




# दशरूपक-विधान

(भरतमुनींच्या "नाट्यशास्त्रा"तील अध्याय १८ व १९ यांचे "अभिनव-भारती" टीकेसह सटीप मराठी भाषांतर)

भाषांतरकार
**प्रा. र. पं. कंगले**



भाषांतरमाला क्र. २७

# दशरूपक-विधान

भरतमुनींच्या "नाट्यशास्त्रा"तील अध्याय १८ व १९ यांचे
"अभिनवभारती" टीकेसह सटीप मराठी भाषांतर


भाषांतरकार
प्रा. र. पं. कंगले






महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ
मुंबई.

# निवेदन

मराठी भाषेला व साहित्याला आधुनिक ज्ञानविज्ञानाच्या व आधुनिक सांस्कृतिक मूल्यांच्या आविष्काराचे सामर्थ्य प्राप्त व्हावे; आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञाने, तंत्र आणि अभियांत्रिकी त्याचप्रमाणे भारतीय प्राचीन संस्कृति, इतिहास, कला इत्यादी विषयांत मराठी भाषेला विद्यापीठाच्या स्तरावर ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य प्राप्त व्हावे; विविध विद्या व कलांबाबत उत्कृष्ट ग्रंथांची निर्मिती करून मराठी भाषेला जागतिक उच्च स्थान मिळवून द्यावे या उद्देशाने महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळाने बहुविध वाङ्मयीन कार्यक्रम आखला असून तो व्यवस्थितपणे कार्यवाहीत आणण्याकरिता विश्वकोश समिती, ललित कला समिती, इतिहास समिती, भाषांतर समिती, मराठी वाङ्मयकोश समिती, प्रकाशन समिती आदी समित्या स्थापन केल्या आहेत.

२. ललित कला समितीच्या कार्यक्रमामध्ये मंडळाच्या बहुविध वाङ्मयीन कार्यक्रमास अधिक संस्कृतीप्रवण करण्यासाठी ललितकलांविषयक नाट्य, नृत्य, वाद्य, चित्र, मूर्ती व गायन या विषयांचे संशोधन, विवरण व इतिहास यांचा अंतर्भाव आहे. या संवर्धित कार्य-क्रमात कला व कलासंबद्ध विषयांवर मूलभूत संशोधन करून लिहिलेले ग्रंथ, संगीत व संगीतशास्त्र, नाटक व नाट्यशास्त्र, नृत्य व शिल्प इत्यादींवरील प्रमाणभूत जुन्या ग्रंथांची भाषांतरे, विविध कलांचा इतिहास, कलाकारांची चरित्रे इत्यादी वाङ्मयाच्या प्रकाशना-बरोबरच संस्कृत व मराठीतर अन्य भारतीय भाषांतील तसेच पश्चिमी व अन्य परदेशी भाषांतील ललितकलाविषयक अभिजात वाङ्मय मराठीत भाषांतरित करून प्रकाशित करण्याचा कार्यक्रम अंतर्भूत आहे. या कलांचा वाङ्मयाच्या द्वारे मराठी वाचकांस संक्षेपाने व विस्ताराने परिचय करून देणे असा मंडळाचा महत्त्वाचा उद्देश आहे.

३. या योजनेखाली मंडळाने श्री. के. नारायण काळे यांनी अनुवादित केलेले स्तानिस्लाव्स्कीचे “अभिनय साधना”, श्री. श्री. ह. देशपांडे यांनी अनुवादित केलेले कॉपलँडचे “संगीत व कल्पकता” आणि डॉ. श्री. ना. रातंजनकर यांनी लिहिलेले “पं. विष्णु नारायण भातखंडे” ही पुस्तके प्रकाशित केली आहेत. भरतमुनींचे “नाट्यशास्त्र” (रस-सिद्धान्तविषयक अध्याय ६ व ७, नाट्यविषयक अध्याय १८ व १९, व संगीतविषयक अध्याय २८), शार्ङ्गदेवाचे “संगीतरत्नाकर”, नंदिकेश्वराचे “अभिनयदर्पण”, भामहाचे “काव्यालंकार”, आनंदवर्धनाचे “ध्वन्यालोक”, दण्डीचे “काव्यादर्श”, विशाखदत्ताचे “मुद्राराक्षस”, कवी हालाची “गाथासप्तशती”, कवी बिहारीची “सतसई”, जयदेव कवीचे “गीतगोविन्दम्”, स्तानिस्लाव्स्कीचे *“Building a Character”*, स्ट्राविन्स्कीचे *“Poetics of Music”*, भरत के अय्यर यांचे “कथाकली”, डॉ. बी. सी. देव यांचा “भारतीय वाद्यांचा कोश”, श्री. वा. ह. देशपांडे यांचे *“Maharashtra's Contribution to Music”* इत्यादी ग्रंथांची भाषांतरे मंडळाच्या वतीने क्रमाने प्रकाशित व्हावयाची आहेत. याशिवाय श्री.

पार्वतीकुमार संपादित "तंजावरची नृत्यसाधना", डॉ. भा. कृ. आपटे संपादित *"Maratha Wall Paintings"*, डॉ. सौ. श्यामला बनारसे लिखित "सांगीतिक मानसशास्त्राची मूलतत्त्वे", डॉ. एस्. व्ही. गोखले यांचे "हिंदुस्थानी संगीतातील लय आणि ताल विचार", डॉ. शं. अ. टेंकशे यांचे "रागवर्गीकरण" इत्यादी ग्रंथही लवकरच मंडळाच्या वतीने प्रकाशित होणार आहेत.

४. मंडळाने ललितकलाविषयक स्वतः प्रकाशित केलेल्या किंवा करावयाच्या ग्रंथां-खेरीज तज्ज्ञ लेखक/कलाकार व कलासंस्था यांना कलाविषयक संशोधनासाठी किंवा प्रका-शनासाठी अनुदानेही दिली आहेत. श्री. ह. वि. दाते यांची "गायनी कळा", श्री. निखिल घोष यांचे "रागतालाची मूलतत्त्वे" व "अभिनव स्वरलेखन पद्धती", प्रा. अशोक रानडे यांचे "संगीताचे सौंदर्यशास्त्र", पं. बाळकृष्ण कपिलेश्वरी यांचे "श्रुतिस्वरदर्शन" व "स्वरप्रकाश", डॉ. ना. ग. जोशी यांचे "मराठी छंदोरचनेचा विकास", श्री. बा. र. देवधर यांनी लिहिलेले "कै. विष्णु दिगंबर पलुस्कर यांचे चरित्र" व "थोर संगीतकार" इत्यादी ग्रंथांच्या प्रकाशना-करिता मंडळाने भरपूर अनुदान दिले आहे. गांधर्व संगीत विद्यालयाच्या "संगीत कला विहार" या मासिकालाही गेली अनेक वर्षे मंडळाचे अनुदान दिले जात आहे.

५. संगीत विषयातील संशोधनाच्या संदर्भात, रुपारेल महाविद्यालय, मुंबई येथील भौतिकी विभागामध्ये मंडळाच्या अनुदानाने संगीत-ध्वनी-विज्ञानाचे मौलिक सशोधन झाले आहे. त्यामधून व्यावहारिक उपयोगाच्या दृष्टीने लक्षणीय अशी माहिती किंवा वाद्य मिळू न शकल्यामुळे ते कार्य आता स्थगित केले आहे. तानसेन म्युझिक ॲकेडेमी, मुंबई या संस्थेला स्वयंचलित 'सूरमंडळ' तयार करण्यास मंडळाने अनुदान दिले आहे. श्री. बा. दा. मोहिते सांगली याना ४८ श्रुतींवर आधारलेल्या सप्तकाची बाजाची पेटी तयार करण्या-साठीही अनुदान दिले आहे. डॉ. ह. वि. मोडक, वास्तव विभाग, वाडिया महाविद्यालय, पुणे यांना दक्षिण भारतातील देवळांतील स्तंभांमधून निघणाऱ्या संगीतसूरांच्या संशोधना-करिताही अनुदान दिले असून त्यांची ध्वनिमुद्रिते तयार झाली आहेत. दण्डतारारहित तंबोरा तयार करण्याचा प्रयत्न कै. डॉ. बी. बी. निंभोरकर, अमरावती यांनी काही वर्षे केला. त्याकरिताही मंडळाने अनुदान दिले आहे. एकंदरीत संशोधनाच्या प्रयत्नांतून प्रायोगिक उपयुक्ततेच्या दृष्टीने लक्षणीय यश प्राप्त झालेले नाही हे येथे नमूद केले पाहिजे. परंतु, संशोधनाचे प्रयत्न सतत चालले पाहिजेत व त्याकरिता उत्तेजनही दिले गेले पाहिजे म्हणून मंडळ सतत प्रयत्नशील आहे. जे. ग्रिफिथ्स् या इंग्लिश संशोधक कलावेत्त्याने अजिंठा येथील चित्रांचा समग्र संग्रह काही वर्षांपूर्वी प्रसिद्ध केला होता. अजिंठा येथील चित्रकला ही भारतातील प्राचीन चित्रकलेचा एक वैभवशाली भाग आहे. या चित्रसंग्रहाचे पुनर्मुद्रण करून ते प्रकाशित करण्याची कार्यवाही मंडळातर्फे चालू आहे.

६. भरतमुनींच्या "नाट्यशास्त्र" या अभिजात संस्कृत ग्रंथातील नाटक व नाट्य-शास्त्रविषयक अध्याय १८ व १९ चे प्रस्तुत भाषांतर अभिनवगुप्ताच्या "अभिनवभारती" टीकेसह प्रा. र. पं. कंगले, मुंबई यांनी मंडळास करून दिले आहे. नाट्याचे प्रकार, व्याख्या व रचना यासंबंधीचे विवेचन भरतमुनींनी नाट्यशास्त्रात केले आहे. "दशरूप-निरूपणम्" नामक अध्याय १८ मध्ये नाटक, प्रकरण वगैरे रूपकाच्या दहा प्रकारांचे वर्णन केले आहे. "इतिवृत्त" नामक अध्याय १९ मध्ये कथानकाचा विचार केला आहे. कथानकाच्या अवस्था, अर्थप्रकृती, सन्धी, संध्यंगे, संध्यंतरे, पताकास्थान इत्यादींचे विवेचन केले असून शेवटी नाटकात सर्वप्रकारच्या लोकस्वभावाचे दर्शन घडवावे असे सांगून नाटकाच्या रचनेविषयीं काही सूचना केल्या आहेत.

७. प्रा. कंगले यांनी प्रस्तुत भाषांतर शब्दशः व "अभिनवभारती" टीकेच्या अनु-रोधाने केले असून शब्दशः केलेले भाषांतर ज्या ठिकाणी दुर्बोध वाटण्याचा संभव आहे त्या ठिकाणी अर्थ विशद करण्यासाठी टीपांचा भरपूर उपयोग केला आहे. प्रस्तुत भाषांतर "दशरूपक-विधान" नावाने प्रकाशित करण्यास मंडळास आनंद होत आहे. भाषांतर आणि टीपा यांच्या साहाय्याने भरतमुनी व अभिनवगुप्त यांचे नाटक व नाटयशास्त्रविषयीचे विचार समजून घेणे वाचकांस सुलभ होईल अशी आशा आहे.

१ फाल्गुन १८९५
महाशिवरात्री
२० फेब्रुवारी, १९७४
सचिवालय,
मुंबई - ४०० ०३२.

**लक्ष्मणशास्त्री जोशी**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ.

# विषयानुक्रम

# उपोद्घात

## रूपक

भरताच्या नाट्यशास्त्रात ज्या अनेक विषयांचे विवेचन आहे त्यांपैकी नाटक, प्रकरण आदी रूपकांचे प्राधान्य निर्विवाद आहे. कारण नटांच्या द्वारा रंगभूमीवर प्रस्तुत केले जाणारे जे नाट्य ते मुख्यत्वेकरून ह्या रूपकांच्या प्रयोगाशीच संबद्ध आहे. इतर बहुतेक विषय ह्या नाट्यप्रयोगाच्या संदर्भात अनुषंगाने आले आहेत. तेव्हा रूपकांच्या विवेचनाला ह्या ग्रंथात महत्त्वाचे स्थान असावे यात आश्चर्य नाही.

रूपकाच्या नाटक, प्रकरण इत्यादी दहा प्रकारांचे विवेचन नाट्यशास्त्राच्या अठराव्या अध्यायात केले असून एकोणविसाव्या अध्यायात त्याच्या कथानकाची घडण व मांडणी यासंबंधी विचार केला आहे. रूपक शब्दाची व्याख्या नाट्यशास्त्रात कोठे केली नाही. किंबहुना, ज्या काव्याच्या गुण, अलंकार, लक्षण आदी विशेषांचे विवरण अगोदरच्या अध्यायांत केले आहे ते काव्य म्हणजेच रूपक हे नाट्यशास्त्रात गृहीत धरले आहे. अभिनेय म्हणजे अभिनयद्वारा व्यक्त होऊ शकणारे रूपकाच्या स्वरूपाचे काव्य अणि अनभिनेय असे इतर काव्य यांमध्ये नाट्याशास्त्रावरील टीकाकारांनी केलेला भेद भरताने उपेक्षिला आहे. दहा रूपकांची उत्पत्ती वृत्तींपासून झाली हे स्पष्ट करताना त्याने असे म्हटले आहे की वृत्ती सर्वच काव्याच्या मातृस्थानी आहेत (१८.४). पण काव्य म्हणजे नाटकादी रूपकप्रकार असेच त्याला सर्वत्र अभिप्रेत आहे.

यासंबंधात एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. 'रूपक' असा शब्दप्रयोग नाट्यशास्त्रात आढळत नाही. त्यात सर्वत्र 'रूप' ह्या शब्दाचाच उपयोग केला आहे; उदाहरणार्थ, १७.२६,१४९,१५०; १८.१,४,९,११६; १९.४५,१३० या ठिकाणी आणि अठराव्या अध्यायाच्या शेवटी 'दशरूपनिरूपण' या त्याच्या नामाभिधानात. असे म्हणण्यास हरकत नाही की नाट्यस्वरूप काव्याला प्रारंभी 'रूप' अशीच संज्ञा होती आणि 'रूपक' ही संज्ञा नंतरच्या काली प्रचारात आली. अभिनेय स्वरूपाच्या काव्याला म्हणजे नाट्याला 'रूप' अशी संज्ञा देण्याचे कारण नाट्य दृश्य असते असे उत्तरकालीन ग्रंथकारांनी दिले आहे. 'अवस्थानुकृतिर्नाट्यं रूपं दृश्यतयोच्यते' असे दशरूपकार धनंजयाने

म्हटले आहे ( द. रू. १.७ ). चक्षुरिन्द्रियाचा विषय रूप हे प्रसिद्ध आहे. रूप् म्हणजे पहाणे ह्या धातूपासून हा शब्द निष्पन्न झाला असल्याचे यात अभिप्रेत आहे. तथापि हे सुद्धा लक्षात ठेवले पाहिजे की विद्यमान संस्कृत नाटकांत काही ठिकाणी 'नाटयति' ऐवजीं 'रूपयति' अशा तऱ्हेच्या नाट्यसूचना आढळतात. म्हणजे रूप् धातू 'अभिनयाने व्यक्त करणे' या अर्थी वापरलेला दिसून येतो. 'रूप' शब्द त्यातील धातूच्या ह्या अर्थाशीही संबद्ध असण्याची शक्यता आहे.

नाट्यशास्त्रात 'रूप' शब्दाचा उपयोग दहा नाट्यप्रकारांच्या संदर्भातच केला आहे. एरव्ही ह्या वाङ्मयप्रकाराचा निर्देश काव्य शब्दाने केला आहे. कवीने निर्मिलेल्या नाट्यात्म कृतीला 'काव्यबन्ध' असे काही ठिकाणी म्हटले आहे; उदाहरणार्थ १८.५,६,९ ३७,६१; १९.१२९ इत्यादी ठिकाणी. रचनेच्या दृष्टीने ज्याला काव्यबन्ध म्हटले आहे त्याचाच प्रयोगाच्या दृष्टीने रूप शब्दाने निर्देश होतो. दशरूप प्रयोगासाठीं वृत्तींपासून निर्माण झाले असे भरताने सांगितलेच आहे (१८.४). प्रयोगासंबंधीचा विचार नाट्य-शास्त्रात इतर अनेक अध्यायांत मिळून विस्ताराने केला आहे. प्रस्तुत अठराव्या व एकोणविसाव्या अध्यायांत निरनिराळ्या रूपकप्रकारांचे विवेचन काव्यबन्ध म्हणून म्हणजे त्यांच्या रचनेच्या दृष्टीनेच मुख्यतः केले आहे.

## वृत्ती

ज्या वृत्तींपासून दहा रूपकांची निष्पत्ती झाल्याचे म्हटले आहे त्या वृत्तींचे निरूपण नाट्यशास्त्राच्या विसाव्या अध्यायात केले आहे. सृष्टिसंहारानंतर भगवान विष्णु शेषावर शयन करीत असता मधु आणि कैटभ हे दोन असुर उन्मत्त होऊन त्याच्याशी नियुद्ध करण्यास प्रवृत्त झाले. त्याप्रसंगी त्यांचा वध करण्याच्या निमित्ताने जे व्यापार घडून आले त्यांना भारती, सात्त्वती, कैशिकी आणि आरभटी ह्या चार वृत्तींचे स्वरूप प्राप्त झाले असे तेथे म्हटले आहे. भारती वृत्ती वाक्प्रधान म्हणजे मुख्यतः वाचिक अभिनयाने युक्त असून प्ररोचना (पूर्वरङ्गाचे एक अंग), आमुख (म्हणजे प्रस्तावना), वीथी आणि प्रहसन (दहा रूपकप्रकारांपैकी दोन) ही तिची चार अंगे होत. सात्त्वती वृत्ती वाचिक आणि आङ्गिक अभिनयांनी युक्त व मुख्यतः वीररौद्रादी रसांचा आविष्कार करणारी असून उत्थापक, परिवर्तक, सल्लापक आणि संघात्य ही तिची चार अंगे होत. कैशिकी वृत्तीत स्त्रियांचे प्राधान्य असून नृत्त आणि गीत मोठ्या प्रमाणात असतात. नर्म, नर्मस्फुञ्ज, नर्मस्फोट आणि नर्मगर्भ अशी तिच्या चार अंगांची नावे आहेत. चौथ्या आरभटी वृत्तीत कपट, वञ्चना, अनृतवचन इत्यादी गोष्टी असतात आणि संक्षिप्तक, अवपात, वस्तूत्थापन व संफेट ही तिची चार अंगे होत. अभिनवगुप्ताने एका श्लोकावरील व्याख्येत असे म्हटले आहे की भारती वृत्ती पाठ्यप्रधान असते, सात्त्वती अभिनयप्रधान, आरभटी

रसप्रधान आणि कैशिकी गीतवाद्योपरञ्जकप्रधान (२०.२३ वरील टीका). यावरून असा निष्कर्ष निघतो की वृत्ती नाट्यप्रयोगाच्या अभिनयादी विविध अंगांशी संबद्ध आहेत. आणि म्हणूनच वृत्तींपासून दहा रूपकांची निर्मिती झाली असे म्हटले आहेसे दिसते.

नाट्यशास्त्रात केलेल्या वृत्तींच्या विवेचनावरून त्यांच्या स्वरूपाची निश्चित कल्पना करणे कठीण आहे. भारती वृत्ती स्त्रीवर्जित असल्याचे आणि संस्कृत पाठ्याने युक्त असल्याचे म्हटले आहे. मग स्त्रियांच्या प्राकृत पाठयाचा कोणत्या वृत्तीने निर्देश करता येइल? ह्या वृत्तीत नट आपापल्या नावानेच प्रयोगात काम करतात (स्वनामधेयैर्भरतैः प्रयुक्ता) असे म्हटले आहे. ही गोष्ट फक्त प्रस्तावनेत होते. मग संपूर्ण नाटकातील पाठ्याचा भारती वृत्तीशी संबंध प्रस्थापित होणे कसे शक्य आहे? सात्त्वती आणि आरभटी ह्या दोन्ही वृत्तींच्या वर्णनात रौद्र रसाचा निर्देश अभिप्रेत आहे. तेव्हा त्यांच्यातील भिन्नता स्पष्टपणे प्रतीत होत नाही. अध्यायाच्या शेवटी कैशिकी हास्य व शृङ्गार हे रस प्रधान असलेली, सात्त्वती वीर आणि अद्भुत रस असलेली, आरभटी रौद्र आणि भयानक रसांनी युक्त आणि भारती बीभत्स व करुण रसांनी युक्त अशा प्रकारे ह्या चार वृत्तींचा रसांशी संबंध जोडला आहे (२०.७३-७४). परंतु मुळात वृत्ती रसनिरपेक्ष असण्याचाच अधिक संभव आहे.

ह्या वृत्तींच्या संबंधात अभिनवगुप्ताने इतरत्र असे म्हटले आहे की मानवी व्यापार म्हणजे मनुष्याचे चेष्टित तीन प्रकारचे असते — वाक्, मनस् आणि काय यांच्या द्वारा होणारे. ही तीन प्रकारची चेष्टिते म्हणजे अनुक्रमे भारती, सात्त्वती आणि आरभटी ह्या तीन वृत्ती होत. आणि त्या तीनही चेष्टितांत सौन्दर्योपयोगी असा जो व्यापार ती कैशिकी वृत्ती (१.४१ श्लोकावरील टीका). वृत्तींच्या स्वरूपासंबंधीची ही उपपत्ती मान्य होण्यासारखी आहे. तथापि, हे उघड आहे की ही उपपत्ती आणि विसाव्या अध्यायातील वृत्तींचे वर्णन यात काही अंशी भिन्नता आहे. किंबहुना, अभिनवगुप्ताच्या दोन्ही ठिकाणच्या विधानातही एकवाक्यता नाही. पहिल्या अध्यायात त्याने सात्त्वतीचा मनोव्यापाराशी आणि आरभटीचा शारीरिक चेष्टिताशी संबंध जोडला आहे तर विसाव्या अध्यायात सात्त्वती अभिनयप्रधान म्हणजे मुख्यतः आंगिक व्यापाराशी संबद्ध आणि आरभटी अनुभावांच्या आवेशामुळे मुख्यतः रसपरिपोषास कारणीभूत असल्याचे म्हटले आहे.

यासंबंधात एक विचार मांडता येण्यासारखा आहे. श्री वासुदेवशरण अग्रवाल यांनी आपल्या पाणिनीवरील ग्रंथात असे सुचविले आहे की आरभटी हा शब्द वायव्येकडील आरभट ह्या प्रदेशविशेषावरून बनला आहे. ग्रीक इतिहासकारांनी ह्या प्रदेशाचा निर्देश आराबितै (Arabitai) या शब्दात केला आहे.[१] आरभटी शब्दाचे हे निर्वचन

१ V. S. Agrawala, *India as known to Pāṇini,* (Lucknow, 1953), p.450.

संभाव्य मानले तर इतर वृत्तींच्या नावांच्या संबंधातही तशाच स्वरूपाची व्युत्पत्ती सुचविता येण्यासारखी आहे. भरत हे एका प्रख्यात प्राचीन वंशाचे नाव सर्वश्रुत आहे. सात्त्वत हे यादवांपैकी एका गणाचे नावही प्रसिद्ध आहे. अन्यत्र काही ठिकाणी निर्देशिलेल्या क्रथकैशिक जनपदाशी कैशिक नावाचा संबंध जोडता येण्यासारखा आहे. तेव्हा भारती, सात्त्वती आणि कैशिकी ही वृत्तींची नावे सुद्धा विशिष्ट जनपद अथवा तेथील लोकांच्या नावांपासून सिद्ध झाली आहेत असे सूचित करता येईल. यावरून अशी कल्पना करता येईल की निरनिराळ्या प्रदेशांत प्रामुख्याने प्रचलित असलेल्या नाट्य-प्रयोगाच्या विविध शैलींवरून ही वृत्तींची नावे मुळात प्रचारात आली. उत्तरकालीन आलंकारिकांनी काव्याच्या विविध शैलींना दिलेली वैदर्भी, गौडी, पाञ्चाली इत्यादी नावे प्रदेशविशेषांवरून पडली आहेत हे प्रसिद्ध आहे. काव्याच्या रीतीप्रमाणेच नाट्य-प्रयोगातील वृत्तीही मूलतः निरनिराळ्या प्रदेशांत आढळून येणाऱ्या भिन्नतेवर आधारित आहेत असे म्हटले तर ते सर्वथा असंभाव्य वाटू नये.

### रूपकप्रकार

अठराव्या अध्यायात दहा रूपकप्रकारांच्या वैशिष्ट्यांचे विवेचन विस्तृतपणे केले आहे. दहा रूपकांव्यतिरिक्त आणखीही एका प्रकाराचे – नाटिकेचे – वर्णन ५२-५५ या आर्यांत केलेले आढळते. परंतु नाट्यशास्त्रातील हा भाग मूळ भरतकृत नसून मागाहून त्यात घातला आहे हे उघड आहे. भरताला जर खरोखरच नाटिकेचे वर्णन करावयाचे असते तर रूपकप्रकारांचा नामनिर्देश करणाऱ्या प्रारंभीच्या उद्देशाच्या २ व ३ ह्या श्लोकांत तिचा निर्देश अवश्य केला असता. प्रथम उद्देश आणि नंतर लक्षण ही पद्धती त्याने सर्वत्र अवलंबिली आहे. तिचा या ठिकाणी त्याग केला असल्याची शक्यता नाही. भरतानंतर झालेल्या कोहलप्रभृती नाट्यशास्त्रावरील ग्रंथकारांनी दहाव्यतिरिक्त इतरही काही रूपक-प्रकारांना मान्यता दिली होती. त्यांच्या मताचा अनुवाद करणारे काही अंश भरताच्या नाट्यशास्त्रातही प्रक्षिप्त करण्यात आले आहेत. नाटिकाविषयक प्रस्तुत अंश हा त्यांपैकीच एक. पण हा प्रक्षेप अभिनवगुप्ताच्या बरीच वर्षे अगोदर करण्यात आला होता यात शंका नाही. कारण ह्या भागावर त्याच्याही अगोदरच्या टीकाकारांनी टीका लिहिल्या होत्या हे अभिनवभारतीवरून स्पष्ट आहे.

अभिनवगुप्ताने नाटिकेसंबंधीचा भाग प्रमाणभूत मानला यात काही आश्चर्य नाही. त्याच्या समोर कोहलादींचे ग्रंथ होते. आणि त्या ग्रंथांच्या प्रभावामुळेच त्याने असे प्रतिपादन केले आहे की रूपकांचे दहाच प्रकार भरताला अभिप्रेत आहेत असे नसून कोहलादींनी निर्देशिलेले तोटक, सट्टक, रासक इत्यादि प्रकारांचा समावेश त्याला अभिप्रेत आहे. हे सिद्ध करण्यासाठी त्याने पहिल्या श्लोकातील 'प्रयोगतः' शब्दाचा

स्वाभाविक अर्थ न स्वीकारता 'निर्दिष्ट केलेल्या रूपकप्रकारांच्या उचित अशा संमिश्रणाने उत्पन्न होणाऱ्या नवीन प्रकारांच्या अनुरोधाने' अशा त-हेचा केला आहे. त्याचप्रमाणे चौथ्या श्लोकावरील टीकेत त्याने असा युक्तिवाद केला आहे की कोणताही रूपकप्रकार निर्भेळ नसतो. प्रत्येक रूपकप्रकारात इतर प्रकाराचेही अंश विद्यमान असतात. उदाहरणार्थ, वीथीची अंगे सर्व प्रकारांत असतात. तसेच आकाशभाषिताच्या रूपात भाणही इतर प्रकारांत असतो. फक्त ज्या प्रकाराचे विशेष प्राधान्येकरून ज्यात विद्यमान असतात त्या प्रकाराचे नाव त्या रूपकाला दिले जाते. यावरून असा निष्कर्ष निघतो की दशरूप शब्दातील दहा ही संख्या 'एवढेच प्रकार होत' अशा त-हेचे नियमन करणारी नाही. याचा अर्थ असा की प्रत्यक्ष जरी दहाच प्रकारांचा निर्देश केलेला असला तरी त्याव्यतिरिक्त इतरही प्रकारांचे अस्तित्व मान्य करणे आवश्यक आहे.

दशरूपकार धनंजयाने दहा रूपकांशिवाय नाटिकेचाही विचार केला आहे. पण त्याने कोहलादींनी स्वीकारलेल्या अन्य प्रकारांची सर्वस्वी उपेक्षा केली आहे. त्याने केलेले नाटिकेचे वर्णन (द. रू. ३.४३-४८) नाटयशास्त्रातील वर्णनाहून बऱ्याच अंशी भिन्न आहे. नाटिकेत अंकांची संख्या एक, दोन किंवा तीन अशीही असू शकते आणि तिच्यातील पात्रे विविध स्वरूपाची असू शकतात असे त्याने म्हटले आहे. साहित्यदर्पणकार विश्वनाथाने नाटिका, त्रोटक, गोष्ठी, सट्टक, नाटयरासक, प्रस्थान, उल्लाप्य, काव्य, प्रेङ्खण, रासक, संलापक, श्रीगदित, शिल्पक, विलासिका, दुर्मल्लिका, प्रकरणिका, हल्लीश आणि भाणिका ह्या अठरा प्रकारच्या उपरूपकांचा निर्देश केला असून (सा. द. ६.४-५) त्यांच्या व्याख्या व उदाहरणे दिली आहेत. यांतील काही प्रकारांत नृत्य-गीत व शृङ्गाररस यांना प्राधान्य असलेले दिसून येते, तर काही प्रकार वाङ्मयदृष्टया अधिक महत्त्व पावले होते. या सर्वांची उपरूपक म्हणून गणना उत्तरकाली होऊ लागली. पण भरताच्या काळी यांतील काही प्रकार अस्तित्वात असले तरी त्याने त्यांची सर्वथा उपेक्षा केली आहे यात शंका नाही.

## नाटक

नाटयशास्त्रात असे म्हटले आहे की नाटक आणि प्रकरण हे दोनच रूपकप्रकार चारही वृत्तींनी युक्त असतात आणि इतर सर्व प्रकारांत कैशिकी वृत्तीचा अभाव असतो. (१८.६–९). त्याचप्रमाणे कथानकाचा विकास निदर्शित करणारे पाचही संधी फक्त नाटक व प्रकरण या दोन प्रकारांतच असतात. डिम व समवकार यांत अमवर्श संधी नसतो, व्यायोग आणि ईहामृग यांत गर्भ व अमवर्श हे दोन संधी नसतात. तर प्रहसन, वीथी, उत्सृष्टिकाङ्क आणि भाण या इतर प्रकारांत तीन संधींचा अभाव असून फक्त मुख आणि निर्वहण हें दोन संधीच विद्यमान असतात (१९.४२-४४). याचा अर्थ

कथानकाच्या विकासाचे महत्त्व या प्रकारांत क्रमशः कमी कमी होते. परिणामतः या इतर आठ प्रकारांत पताका व प्रकरी या दोन अर्थप्रकृतींची योजनाही अनावश्यक ठरते. तेव्हा परिपूर्ण स्वरूपाचे रूपकप्रकार दोनच – नाटक आणि प्रकरण.

नाटक आणि प्रकरण हे दोन्हीही परिपूर्ण स्वरूपाचे असले तरी त्यांपैकी नाटक ह्या रूपकप्रकाराचे श्रेष्ठत्व निरपवादपणे मान्य झाले आहे. नाटयशास्त्रात सर्वप्रथम नाटकाचा विचार केला आहे, त्यानंतर इतर प्रकारांचा. इतकेच नाही, तर नाटक हा शब्द रूपक शब्दाचा पर्याय म्हणूनही वापरला आहे. जेव्हा कोणत्या एका विशिष्ट रूपकप्रकाराचा निर्देश करावयाचा नसून सर्वसाधारण रूपकांचा निर्देश अभिप्रेत असतो तेव्हा रूप अथवा रूपक शब्दाऐवजी नाटक शब्दाचा उपयोग अनेक ठिकाणी केला आहे.

नाटकाचे कथानक प्रख्यात असावे असे म्हटले आहे. याचा अर्थ ते रामायण महाभारतादी ग्रंथांवरून घेतलेले असावे. त्याचा नायक प्रसिद्ध असा राजा असणे आवश्यक आहे. राजाव्यतिरिक्त इतर कोणीही नाटकाचा नायक असू शकत नाही. नाटकात देव नायक असत नाहीत याचे कारण अभिनवगुप्ताने असे दिले आहे की नाटकात विविध भावांचा व रसांचा आविष्कार आवश्यक असतो. पण देवांच्या संबंधात विप्रलम्भशृङ्गार, करुण, भयानक आदि रसांची व तत्संबद्ध भावांची योजना नसेल तर नाटकाच्या रंजकतेत वैचित्र्य येणार नाही, व त्यामुळे प्रेक्षकांमध्ये हृदयसंवाद उत्पन्न न झाल्याकारणाने रसास्वाद असंभव होईल. शिवाय, देव दुःखापासून मुक्त असतात. तेव्हा त्यांच्या चरितात दुःखमय प्रसंगांच्या निवारणाचे उपाय दिसून येत नसल्यामुळे प्रेक्षकांना तशा नाटकापासून काही बोधही घेता येणार नाही. इतर काही रूपकप्रकारांत देव नायक असू शकतात, पण नाटकात नाही. उत्तरकालीन साहित्यदर्पणात मात्र नाटकात सुद्धा दिव्य नायक असू शकतो असे म्हटले आहे. (सा.द. ६.९).

नाटयशास्त्राच्या चोविसाव्या अध्यायात धीरोद्धत, धीरललित, धीरोदात्त आणि धीरप्रशान्त अशा चार प्रकारच्या नायकांचा निर्देश केला असून देव धीरोद्धत असतात, राजे धीरललित, सेनापति आणि अमात्य धीरोदात्त आणि ब्राह्मण व वणिक धीरप्रशान्त असतात असे पुढे म्हटले आहे (२४.१७-१९). त्यावरून असा निष्कर्ष निघण्याचा संभव आहे की नाटकाचे नायक जे राजे ते सर्वत्र ललित प्रकृतीचेच दाखविणे आवश्यक आहे. परंतु हा निष्कर्ष मान्य होण्यासारखा नाही हे उघड आहे. नाटकाच्या वर्णनात नायक उदात्त असावा असेच म्हटले आहे. यासंबंधात अभिनवगुप्ताने असे स्पष्टीकरण केले आहे की ललित प्रकृती कोणा नायकाच्या ठिकाणी दाखवावयाची असेल तर ती फक्त राजाच्याच ठिकाणी दाखवावी, इतर कोणाच्या नाही.

नाटकाच्या वर्णनात नायकाव्यतिरिक्त इतर पात्रांचा साक्षात उल्लेख केलेला नाही. उदाहरणार्थ, नायिका कोण असावी ते सांगितलेले नाही. तथापि, पुढे चोविसाव्या अध्यायात नायकांप्रमाणेच नायिका सुद्धा चार प्रकारच्या असल्याचे म्हटले आहे. दिव्यस्त्री, नृपपत्नी, कुलाङ्गना आणि गणिका अशा चार प्रकारच्या नायिकांचा तेथे निर्देश केला असून त्यांची प्रकृती धीर, ललित, उदात्त आणि शान्त या प्रकारांची असते असे सांगितले आहे. गणिकेची प्रकृती ललित व उदात्त, कुलस्त्रीची उदात्त व शान्त आणि दिव्यस्त्री व नृपपत्नी यांची चारही प्रकारची असू शकते असा भरताच्या म्हणण्याचा आशय दिसतो (२४.२३-२६). यांपैकी गणिका आणि कुलस्त्री यांना नाटकात नायिकेचे स्थान प्राप्त होण्यासारखे नाही. त्यांना तसे स्थान प्रकरणात मिळू शकते. नाटकात फक्त दिव्यस्त्री किंवा नृपपत्नीच नायिका असू शकते. राजा नायक असताही दिव्याङ्गना नायिका असते याचे प्रसिद्ध उदाहरण विक्रमोर्वशीय आहे, त्याचा निर्देश अभिनवगुप्ताने केलाच आहे.

अठराव्या अध्यायात नाटक व प्रकरण दोहोंच्या संबंधात असे म्हटले आहे की त्यांत पुष्कळ मनुष्यांची गर्दी नसावी, कार्यपुरुष म्हणजे कार्यसिद्धीला उपयोगी होणारी माणसे चार किंवा पाच असावीत (१८.३६). नाटकातील अंकाचे वर्णन करताना नायक, देवी, गुरुजन, पुरोहित, अमात्य आणि सार्थवाह यांच्या द्वारा रसांचा अविष्कार होतो असे म्हटले आहे (१८.१७). हेच कार्यपुरुष म्हणून अभिप्रेत असावेत.

नाटकाच्या वर्णनात ते सुख आणि दुःख यांच्या उत्पत्तीने युक्त असून त्यात विविध रसांचा आणि भावांचा आविष्कार करणारी चेष्टिते असावीत असे म्हटले आहे (१८.१२). पुढे एकोणविसाव्या अध्यायाच्या शेवटी नाटकाची महती वर्णन करताना लोकांच्या सुख-दुःखात्मक विविध अवस्थांचे चित्रण त्यात असल्याचे सांगून त्यात सर्व रस, सर्व भाव, सर्व प्रकारच्या कर्मप्रवृत्ती यांचे दर्शन होत असल्याचे म्हटले आहे (१९.११९,१२४). उत्तर-कालीन ग्रंथकारांनी नाटकात प्रधान रस म्हणून शृङ्गार अथवा वीर रसाची योजना करावयास सांगितले आहे (सा. द. ६.१०) ते भरताला मान्य होण्यासारखे आहे असे रसाध्यायातील विवेचनावरून म्हणता येते. प्रस्तुत ठिकाणी रसविषयक एवढाच उल्लेख आहे की निर्वहण संधीत अद्भुत रसाची अवश्य योजना करावी (१८.३८). याचा अर्थ असा होतो की नाटकातील कथानकाचा शेवट आश्चर्यकारक घटनांनी होत असल्याचे दाखविणे आवश्यक आहे.

## अंक आणि प्रवेशक

नाटक अंक आणि प्रवेशक यांनी समृद्ध असावा असे म्हटले आहे (१८.११). या दोहोंचे स्वरूप स्पष्ट करण्यासाठी अनेक आर्या (१३–३४) खर्ची घातल्या आहेत. यांतील

१५ व्या आर्येची व्याख्या करताना अभिनवगुप्ताने तिच्यात चूलिका, अङ्कावतार व अङ्क-मुख या तीन अर्थोपक्षेपकांचा निर्देश अभिप्रेत असून अंकाचे हे तीन निरनिराळे प्रकार होत असा त्या आर्येचा निष्कर्ष असल्याचे म्हटले आहे. पण ही त्याची व्याख्या मान्य होण्यासारखी नाही. भरताला हे तीन अर्थोपक्षक अवगत नाहीत. किंबहुना, अर्थोपक्षेपक शब्दाचाही त्याने कोठे उपयोग केलेला नाही. एकोणविसाव्या अध्यायात १०१ व्या श्लोका-नंतर पाच अर्थोपक्षेपकांचे वर्णन करणारे सात श्लोक आढळतात हे खरे आहे. पण हे श्लोक प्रक्षिप्त आहेत यात शंका नाही. नाट्यशास्त्रात फक्त प्रवेशक आणि विष्कम्भक यांचेच विवेचन आहे. इतर तीन अर्थोपक्षेपकांचा निर्देश कोहलप्रभृती नंतरच्या शास्त्रकारांनी केला आहे असे अभिनवगुप्तानेच म्हटले आहे.

यासंबंधात दुसरी एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. नाट्यशास्त्रात नाटकाच्या वर्ण-नात फक्त प्रवेशकाचाच निर्देश केला आहे. विष्कम्भकाचे वर्णन प्रकरणाचे निरूपण करताना केले आहे, आणि तसे करताना विष्कम्भकाची योजना प्रवेशकाप्रमाणे करावी असे म्हटले आहे (१८.४९). यावरून असे दिसते की नाटकात प्रवेशकांची योजना तर प्रकरणात विष्कम्भकांची अशीच व्यवस्था भरताला मुख्यतया अभिप्रेत होती. अर्थात प्रकरणात प्रवेश-कांची योजना सुद्धा त्याने संभाव्य मानली आहे. त्याने असे म्हटले आहे की नाटक आणि प्रकरण यांत पाच ते दहा अंक असावेत आणि जितके अंक तितक्याच प्रवेशकांची त्यांत योजना करावी (१८.२५). यावरून असा निष्कर्ष निघतो की नाटकात प्रस्तावनेनंतर पहिल्या अंकाच्या पूर्वीही प्रवेशकाची योजना करावी असे भरताचे मत होते. अभिनव-गुप्ताने उद्धृत केलेल्या कोहलाच्या मतानुसार विष्कम्भकाची योजना फक्त मुखसंधीतच म्हणजे पहिल्या अंकाच्या पूर्वी किंवा पहिला अंक व दुसरा अंक यांच्यामध्ये या ठिका-णीच करावी. अभिनवगुप्ताने स्वतः हे मत अग्राह्य ठरवून विष्कम्भकांची योजना नंतरही करावयास हरकत नाही असा युक्तिवाद केला आहे. तथापि, नाटकातही विष्कम्भक असू शकतात हे नाट्यशास्त्रात व्यक्त न झालेले मत त्याला मान्यच होते. प्रवेशक आणि शुद्ध व संकीर्ण असे दोन प्रकारचे विष्कम्भक यांचे वर्णन १८.२९ आणि १८.४९–५० या ठिकाणी केले आहे, त्यावरून त्यांच्यामधील भेद स्पष्ट होतात.

अंकाच्या स्वरूपाची चर्चा करताना भरताने त्यात कोणत्या गोष्टी दाखवाव्यात आणि कोणत्या दाखवू नयेत याचा निर्देश केला आहे. न दाखवावयाच्या गोष्टींमध्ये युद्ध आणि मृत्यू ह्या प्रधान होत. त्यांचा निर्देश प्रवेशकांच्या द्वारा करावयास सांगि-तले आहे (१८.३३). एका अंकातील वृत्त एका दिवसातच घडून येणारे असावे आणि दोन अंकांच्या मध्ये व्यतीत होणारा काल एका वर्षाहून केव्हाही अधिक असता कामा नये असे भरताने म्हटले आहे. (१८.१९,२६). या संबंधात अभिनव-

गुप्ताने असा युक्तिवाद केला आहे की किती काळ लोटला याचा विचार करताना ज्या वर्षी काही वृत्त घडले असेल तेच विचारात घेतले पाहिजे, सुनी गेलेली इतर वर्षे नाही. म्हणून रामाच्या वनवासाचा काल जरी चौदा वर्षांचा असला तरी त्यांपैकी फक्त दोन तीन वर्षींच काही घटना घडल्या. त्यामुळे नाटकाच्या प्रारंभी वनवास-गमन दाखवून शेवटी रामाला अयोध्येत होणारा अभिषेक दाखविण्यास काही हरकत नाही. अंकाच्या वर्णनात भरताने असे म्हटले आहे की त्यात नायक संनिहित असावा (१८.२४). याचा अर्थ नाटकाच्या प्रत्येक अंकात नायकाची उपस्थिती आवश्यक मानली आहे. कथानकाच्या विकसित होणाऱ्या प्रत्येक अवस्थेशी फलस्वाम्याचा अधिकारी म्हणून नायकाचा संबंध अनिवार्य असतो यास्तव हे विधान केले आहे हे उघड आहे. पण अनेक विद्यमान नाटकांत या नियमाचे पालन झालेले दिसत नाही.

नाटकात काय दाखवू नये याचे विवेचन करताना भरताने म्हटले आहे की नाटक आणि प्रकरण या दोन प्रकारांत नायकाचा वध झालेला अंकामध्ये दाखविता कामा नये किंवा प्रवेशकातही निदर्शित करू नये. नायकावर मोठे संकट गुजरलेले दाखवावयाचे असेल तर त्याने आपल्या राज्यातून पलायन केलेले दाखवावे किंवा अधिकात अधिक म्हणजे त्याला बंदिवास झालेला दाखवावा (१८.३४-३५). नाटकाच्या शेवटी प्राप्त होणारे फल नायकालाच मिळावयाचे असल्यामुळे मध्येच त्याचा वध झालेला दाखविल्यास कथानकात विसंगती उत्पन्न होईल हें उघड आहे.

## प्रकरण

नाटकानंतर प्रकरण ह्या दुसऱ्या रूपकप्रकाराचा विचार केला आहे. मुख्यत: दोन गोष्टींच्या बाबतीत प्रकरण नाटकाहून भिन्न असते, एक त्यातील कथानकाचा विषय आणि दुसरी त्याचे नायक आणि नायिका. प्रकरणाचे कथानक सर्वथा कविकल्पित असते, रामायणमहाभारतादीतील एखाद्या प्रसिद्ध प्रसंगावर त्याची उभारणी झालेली नसते (१८.४०). नाट्यशास्त्रात असाही विचार मांडला आहे की कोणा अगोदरच्या कवीने कल्पिलेल्या कथेच्या आधारानेही प्रकरणाच्या कथानकाची रचना करावयास हरकत नाही (१८.४१). बृहत्कथेसारख्या ग्रंथावरून कथानक घेता येते असा याचा अभिनवगुप्ताने खुलासा केला आहे. कथाविषय प्रसिद्ध नसावा या गोष्टीवर जोर दिला आहे. पण याहून अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे नायक व नायिका यांच्या संबंधात प्रकरणाची भिन्नता. प्रकरणाचा नायक ब्राह्मण, वणिक, सचिव, पुरोहित, अमात्य आणि सार्थवाह ह्यांपैकी कोणीतरी असावा आणि नायिका कुलस्त्री किंवा वेश्या असावी असे म्हटले आहे. त्याचा नायक उदात्त नसावा आणि त्यात राजाच्या अथवा देवतेच्या चरिताचे दर्शन नसावे असे स्पष्ट म्हटले आहे (१८.४३-४४). नायिकेच्या संबंधात भरताच्या म्हणण्याचा आशय असा दिसतो की

सामान्यतः जर नायिका कुलस्त्री असेल तर त्या प्रकरणात वेश्येची योजना करू नये आणि जर वेश्या नायिका असेल तर त्यात कुलस्त्रीचा संपर्क आणू नये; तथापि कारण-परत्वे दोघींचीही योजना करावयास हरकत नाही (१८.४६-४८). अभिनवगुप्ताच्या म्हणण्याप्रमाणे जेथे केवळ कुलस्त्री अथवा केवळ वेश्या असेल ते शुद्ध प्रकरण आणि ज्यात दोघीही विद्यमान असतील ते संकीर्ण प्रकरण. शुद्ध प्रकरणातील नायक श्रेष्ठी, सचिव आदींपैकी असावा आणि संकीर्ण प्रकरणात विट वगैरे नायक असावा असेही त्याने पुढे म्हटले आहे. अभिनवगुप्ताने केलेले प्रकरणाचे हे भेद समजण्यासारखे आहेत, पण प्रकरणाचे एकंदर एकवीस प्रकार होतात असे जे त्याने म्हटले आहे ते कसे काय हे स्पष्ट नाही. फक्त नाट्यदर्पणात त्याचा हिशोब भिन्न प्रकारे करून दाखविला आहे.

भरताच्या मताप्रमाणे नाटकात फक्त प्रवेशकांचीच योजना होते, तर प्रकरणात विष्कम्भकाची सुद्धा योजना होऊ शकते याचा वर निर्देश केला आहे. हा भेद होण्याचे मूळ कारण असे दिसते की नाटकातील घटना राजघराण्यातील व्यक्तींशी संबद्ध असतात; त्यांपैकी ज्या प्रत्यक्ष दाखवावयाच्या नसतील त्यांचे सूचन दास, दासी प्रभृती कनिष्ठ दर्जाच्या पात्रांकडून केले जाणे अधिक संभाव्य होते, म्हणून त्यात मुख्यतः प्रवेशकाची योजना. याउलट प्रकरणातील प्रधान पात्रेच समाजातील ब्राह्मण, श्रेष्ठी, विट आदी भिन्न स्तरांतून आलेली असल्यामुळे त्यांच्या संबंधात घडलेल्या घटनांचे सूचन त्यांच्या समव्यवसायी अथवा मित्रवत असलेल्या समान दर्जाच्या पात्रांकडूनही होण्याची शक्यता होती. आणि ही पात्रे मध्यमप्रकृति असल्यामुळे हे प्रवेश विष्कम्भक ठरतात. ते काहीही असले तरी नाटक आणि प्रकरण हे समाजातील दोन भिन्न भिन्न घटकांचे दर्शन घडवितात आणि हे सुद्धा त्या दोहोंमधील भेदाचे एक गमक मानता येईल असे म्हणावयास हरकत नाही.

## नाटिका

प्रकरणाच्या वर्णनानंतर नाट्यशास्त्रात नाटिकेचे वर्णन करणाऱ्या आर्या आहेत. त्या मूळ भरतकृत नाहीत हे वर सुचविलेच आहे. नाटिकेच्या येथील वर्णनावरून तिचे सहा, आठ किंवा सोळा प्रकार होऊ शकतात या अगोदरच्या टीकाकारांच्या मतांचा उल्लेख अभिनवगुप्ताने केला आहे. नाटिकेचे येथील वर्णन रत्नावलीप्रभृती नाटिकांना पूर्णतया लागू पडण्यासारखे आहे हे उघड आहे.

## समवकार

यानंतर ५७ ते ६८ या आर्यांत समवकार नावाच्या तिसऱ्या रूपकप्रकाराचे विस्तृतपणे वर्णन केले आहे. ह्या वर्णनावरून असा ग्रह होतो की ते समवकाराच्या एका विशिष्ट

उदाहरणावरूनच बनविले आहे. पहिल्या अंकाचा प्रयोग बारा नाडिका (म्हणजे चार तास अठ्ठेचाळीस मिनिटे) चालावा, दुसऱ्या अंकाचा चार नाडिका (एक तास छत्तीस मिनिटे) आणि तिसऱ्या अंकाचा दोन नाडिका (अठ्ठेचाळीस मिनिटें) चालावा अशा प्रकारचा कृत्रिम नियम किंवा त्यात तीन प्रकारच्या शृङ्गाराचे, तीन प्रकारच्या कपटाचे आणि तीन प्रकारच्या विद्रवाचे दर्शन घडवावे अशासारखा नियम प्रत्येक समवकारामध्ये पाळला जावा अशी अपेक्षा करणे सयुक्तिक वाटत नाही. हल्ली उपलब्ध असलेल्या संस्कृत नाटकांमध्ये समवकाराचे उदाहरण आढळत नाही. नाट्यशास्त्राच्या चौथ्या अध्यायात असे म्हटले आहे की नाट्यवेदाची निर्मिती करून तो भरताच्या स्वाधीन केल्यावर आणि नाट्यमंडपाची निर्मिती झाल्यावर ब्रह्मदेवाने स्वतः रचलेल्या अमृतमन्थन नावाच्या समवकाराचा प्रयोग करण्याची त्याला आज्ञा केली आणि त्याप्रमाणे भरताने त्या समवकाराचा प्रयोग केला (४.२-४). प्रस्तुत ठिकाणी केलेले समवकाराचे वर्णन अमृतमन्थनाच्या प्रसङ्गाला लागू पडण्यासारखे आहे. त्यात देव आणि असुर यांच्या कार्याशी संबद्ध अशा घटना आहेत, त्यात कपट आहे, विद्रव आहे आणि शृंगारही आहे. असा संभव आहे की ह्या प्रसंगावर आधारलेली एक दीर्घ नाट्यकृती नाट्यशास्त्रकाराला अवगत होती आणि तिच्या आधारानेच त्याने हे वर्णन केले आहे. उष्णिग्, गायत्री वगैरे छंदांचा उपयोग कवीने समवकारात करावा असे म्हटले आहे त्यावरून अशा काव्यमय नाट्याच्या अस्तित्वाच्या कल्पनेला दुजोरा मिळतो.

## ईहामृग

समवकारानंतर ७०–७४ आर्यांमध्ये ईहामृग नावाच्या प्रकाराचे वर्णन आहे. याचेही उदाहरण संस्कृत वाङ्मयात आढळत नाही. या प्रकारात सुद्धा नायक आणि नायिका दिव्य असतात. पण याचे प्रधान वैशिष्ट्य हे की यात स्त्रियांच्या संबंधात पुरुषांमध्ये संघर्ष उत्पन्न होतो आणि परिणामतः अपहरण, विद्रव, युद्ध इत्यादी प्रसंग दाखविले जातात. या ठिकाणी असे म्हटले आहे की युद्धात वध्य व्यक्तीचा वध समीप आला असता काही तरी निमित्त काढून ते युद्ध थांबवावे (१८.७४). यावरून असे म्हणावयास हरकत नाही की ह्या प्रकारात रंगभूमीवर युद्ध चाललेले दाखविता येईल, पण त्या युद्धात कोणाचा मृत्यू झालेला प्रत्यक्ष दाखविणे उचित होणार नाही. असा संभव आहे की समवकाराप्रमाणेच ह्या प्रकाराचे वर्णनही एका उदाहरणावरूनच बनविलेले आहे. साहित्यदर्पणात उदाहरण म्हणून कुसुमशेखरविजय नावाच्या ईहामृगाचा निर्देश केला आहे. ती कृती नाट्यशास्त्रकाराला अवगत असण्याची शक्यता नाही.

## डिम

यानंतरच्या डिम नावाच्या प्रकारात सुद्धा देव, राक्षस, यक्ष इत्यादींच्या चरिताचे चित्रण असते. त्यात एकंदर सोळा नायक असावेत असे म्हटले आहे. शृङ्गार आणि

हास्य हे दोन रस यात वर्ज्य असून मुख्यत: दीप्त रसांचा म्हणजे वीर आणि रौद्र यांचा आविष्कार असतो, तसेच माया, इन्द्रजाल, उल्कापात, चन्द्रसूर्यग्रहण आदी गोष्टींचेही विपुल प्रमाणात दर्शन होते (१८.७६-८०). असा संभव आहे की ह्या प्रकाराचेही फक्त एकच उदाहरण नाट्यशास्त्रकारासमोर होते. चौथ्या अध्यायात असे म्हटले आहे की भरताने हिमालयावर शंकरासमोर अमृतमन्थन नावाच्या समवकाराचा प्रयोग करून दाखविल्यानंतर त्रिपुरदाह नावाच्या डिमाचाही प्रयोग करून दाखविला (४.१०). त्रिपुरदाहाच्या वृत्तान्तात सोळा नायक असण्याची शक्यता फार कमी वाटते.

ज्या रूपकप्रकारांत नायक-नायिका दिव्य असतात, म्हणजे समवकार, ईहामृग आणि डिम, त्यांच्या संबंधात भरताने असे सांगितले आहे की त्यांतील घटना भारतवर्षात घडलेल्या अशाच दाखवाव्यात. याचे कारण असे दिले आहे की पृथ्वीवरील इतर वर्षांत सर्वत्र सर्वकाळ सुख, संभोग आणि आनंद यांचेच साम्राज्य असते, तेथे दु:ख आणि शोक या गोष्टी असंभाव्य असतात. आणि ज्या ठिकाणी देवांचा वास असतो ती त्यांची भोगभूमी; त्यांच्यासाठी सुद्धा कर्मभूमी म्हणून भारतवर्षच योग्य मानले आहे (१८.८९-९२). सुखदु:खमिश्रित विविध अवस्थांचे दर्शन घडल्याशिवाय प्रयोगात रुची उत्पन्न होणार नाही अशी यामागची भूमिका आहे. परिणामत: या नाट्यप्रकारांत देवदेवता मानवी विकारांच्या अधीन झालेले दिसून येणे स्वाभाविक होईल.

## व्यायोग

बाकी राहिलेले पाच रूपकप्रकार सर्व एकअंकी आहेत. त्यांपैकी व्यायोग बऱ्याच बाबतीत समवकारासारखा असतो असे म्हटले आहे. फक्त त्यात एकच अंक असल्यामुळे त्याचा विस्तार समवकाराएवढा नसतो आणि त्यातील पात्रे दिव्य नसतात. त्याचा नायक राजा नसावा असा अभिनवगुप्ताने अर्थ लावला आहे. पण त्या आर्येतील वचनाचा नायक राजा असावा असा अर्थ करणेही शक्य आहे. किंबहुना साहित्यदर्पणकाराने नायक राजर्षि अथवा दिव्य असावा असे म्हटले आहे. व्यायोगात युद्ध, नियुद्ध, संघर्ष वगैरे गोष्टी मुख्य असतात (१८.८४). भासाच्या नावाने प्रसिद्ध असलेल्या नाटकांत एक मध्यमव्यायोग नावाचे एकअंकी नाटक आहे. त्याला भरताने केलेली व्यायोगाची व्याख्या लागू पडण्यासारखी आहे असे वाटत नाही. विश्वनाथाने सौगन्धिकाहरण नावाच्या व्यायोगाचा निर्देश केला आहे. व्यायोगाची बरीच उदाहरणे हल्ली उपलब्ध झाली आहेत.

## उत्सृष्टिकाङ्क

उत्सृष्टिकाङ्क हा त्यानंतरचा रूपकप्रकार. त्याला केवळ अङ्क असेही म्हटले आहे. याचे वैशिष्ट्य असे की यात करुणरसाला प्राधान्य असते, त्यामुळे यात स्त्रियांचे विलाप, निर्वेदयुक्त

वचने इत्यादी गोष्टीच प्रामुख्याने असतात (८६-८८). संस्कृत वाङ्मयात एकअंकी रूपके अनेक आहेत. पण भरताने निर्देशिलेले वैशिष्टय त्यांत क्वचितच आढळते.

## प्रहसन

प्रहसन दोन प्रकारचे असते, एक शुद्ध व दुसरे संकीर्ण. ज्यात साधू, तपस्वी, ब्राह्मण इत्यादींचे खालच्या वर्गातील लोकांशी हास्यकारक संभाषण चालते ते शुद्ध. यात ज्याच्या त्याच्या स्वाभाविक आचारविचारांचे व भाषांचे चित्रण असते. त्यांत दिसून येणारा विरोध हे हास्याचे कारण होते. संकीर्ण प्रहसनात वेश्या, विट, चेट, धूर्त, नपुंसक अशा प्रकारची पात्रे असून त्यांचे भडक वेष, उच्छृंखल वागणे, उत्तान वचने इत्यादी गोष्टी हास्यास कारणीभूत होतात. हास्यरसाला या प्रकारात प्राधान्य असते हे त्याच्या नावावरूनच स्पष्ट आहे. प्रहसनात जमण्यासारखे असेल तेथे वीथीच्या अंगांची योजना करावयास सांगितले आहे. हास्यास्पद गोष्टी किंवा फसवणुकीचे प्रकार लोकांमध्ये प्रसिद्ध असलेले असेच दाखवावेत असेही नाटयशास्त्रात सांगितले आहे (९४-९८). लटकमेलक आणि धूर्तसमागम ही दोन प्रहसने प्रसिद्ध आहेत. ती अर्थातच भरतानंतर पुष्कळ शतकांनी लिहिलेली आहेत.

## भाण

नववा रूपकप्रकार भाण. यात एकच पात्र असते – धूर्त अथवा विट. ते एकच पात्र आपला स्वतःचा वृत्तान्त तसेच इतरांची चेष्टिते यांचे वर्णन करते. आकाशभाषिताचा फार मोठ्या प्रमाणावर उपयोग हे या प्रकाराचे प्रधान वैशिष्टय (९९-१०१). हा एकअंकी असला तरी अनेक प्रकारच्या अवस्थांचे आणि चेष्टितांचे यात वर्णन करता येते. संस्कृतात अनेक भाण प्रसिद्ध आहेत. ते सर्व अर्थात भरतानंतरचे आहेत.

## वीथी

शेवटचा रूपकप्रकार वीथी. यात एकच अंक आणि एक अथवा दोनच पात्रे असतात. उत्तम, मध्यम आणि अधम अशा तीनही प्रकृतींनी वीथी युक्त असावी असे भरताने म्हटले आहे, त्याचे स्पष्टीकरण अभिनवगुप्ताने असे केलेले दिसते की वीथीचा नायक ह्या तिहींपैकी कोणत्याही प्रकृतीचा असू शकतो. पण वीथीचे सर्वाधिक वैशिष्टय म्हणजे तीत आवश्यक मानलेली तेरा अंगे (१०२-१०४). या तेराही अंगांच्या भरताने व्याख्या दिल्या असून अभिनवगुप्ताने त्यांची उदाहरणे दिली आहेत (१०५-११५). ही बहुतेक उदाहरणे रत्नावली, वेणीसंहार इत्यादी इतर रूपकप्रकारांतून घेतलेली आहेत. वास्तविक कोणत्या तरी वीथीतूनच ही उदाहरणे उद्धृत करणे उचित झाले असते. वीथ्यङ्गांचा

इतर रूपकप्रकारांतही – उदाहरणार्थ प्रहसनामध्ये – उपयोग करावयास भरताने सांगितले आहे हे खरे आहे. पण त्याने ज्याअर्थी ह्या अंगांचा वीथ्यङ्गे म्हणून निर्देश केला आहे त्याअर्थी त्याच्यासमोर ह्या अंगांनी युक्त अशा वीथींची एकदोन तरी उदाहरणे असली पाहिजेत हे निश्चित. वीथीची ती प्राचीन उदाहरणे अभिनवगुप्ताला उपलब्ध नव्हती असे म्हणावयास हरकत नाही. सध्याही वीथीचे उदाहरण उपलब्ध नाही.

वीथीच्या तेरा अंगांपैकी पहिली दोन उद्घात्यक आणि अवलगित ही आहेत. पुढे विसाव्या अध्यायात आमुखाचे म्हणजे प्रस्तावनेचे पाच प्रकार सांगितले आहेत त्यांत ह्या दोहोंचा समावेश केला असून कथोद्घात, प्रयोगातिशय आणि प्रवृत्तक अशी इतर तीन प्रकारांची नावे दिली आहेत (२०.३३). त्याशिवाय, तेथे असे म्हटले आहे की वीथी आणि प्रहसन हे दोन रूपकप्रकार, आमुख अथवा प्रस्तावना आणि प्ररोचना हे पूर्वरंगाचे एक अंग ही चार भारती वृत्तीची अंगे होत (२०.२७). ह्या दोन रूपकांचाच भारती वृत्तीशी संबंध का जोडला आहे ते स्पष्ट नाही. वस्तुतः उत्सृष्टिकाङ्कातच फक्त भारती वृत्तीचे दर्शन संभाव्य असते; त्याला भारती वृत्तीचे एक अंग मानणे अधिक उचित झाले असते. भारती वृत्तीच्या वीथी ह्या एका अंगाची दोन अंगे (उद्घात्यक व अवलगित) आमुख ह्या दुसऱ्या अंगाचीही अंगे होत हे थोडेसे गोंधळात टाकणारेच आहे.

रूपकाच्या ह्या दहा प्रकारांच्या वर्णनावरून असे दिसून येते की त्यांच्यातील भेद मुख्यतः कथानक व त्यातील पात्रे यांच्या अनुरोधाने कल्पिले आहेत. देवदानवांच्या पुरातन कथांवर आधारलेले समवकार, ईहामृग आणि डिम हे तीन प्रकार. ईहामृगाचे कथानक स्त्रीविषयक संघर्षावर आधारलेले, तर डिमाच्या कथानकातील संघर्ष इतर गोष्टींच्यामुळे उत्पन्न होणारा अशा तऱ्हेचा ह्या दोहोंतील भेद अभिप्रेत असावा. समवकारात युद्ध, नियुद्ध आदीमध्ये परिणत होणाऱ्या संघर्षाला प्राधान्य नाही असे त्याच्या भिन्नतेचे वर्णन करता येईल. मानवी जीवनाचे चित्रण करणाऱ्या रूपकप्रकारांत नाटक आणि प्रकरण हे दोन अर्थातच प्रधान होत. त्यांपैकी नाटकात राजकुल व त्याच्याशी संबद्ध असलेल्या व्यक्ती यांच्या जीवनाचे दर्शन मुख्यतया घडते, तर प्रकरणात ज्यांना सामान्यतः मध्यमवर्गीय म्हणता येईल अशा व्यक्तींचे जीवन प्रतिबिंबित होते असाही त्या दोहोंमधील फरक प्रतीत होतो. समाजाच्या खालच्या थरातील लोकांचे जीवन–विशेषतः त्याच्या उच्छृंखल स्वरूपात –प्रहसन व भाण या दोन प्रकारांत चित्रित होते असे म्हणता येईल. बाकीचे एकअंकी प्रकार–व्यायोग, उत्सृष्टिकाङ्क आणि वीथी - एखाद्या विशिष्ट प्रसंगाच्या चित्रणासाठी उपयोगात आणलेले दिसतात. सर्वसाधारणपणे असे म्हणावयास हरकत नाही की रूपकाचे हे भेद मूलतः त्यातील विषयाच्या अनुरोधाने केले आहेत.

चार वृत्तींपासून दहा रूपकांची निष्पत्ती झाली असे म्हटले आहे. परंतु वृत्तींच्या भिन्नतेच्या अनुरोधाने रूपकांचे भिन्न भिन्न प्रकार अस्तित्वात आले असे म्हणता

येण्यासारखे नाही. नाटक व प्रकरण यांत चारही वृत्ती असतात आणि इतर प्रकारांत कैशिकी वृत्तीचा अभाव असतो ह्या निर्देशावरून हे स्पष्ट आहे की रूपकभेदाचे गमक वृत्तिभेद असे मानता येत नाही. त्यापेक्षा रसांच्या भिन्नतेच्या अनुरोधाने रूपकांच्या भेदांची उपपत्ती लावणे अधिक शक्य आहे. परंतु रसांचा आविष्कार काव्याच्या विषयाला अनुसरूनच होत असल्यामुळे रूपकभेदाचे रसभेद हे स्वतंत्र गमक असे मानण्याची आवश्यकता नाही.

## कथानक

एकोणविसाव्या अध्यायात कथानकाच्या घडणीचे विवेचन आहे. त्यात त्याचे अनेक दृष्टींनी विश्लेषण केले आहे. कथानक हे नाटयाचे शरीर होय असे प्रारंभी म्हटले आहे. रस हा त्याचा आत्मा अशी अभिनवगुप्ताने त्या विधानाची पूर्ती केली आहे. कथानक आधिकारिक आणि प्रासंगिक असे दोन प्रकारचे असते. नाटकाच्या शेवटी फलप्राप्तीच्या स्वरूपाचे जे कार्य सिद्ध करावयाचे असते त्याच्याशी साक्षात संबद्ध असलेला कथाभाग म्हणजे आधिकारिक इतिवृत्त आणि त्याला सहायभूत होणारा कथाभाग म्हणजे प्रासंगिक अथवा आनुषंगिक इतिवृत्त. फलप्राप्ती ज्याला होते तो नायक. प्रासंगिक अंश त्याच्या फलप्राप्तीला अप्रत्यक्षपणे उपयोगी होतो (१९.३-५).

## अवस्था

कोणतेही कार्य सिद्धीस जावयाचे असता ते पाच अवस्थांमधून जाते. आरम्भ, प्रयत्न, प्राप्तिसंभव, नियत फलप्राप्ति आणि फलयोग या त्या पाच अवस्था. या सार्वत्रिक नियमाला अनुसरून नाटकाच्या शेवटी सिद्ध होणारे कार्य सुद्धा या पाच अवस्थांतून गेलेले असते. याचा अर्थ कथानकाच्या विकासाचे दर्शन क्रमशः ह्या अवस्थांच्या द्वारा होत जाते. तिसऱ्या आणि चौथ्या अवस्थांत सिद्धीच्या मार्गात उत्पन्न होणाऱ्या विघ्नांचे होणारे निराकरण अभिप्रेत आहे. भरताने या पाच अवस्थांच्या व्याख्या १९.८-१२ ह्या श्लोकांत दिल्या आहेत.

## अर्थप्रकृती

दुसऱ्या दृष्टीने कथानकाचे विश्लेषण करून भरताने बीज, बिन्दु, पताका, प्रकरी आणि कार्य ह्या पाच अर्थप्रकृतींचे वर्णन केले आहे. प्रारंभीची मूलभूत घटना की जिच्यापासून कथानकाला सुरुवात होते आणि शेवटी होणारी कार्यसिद्धी हे जिचे अंतिम फल ती घटना म्हणजे बीज (१९.२१). वृक्षाच्या संबंधात होणाऱ्या प्रक्रियेवरून ही कल्पना घेतली आहे हे उघड आहे. बिन्दु ह्या दुसऱ्या अर्थप्रकृतीची व्याख्या पुढीलप्रमाणे आहे. कार्यसिद्धीशी संबद्ध असलेल्या कथानकाच्या अंशात दुसऱ्या एखाद्या गोष्टीने खंड पडला

असता ज्या घटनेने अथवा उक्तीने मुख्य कथानकाचा सांधा पुन्हा जोडला जातो ती घटना अथवा उक्ती म्हणजे बिन्दु. असा बिन्दु काव्यबन्ध समाप्त होईपर्यंत असतो असे भरताने म्हटले आहे (१९.२२). पाण्याच्या पृष्ठभागावर पसरत जाणाऱ्या तैलबिन्दूप्रमाणे असल्यामुळे याला बिन्दु म्हणतात असे स्पष्टीकरण अभिनवगुप्ताने केले आहे. पण याने बिन्दूचे जे प्रधान कार्य – खंड पडला असता सांधा जोडण्याचे – त्याची उपपत्ती समाधानकारकपणे लागत नाही. नाटकलक्षणरत्नकोशकार सागरनन्दीने याची दुसऱ्या प्रकारे उपपत्ती सुचविली आहे. पाण्याची धार वरून थेंबाथेंबाने पडत असता दोन थेंबांमध्ये धारेत खंड पडलेला दिसतो, पण त्या थेंबांमुळेच धारेचे सातत्य प्रतीत होऊन सांधे जोडल्यासारखे दिसतात.[२] ही उपपत्ती अधिक पटण्याजोगी वाटते. डॉ. मनमोहन घोष यांनी बिन्दु म्हणजे प्राण्याच्या वीर्याचा बिन्दु (vital drop)अशी कल्पना करून ह्या प्रक्रियेचे वीर्योत्सर्गाशी सादृश्य स्वीकारले आहे.[३] पण ती कल्पना सर्वस्वी अग्राह्य आहे. भरताने केलेल्या बिन्दूच्या व्याख्येशी ती कोणत्याही प्रकारे सुसंगत नाही.

नंतरच्या दोन अर्थप्रकृती, पताका आणि प्रकरी, म्हणजे कथानकाचा प्रासंगिक अथवा आनुषंगिक अंश. त्या दोहोंतील फरक असा की पताका मुख्य कथानकाच्या परिपोषाला उपयुक्त असली तरी तिच्यात गौण असे एखादे कार्य स्वतन्त्र फल म्हणून सिद्ध होते, तर प्रकरीत असे कोणतेही कार्य सिद्ध होत नसून ती केवळ मुख्य कथानकाला उपकारक अशी एखादी घटना असते. रामाच्या कथेवर आधारलेल्या नाटकांत सुग्रीव-वालीचा वृत्तान्त पताकेसारखा आणि जटायूचा प्रसंग प्रकरीसारखा (१९.२३-२४). पताका साहजिकच विस्तृत असून तिचाही विकास होत असलेला दिसून येतो. म्हणून ती काही अंशी प्रधान कथानकासारखी असून तिच्यातही संधी असू शकतात. पताकेतील संधींना अनुसंधि अशी संज्ञा आहे (१९.२७). पताकानायकाचे स्वतःचे कार्य मुख्य कथानकाच्या विमर्श संधीच्या आतच सिद्ध झालेले दाखविणे आवश्यक आहे. शेवटच्या निर्वहण संधीत सिद्ध होणाऱ्या प्रधान कार्याला ते पताका-कार्य उपकारक असल्यामुळे त्याची सिद्धी अगोदरच झाली असली पाहिजे हे उघड आहे (१९.२८). पताका आणि प्रकरी दोन्हीही प्रधान कार्याला उपकारक असणे आवश्यक मानले आहे. तेव्हा कोणत्याही प्रासंगिक कथांशामुळे मुख्य कथानकाच्या एकसूत्रतेत व्यत्यय येणार नाही अशी काळजी घेतली पाहिजे असेच भरताला अभिप्रेत आहे यात शंका नाही.

२ बिन्दुरिव विच्छिन्नायामपि धारायां यथा जलबिन्दुः पटलपर्यन्तेष्वन्तरान्तरा लब्धनिजनिपातः पयसां पतनमभिव्यञ्जयति तथायमपि प्रयोजनमित्यर्थः। – ना. ल. र. को., पृ. ७

३ *The Nāṭyaśāstra*, Text, Vol. 1 by Manomohan Ghosh (Calcutta, 1967), Intro, p. xxvii. Translation, Vol. I, 2nd edition (1967), p, 381,

पाचवी अर्थप्रकृति जे कार्य त्याची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे. मुख्य कथानकात जे अंतिम साध्य ठरविलेले असेल त्याच्या सिद्धीसाठी होणारे जे जे उपाय त्या सर्वांना कार्य अशी संज्ञा आहे (१९.२५). ह्या उपायांचा निर्देश करताना अभिनवगुप्ताने अर्थशास्त्रात वर्णन केलेल्या प्रभु, मन्त्र, आणि उत्साह ह्या राज्याच्या तीन शक्तींचा, जनपद, दुर्ग, कोश आदि राज्याच्या प्रकृतींचा आणि साम, दान, भेद व दंड ह्या चार उपायांचा उल्लेख केला आहे.

## पताकास्थानक

अर्थप्रकृतींच्या वर्णनानंतर नाट्यशास्त्रात चार प्रकारच्या पताकास्थानकांच्या व्याख्या दिल्या आहेत. एखादी गोष्ट चालू असता किंवा एखाद्या गोष्टीचा निर्देश अभिप्रेत असता तिच्यासारखीच चिह्ने असलेली दुसरी गोष्ट सूचित होते हे पताकास्थानकाचे सामान्य लक्षण (१९.२९). ही सूचित झालेली दुसरी गोष्ट प्रधान कार्याच्या सिद्धीला उपकारक असते अथवा त्या सिद्धीची सूचक असते. स्वतःचा कार्यभाग साधून दुसऱ्याच्या कार्याला साहाय्यक होणे हे पताकेचे वैशिष्टय ह्या प्रकारात असते म्हणून ह्याला पताकास्थानक हे नाव दिले आहे. अचानक घडून येणारी घटना, अतिशयोक्तियुक्त वचन, मूलतः भिन्नार्थ असलेल्या वचनांची एकत्र योजना आणि श्लेषयुक्त वचन या गोष्टींमुळे जेव्हा कथानकाशी संबद्ध अशा–प्रायः भावी स्वरूपाच्या–घटनेचे सूचन होते तेव्हा तेथे पताकास्थानकाचे चार प्रकार निष्पन्न होतात (१९. ३०-३३). ह्या पताकास्थानकांचे स्वरूप काहीसे dramatic irony सारखे आहे. नाट्यशास्त्रात यानंतर असे म्हटले आहे की नाटकातील कार्य अधिकात अधिक चार पताकांनी युक्त असावे (१९.३४). या ठिकाणी पताका ह्या शब्दाने पताका-स्थानक अभिप्रेत आहे असे जे अभिनवगुप्ताने म्हटले आहे ते रास्तच आहे. प्रासंगिक कथांश ह्या अर्थी एकाहून अधिक पताका कोणत्याही नाटकात योजल्या तर ते मुख्य कथानकाला बाधक होईल हे उघड आहे.

दशरूपकाराने फक्त दोनच प्रकारच्या पताकास्थानकाचा निर्देश केला आहे – घटना-साम्यामुळे होणारे भावी प्रसंगाचे सूचन आणि श्लिष्ट विशेषणामुळे होणारे भावी घटनेचे सूचन (द. रू. १. १४). त्यावरील अवलोक ह्या टीकेत धनिकाने हे दोन प्रकार म्हणजे अनुक्रमे अन्योक्ति आणि समासोक्ति अलंकार होत असे म्हटले आहे ते बरोबरच आहे. भरताच्या चार प्रकारांत अन्योक्तिरूप पताकास्थानकाचा समावेश नाही.

## संधी

कथानकाची नाटकाच्या स्वरूपात मांडणी करताना त्याच्या होणाऱ्या विभागांना संधि अशी संज्ञा आहे. मुख, प्रतिमुख, गर्भ, विमर्श अथवा अवमर्श आणि निर्वहण असे नाटकाच्या कथानकात पाच संधी असतात. मुखसंधीत कथानकाच्या बीजाची उत्पत्ति होते,

प्रतिमुखसंधीत त्या बीजाचे उद्घाटन कधी दृश्य तर कधी अदृश्य अशा स्वरूपात होते, गर्भसंधीत बीजाचा उद्भेद कधी प्राप्ती, कधी अप्राप्ती, तर कधी अन्वेषण या स्वरूपात होतो, विमर्शसंधीत विलोभन, क्रोध किंवा व्यसन यामुळे बीजाचे फल गर्भातून बाहेर येते आणि निर्वहणसंधीत बीजाशी संबद्ध अशा अगोदर निर्दिष्ट झालेल्या सर्व गोष्टींचा उपसंहार होतो (१९. ३६-४०). यांपैकीं काही संधींचे स्वरूप पूर्णपणे स्पष्ट नाही. प्रतिमुखसंधीतील उद्घाटन आणि गर्भसंधीतील उद्भेद यांतील फरक कथानकाच्या विकासाच्या भिन्न भिन्न टप्प्यांचा निदर्शक आहे असे समजता येईल. तसेच अभिनवगुप्ताने म्हटले आहे त्याप्रमाणे प्रतिमुखसंधीतील दृष्ट व नष्ट ह्या अवस्था बीजाच्या संबंधात वापरल्या आहेत, तर गर्भ-संधीतील प्राप्ति, अप्राप्ति ह्या गोष्टी फलाशी संबद्ध आहेत अशा प्रकारचा फरकही मान्य करता येईल. तथापि, या दोन संधींत काही मूलभूत भेद आहेसे दिसत नाही. चौथ्या संधीला विमर्श आणि अवमर्श अशी दोन्हीही नावे प्राचीन काळापासून स्वीकृत झालेली दिसतात. फलप्राप्तीच्या मार्गात विघ्न उत्पन्न झाल्यामुळे त्याच्या परिहाराचा विचार विमर्शात अभिप्रेत दिसतो. अवमर्श शब्दातही तीच कल्पना अभिप्रेत असावी, पण काही टीकाकारांनी अवमर्श म्हणजे विघ्न असाच अर्थ केला आहे. या संधीत विघ्नाला प्राधान्य आहे. पण त्याचा परिहार याच संधीत अभिप्रेत आहे की पुढील निर्वहणसंधीत ते स्पष्ट नाही.

ह्या पाच संधींचा पाच अवस्थांशी अनुक्रमे संबंध जोडला जावा हे स्वाभाविक होते. तदनुसार गर्भसंधीत प्राप्तिसंभव आणि अवमर्शसंधीत नियत फलप्राप्ति या अवस्थांचे अनुक्रमे दर्शन होते असे ठरते. ही गोष्ट विचारात घेऊन श्री कवि यांनी गर्भसंधीत अप्राप्तीला प्राधान्य असते, तर अवमर्शसंधीत प्राप्तीला या कारणास्तव अभिनवगुप्ताच्या व्याख्येत काही दुरुस्ती सुचविली आहे. ती अग्राह्य असल्याचे त्या ठिकाणी दाखवून दिले आहे. वस्तु-स्थिती अशी आहे की संधी आणि अवस्था यांच्यातील संबंध जरी स्वाभाविक असला तरी भरताने तसा स्पष्ट निर्देश कोठे केलेला नाही. तेव्हा एखाद्या अवस्थेची व्याप्ती तिच्याशी संलग्न म्हणून मानलेल्या संधीची मर्यादा ओलांडून जाऊ शकेल हा संभव नाकारता येणार नाही.

तिसऱ्या संधीचे नाव गर्भसंधी असे आहे आणि अवमर्श संधीच्या वर्णनात 'गर्भनि-र्भिन्नबीजार्थः' हे वचन वापरले आहे. यांच्या मुळाशी प्राण्यांमध्ये होणारी गर्भधारणा व नंत-रची प्रसूती या कल्पना आहेत असा ग्रह होऊन त्यामुळे डॉ. घोष यांनी केलेल्या बिन्दु म्हणजे वीर्यबिन्दु ह्या अर्थाला दुजोरा मिळतो असे वाटण्याचा संभव आहे. पण ते बरोबर नाही. जी प्रक्रिया डॉ. घोष यांना अभिप्रेत आहे तिच्यात बिन्दु म्हणजे वीर्योत्सर्ग प्रारम्भस्थानी असतो. त्यामुळे बीज आणि बिन्दु यांत काहीच भेद होत नाही. परंतु नाटयशास्त्राप्रमाणे बिन्दु प्रारंभस्थानी नसतो, तर बीजारोपण झाल्यानंतरच बिन्दु अस्तित्वात येतो, आणि तो बिन्दु म्हणूनच नाटकात सर्वत्र असतो. फार तर एवढेच म्हणता येईल की गर्भाची कल्पना प्राणि-

शास्त्रावरून घेतली असून ती मूळच्या वृक्षारोपणाच्या कल्पनेशी संमिश्रित केली आहे.

पाच संधींचा पाच अवस्थांशी क्रमशः संबंध प्रस्थापित होऊ शकतो. पण त्यांचा पाच अर्थप्रकृतींशी त्याच क्रमाने संबंध प्रस्थापित होण्यासारखा नाही. बीज आणि मुखसंधि यांच्यातील संबंधच फक्त मान्य करता येईल. बिन्दु केवळ प्रतिमुख संधीतच असतो असे नसून तो नाटकाच्या समाप्तीपयत (यावत्समाप्तिर्बन्धस्य, १९.२२) असतो. पताका केवळ गर्भसंधीतच असू शकते असे नसून प्रतिमुख आणि अवमर्श ह्या संधींतही तिची व्याप्ती संभाव्य आहे हे 'आगर्भादाविमर्शाद्वा (१९.२८)' या शब्दप्रयोगावरून स्पष्ट आहे. आणि उपायाच्या स्वरूपाचे कार्य हे सुद्धा नाटकात सर्वत्र असते. दशरूपकाराने मात्र असे म्हटले आहे की पाच अर्थप्रकृतींचा पाच अवस्थांशी क्रमशः संयोग झाला म्हणजे क्रमाने मुखादी पाच संधी निष्पन्न होतात.[४] पण हे मत नाटयशास्त्रातील विवेचनाला धरून नाही यात शंका नाही.

हे पाचही संधी फक्त नाटक आणि प्रकरण ह्या दोन रूपकप्रकारांतच असतात. इतर प्रकारांत चार, तीन किंवा दोनच संधी असतात त्याचा वर निर्देश केला आहे.

## संध्यङ्गे

संधींच्या निरूपणानंतर नाटयशास्त्रात त्यांच्या अंगांचा म्हणजे संध्यङ्गांचा विचार केला आहे. प्रत्येक संधीत बारा ते चौदा याप्रमाणे पाच संधीत मिळून चौसष्ट संध्यंगे असतात असे म्हटले आहे. मुखसंधीत बारा, प्रतिमुखसंधीत तेरा, गर्भसंधीत तेरा, अवमर्शसंधीत तेरा आणि निर्वहणसंधीत चौदा याप्रमाणे वास्तविक पासष्ट संध्यंगांचा नामनिर्देश करून त्या प्रत्येकाची व्याख्या दिली आहे, तथापि अंगांची संख्या चौसष्ट असेच नाटयशास्त्रात म्हटले आहे (१९.६३). हाच प्रकार नाटकलक्षणरत्नकोश आणि साहित्यदर्पण ह्या ग्रंथांत आढळतो. या संबंधात काही प्राचीन टीकाकारांनी केलेल्या खुलाशाचा अभिनवगुप्ताने निर्देश केला आहे. निर्वहणसंधीतील शेवटचे अंग जे प्रशस्ति ते कथानकाशी असंबद्ध असल्यामुळे त्याची गणना करणे अन्याय्य म्हणून खरी संध्यंगे चौसष्टच असा हा खुलासा आहे. रामचन्द्र-गुणचन्द्र यांच्या नाटयदर्पणात हाच खुलासा केलेला दिसून येतो. परंतु दशरूपकार धनंजयाने गर्भसंधीतील प्रार्थना नावाचे अंग वगळून त्या संधीत फक्त बाराच संध्यंगे स्वीकारली आहेत आणि अशा रीतीने चौसष्ट संख्या बरोबर असल्याचे निर्धारित केले आहे.

संध्यंगांच्या योजनेच्या आवश्यकतेबद्दल भरताने असे म्हटले आहे की काव्य कितीही उदात्त असले तरी जर ते अंगविहीन असेल तर त्याच्या प्रयोगाने रसिकांना

४ अर्थप्रकृतयः पञ्च पञ्चावस्थासमन्विताः।
यथासंख्येन जायन्ते मुखाद्याः पञ्च संधयः॥ द. रू. १.२१.

आह्लाद होणार नाही; याउलट हीन अर्थ असलेल्या काव्याची सुद्धा शोभा अंगांच्या योजनेमुळे वाढते (१९.५०-५१). ह्या अंगांचा कथानकाच्या रचनेत सहा प्रकारे उपयोग होत असल्याचे त्याने म्हटले आहे (१९.४७-४८).

असे दिसते की उद्भटप्रभृती नाटयशास्त्रावरील प्राचीन टीकाकारांनी असे मत मांडले होते की ज्या संधीत ज्या अंगांचा निर्देश केला आहे त्या संधीतच त्या अंगांची योजना करणे आणि ती सुद्धा निर्दिष्ट केलेल्या क्रमानेच करणे आवश्यक आहे. अभिनवगुप्ताने ह्या मताचे जोरदार खंडन केले आहे. भरताने जरी असे म्हटले आहे की ह्या अंगांची योजना 'यथासंधि' करावी (१९.९७) तरी त्याचा अर्थ ज्या संधीत जे योग्य असेल तेच अंग योजावे असा त्याने केला आहे. आणि यात शंकाच नाही की उद्भटप्रभृतींचे मत बरोबर नाही. वस्तुस्थिती अशी आहे की यांपैकी फारच थोड्या अंगांची त्या त्या विशिष्ट संधीत योजना करणे आवश्यक असे मानता येइल. उपक्षेप म्हणजे बीजाचे समारोपण, परिकर म्हणजे बीजाचे बाहुल्य इत्यादी प्रारंभीची चार पाच अंगे मुखसंधीतच आणि तीही निर्दिष्ट केलेल्या क्रमाने योजणे योग्य होईल हे उघड आहे. तसेच काव्यसंहार आणि प्रशस्ति ही शेवटची दोन अंगे निर्वहणसंधीत त्याच ठिकाणी योजिली जावीत हेही स्वाभाविक आहे. कथानकाच्या विकासाशी संबद्ध अशी काही अंगे आहेत; उदाहरणार्थ, प्रतिमुखसंधीतील परिसर्प, गर्भसंधीतील आक्षिप्ति, अवमर्शसंधीतील आदान आणि प्ररोचना, आणि निर्वहणसंधीतील निरोध आणि ग्रथन. यांची त्या त्या संधीत योजना उचित मानता येईल. परंतु बहुसंख्य अंगे अशी आहेत की त्यांचा कथानकाच्या परिपोषाशी साक्षात संबंध नसून ती कोणत्याही कथेच्या ओघात स्वाभाविकपणेच आविर्भूत होण्यासारखी आहेत. उदाहरणार्थ, विलास, नर्म, नर्मद्युति, प्रार्थना, उद्वेग, शंका, संफेट (रोषयुक्त वचन), खेद, छादन (अपमानयुक्त वचन), आनन्द, प्रसाद, अनुमान, युक्ति इत्यादी अनेक अंगे कथेत स्वभावतःच अनुस्यूत होऊ शकतात. पण त्यांचा आविष्कार कथेत अमुक ठिकाणीच व अमुक क्रमानेच होणे आवश्यक आहे असे मानणे अयोग्य होईल. असे दिसते की ज्या नाटकांच्या आधारे भरताने नाटकाचे विवेचन केले आहे त्यात ह्या अंगांचा आविर्भाव निर्दिष्ट संधीत आणि निर्दिष्ट क्रमानेच झाला होता, आणि त्याने हा असा निर्देश केल्यामुळेच ह्या विवेचनाला नियमाचे स्वरूप प्राप्त झाले.

## संध्यन्तरे

संध्यंगांच्या विवेचनानंतर नाटयशास्त्रात एकवीस संध्यन्तरांचा निर्देश केला आहे (१९.९९-१०१). त्यात सामादी चार उपायांबरोबर भय, लज्जा, क्रोध इत्यादी विकार, दूत, लेख, स्वप्न, चित्र इत्यादी प्रायः शृंगाराशी संबद्ध अशा गोष्टींचाही समावेश केला आहे. नाटयदर्पणात म्हटल्याप्रमाणे यांपैकी काहींना संध्यंगे म्हणणेच उचित होईल. मति,

मद, चापल आदी काही व्यभिचारिभावांत अन्तर्भूत आहेत, तर दूत, लेख यासारख्या गोष्टी कथानकाचा भाग होत. अभिनवगुप्ताच्या व्याख्येवरून असे दिसते की त्याने ह्या संध्यन्तरांचा संबंध संधींशी न जोडता संध्यंगांशी जोडला आहे. या संध्यन्तरांच्या निर्देशाची आवश्यकता होती असे दिसत नाही. दशरूप आणि साहित्यदर्पण यात त्यांची साहजिकच उपेक्षा केली आहे

## लास्याङ्गे

यानंतर एकोणविसाव्या अध्यायाच्या १०२ ते ११५ ह्या श्लोकांत दहा लास्याङ्गांतून नाटकाला उपयोगी असा कोणकोणता भाग घेता येईल याचे विवेचन केले आहे. लास्य हे सुकुमार नृत्तप्रकाराचे नाव आहे. ह्या नृत्ताला साथ करणारे गान शृंगाररसाचा आविष्कार करते म्हणून त्यात ललित अंगहारांचा उपयोग होतो असे चौथ्या अध्यायात म्हटले आहे.[५] दहा लास्यांगे म्हणजे शृंगाररसाधिष्ठित अशा नृत्ताचे दहा प्रकार. त्यांचे विस्तृत वर्णन एकतिसाव्या अध्यायात ३३० ते ३६७ ह्या श्लोकांत केले आहे. आणि त्या ठिकाणी अभिनवगुप्ताने असे दाखवून दिले आहे की पूर्वरंगाच्या ज्या अनेक अंगांचे पाचव्या अध्यायात वर्णन केले आहे त्यांपैकी काही अंगांच्या प्रयोगाच्या वेळी ह्या लास्य-प्रकारांचा उपयोग करावयाचा असतो. प्रस्तुत ठिकाणी ह्या दहापैकी प्रत्येक लास्यांगात जो नाटकाला उपयोगी अंश असेल त्याचीच त्यात योजना करावयास सांगितले आहे. अभिनवगुप्ताच्या म्हणण्याप्रमाणे हा घेतला जाणारा अंश अलौकिक स्वरूपाचा असतो. त्याने याचे स्पष्टीकरण केले आहे ते असे : गेयपदातून ध्रुवागान आणि वाद्यवादन यातील अलौकिक अंश, स्थितपाठ्यातून पाठ्यातील अलौकिक स्वरूपाचे रंजकत्व, आसीनपाठ्यातून स्त्रियांच्या कारुण्यपूर्ण गीतातील अलौकिकता, पुष्पगण्डिकेतून नृत्त, गीत आणि वाद्य यांच्या योजनेतील अलौकिक भाग, प्रच्छेदकातून काव्यात प्रसंगविशेषी दिसून येणारी कालाच्या वर्णनातील अलौकिकता, त्रिमूढकातून काव्यात रसानुकूल गुण, अलंकार आदींच्या योजनेने येणारी अलौकिकता, सैन्धवकातून भाषेच्या योजनेतील अलौकिक अंश, द्विमूढकातून पात्रांची गति अथवा परिक्रमण यातील अलौकिकता, उत्तमोत्तमकातून रसपरिपोषक अशा विविध भावांची अभिव्यक्ती करणाऱ्या अभिनयातील अलौकिकता आणि उक्तप्रत्युक्तातून गानाच्या द्वारा किंवा इतरही प्रकारे अभिव्यक्त होणारा रसाचा आवेशरूप अलौकिक अंश – याप्रमाणे ह्या दहा लास्यांगांतून उपयुक्त तेवढाच भाग नाटकात योजावयाचा असतो. यावरून असे म्हणता येईल की लास्यांगे ही वीथीच्या अंगांप्रमाणे स्वतंत्रपणे योजावयाची नसून नाटकाच्या प्रयोगात ज्या विविध गोष्टींचे दर्शन होते त्या

५ यत्र शृङ्गारसंबद्धं गानं स्त्रीपुरुषाश्रयम् ।
देवीकृतैरङ्गहारैर्ललितैस्तत् प्रयोजयेत् ।। ४.३२३.

सर्वांचे अलौकिक स्वरूप कोणत्या तरी लास्याच्या प्रकारापासून निष्पन्न झालेले आहे अशी कल्पना केली गेली आहे इतकेच. दशरूप आणि नाट्यदर्पण या ग्रंथांत लास्यांगांचा उल्लेख नाही यात काही आश्चर्य नाही.

या अध्यायाच्या शेवटी भरताने नाटक लिहू इच्छिणाऱ्या कवीला समारोपादाखल काही सूचना केल्या आहेत (१९.११६–१२९). त्यांत नाटकाच्या सर्वसंग्राहकतेचा निर्देश असून ते लोकस्वभावाला धरून असावे असे म्हटले आहे. नाटकात कर्कश शब्द-योजना टाळून लोकांना अर्थ सहज समजेल अशी रचना करावी, याचे कारण उत्तरोत्तर लोकांची बुद्धी कमी कमी तीक्ष्ण होत जाईल असे सांगितले आहे.

## पात्रांचे स्वभाव

नाटकात विविध प्रकारच्या लोकांच्या स्वभावाचे दर्शन घडवावे असे नाट्यशास्त्रात म्हटले आहे. तदनुसार नाटकात संभाव्य असणाऱ्या विविध प्रकारच्या पात्रांच्या स्वभाव-विशेषांची माहिती चोविसाव्या अध्यायात दिली आहे. पुरुष आणि स्त्रिया यांची प्रकृती उत्तम, मध्यम आणि अधम अशी तीन प्रकारची असू शकते हे सांगून चार प्रकारचे नायक आणि चार प्रकारच्या नायिका यांच्या मुख्य स्वभाववैशिष्ट्यांचा निर्देश केला आहे. त्यानंतर त्या अध्यायात राजाच्या अन्तःपुरात नेहमी आढळून येणाऱ्या अनेक प्रकारच्या व्यक्तींचे वर्णन केले असून पुढे राजकुलाशी संबद्ध अशा पुरुषांचे स्वभावविशेष विस्ताराने सांगितले आहेत. महादेवी, देवी, स्वामिनी, नाटकीया, नर्तकी, प्रतीहारी, कञ्चुकीय प्रभृती अन्तःपुराशी संबद्ध असलेली पात्रे, तसेच राजा, सेनापति, मन्त्री, पुरोहित वगैरे राजकुला-तील इतर व्यक्ती यांच्या स्वभावविशेषांचे विस्तृत विवेचन येथे आढळते. नाटकाचा नायक राजा असणे आवश्यक मानल्यामुळे आणि रूपकप्रकारांत नाटकच सर्वश्रेष्ठ असल्यामुळे ह्या पात्रांचाच प्राधान्येकरून विचार केला जावा हे स्वाभाविक होते.

ह्या सर्व स्वभाववर्णनावरून एक गोष्ट स्पष्ट होते. प्रत्येक पात्राच्या ठिकाणी त्याचे स्थान व हुद्दा यांना अनुरूप असे सर्व गुण असणे आवश्यक मानले आहे. उदाहरणार्थ, राजा बुद्धिसंपन्न, शूर, दक्ष, अव्यसनी, अर्थशास्त्रवित् इत्यादी प्रकारे अनेक गुणांनी मंडित असावा असे म्हटले आहे. नाटकाचा नायक प्रख्यात व उदात्त असावा असे म्हटले आहे त्याला पूरक असेच हे वर्णन आहे. त्याचप्रमाणे सेनापति, मंत्री यांच्या वर्णनातही त्यांच्या अधिकाराला आवश्यक अशा शौर्य, स्वामिभक्ती वगैरे सर्व गुणसमुच्चयाचा निर्देश आहे. या नियमांचे पालन केल्यास निरनिराळ्या नाटकांतील पात्रांच्या स्वभावात मूलभूत फरक पड-ण्याचा संभव नाही. शिवाय, सर्वत्र पात्रांच्या स्वभावाचे चित्रण आदर्श स्वरूपातच होणार. तथापि, भिन्न भिन्न नाटकांतील प्रसंगांची विविधता आणि त्या प्रसंगीं होणारी पात्रांची विविध स्वरूपाची वागणूक यांमुळे स्वभावास्वभावामधील भिन्नता अभिव्यक्त झाल्याशिवाय

राहात नाही. आणि याच्याच अनुरोधाने सर्व गुण अंगी असलेल्या राजाच्या ललित, उद्धत, शान्त अशा भिन्न भिन्न प्रकृती मानल्या आहेत. त्यामुळे नाटकातील पात्रे ठरीव साचेबंध स्वरूपाची होण्याचा संभव असला तरी भरताच्या नियमांच्या चौकटीतही पात्रांच्या स्वभावचित्रणात विविधता उत्पन्न करण्यास पुष्कळ अवकाश आहे असे म्हणावयास हरकत नाही.

## भाषा

नाट्यात्म काव्याच्या संबंधात भरताने निर्दिष्ट केलेल्या दोन वैशिष्ट्यांचा उल्लेख करणे उचित होईल. एक, नाटकातील संवादासाठी योजावयाच्या भाषांचे मिश्रण आणि दुसरे, गद्य आणि पद्य ह्या दोन्ही वाङ्मयप्रकारांचा उपयोग. संस्कृत आणि प्राकृत अशा दोन प्रकारच्या पाठ्याचा निर्देश करून भरताने प्राकृत पाठ्य समानशब्द, विभ्रष्ट आणि देशीगत असे तीन प्रकारचे असते असे म्हटले आहे (१७.१-३). मागधी, अवन्तिजा, प्राच्या, शौरसेनी, अर्धमागधी, बाह्लीका आणि दाक्षिणात्या या देशविशेषांत प्रचारात असलेल्या सात भाषा आणि शकार, आभीर, चण्डाल, शबर, द्रमिल, आन्ध्र आणि वनचर या जातिविशेषांत प्रचलित असलेल्या सात विभाषा यांचा निर्देश करून नाटकात त्या कोणाच्या तोंडी घालाव्यात याचे वर्णन केले आहे. सामान्यपणे उत्तम आणि मध्यम प्रकृतीच्या पुरुष पात्रांची भाषा संस्कृत असावी आणि स्त्री पात्रांची व शकार आदी अनार्य जातींतील पात्रे खेरीज करून इतर पात्रांची भाषा शौरसेनी असावी असा नियम आहे. तथापि या नियमाला अनेक अपवाद असल्याचे सांगितले आहे (१७.३२-६४).

नाटकात आवश्यक मानलेल्या विविध भाषांच्या उपयोगाचे मूळ वास्तवाचे यथातथ्य अनुकरण करण्याच्या इच्छेत आहे हे उघड आहे. नाट्य ज्यावेळेस प्रथम अस्तित्वात आले त्या वेळी सर्व लोकांच्या बोलण्यात एकच शुद्ध स्वरूपाची संस्कृत भाषा होती अशी परिस्थिती राहिली नव्हती. उच्च वर्णीय, विशेषतः सुशिक्षित लोक प्रायः शुद्ध संस्कृतात बोलत असत, परंतु इतर लोक, विशेषतः शिक्षणाचा संस्कार न झालेले लोक अशुद्ध भाषेचा उपयोग करीत. ही अशुद्ध संस्कृत भाषा म्हणजेच प्राकृत भाषा. संस्कृत आणि प्राकृत ही एकाच भाषेची शुद्ध आणि अपभ्रष्ट रूपे हे सामान्यतः मान्य होण्यासारखे आहे. प्राकृताची देशपरत्वे शौरसेनी, मागधी इत्यादी भिन्न भिन्न रूपे झाली इतकेच. सामान्यपणे कोणत्याही समाजात उच्च वर्गांतील व सुशिक्षित लोकांची शुद्ध भाषा आणि कनिष्ठ वर्गांतील व अशिक्षित लोकांची अशुद्ध भाषा यांत जितका फरक असतो तितकाच फरक संस्कृत आणि प्राकृत यांमध्ये आहे. आणि ज्याप्रमाणे हल्ली सुद्धा सुशिक्षित व अशिक्षित लोक भाषेच्या आपापल्या रूपांचा उपयोग करून परस्परांशी व्यवहार करू शकतात त्याचप्रमाणे संस्कृतभाषी आणि प्राकृतभाषी आपापल्या भाषेचा व्यवहारात उपयोग करीत असावेत.

याच तत्कालीन परिस्थितीचे प्रतिबिम्ब नाटयात पडले आहे असे समजण्यास हरकत नाही. स्त्रियांना सामान्यतः प्राकृतभाषी ठरविले आहे यावरून त्यांच्यापैकी फार थोड्या व्यक्तींवर शिक्षणाचे संस्कार होत असत असे अनुमान निघते.

प्राकृत बोलींपैकी मुख्यतः शौरसेनीचा उपयोग करावयास सांगितले आहे. यावरून असा निष्कर्ष काढला की नाट्याची उत्पत्ती शूरसेन देशात झाली तर चूक होणार नाही. शूरसेन देश म्हणजे मथुरा नगरी राजधानी असलेला प्रदेश. जेव्हा इतर प्रदेशांतील नागरिकांची अथवा शबर आदी अनार्य व्यक्तींची नाटकात योजना करावयाची असेल तेव्हा त्यांना आपापल्या बोलीत बोलावयास लावावे असे अभिप्रेत आहे. ह्यात सुद्धा वास्तवाच्या अनुकरणाचीच इच्छा दिसून येते.

### गद्य व पद्य

भरतवर्णित नाट्याची दुसरी विशेषता म्हणजे गद्य आणि पद्य यांचा मिश्र उपयोग. गद्याला भरताने चूर्णपद असे म्हटले असून पद्य म्हणजे निबद्ध पद (१४.४०–४१). ह्या दोहोंचा उपयोग केव्हा आणि कसा करावयाचा ते त्याने स्पष्ट केलेले नाही. तथापि, भावनांच्या आविष्कारासाठी व वैशिष्ट्ययुक्त वर्णनासाठी पद्याचा उपयोग आणि इतरत्र संवादासाठी गद्याचा उपयोग व्हावा हे स्वाभाविक मानता येईल. हे लक्षात ठेवणे आवश्यक आहे की पद्याचा अन्तर्भाव पाठ्यातच होतो. याचा अर्थ नाटकातील श्लोकांचे पठन करावयाचे असते, ते गावयाचे नसतात. गाण्यासाठी भरताने बत्तिसाव्या अध्यायात ध्रुवा नावाच्या पद्यांचे प्रकार निर्दिष्ट केले असून त्यांची अनेक उदाहरणे दिली आहेत. ही सर्व पद्ये प्राकृतात आहेत. यावरून गाण्याची भाषा प्राकृत हे ठरून गेले होते असा निष्कर्ष निघतो.

कथानकाची मांडणी, पात्रे, भाषा इत्यादींसंबंधी भरताने केलेल्या विवेचनाला अनुसरूनच सध्या उपलब्ध असलेल्या प्रायः सर्व नाटकांची रचना झालेली दिसून येते. नाटक, प्रकरण, भाण, प्रहसन इत्यादी रूपकांचे प्रकार, अंकांमध्ये वस्तूची विभागणी, प्रवेशक आणि विष्कम्भक यांचा उपयोग, नाटकात योजावयाची पात्रे, संस्कृत आणि प्राकृत भाषांचा मिश्र उपयोग, गद्य आणि पद्य दोन्ही वाङ्मयप्रकारांचा उपयोग इत्यादी सर्व बाबतींत प्रसिद्ध झालेली संस्कृत नाटके नाटयशास्त्रातील विवेचनाच्या आधारेच लिहिली गेली आहेत यात शंका नाही. क्वचित एखाद्या नाटयकृतीत भरताची एखादी सूचना अमलात आणली गेली नाही असे दिसून येते. पण या गोष्टीला अवास्तव महत्त्व देऊन त्यावरून एखादे नाटक भरतपूर्वकालीन आहे असे ठरविणे युक्तिसंगत वाटत नाही. कोणताही नाटककार भरताच्या बारीकसारीक नियमांचे सुद्धा उल्लंघन करण्यास प्रवृत्त होणे शक्य नाही असे मानण्याचे काही कारण नाही. अर्थात नाट्यशास्त्राच्या रचनेच्या पूर्वी अनेक

संस्कृत नाटके विद्यमान होती यात शंका नाही. किंबहुना त्या नाटकांच्या परिशीलनानेच ह्या शास्त्राची निर्मिती शक्य झाली हे उघड आहे. पण त्या भरतपूर्वकालीन नाटकांपैकी एखादे तरी आज उपलब्ध आहे असे निश्चितपणे म्हणता येण्यासारखे नाही.

भरताच्या काळी संस्कृत नाटके विद्यमान होती इतकेच नव्हे तर त्यांचे प्रयोगही मोठया प्रमाणावर होत असत. नाटयशास्त्राचे कितीतरी अध्याय नाटयप्रयोगाच्या सविस्तर वर्णनाला वाहिलेले आहेत. तत्कालीन प्रयोगाच्या स्वरूपाची साधारण कल्पना यावी म्हणून ह्या वर्णनाचा थोडक्यात परिचय करून घेणे अनुचित होणार नाही.

**नाट्यमंडप**

नाटयप्रयोगासाठी प्रथम आवश्यक आहे नाटयमंडप अथवा प्रेक्षागृह. ते कसे असावे याचे वर्णन दुसऱ्या अध्यायात केले आहे. लम्बचौरस, चौरस आणि त्रिकोणी अशा तीन प्रकारच्या मंडपांचा निर्देश करून त्या प्रत्येकाचे ज्येष्ठ, मध्यम आणि कनिष्ठ परिमाण असतात असे म्हटले आहे. सर्वसाधारण नाटकांना मध्यम परिमाणाचा लम्बचौरस मंडप उपयोगी असतो म्हणून त्याचे विस्ताराने वर्णन केले आहे. हा मंडप ६४ हात लांब आणि ३२ हात रुंद (१ हात म्हणजे सुमारे १॥ फूट) असा मोजून त्याचे ३२ हात × ३२ हात असे दोन भाग करावेत. पश्चिमेकडील चौरस भागात नेपथ्यगृह आणि रंगभूमी तर पूर्वेकडील अर्ध्या भागात प्रेक्षकांची बसण्याची जागा असावी. प्रेक्षकांच्या जागेपेक्षा रंगभूमीचा भाग दीड हात अधिक उंच करावा. ह्या उंच भागातील पाठीमागचा अर्धा भाग म्हणजे नेपथ्यगृह आणि पुढचा अर्धा भाग म्हणजे रंगभूमी. या दोहोंच्या मध्ये एक भिंत उभी करून त्या भिंतीत उत्तर बाजूला आणि दक्षिण बाजूला पात्रांच्या प्रवेश-निष्क्रमणासाठी दोन दरवाजे असावेत. रंगभूमीचे सुद्धा दोन समान भाग करावेत, पाठीमागचा भिंतीजवळचा भाग तो रंगशीर्ष आणि पुढचा प्रेक्षकांच्या समीप असणारा भाग तो रंगपीठ. रंगपीठापेक्षा रंगशीर्षाचा भाग किंचित अधिक उंच करावा. रंगपीठाच्या दोन्ही बाजूस आठ हात चौरस असे दोन मत्तवारणी नावाचे व्हरांडे तयार करावेत. हे नाटयमंडपाच्या बाहेरच्या बाजूस असावेत असे अभिनवगुप्ताचे मत असल्याचे आचार्य विश्वेश्वर यांनी प्रतिपादन केले आहे ते पटण्यासारखे आहे.[६] प्रेक्षकांसाठी बसण्याच्या जागा विटा किंवा लाकूड यांच्या साहाय्याने बनवाव्यात आणि ह्या आसनपंक्ती सोपानाकृति म्हणजे पायऱ्यांच्या स्वरूपाच्या असाव्यात. प्रेक्षकांसाठी येण्याजाण्याचा दरवाजा आसनांच्या पाठीमागे पूर्वेकडील भिंतीत आणि नटांच्यासाठी आत येण्याचा दरवाजा नेपथ्यगृहाच्या पाठीमागे पश्चिमेकडील भिंतीत असावा. नाटयमंडपाच्या आग्नेय, नैर्ऋत्य, वायव्य आणि ईशान्य

६ **हिंदी अभिनवभारती**, आचार्य विश्वेश्वरकृत (दिल्ली विश्वविद्यालय, दिल्ली, १९६०) पृ. ३१०–३२२.

दिशांना असलेल्या चार कोपऱ्यांत उभे करावयाच्या चार खांबाना अनुक्रमे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या संज्ञा दिल्या असून मंडपात आधारासाठी अन्य चोवीस खांब आवश्यक असल्याचे म्हटले आहे असा अभिनवगुप्ताच्या व्याख्येचा आशय आहे.

नाट्यशास्त्रात रंगभूमीवर असलेल्या पडद्यासाठी यवनिका हा शब्द वापरला आहे. पूर्वरंगाच्या वर्णनात असे म्हटले आहे की त्याच्या पहिल्या नऊ अंगांची योजना यवनिकेच्या आत असलेल्या गायक व वादक कलाकारांनी करावयाची असून त्यानंतरच्या इतर अंगांचा प्रयोग यवनिका दूर केल्यानंतर त्यांनी करावयाचा आहे (५.११-१२). अभिनवगुप्ताने म्हटले आहे की हा पडदा रंगपीठ आणि रंगशीर्ष यांच्या मध्ये असावा, आणि तेच बरोबर वाटते. रंगभूमीच्या अगदी पुढे दर्शनी पडदा अभिप्रेत असण्याची शक्यता वाटत नाही. पात्रांच्या रंगभूमीवर होणाऱ्या प्रवेशाचे आणि निष्क्रमणाचे निर्देश आहेत. हे सर्व प्रवेश आणि निष्क्रमणे पडद्याच्या साहाय्यावाचूनच होत असावेत असे दिसते.

## पूर्वरंग

प्रत्येक नाट्यप्रयोगाचा प्रारंभ पूर्वरंगाने करावयास सांगितले आहे. पूर्वरंगाचे विस्तृत वर्णन पाचव्या अध्यायात केले आहे. त्याची एकंदर वीस अंगे निर्दिष्ट आहेत : (१) **प्रत्याहार,** यात वाद्ये रंगभूमीवर आणली जातात आणि वादक कलाकार ठरलेल्या जागी स्थानापन्न होतात. (२) **अवतरण,** यात गायक स्थानापन्न होतात. (३) **आरम्भ,** यात गायक गीतस्वरांचा आरम्भ करतात. (४) **आश्रावणा,** यात वाद्यवादनाला प्रारम्भ होतो. (५) **वक्त्रपाणि,** यात बासरी व तत्सदृश वाद्ये वाजविली जातात. (६) **परिघट्टना,** यात वीणा व तत्सदृश वाद्ये वाजविली जातात. (७) **संघोटना,** यात पुष्कर आदी वाद्य वाजविली जातात. (८) **मार्गासारित,** यात सर्व प्रकारची वाद्ये एकत्र वाजविली जातात. (९) **आसारितक्रिया,** यात नंतर म्हणावयाचे असलेल्या गीतासाठी अनुरूप ताल आणि लय यांचा उपक्षेप केला जातो. ही पहिली नऊ अंगे होत असता गायक व वादक यवनिकेचे आतच असतात. यानंतर यवनिका दूर केली जाते व पुढील अंगांचा प्रयोग सुरू होतो. (१०) **गीत,** यात देवतांच्या स्तुतिपर असलेल्या एका गीताचे गायन होते. (११) **वर्धमान,** यात तांडव नृत्य केले जाते. (१२) **उत्थापन,** यात इन्द्रध्वजाचे आरोपण केले जाते व त्यावेळेस उत्थापनी ध्रुवेचे गायन केले जाते. ह्या ध्वजारोपणासाठी दोन पारिपार्श्वकांसह सूत्रधाराचा प्रवेश होतो. एका पारिपार्श्वकाच्या हातात पाण्याचा कलश असतो व दुसऱ्याच्या हातात इन्द्रध्वज. फूल अर्पण करून सूत्रधार इन्द्रध्वज उभा करतो. (१३) **परिवर्तन,** यात सूत्रधार पारिपार्श्वकांसह रंगभूमीच्या चारही दिशांना जाऊन लोकपालांची स्तुती करतो आणि जर्जरपूजा म्हणजे इन्द्रध्वजाची पूजा करतो. (१४) **नान्दी,** यात आशीर्वचन आणि नमस्कार असतात. नान्दीचे पठन सूत्रधार मध्यम स्वरात करतो. (१५) **शुष्कावकृष्टा,** ही एक प्रकारची ध्रुवा आहे. हिचे गायन

झाल्यावर सूत्रधार गंभीर स्वरात जर्जरश्लोक म्हणतो, त्यात ज्या देवतेच्या यात्रेचा प्रसंग असतो त्या देवतेची अथवा राजाची स्तुती असते. (१६) **रङ्गद्वार,** यात आणखी एका श्लोकाचे पठन होऊन जर्जर अथवा इन्द्रध्वज खाली केला जातो. (१७) **चारी,** यात सूत्रधार पारिपार्श्वकांसह विविध प्रकारचे पदविन्यास करून शृंगारिक अभिनय करतो. (१८) **महाचारी,** यात सुद्धा पदविन्यासच असतात, पण यातील अभिनय रौद्र स्वरूपाचा असतो. (१९) **त्रिगत,** यात सूत्रधार, विदूषक आणि पारिपार्श्वक या तिघांत संभाषण चालते, त्यात विदूषक पुष्कळसे असंबद्ध आणि अर्थहीन असे बोलतो. ह्या निर्देशावरून हे उघड आहे की सूत्रधाराबरोबर येणाऱ्या दोन पारिपार्श्वकांपैकीच एक विदूषक नावाचा असतो. (२०) **प्ररोचना,** यात ज्या नाटकाचा प्रयोग व्हावयाचा असतो त्याचा निर्देश करून सूत्रधार ते पहाण्याची प्रेक्षकांना विनंती करतो. यानंतर सूत्रधार आणि पारिपार्श्वक यांचे निष्क्रमण होऊन पूर्वरंगाची समाप्ती होते. हे झाले चतुरस्र पूर्वरंगाचे वर्णन. त्र्यस्र पूर्वरंगात यांतील काही अंगांना काट देता येतो, तर चित्र पूर्वरंगात या अंगांत वृद्धी सुद्धा करता येते.

पूर्वरंगाच्या ह्या वर्णनावरून हे उघड आहे की देवदेवतांना प्रसन्न करण्याचा हा एक प्रदीर्घ विधी आहे. प्रत्येक अंगाने कोणकोणत्या देवतेला, दैत्यांना, भूतगणांना, पितृगणांना वगैरे संतोष प्राप्त होतो त्याचा नाटयशास्त्रात निर्देश केला आहे. प्रसन्न करण्याचे प्रमुख साधन, नृत्य, गीत आणि वाद्य, ह्यांचा पूर्वरंगविधीत मोठया प्रमाणावर उपयोग होतो. त्याचबरोबर इन्द्रध्वजाची उभारणी व त्याची पूजा यांना ह्या विधीत महत्त्वाचे स्थान आहे. पूर्वरंगाच्या ह्या विधीशी नाटककार अथवा त्याची नाटयकृती यांचा काही संबंध नाही हे उघड आहे. शेवटच्या प्ररोचना नावाच्या अंगात नाटकांचा निर्देश असतो इतकेच. पूर्वरंगाच्या प्रयोगात पुष्कळ वेळ जात असला पाहिजे. शिवाय त्यातील कलाकारांना आपापले कार्य लांबविण्याचा मोह होणेही स्वाभाविक आहे. म्हणून भरताने सांगितले आहे की नृत्य, गीत आदी गोष्टी फार लांबवू नयेत, कारण त्यामुळे प्रेक्षकांना कंटाळा येण्याचा संभव आहे. काही नाटककारांनी सूत्रधाराच्या तोंडी घातलेले 'अलमतिविस्तरेण' हे वचन पूर्वरंगाच्या विस्ताराला उद्देशून आहे.

## नान्दी

नान्दी हे पूर्वरंगाचेच एक – चौदावे – अंग. त्यावरून हे आपोआपच सिद्ध होते की नान्दी ही नाटककाराची कृती नव्हे. भरताने नान्दी बारा पदांनी किंवा आठ पदांनी अलंकृत असावी असे म्हटले आहे. पण त्याने जे नान्दीचे उदाहरण दिले आहे त्यात हा नियम पाळलेला दिसत नाही. चार श्लोक मिळून बनलेल्या ह्या नान्दीत सर्व देवांना नमस्कार असो, द्विजातींचे शुभ होवो, राजा अखिल पृथ्वीवर राज्य करो, राज्याची वृद्धी होवो, रंग समृद्ध होवो, प्रेक्षकांचा धर्म वृद्धिंगत होवो, नाटककाराच्या यशात भर पडो अशा

प्रकारच्या अनेक प्रार्थना आहेत (५.१०५–१०८). प्रत्येक वाक्य उच्चारल्यानंतर पारिपार्श्वकांनी 'एवमस्तु' असे म्हणावयाचे असते. सांप्रतच्या संस्कृत नाटकांत प्रारंभी असलेल्या मंगलश्लोकांना भरतकृत नान्दीचे लक्षण लागू पडत नाही हे उघड आहे. साहित्यदर्पणकार विश्वनाथाने म्हटले आहे की हे श्लोक म्हणजे वस्तुतः पूर्वरंगाचे रंगद्वार हे अंग.[७] पण हे म्हणणे सुद्धा पटण्यासारखे नाही. रंगद्वारानंतर पूर्वरंगात आणखी चार अंगे असतात. त्यांना सांप्रतच्या नाटकांत मुळीच स्थान नाही. या संबंधात एक गोष्ट लक्षात येण्यासारखी आहे. दशरूपकार धनंजयाने पूर्वरंगाचा निर्देश केला नाही, इतकेच नाही तर नान्दीचाही कोठे उल्लेख केला नाही. उत्तरकाली पूर्वरंगाचा विधी प्रचारात राहिला नाही असे म्हणता येईल.

या ठिकाणी असा प्रश्न उद्भवण्याचा संभव आहे की सांप्रतच्या नाटकांतील प्रारंभीचे श्लोक मूलतः नान्दी नाहीत तर त्यांच्या पूर्वी अथवा नंतर 'नान्द्यन्ते ततः प्रविशति सूत्रधारः' अशा प्रकारची नाट्यसूचना आढळते ते कसे? या प्रश्नाचे उत्तर असे दिसते की कालान्तराने पूर्वरंगाचा संक्षेप होऊन त्यातील नान्दी हे प्रधान अंगच अवशिष्ट राहिले आणि तिचे पठन झाल्यावर नाटककाराच्या कृतीचा प्रारंभ होई. हा प्रारंभ सर्वत्र आढळणाऱ्या मंगलश्लोकांनी होई. पुढे हे श्लोक म्हणजेच नान्दी असे समजले जाऊ लागले.

## प्रस्तावना

भरताच्या वर्णनाप्रमाणे पूर्वरंगाची समाप्ती झाल्यावर पारिपार्श्वकांसह सूत्रधाराने निष्क्रमण करावे. त्यानंतर सूत्रधारासारखाच असणाऱ्या स्थापकाने प्रवेश करून रंगाचे प्रसादन करावे आणि नाटककार कवीचे नाव सांगून प्रस्तावना करावी. यावरून पूर्वरंगातील सूत्रधार आणि प्रस्तावनेतील स्थापक हे भिन्न आहेत हे उघड होते. म्हणजे पूर्वरंग आणि नाटक हे जवळजवळ संपूर्णपणे स्वतंत्र असे प्रयोग होते. अगदी प्रारंभी अशीच व्यवस्था होती असे दिसते. परंतु पुढे सूत्रधार आणि स्थापक यांच्यातील भेद नष्ट झाला आणि पूर्वरंगाची योजना करणारा सूत्रधारच स्थापक बनून नाटकाची प्रस्तावना आयोजित करू लागला. हे स्वाभाविक असेच समजता येईल. अभिनवगुप्ताने सूत्रधार व स्थापक यांत भेद मानला नाही. स्थापकाने मधुर श्लोकांनी रंगाचे प्रसादन करावे आणि कवीचे नाव सांगून प्रस्तावना करावी असे म्हटले आहे. हल्ली नाटकाच्या आरंभीचे हे श्लोक नान्दी म्हणून ओळखले जातात ते मूलतः हे रंगप्रसादनपर श्लोक होत असे समजण्यास हरकत नाही.

७ एतन्नान्दीति कस्यचिन्मतानुसारेणोक्तम् । वस्तुतस्तु पूर्वरङ्गस्य रङ्गद्वाराभिधानमङ्गमित्युच्यते ।
—सा. द. ६.२४–२५ वरील वृत्ति.

स्थापकाने विविध प्रकारच्या उपक्षेपांनी काव्य म्हणजे नाटक प्रस्तुत करावे असे सांगितले आहे. हीच नाटकाची प्रस्तावना. हिला आमुख असेही नाव असून सूत्रधाराचा अथवा स्थापकाचा नटी, विदूषक किंवा पारिपार्श्वक यांच्याबरोबर आपल्या स्वतःच्या कार्याविषयी होणारा संवाद आणि तद्द्वारा नाटकाच्या प्रारंभीच्या प्रवेशाचे सूचन ही तिची वैशिष्ट्ये होत. आमुख भारती वृत्तीचा एक भाग मानला असून उद्घात्यक, कथोद्घात, प्रयोगातिशय, प्रवृत्तक आणि अवलगित ही आमुखाची म्हणजे प्रस्तावनेची पाच अंगे होत असे म्हटले आहे (२०.३०-३७). ही अंगे म्हणजे नाटकाचा प्रारम्भ सूचित करण्याचे निरनिराळे प्रकार होत. यांपैकी उद्घात्यक आणि अवलगित यांचा वीथ्यंगांतही समावेश केला आहे (१८.१०५-१०६). अशा प्रकारची प्रस्तावना हे संस्कृत नाटकाचे वैशिष्ट्य आहे हे सर्वमान्य आहे.

## ध्रुवागान

पूर्वरंगात जे गायक आणि वादक कलाकार रंगशीर्षावर स्थानापन्न झालेले असतात ते नाटकाचा प्रयोग सुरू झाल्यावरही तेथेच बसून राहातात. नाटकातील विविध प्रसंगांत ध्रुवांचे गायन करणे हे त्यांचे कार्य असे समजावयास हरकत नाही. कारण, ध्रुवांच्या संबंधी अति विस्तृत विवेचन बत्तिसाव्या ध्रुवाध्यायात केले आहे. ध्रुवा म्हणजे विविध प्रकारच्या वृत्तांमध्ये निबद्ध झालेला अक्षरसमूह म्हणजेच पद्य. प्रत्येक पादात चार पासून बावीस अक्षरे असलेल्या अनेक ध्रुवापद्यांची नामनिर्देशासह उदाहरणे दिली आहेत. ही सर्व पद्ये शौरसेनी प्राकृतात आहेत. ध्रुवांची ही पद्ये पठन करावयाची नसून ती गावयाची असतात. नाटकात पाच प्रसंगी हे ध्रुवागान करावयास सांगितले आहे. रंगभूमीवर पात्राच्या प्रवेशाच्या प्रसंगी गायिली जाते ती **प्रावेशिकी** ध्रुवा, तसेच त्याच्या निष्क्रमणाच्या समयी गातात ती **नैष्क्रामिकी** ध्रुवा. एका रसाचा आक्षेप करून भिन्न लयातील रसाचा उपक्षेप करणारी ती **आक्षेपिकी** ध्रुवा, पात्राच्या चित्तवृत्तीचा आविष्कार करणारी ती **प्रासादिकी** ध्रुवा, आणि परिक्रमण, मूर्च्छा इत्यादींनी खंड पडला असता म्हणावयाची ती **आन्तरा** ध्रुवा. ह्या सर्व ध्रुवा अन्योक्तीच्या स्वरूपाच्या आहेत, म्हणजे पात्राला मेघ, सिंह, सारस इत्यादी कल्पून हे प्राकृत श्लोक रचलेले आहेत. ह्या सर्व ध्रुवा गायिल्या जाव्यात हे अपेक्षित आहे, इतकेच नव्हे तर निरनिराळ्या प्रसंगांना अनुसरून ताल, लय, स्वर यांची विविध प्रकारे योजना कशी करावी हेही विस्ताराने सांगितले आहे. हे गायन रंगशीर्षावर उपस्थित असलेले गायक करीत असले पाहिजेत. असा संभव आहे की ध्रुवागान मूलतः नृत्ताच्या समयी केले जात असे. पण नाट्यशास्त्रावरून हे स्पष्ट आहे की नाटकाच्या प्रयोगातही त्याची योजना केली जात असे. आठव्या शतकात लिहिलेल्या दामोदरगुप्ताच्या कुट्टनीमत ह्या ग्रंथात रत्नावली नाटिकेच्या पहिल्या

अंकाच्या प्रयोगाचे वर्णन आहे, त्यात प्रावेशिकी आणि नैष्क्रामिकी या दोन ध्रुवा म्हटल्या गेल्या असल्याचा निर्देश आहे.[८] विक्रमोर्वशीय नाटकाच्या चौथ्या अंकाचे जे बंगाली संस्करण आहे त्यात पुरूरव्याची चित्तवृत्ती आणि अवस्था यांचे सूचन करणारी प्राकृत आणि अपभ्रंश भाषांतील अनेक पद्ये आहेत. ती सर्व अन्योक्तीच्या स्वरूपाची असून त्यांना ध्रुवा संबोधणेच उचित होईल. ह्या ध्रुवा कालिदासकृतच आहेत हे जरी संशयातीत नसले तरी ह्या नाटकाच्या प्रयोगाच्या वेळी भारतातील निदान काही प्रदेशांत ध्रुवागान करण्याची पद्धती चालू होती यात शंका नाही. नाटकात गावयाच्या असलेल्या ह्या ध्रुवांची रचना नाटककार कवीच करीत असे असे मानता येण्यासारखे आहे. भरताने उद्धृत केलेल्या अनेक ध्रुवांत श्रेष्ठ प्रतीचे काव्य आहे. नंतरच्या काळी ध्रुवागानाची पद्धती हळुहळू प्रचारातून गेली असे दिसते. विक्रमोर्वशीयाचा अपवाद वगळता अन्य नाटकांच्या प्रयोगासाठी रचलेल्या ध्रुवा उपलब्ध झालेल्या नाहीत.

## सूत्रधार व इतर नट

पूर्वरंगानंतर योजावयाच्या प्रस्तावनेत उपस्थित होणारे सूत्रधार, पारिपार्श्वक आदी नट म्हणून उपस्थित होतात, नाटकातील कोणत्याही भूमिकेत अवतीर्ण झालेले नसतात. सूत्रधार हा या नटवर्गातील मुख्य. त्याच्या अंगी कोणते गुण आवश्यक आहेत त्याच नाटयशास्त्रात निर्देश केला आहे. सूत्रधारालाच अन्यत्र नाटयाचार्य अथवा नुसतेच आचार्य म्हटले आहे. गीत, नृत्त, वाद्य, प्रस्तार (ताल), गमनक्रिया व शिष्यनिष्पादन हे आचार्यगुण असे म्हटले असून ऊह, अपोह, मति, स्मृति व मेधा ह्या गोष्टी त्याला आवश्यक मानल्या आहेत (२६.३५-३६). सूत्रधाराशिवाय इतर नटांचे नाटयशास्त्रात वर्णन केले आहे. त्यांनी करावयाच्या कमीअधिक महत्त्वाच्या भूमिकांना अनुसरून त्यांना भरत, नट, नन्दी, नाटयकर, विदूषक अशा संज्ञा दिल्या आहेत. नाटकातील कोणती भूमिका कोणत्या नटाने करावी हे ठरविण्याचे काम नाटयाचार्याचे. ही निवड वय, अवस्था इत्यादी दृष्टींनी अनुरूप असावी, विरूप नसावी हे अर्थातच सांगितले आहे. स्त्रीची भूमिका पुरुषाने केली तर ती योजना रूपानुरूपा असे म्हटले आहे. (२६.१४).

नाट्यप्रयोगाचे सुकुमार आणि आविद्ध असे दोन भिन्न प्रकार निर्दिष्ट केले आहेत. नाटक, प्रकरण, भाण, वीथी आणि उत्सृष्टिकाङ्क यांचे प्रयोग सुकुमार होत, तर समवकार, डिम, व्यायोग आणि ईहामृग यांचे प्रयोग आविद्ध होत. आविद्ध प्रयोगासाठी पुरुष नटांचीच निवड करावी असे सांगितले आहे. सुकुमार प्रयोगांत स्त्रियांची योजना करावी,

८ प्रावेशिक्यवसाने द्विपदीग्रहणान्तरेऽविशत्स्त्री। – कुट्टनीमत, ८८१.
नैष्क्रामिक्या ध्रुवया विनिर्ययौ नायकोऽपि सह सर्वैः। – कुट्टनीमत, ९२८.

विशेषतः शृंगाररसप्रधान अशा नाट्यात सर्वच भूमिका स्त्रियांनी कराव्यात असे म्हटले आहे. याचे कारण असे दिले आहे की स्वर्गात होणाऱ्या नाट्यप्रयोगात रम्भा, उर्वशी आदी अप्सराच सर्व भूमिका करतात. त्याला अनुसरून पृथ्वीवर सुद्धा – विशेषतः राजमहालात – स्त्रियांना भूमिका देणे योग्य होईल. तथापि, सर्वसाधारणपणे अनुरूप अशीच योजना करणे भरताने प्रशस्त मानले आहे. देव, राक्षस, राजा, सेनापति, दास इत्यादी विविध भूमिकांसाठी नटांमध्ये कोणत्या गोष्टी आवश्यक आहेत याचेही भरताने विवेचन केले आहे (पस्तिसावा अध्याय).

भूमिका निश्चित झाल्यावर नटांनी करणे आवश्यक असलेल्या तालमीचा (योग्या) सुद्धा नाट्यशास्त्रात निर्देश आहे. ही योग्या केल्याशिवाय भाव आणि रस यांच्या आविष्कारात सौष्ठव येणार नाही असे भरताने म्हटले आहे (२६.३३). अभिनयद्वारा हा आविष्कार करण्याचे शिक्षण नटांना देण्याचे काम नाट्याचार्याचे हे उघडच आहे. नाट्यशास्त्रात विविध प्रकारच्या अभिनयाचे निरूपण करणारे अनेक अध्याय समाविष्ट केले आहेत, ते नाट्याचार्याला या कामी उपयोगी पडण्यासारखे आहेत.

## आङ्गिक अभिनय

आंगिक, वाचिक, सात्त्विक आणि आहार्य अशा चार प्रकारच्या अभिनयाचे अति विस्तृत विवेचन नाट्यशास्त्रात आढळते. आठ ते तेरा ह्या सहा अध्यायात आंगिक अभिनयाचा परिपूर्ण विचार केला आहे. मस्तक, नेत्र, भुवया, नासिका, ओठ, चिबुक, ग्रीवा इत्यादींच्या विविध प्रकारच्या हालचालींनी निरनिराळे भाव कसे व्यक्त होतात याचे वर्णन आठव्या अध्यायात आहे. नवव्या अध्यायात मुख्यतः हात आणि पाय यांच्या विविध प्रकारच्या चलनवलनाने होणाऱ्या अभिनयाचे विस्तृत वर्णन आहे. हस्ताभिनयाचे अनेक प्रकार – ज्यांना मुद्रा असे म्हणता येण्यासारखे आहे – मुख्यतः नृत्ताला उपयोगी आहेत असे वाटते. तथापि, त्यांपैकी काहींचा नाटकाच्या प्रयोगातही उपयोग होत असावा यात शंका नाही. पुढील दोन अध्यायांत पायांच्या विशिष्ट हालचालींनी करावयाच्या चारी आणि त्यांच्या संयोगाने होणारी मंडले यांचे वर्णन आहे. हे वर्णनही मुख्यतः नृत्तासंबंधात केलेले आहेसे दिसते. तथापि, काही चारींचा उपयोग नाटकातही होण्यासारखा आहे. बाराव्या अध्यायात विविध प्रकारच्या गतींचे वर्णन आहे. आणि तेराव्या अध्यायात कक्षा-विभागाचा म्हणजे रंगभूमीवर कल्पावयाच्या भिन्न भिन्न ठिकाणांचा निर्देश असून शेवटी लोकधर्मी आणि नाट्यधर्मी यांतील भेद स्पष्ट केला आहे. लोकधर्मी म्हणजे लोकव्यवहारात दिसून येणाऱ्या गोष्टी आणि नाट्यधर्मी म्हणजे नाटकात पाळले जाणारे भिन्न असे संकेत, आकाशभाषित, ललित गती इत्यादी. ह्या सहा अध्यायांशिवाय चित्राभिनय नावाच्या पंचविसाव्या अध्यायात अभिनयाच्या द्वारा ऋतू, वृक्ष, सागर, मेघ, चन्द्रजोत्स्ना इत्यादी

गोष्टी कशा सूचित कराव्यात, दुःख, आनन्द, भय, मद आदींची अभिव्यक्ती कशी करावी, धैर्य, शौर्य, गर्व इत्यादी स्वभावविशेष कसे व्यक्त करावेत याचे सूक्ष्म विवेचन केले आहे. या अध्यायाच्या शेवटी आकाशभाषित, अपवारित, जनान्तिक आणि स्वगत ह्या भाषण-प्रकारांचे वर्णन केले आहे. ह्या अध्यायात वर्णिलेले अभिनयाचे प्रकार सुद्धा मुख्यतः नृत्तांत उपयोगी पडण्यासारखे आहेत. असा संभव आहे की आंगिक अभिनयाच्या सर्व प्रकारांची उत्पत्ती नृत्ताच्या अनुषंगाने झाली असावी. तथापि, हा अभिनय मूलतः नृत्ताशी संबद्ध होता असे मानले तरी नाटकाच्या प्रयोगातही त्याचा अनुरूपतेप्रमाणे उपयोग केला जात असणार यात शंका नाही. वचनविरहित अशा नृत्तातील अभिनय आणि वचनयुक्त अशा नाटकातील अभिनय असा भेद भरताने कोठे केलेला नाही. अभिनय नाट्यात करावयाचा असतो असे त्याने म्हटले आहे (८.८) आणि नाट्यात प्रधानतया नाटकाचा अन्तर्भाव होतो. ह्या सर्व अध्यायांतील वर्णनावरून ही गोष्ट स्पष्ट होते की आंगिक अभिनयाचे शास्त्र भरताच्या काळी अति परिणत स्वरूपात विद्यमान होते आणि नाटकाच्या प्रयोगाच्या समयी त्याच्या विविध स्वरूपाचे दर्शन प्रेक्षकांना होत असे.

## वाचिक अभिनय

दुसऱ्या वाचिक अभिनयाचा विचार चौदा ते सतरा या चार अध्यायांत केला आहे. वाक् अथवा वाणी हे नाट्याचे शरीर होय असे प्रारंभी सांगून चौदाव्या अध्यायात संस्कृत भाषेतील वर्ण व त्या भाषेचे व्याकरण यांची थोडक्यात माहिती दिली आहे. नंतर त्या अध्यायात व पुढील पंधराव्या अध्यायात पद्यासाठी वापरावयाच्या विविध वृत्तांच्या व्याख्या देऊन त्यांची उदाहरणेही दिली आहेत. सोळाव्या अध्यायात काव्य ह्या दृष्टीने नाट्याचा विचार करून लक्षण, अलंकार, गुण आणि दोष यांचे विवेचन केले आहे. सतराव्या अध्या-याच्या प्रारंभी प्राकृत भाषेच्या व्याकरणाचे नियम थोडक्यात दिले आहेत आणि शेवटी पाठ्यात आवश्यक असलेल्या गुणांचे वर्णन केले आहे. वस्तुतः वाचिक अभिनय म्हणजे नाटकातील पाठ्य म्हणावयाची पद्धती इतकेच. बाकीचे सर्व विवेचन फक्त नाटककारालाच उपयोगी पडणारे आहे. पाठ्यात अपेक्षित मुख्य गुण म्हणजे ते रस आणि अर्थ यांना अनु-रूप असावे. यासाठी रसानुरूप षड्जादी स्वरांच्या उपयोगाचे ज्ञान आणि अर्थाप्रमाणे स्वरांत बदल करण्याची कला अवगत असणे आवश्यक असल्याचे म्हटले आहे. शब्दांचे शुद्ध उच्चारण आणि स्वराचे यथोचित नियमन ह्या गोष्टी वाचिक अभिनयाला मूलभूत होत. साकांक्ष आणि निराकांक्ष काकु, उच्च, दीप्त, मन्द्र इत्यादी अलंकार, विराम इत्यादींचा पाठ्यगुणांत समावेश केला आहे. या सर्व विवेचनावरून हे स्पष्ट होते की वाचिक अभिनयाची म्हणजे पाठ्याची कला सुद्धा भरताच्या काळी परिणत अवस्थेला पोचली होती. हा अभिनय केवळ नाटकांच्या प्रयोगातच केला जाण्याची शक्यता आहे हे उघड आहे.

## सात्त्विक अभिनय

तिसरा अभिनयाचा प्रकार सात्त्विक अभिनय. ह्याचा अवलंब सात्त्विक भावांच्या अभिव्यक्तीसाठी करावयाचा असतो. स्तम्भ, स्वेद, रोमाञ्च, स्वरभेद, वेपथु, वैवर्ण्य, अश्रु आणि प्रलय असे हे आठ सात्त्विक भाव होत. व्यभिचारिभावांपेक्षा यांचे वैशिष्ट्य असे की यांच्या अभिव्यक्तीसाठी नटाच्या ठिकाणी सत्त्व आवश्यक असते. सत्त्व म्हणजे ज्या पात्राची भूमिका करावयाची त्याचे स्वभाववैशिष्ट्य. पात्राचे सत्त्व नटाच्या ठिकाणी दिसून यावे यासाठी त्याचे मन समाहित होणे आवश्यक आहे, म्हणजेच मन एकाग्र करून तो त्या पात्राशी एकरूप झाला पाहिजे. मनाची समाहितता नसेल तर अश्रू, रोमांच इत्यादींचा अभिनय नटाला करता येणार नाही. नाटयात सुख आणि दुःख यांचे यथार्थ दर्शन घडवावयाचे असते. दुःखाचे दर्शन घडविण्यासाठी रडून अश्रू ढाळणे आवश्यक होते, तसेच हर्षाच्या प्रसंगी अंगावर रोमांच आलेले दाखवावे लागतात. पण नट स्वतः दुःखी अथवा सुखी नसता त्याला ह्या गोष्टी कशा साधणार? याचे उत्तर पात्राचे सत्त्व त्याच्या ठिकाणी उत्पन्न होऊन मनाच्या समाहित अवस्थेमुळे तो दुःखी किंवा सुखी असल्याचे दाखवू शकतो (७.९३ नंतरचे गद्य) असे आहे. भरताने अन्यत्र असे म्हटले आहे की ज्याप्रमाणे जीव एका देहातील आपल्या स्वभावाचा परित्याग करून दुसऱ्या देहात प्रवेश केल्यावर दुसरे भाव धारण करतो त्याप्रमाणे नटाने स्वतःच्या भावांचा त्याग करून पात्राच्या ठिकाणचे भाव मी तोच आहे असे मनात आणून वाक्, चेष्टा आदींनी प्रकट करावेत.[१] भूमिकेशी अशा प्रकारे तन्मय झाल्यावर उत्कट भावनांची आपोआप जी अभिव्यक्ती होते ती सात्त्विक अभिनयामुळे.

## आहार्य अभिनय

चौथ्या प्रकारचा जो आहार्य अभिनय त्याचे विस्तृत वर्णन एकविसाव्या अध्यायात केले आहे. आहार्य अभिनय म्हणजे नेपथ्यकर्म. पुस्त, सजीव, अलंकार आणि अंगरचना असे त्याचे चार प्रकार आहेत. पहिल्या दोहोंच्या साहाय्याने प्रयोगासाठी आवश्यक असलेल्या वस्तू तयार केल्या जातात, तर नंतरचे दोन प्रकार नटांच्या वेषभूषेसंबंधी आहेत. निर्जीव वस्तू तयार करण्याच्या प्रक्रियेला पुस्त अशी संज्ञा आहे आणि सचेतन प्राण्यांची प्रतिकृती बनविण्याच्या क्रियेला सजीव म्हटले आहे. निर्जीव वस्तू सुद्धा तीन

१ यथा जीवः स्वभावं स्वं परित्यज्यान्यदैहिकम् ।
परभावं प्रकुरुते परदेहं समाश्रितः ।।
एवं बुधः परं भावं सोऽस्मीति मनसा स्मरन् ।
वेषवागङ्गलीलाभिश्चेष्टाभिश्च समाचरेत् ।। (२६.७–८, शुद्ध केलेला पाठ; तसेच २१.८९–९१).

प्रकारांनी करता येतात. बांबू, चामडे, वस्त्र इत्यादींनी वस्तू बनवितात त्याला सन्धिम पुस्त असे नाव दिले आहे. यंत्राने जेव्हा एखादी वस्तू बनविली जाते तेव्हा ते व्याजिम पुस्त होय. आणि वस्तू वस्त्राने वेष्टित केलेली असली म्हणजे ते वेष्टिम पुस्त. पुस्ताच्या साहाय्याने पर्वत, वाहन, विमान, प्रासाद, मंदिर इत्यादी गोष्टी बनविता येतात. सज्जीव नेपथ्य याच प्रकारांनी तयार करता येते. वानर, हत्ती, घोडे इत्यादी प्राणी, तसेच राक्षस आदींचे अनेक हात, अनेक मुख वगैरे, बांबू, तालपत्र, गवत इत्यादींच्या साहाय्याने योग्य आकाराचे सापळे तयार करून ते वस्त्राने वेष्टित करून वर रंग देऊन तयार करावयास सांगितले आहे. पुस्त आणि सज्जीव ह्या दोन्ही प्रकारांत लाकूड, अभ्रक, लाख, मेण यांचाही उपयोग करता येतो.

पात्रांनी वापरावयाच्या अलंकारांचे खूपच विस्ताराने वर्णन केले आहे. कुण्डल वगैरे आवेध्य, हार वगैरे आरोप्य, अंगद, मेखला वगैरे बन्धनीय आणि नूपुर, वलय वगैरे प्रक्षेप्य अशा चार प्रकारच्या आभरणांचा निर्देश करून अनेकविध अलंकारांची नावे दिली आहेत. ही सर्व बनावट करावीत, तसेच ती वजनात हलकी असावीत असे सांगितले आहे. त्यात तांबे, अभ्रक, लाख इत्यादींचा मोठ्या प्रमाणावर उपयोग अपेक्षित आहे. आभरणे हलकी असावीत याचे कारण ती जड असल्यास नटाला भार होऊन त्याला घाम, मूर्छा वगैरे येण्याचा संभव असतो असे सांगितले आहे. मुकुटांसंबंधी स्वतंत्र विचार केला असून कोणत्या प्रकारचा मुकुट कोणत्या पात्राला योग्य ते सांगितले आहे.

अंगरचना नावाच्या चौथ्या नेपथ्यकर्मात नटांच्या शरीराला द्यावयाचे रंग, त्यांनी करावयाच्या विविध केशरचना आणि त्यांनी परिधान करावयाची वस्त्रे यांचे विवेचन केले आहे. निरनिराळ्या देवता, राक्षस, मनुष्य यांच्या भूमिकांसाठी अंगाला भिन्न भिन्न रंग लावणे आवश्यक आहे. तसेच ब्राह्मणक्षत्रियादी वर्ण, काशीकोसलादी देशविशेष, किरातबर्बरादी जातिविशेष यांना अनुरूप असे रंग त्या त्या पात्रांना द्यावयास सांगून त्यांच्या निरनिराळ्या रंगांची माहिती दिली आहे. पुरुष आणि स्त्रिया उभयतांच्या केशरचनेच्या अनेक प्रकारांचे वर्णन केले आहे. जातिपरत्वे आणि देशपरत्वे केशरचनेत भिन्नता निर्दिष्ट झालेली दिसून येते. त्याचप्रमाणे परिधान करावयाच्या वस्त्रांच्या बाबतीतील भिन्नतेचेही वर्णन केले आहे. पात्राचा दर्जा, त्याचा देश, त्याची अवस्था इत्यादी गोष्टींच्या अनुरोधाने त्याची वेषभूषा करावयास सांगितले आहे. या अध्यायात ज्या जर्जराची अथवा इन्द्रध्वजाची पूर्वरंगविधीत पूजा करावयाची असते तो जर्जर कसा तयार करावा याचे विस्तृत विवेचन केले आहे.

नेपथ्यकर्माच्या ह्या विस्तृत वर्णनावरून हे स्पष्ट आहे की वास्तवतेचा शक्य तितका आभास रंगभूमीवर निर्माण केला जावा असे नाट्यशास्त्रात अभिप्रेत आहे. तेव्हा भरताच्या काळी होत असलेल्या नाट्यप्रयोगांत ह्या सूचनांनुसार वागण्याचे कमीअधिक

यशस्वी प्रयत्न केले जात असणार याविषयी संशय घेण्याचे कारण नाही. काही आधुनिक पंडितांच्या मते संस्कृत नाटकांच्या प्रयोगाच्या वेळी रंगभूमीवर कोठलीही साधनसामुग्री उपस्थित केली जात नसे, केवळ पात्रांची वचने आणि अभिनय यांच्या साहाय्याने प्रेक्षक त्या त्या गोष्टींची कल्पना करीत असत. हे मत अग्राह्य ठरविणारा भरपूर पुरावा नाट्यशास्त्रात आहे हे उघड आहे.

नाट्यशास्त्राच्या पस्तिसाव्या अध्यायात विविध प्रकारच्या नटांचे वर्णन केल्यानंतर काही कारागिरांचा निर्देश केला आहे. विविध प्रकारचे कृत्रिम मुकुट बनविणारा मुकुटकार, विविध तऱ्हेचे बनावटी अलंकार घडविणारा आभरणकार, पाच प्रकारचे फुलांचे हार तयार करणारा मालाकार, निरनिराळ्या भूमिकांसाठी अनुरूप वेष तयार करणारा वेषकर, वस्त्रांना रंग देणारा रंजक, भिंती, खांब वगैरे चित्रांनी सुशोभित करणारा चित्रकार, आणि लाकूड, लाख, धातु इत्यादींच्या साहाय्याने विविध प्रकारच्या वस्तू बनविणारा कारुक हे कारागीर त्या ठिकाणी निर्दिष्ट केले आहेत. त्यावरून असा निश्चित ग्रह होतो की नटसंघात ज्याप्रमाणे अनेक प्रकारचे नट आणि गायक, वादक, नर्तक हे कलाकार विद्यमान असत त्याचप्रमाणे आहार्य अभिनयाची सिद्धता करून देणारे हे कारागीरही त्यांच्या समवेत असले पाहिजेत. तेव्हा नाट्यप्रयोगात उपकरणांचा सर्वथा अभाव असे हे मत बरोबर मानणे शक्य नाही.

## नाट्यप्रयोग

पक्क्या स्वरूपाचा उभारावयाचा असलेला नाट्यमंडप आणि सर्व साधनांनी संपन्न असा नटसंघ यांचे अस्तित्व नाट्यशास्त्रात निर्दिष्ट झाले असल्यामुळे नाटकांचे प्रयोग वारंवार होत असत हे मान्य करण्यास हरकत नाही. पण पक्के नाट्यगृह मोठ्या शहरींच उभारले जाणे संभाव्य होते. शिवाय, नाट्यशास्त्रावरून असे दिसते की नाटकांचे प्रयोग एखाद्या देवतेच्या यात्रेच्या अथवा उत्सवाच्या प्रसंगी होत असत. अशा प्रसंगी प्रायः तात्पुरते नाट्यगृह उभारले जाई ही शक्यताही नाकारण्याचे कारण नाही. यात्रेच्या अथवा उत्सवाच्या निमित्ताने नाटकांचे प्रयोग होत असल्यामुळे नटसंघ एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी याप्रमाणे भ्रमण करीत असत असे समजावे लागते.

भरताच्या म्हणण्याप्रमाणे निरनिराळ्या स्वरूपाच्या नाट्यप्रयोगासाठी दिवसाच्या निरनिराळ्या वेळाच अनुरूप होत. सत्ताविसाव्या अध्यायात त्याने म्हटले आहे की ज्याचा प्रयोग कर्णमधुर असेल आणि जे धार्मिक प्रवृत्ती जागृत करील असे नाट्य पूर्वाह्णसमयी प्रयोगान्वित करावे. अपराह्णकाली करणे उचित असलेल्या प्रयोगाचे वर्णन करणाऱ्या श्लोकाचा अर्थ स्पष्ट नाही. तो सत्त्वोत्थानगुणांनी युक्त व वाद्यभूयिष्ठ असावा असे म्हटले आहे. शृंगाररसप्रधान, नृत्य, गीत, वाद्य यांनी समृद्ध असलेला

प्रयोग प्रदोषसमयी करावा. नर्म व हास्य पुष्कळ असलेला, तसेच करुणरसयुक्त प्रयोग प्रभातकाली करावयास सांगितले आहे. मध्यरात्री, मध्याह्नसमयी किंवा संध्या आणि भोजनाची वेळ असेल तेव्हा प्रयोग करू नये हे मुद्दाम सांगितले आहे.

त्याच सत्ताविसाव्या अध्यायात सिद्धींचे आणि त्याचबरोबर घातांचे वर्णन केले आहे. सिद्धी म्हणजे प्रेक्षकांनी प्रयोगाविषयी संतोष व्यक्त करण्याचे प्रकार. स्मित, हास्य, 'साधु' 'ओहो' असे शब्द, रोमांचित होणे, चेलदान इत्यादी प्रकारे प्रयोगाबद्दलची पसंती व्यक्त करता येते. घात म्हणजे प्रयोगात घडणाऱ्या चुका किंवा त्यात येणारी विघ्ने. शब्दांचे उच्चार स्पष्ट न करणे, पाठ्यात चूक करणे, आभरणवस्त्रादीतील चुका, रथ, घोडा इत्यादी यानावर चढण्याउतरण्यात अनभिज्ञता दिसून येणे इत्यादी घात प्रयोग करणारांच्या हातून घडतात. त्याचबरोबर शत्रूंनी प्रयोगात आणलेल्या विघ्नांचाही नाटयशास्त्रात निर्देश केला आहे. निरनिराळ्या नटसंघांत स्पर्धा असल्यामुळे ही विघ्ने उत्पन्न होण्याचा संभव असल्याचे म्हटले आहे. किंबहुना विशिष्ट प्रसंगी प्रयोगांच्या स्पर्धा आयोजित केल्या जात असत असे नाटयशास्त्रावरून दिसते. त्यांत यशस्वी ठरणाऱ्या प्रयोगाला राजाकडून पताकेचा मान मिळून अर्थप्राप्तीही होत असे. प्रयोगाची गुणवत्ता ठरविण्यासाठी निवडक प्रेक्षकांच्या उपस्थितीत विविध शास्त्रांत पारंगत असे प्राश्निक म्हणजे परीक्षक नेमावयास सांगितले आहे. त्यांच्या मदतीला दिलेल्या लेखक व गणक यांनी सिद्धी व घात यांची नोंद करावयाची असते. यांची गोळाबेरीज करून ज्या प्रयोगाला सर्वात अधिक गुण प्राप्त झाले असतील तो विजयी असे ठरवून राजाने त्याला पताका द्यावी, जर दोन प्रयोगांना समान गुण मिळाले तर दोघांनाही पताका द्यावी असे म्हटले आहे. पताकेबरोबर अर्थप्राप्तीही होत असली तरी पताकाप्राप्ती हेच यशाचे गमक ठरत असे यात शंका नाही. याच पताकाप्राप्तीला उद्देशून बाणभट्टाने भासाबद्दल '(नाटकैः) सपताकैर्यशो लेभे' असे उद्गार काढले आहेत.

स्पर्धेच्या वेळी नाटकाचे प्रथम प्रयोग होत आणि त्यावेळेस नाटकाशी समरस होणाऱ्या प्रेक्षकांसमोर त्याची गुणवत्ता ठरत असे. पण त्या नाटकाचे इतरत्र आणि इतर प्रसंगींही प्रयोग होत असत यात शंका नाही. या प्रयोगांना सर्वसाधारण लोक येत असत हे नाटयशास्त्रावरून स्पष्ट आहे. त्याच सत्ताविसाव्या अध्यायात म्हटले आहे की नाटयातील कामाच्या दर्शनाने तरुणांना आनंद होतो, धर्मपालनाच्या दर्शनाने विदग्ध मनुष्यांना संतोष होतो, अर्थप्राप्तीच्या दर्शनाने व्यवहारी लोकांना आनंद होतो, मोक्षसिद्धी पाहून विरागी लोक संतुष्ट होतात, वीर आणि रौद्राच्या आविष्काराने शूर लोक खूष होतात, धर्माख्याने, पुराणे यांची ओळख पटून वृद्ध माणसांना संतोष होतो, तत्त्वचिंतनाच्या आविष्काराने प्राज्ञ लोकांना समाधान वाटते, तर लहान मुले, मूर्ख माणसे आणि स्त्रिया हास्य आणि नेपथ्य यांनी खूष होतात. इतरत्र भरताने सांगितले आहे की पित्रा, पुत्र, स्नुषा,

सासू असे सर्व एकत्र नाटक पहावयास येत असल्यामुळे लज्जा उत्पन्न करणाऱ्या गोष्टी रंगभूमीवर दाखवू नयेत (२२.२९८). यावरून नाटकाचे प्रयोग सर्वसाधारण लोकांसाठी होत असत हे उघड आहे.

## नाटकप्रयोगाचे प्रयोजन

भरताच्या काळी विविध प्रकारच्या नाटकांचे प्रयोग होत असत आणि ते पहाण्यासाठी सर्व प्रकारचे लोक जात हे निर्विवाद आहे. लोक बहुतांशी मनोरंजन व्हावे या उद्देशाने नाटक बघावयाला जात असे समजता येईल. दृश्य आणि श्रव्य असे क्रीडनीयक लोकांना हवे होते म्हणूनच नाट्यवेदाची निर्मिती झाली असे पहिल्या अध्यायात प्रारंभीच म्हटले आहे. पण नाट्याच्या दर्शनाने मनोरंजनाबरोबर दुसरीही फलप्राप्ती होत असल्याचे सांगितले आहे. नाट्य हे हितोपदेशजनन आणि बुद्धिविवर्धन आहे असे त्याचे त्या अध्यायाच्या शेवटी वर्णन केले आहे. नाटकात धर्म, क्रीडा, काम, शम, अर्थ, हास्य, युद्ध, वध इत्यादी जगातील सर्व गोष्टींचे दर्शन होऊन दुष्ट माणसांना झालेले शासन, सत्प्रवृत्तांना होणारा सुखाचा लाभ, शूरांचा उत्साह, विद्वान मनुष्यांचे वैदग्ध्य, संकटकाली दाखविलेले धैर्य इत्यादी अनेक गोष्टी प्रत्यक्ष होत असलेल्या दिसतात. तेव्हा मनोरंजन होत असताच या गोष्टींचा संस्कारक्षम मनुष्याच्या मनावर परिणाम होऊन तो त्यापासून योग्य तो बोध घेऊ शकतो. मनोरंजन आणि बोध ह्यांना अनुक्रमे प्रीति आणि व्युत्पत्ति ह्या संज्ञा देऊन नाटकाचे हे द्विविध प्रयोजन होय असे नाट्यशास्त्राच्या टीकाकारांनी मानले आहे. अठराव्या व एकोणविसाव्या अध्यायांवरील व्याख्येत अभिनवगुप्ताने ठिकठिकाणी व्युत्पत्तीचा निर्देश केला आहे. पण ही व्युत्पत्ती प्रीतीच्या द्वारा म्हणजे मनोरंजन होत असतानाच प्राप्त होते. ही गोष्ट एखाद्या व्याधिग्रस्त मनुष्याला कडू औषध देणे आवश्यक असता ते गोड पदार्थातून देतात त्यासारखी आहे असे त्याने एके ठिकाणी म्हटले आहे.

परंतु नाटकाच्या दर्शनाने उत्पन्न होणाऱ्या प्रीतीचे स्वरूप सामान्य प्रकारच्या मनोरंजनासारखे नसून रसाची प्रतीती असे विशिष्ट प्रकारचे आहे. रसांचे विवेचन करणाऱ्या सहाव्या अध्यायात भरताने म्हटले आहे की विभाव, अनुभाव आणि व्यभिचारिभाव यांच्या संयोगाने रसनिष्पत्ती होते. याचे स्पष्टीकरण त्याने असे केले आहे की ज्याप्रमाणे गूळ आदी द्रव्य, व्यञ्जन आणि औषधी यांच्या संयोगाने षाडव आदी रस निष्पन्न होतात, त्याचप्रमाणे विभावादींच्या संयोगाने स्थायिभाव रसस्वरूप होतात. आणि ज्याप्रमाणे नाना प्रकारच्या व्यञ्जनांनी संस्कृत केलेल्या अन्नाचे भोजन करणारे त्यातील रसांचा आस्वाद घेऊन एक विशेष प्रकारचा आनन्द प्राप्त करतात त्याचप्रमाणे अभिनयद्वारा विविध भावांच्या होणाऱ्या आविष्कारामुळे रसात परिणत झालेल्या स्थायिभावाचा

आस्वाद घेऊन प्रेक्षक एक विशेष प्रकारचा आनंद अनुभवतात. रसनिष्पत्तीच्या प्रक्रियेबद्दल नाट्यशास्त्राच्या टीकाकारांत मतभेद आहेत. पण अभिनवगुप्ताचे त्यासंबंधीचे मत प्राय: सर्वमान्य झाले आहे. प्रेक्षकाचा स्थायिभाव उद्बुद्ध होऊन त्याची रसात परिणती होते आणि ह्या रसाचा आस्वाद म्हणजे परमोच्च प्रकारच्या आनंदाचा लाभ असे त्याचे मत थोडक्यात मांडता येईल. खुद्द नाट्यशास्त्रात असे मत गृहीत धरलेले दिसते की रस काव्यात असून तो भावांच्या अभिनयाच्या द्वारा अभिव्यक्त होतो. अनेक रूपकप्रकारांच्या वर्णनात ते विशिष्ट रसांनी युक्त असावेत असे म्हटले आहे. तथापि रसास्वाद हे नाट्याचे परमोच्च प्रयोजन असे नाट्यशास्त्रात अभिप्रेत आहे यात संशय नाही.

## संस्कृत नाटकाची उत्पत्ती

नाटके आणि त्यांचे प्रयोग याविषयीचे भरताच्या नाट्यशास्त्रातील हे सर्व विवेचन त्यावेळी उपलब्ध असणाऱ्या नाटकांवर आणि त्यांच्या वारंवार होत असलेल्या प्रयोगांवर आधारित आहे असे समजणे आवश्यक आहे. प्रत्यक्ष उदाहरणे समोर असल्याशिवाय केवळ कल्पनेने ह्या शास्त्राची निर्मिती होण्याची शक्यता नव्हती. परंतु भरताला अवगत असलेल्या नाटकांपैकी आज एखादे उपलब्ध आहे असे निश्चितपणे म्हणता येण्यासारखे नाही. सध्या उपलब्ध असलेली संस्कृत नाटके प्राय: सर्व उत्तरकालीन आहेत. भरताने उदाहरणादाखल कोणत्याही नाटकाचा अथवा त्यातील एखाद्या प्रसंगाचा कोठे निर्देश केलेला नाही. म्हणून ज्या नाटकांच्या आधारे त्याने हे विवेचन केले आहे त्या पूर्वकालीन नाटकांची माहिती उपलब्ध होण्यासारखी नाही. तथापि, सध्या आपल्याला अवगत असलेली संस्कृत नाटके भरताच्या अगोदरच्या नाटकांहून कोणत्याही प्रकारे भिन्न नाहीत यात शंका नाही. नाट्यशास्त्रातील नाटकांच्या स्वरूपाविषयीचे वर्णन जवळजवळ तंतोतंत हल्लीच्या नाटकांना लागू पडते. किंबहुना ह्या शास्त्रातील विवेचनाला अनुसरूनच ही नाटके लिहिली गेली आहेत हे उघड आहे. तेव्हा संस्कृत नाटकाची परंपरा भरतपूर्वकालीन आहे याविषयी संशय घेण्याचे कारण नाही. ही परंपरा कशी प्रस्थापित झाली म्हणजेच संस्कृत नाटकाची उत्पत्ती केव्हा व कशी झाली याचा विचार करणे उद्बोधक होईल.

खुद्द नाट्यशास्त्रातच यासंबंधीची एक कल्पना मांडली आहे. पहिल्या अध्यायात नाट्यवेदाच्या निर्मितीचे वर्णन आहे. चार वेद फक्त त्रैवर्णिकांसाठीच आहेत. तेव्हा शूद्रांसहित सर्व वर्णांना उपयोगी होईल असा आणि जो दृश्य आणि श्रव्य असून मनोरंजन करील असा एक नवीन वेद ब्रह्मदेवानेच काही ऋषींच्या विनंतीवरून निर्माण केला तोच हा नाट्यवेद. त्याच्या निर्मितीच्या कामी चार वेदांचाच उपयोग झाला. ऋग्वेदातून पाठ्य, सामवेदातून गीत, यजुर्वेदातून अभिनय आणि अथर्ववेदातून रस याप्रमाणे त्या त्या वेदा-

तील वैशिष्ट्ययुक्त अंश घेऊन व त्यांचे एकत्रीकरण करून ब्रह्मदेवाने नाट्यवेद निर्माण केला असे तेथे म्हटले आहे. त्याचा प्रयोग करण्याचे काम ब्रह्मदेवाने भरतावर सोपविले आणि त्याने तो आपल्या शंभर पुत्रांकरवी बसवून घेतला. त्यात कैशिकी वृत्तीची सुद्धा योजना व्हावी या उद्देशाने ब्रह्मदेवाने अप्सरा निर्माण केल्या. तेव्हा इन्द्रध्वज उत्सवाच्या प्रसंगी भरताने प्रथम आशीर्वचनाने युक्त असा नान्दीचा प्रयोग केला. आणि नंतर देवांनी दैत्यांवर मिळविलेल्या विजयाचा प्रसंग नाट्यरूपाने प्रस्तुत केला. त्याने क्षुब्ध झालेल्या दैत्यांची समजूत घालून त्यांना नाटकाचे महत्त्व पटवून दिले इत्यादी कथा पहिल्या अध्यायात आहे. पुढे चौथ्या अध्यायात असे म्हटले आहे की नाट्यमंडपाची उभारणी आणि रंगदैवतांचे पूजन झाल्यानंतर भरताने अमृतमन्थन नावाच्या ब्रह्मदेवरचित समवकाराचा प्रयोग केला. त्यानंतर हिमालयावर शंकराकडे जाऊन तेथे त्याच्यासमोर तोच प्रयोग करून शिवाय त्रिपुरदाह नावाच्या डिमाचा सुद्धा प्रयोग केला. त्या प्रसंगी शंकराने आपले नृत्य पूर्वरंगात उपयोजिण्यासाठी तण्डुकरवी भरताला शिकविले.

स्वर्गातून नाट्य पृथ्वीवर कसे आले याविषयीची कथा नाट्यशास्त्राच्या शेवटच्या दोन (३६ व ३७) अध्यायांत आहे. स्वर्गात भरताचे पुत्र नाट्यप्रयोग करीत असता एका प्रयोगात त्यांनी ऋषींची ग्राम्य कुचेष्टा केली. त्यामुळे संतप्त झालेल्या ऋषींनी त्यांना असा शाप दिला की त्यांचे नाट्यवेदाचे ज्ञान नाश पावेल आणि ते आणि त्यांचे वंशज शूद्राचार होऊन नर्तक म्हणून दुसऱ्यांची सेवा करून जगतील. देवांनी मध्यस्थी करून नाट्य-वेदाचा नाश होऊ दिला नाही आणि भरताच्या सांगण्यावरून त्याचे ज्ञान अप्सरांना देण्यात आले. पुढे नहुषाला इन्द्रपदाची प्राप्ती झाल्यावर स्वर्गात अप्सरांनी केलेले नाट्यप्रयोग पाहून त्याला असे वाटू लागले की अशा तऱ्हेचे प्रयोग पृथ्वीवर त्याच्या प्रासादातही केले जावेत. अप्सरा त्यासाठी पृथ्वीवर जाणे शक्य नसल्यामुळे नहुषाच्या सांगण्यावरून भरताने आपल्या शापित पुत्रांना असा आदेश दिला की त्यांनी पृथ्वीवर जाऊन नाट्याचे प्रयोग करावेत, म्हणजे शापाचा अंत होऊन त्यांना हीन दशा प्राप्त होणार नाही. त्याप्रमाणे ते भरतपुत्र पृथ्वीवर अवतीर्ण होऊन येथील स्त्रियांच्या साहाय्याने नाट्याचे प्रयोग करू लागले.

ही सर्व दंतकथा आहे यात शंका नाही. तथापि तिच्यावरून काही निष्कर्ष काढणे गैर होणार नाही. अमृतमन्थन आणि त्रिपुरदाह ह्या अगदी प्रारंभीच्या नाटकांच्या निर्देशावरून असे म्हणता येईल की सुरुवातीचे नाट्यप्रयोग देवादिकांच्या चरितांचे अथवा पराक्रमाचे दर्शन घडविण्याच्या उद्देशाने केले जात असत. भरताचे पुत्र अथवा वंशज शापित झाल्यामुळे हीन समजले जाण्याचा संभव उत्पन्न झाला यावरून नटांचे समाजातील स्थान प्रारंभापासूनच कमी दर्जाचे मानले जात होते असा निष्कर्ष निघतो. आणि नाट्याचा प्रयोग करण्यात अप्सरांचा म्हणजे देवगणिकांचा महत्त्वाचा भाग असे याचा अर्थ असा

होऊ शकतो की पृथ्वीवरील नाट्यही प्रारंभापासूनच गणिका अथवा वेश्या यांच्या साहाय्याने प्रस्तुत केले जात असे.

**नाट्य आणि वेद**

ह्या दन्तकथेत नाट्याचा चार वेदांशी जो संबन्ध जोडला आहे त्यात काल्पनिकतेचाच भाग अधिक आहे. ऋग्वेदातील ऋचांचे पठन होत असे आणि सामवेदातील मंत्र गायिले जात यावरून नाटयातील पाठय आणि गीत यांचे मूळ या दोन वेदांत आहे हे समजता येण्यासारखे आहे. पण अभिनयाचा यजुर्वेदाशी जोडलेला संबंध फारच क्षीण स्वरूपाचा आहे. यज्ञात अध्वर्यूच्या हातून घडणाऱ्या क्रियांपासून नाटयातील अभिनयाची उत्पत्ती झाली हे तितकेसे पटण्यासारखे नाही. नाटयातील रस आणि अथर्ववेद यांच्यातील संबंधही अशाच प्रकारचा आहे. त्या वेदातील अभिचार, वशीकरण इत्यादिविषयक काही मंत्रांमध्ये चित्तवृत्तिरूप काही भावांचा आविष्कार झालेला दिसून येतो इतकेच. सर्व शास्त्रांचे मूळ वेदात आहे ह्या भावनेतूनच नाटयाच्या प्रधान अंगांचे मूळ वेदांत शोधण्याची कल्पना उगम पावली असे म्हणावयास हरकत नाही.

परंतु संस्कृत नाटयाचा वेदाशी अशा तऱ्हेने प्रस्थापित होणारा संबंध पटण्यासारखा नसला तरी दुसऱ्या दृष्टीने नाटयाचे मूळ ऋग्वेदात शोधण्याचे प्रयत्न झाले आहेत. दोन किंवा अधिक व्यक्तींमध्ये संवाद असलेली अनेक सूक्ते ऋग्वेदात आहेत. उदाहरणार्थ, सूक्त १०.१० यम-यमी संवाद, १०.३३ विश्वामित्र आणि विपाश्-शुतुद्री नद्या यांच्यातील संवाद, १०.९५ उर्वशी आणि पुरूरवस् यांचा संवाद, १०.८६ इन्द्र, वृषाकपि आणि इन्द्राणी यांच्यातील संवाद, १०.१०८ सरमा आणि पणी यांचा संवाद, ४.१८ वामदेव, इन्द्र आणि अदिति यांचा संवाद, इत्यादी. ह्या सूक्तांना वैदिक कर्मकांडात स्वाभाविक असे स्थान नाही. कारण त्यांतील विषयांचा कोणत्याही धार्मिक विधीशी प्रत्यक्ष संबंध नाही. त्यांची रचना प्रायः काव्यात्मक आहे. त्यामुळे आणि विशेषतः त्यांच्यातील काही नाट्यपूर्ण संवादामुळे ह्या सूक्तांचा नाट्याशी संबंध प्रस्थापित करण्याचे प्रयत्न व्हावेत हे स्वाभाविक होते.

ऋग्वेदातील १.१६५ या सूक्तात इन्द्र आणि मरुद्गण यांच्यातील संवाद आहे. त्याची व्याख्या करताना मॅक्स म्यूलर यांनी असे सूचित केले होते की याग चालू असता काही ऋत्विग इन्द्र आणि मरुत यांच्या वेषात उपस्थित होऊन हा संवाद म्हणत असावेत.[१०] ही सूचना मान्य करून लेव्हि यांनी संस्कृत नाटयावरील आपल्या ग्रंथात असे प्रतिपादन केले आहे की ह्या संवादसूक्तांवरून त्या वेळी नाटकासारखे प्रयोग निश्चितपणे

१० F. Max Müller, *Rigveda*: Translated and Explained, Vol. I, *Hymns to the Maruts* (*London*, 1869), pp. 172–173.

होत असत असे दिसून येते. नाट्यप्रयोगांशी संबद्ध अशा सर्व कलांचा वैदिक युगात विकास झाला होता हे त्यांनी दाखवून दिले आहे. गानकला परिणत अवस्थेला पोचली होती हे सामवेदावरून स्पष्ट आहे. सुंदर वेष परिधान करून पुरुषांना आकर्षित करणाऱ्या स्त्रियांचा ऋग्वेदात निर्देश आहे, त्यावरून असे अनुमान निघते की त्यावेळी नृत्यकला सुद्धा खूप विकसित झाली होती. अथर्ववेदातील १२.१.४१ ह्या मंत्रावरून असे दिसते की वाद्यसंगीताच्या साथीने लोक नृत्य आणि गायन करीत असत. यावरून असा निष्कर्ष निघतो की प्रेक्षकांसमोर नृत्य आणि गायन यांचे प्रयोग त्या काळी होत असत. तेव्हा ह्या संवादसूक्तांचेही नाट्यस्वरूपात प्रयोग केले जात असत असा संभव मान्य करावयास हरकत नाही असा लेव्हींच्या प्रतिपादनाचा आशय आहे.[११]

याच्याही पुढे जाऊन फॉन् श्रोडर यांनी दीर्घ परिश्रमाने असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला की ऋग्वेदातील ही संवादसूक्ते वस्तुतः एका प्राचीन नाट्यप्रकाराचे अवशेषरूप आहेत. त्यांनी असे प्रतिपादन केले आहे की सर्व मानवी समाजांच्या प्राथमिक अवस्थेत गायन, नृत्य आणि नाट्य यांच्यात दृढ परस्परसंबंध असून ते सर्व कोणत्या तरी धार्मिक विधीशी निगडित असतात. नृत्यगीतात्मक धार्मिक नाट्य (ज्याला *mystery play* म्हणता येईल असे) प्राथमिक अवस्थेत असलेल्या अनेक जमातींत – उदाहरणार्थ, मेक्सिकोमध्ये – आजही पहावयास मिळते. अशाच तऱ्हेचे धार्मिक नाट्य आर्य लोकांच्या प्राथमिक अवस्थेत म्हणजे इंडो-युरोपियन युगात अस्तित्वात होते असे फॉन् श्रोडर यांचे म्हणणे आहे. ऋग्वेदात इन्द्र, उषस्, अश्विनौ, मरुद्गण आदी देवतांचा 'नृत्य करणारे' असा निर्देश केला आहे, याची उपपत्ती हीच असू शकते की लोक ह्या देवतांच्या भूमिकांत उपस्थित होणाऱ्या ऋत्विजांचे नृत्य पहात असत. तेव्हा फॉन् श्रोडरच्या मते ऋग्वेदातील संवादसूक्तांत तसेच स्वगत भाषण असलेल्या इतर काही सूक्तांत ह्या प्राचीन नाट्यप्रकाराचे अवशेष आहेत. प्राचीन धार्मिक नाट्यात *fertility rite* म्हणजे प्रजननक्षमता साध्य करण्याच्या विधीला फार महत्त्वाचे स्थान होते. त्या विधीचे काही प्रमाणात नाट्यरूप दर्शन १.१७९ अगस्त्य-लोपामुद्रा-संवाद सूक्त, १०.१० यम-यमी-संवाद सूक्त, १०.८६ वृषाकपि सूक्त इत्यादींमध्ये होते असा फॉन् श्रोडरचा दावा आहे. तथापि ऋग्वेदात ह्या धार्मिक नाट्याचे अवशेष दिसतात, ते त्याच्या प्राथमिक अवस्थेचे द्योतक नसून त्याची अखेरची अवस्था दिग्दर्शित करतात असे त्यांनी म्हटले आहे.[१२]

परंतु ह्या पंडितांची ही विचारसरणी मान्य करणे कठीण आहे. यात संशय नाही की ऋग्वेदातील अनेक सूक्तांत नाट्यमय प्रसंगांची कल्पना केली गेली आहे. तथापि, हे प्रसंग

११. S. Levi, *Le théatre indien* (*Paris*, 1890), pp. 307–308.

१२ L. von Schroeder, *Mysterium und Mimus im Ṛgveda* (Leipzig, 1908).

यागाच्या समयी अथवा इतर वेळी प्रयोगबद्ध केले जात असे मानण्यास काही आधार नाही. ऋत्विग लोकच इन्द्राचा अथवा मरुद्गणाचा वेष धारण करीत आणि सूक्तातील संवाद नाट्यरूपाने प्रस्तुत करीत या मताचे समर्थन करू शकेल असा कोणताही पुरावा वैदिक वाङ्मयात नाही. तसेच वैदिक युगात नृत्य, गीत आणि वाद्य या कला परिणत अवस्थेला पोचल्या होत्या याविषयीही संशय नाही. तथापि, ऋग्वेदातील संवादाचा ह्या कलांशी संयोग घडून येऊन नाट्य अस्तित्वात आले होते असे खात्रीपूर्वक म्हणता येण्यासारखे नाही. काही देवतांचे 'नृत्य करणारे' असे वर्णन केले आहे त्यावरून ऋत्विग लोक त्या देवतांच्या वेषात नृत्य करीत असा काढलेला निष्कर्ष ग्राह्य वाटत नाही. नृत्याचे इतरत्र होणारे प्रयोग पाहूनच देवतांविषयींची ही कल्पना कवींना सुचली असे मानणेच अधिक उचित होईल. ऋत्विग स्वतःच इन्द्र, उषस् इत्यादींच्या वेषात नाचत असे समजण्यास काही सुद्धा आधार नाही. त्याचप्रमाणे यम व यमी, विश्वामित्र व नद्या, देवशुनी सरमा आणि पणी इत्यादींचे वेष धारण करूनच ऋत्विग ह्या सूक्तांचे संवादात्मक पठन करीत असत असे मानण्यासही काही आधार नाही.

फॉन् श्रोडर यांनी म्हटले आहे त्याप्रमाणे प्रारम्भिक अवस्थेतील समाजात धार्मिक विधीचा भाग म्हणून नृत्य, गीत आणि नाट्य विद्यमान असते हे सामान्यपणे मान्य करता येईल. तदनुसार असेही समजता येईल की प्राचीन इंडो-युरोपिअन समाजात सुद्धा नृत्यगीतादींनी युक्त धार्मिक नाट्य प्रचलित होते. तथापि, ऋग्वेदातील ही सूक्ते तशा प्रकारच्या धार्मिक नाट्याचे अवशेष होत हे मत मान्य करणे कठीण आहे. ऋग्वेदातील सूक्ते रचिली गेली त्यावेळेस धार्मिक विधीस यज्ञसंस्थेचे विकसित स्वरूप प्राप्त झाले होते. त्याच वेळी नृत्यगीतात्मक नाट्याच्या स्वरूपाचा धार्मिक विधीही प्रचलित असावा हे संभाव्य वाटत नाही. शिवाय, ही सूक्ते प्रायः ऋग्वेदकालाच्या शेवटी शेवटी रचिली गेली असे मानतात. तेव्हा त्यांत अति प्राचीन, प्राथमिक अवस्थेतील नाट्य अवशिष्ट राहिले आहे हे मान्य करणे सुद्धा कठीण आहे. जर फॉन् श्रोडर समजतात त्या प्रकारचे धार्मिक नाट्य वैदिक काळी खरोखरच अवशिष्ट असते तर ब्राह्मण आणि सूत्रग्रंथांत वर्णिलेल्या कर्मकाण्डात त्याचा कोठे ना कोठें निर्देश झाला असता. पण तसा तो कोठे आढळत नाही. वस्तुस्थिती अशी आहे की ह्यांपैकी बहुतेक सूक्तांचा धार्मिक विधीत अन्तर्भाव होण्यासारखा नाही. अगस्त्य-लोपामुद्रा संवाद अथवा यम-यमी संवाद प्रजननविषयक धार्मिक विधीतील नाट्याचे अवशेष होत ही गोष्ट सुद्धा पटण्यासारखी नाही.

आणि मुख्य गोष्ट अशी की ऋग्वेदकाली एक प्रकारचे नाट्य अस्तित्वात होते हे मान्य केले तरी उत्तरकालीन संस्कृत नाटकांचा त्या नाट्याशी संबंध प्रस्थापित करणे अशक्य आहे. ऋग्वेदातील सूक्तांत संवाद आहेत, तसे ते संस्कृत नाटकांत आहेत, यापलीकडे त्या दोहोंत काही साम्य नाही. आणि ऋग्वेदकालापासून नाट्याची परंपरा

अखंडित राहून तिच्यातूनच संस्कृत नाटक उदयास आले असे मानण्यास काही आधार नाही. एवढे मात्र मान्य होण्यासारखे आहे की वैदिक काळी अस्तित्वात असलेल्या नृत्य, गीत आणि वाद्य ह्या कलांचा विकास आणि वृद्धि ही अविच्छिन्नपणे पुढेही होत राहिली आणि त्यांचेच परंपरेने आलेले स्वरूप भरताने वर्णिलेल्या पूर्वरङ्गात आणि ध्रुवागानात प्रत्ययास येते. तथापि ह्या नृत्य आणि गीतांचा संस्कृत नाटकाच्या उत्पत्तीशी काही विशेष संबंध असल्याचे दिसत नाही.

## नाट्य आणि सोमक्रयविधि

ऋग्वेदात संस्कृत नाटकाचे मूळ शोधण्याचे जसे प्रयत्न झाले तसेच प्रयत्न कर्मकाण्डाच्या संबंधातही केले गेले आहेत. त्यात वर्णन केलेल्या काही विधींत संस्कृत नाटकाचा प्रारम्भ दृष्टीस पडतो असे एक मत आहे. सोमयागाच्या वर्णनात सोम (वल्ली) विकत घेण्याच्या विधीचे वर्णन आहे. सोम विकणारा कौत्स किंवा अन्य ब्राह्मण किंवा अब्राह्मणही असावा असे आपस्तम्बश्रौतसूत्रात म्हटले आहे. कात्यायनश्रौतसूत्रानुसार विक्रेता कौत्स अथवा शूद्र असतो. सोमाच्या किमतीबद्दल अध्वर्यु आणि विक्रेता यांच्यात बोलणे होऊन सोमक्रयणी गाय अशी त्याची किंमत ठरते. तथापि, विक्रेत्याला फक्त हिरण्य देऊन त्याच्यापासून सोम घेतला जातो. सोम घेत असता अध्वर्यु 'स्वान, भ्राज' इत्यादी शब्दांनी युक्त मंत्र म्हणतो. विक्रेता जर सोम देऊ इच्छित नसला आणि तक्रार करू लागला तर त्याच्यापासून सोम हिसकावून घेतला जातो आणि चामड्याच्या पट्ट्याने अगर काठीने त्याला मारून हुसकावून लावण्यात येते.[१३] सोमक्रयाच्या ह्या विधीचे विवेचन करताना हिलेब्रांट यांनी असे प्रतिपादन केले आहे की त्यात संस्कृत नाट्याच्या प्रारंभाचे दर्शन होते. सोमक्रयाचा हा विधी याच स्वरूपात पार पाडणे आवश्यक आहे. वास्तविक सोमाची खरेदी यज्ञमंडपाच्या बाहेरच होत असणार, तरीही ह्या विधीचा उपरिनिर्दिष्ट क्रम आवश्यक मानला आहे. यावरून हिलेब्रांट यांनी असे अनुमान केले आहे की हा विधि एका पुराणकथेवर आधारित आहे. या कथेप्रमाणे सोम प्रथम स्वर्गात होता आणि इन्द्रादी देव पृथ्वीवर होते. देवांच्यासाठी गायत्री सोम स्वर्गातून पृथ्वीवर घेऊन येत होती, परंतु वाटेत विश्वावसु गन्धर्वाने सोम तिच्यापासून हिसकावून घेतला होता. तेव्हा देवांनी गन्धर्वांना पाहिजे असलेली वाग्देवता त्यांना दिली आणि तिच्या बदल्यात गन्धर्वांपासून सोमाची प्राप्ती करून घेतली. हिलेब्रांट यांच्या मते ह्या पुराणकथेला यागात विधीचे स्वरूप दिले आहे. सोमविक्रय करणारा सामान्य विक्रेता नसून तो गन्धर्वाचे प्रतिनिधित्व करतो. हा सोमक्रयाचा विधी लोकनाट्याच्या स्वरूपाचा आहे, कारण त्यात मारपीट करून हुसकावून

१३ आपस्तम्बश्रौतसूत्र, १०.२०.१२ ते १०.२७.८;
कात्यायनश्रौतसूत्र, ७.६.१ ते ७.८.२५.

लावण्याचा प्रकार आहे इत्यादी विवेचन त्यांनी केले आहे.[१४]

### महाव्रतविधि

त्याचप्रमाणे गवामयन सत्राच्या वर्णनात महाव्रत नावाच्या विधीचे वर्णन आहे. सत्राच्या उपान्त्य दिवशी हा विधी करावयाचा असतो. त्या प्रसंगी अनेक प्रकारची वाद्ये सिद्ध केली जातात आणि एक झोपाळा तयार केला जातो. तेव्हा एक पुंश्चली आणि एक ब्रह्मचारी एकमेकाला टाकून बोलतात. त्यानंतर एक शूद्र आणि एक आर्य एक शुभ्र गोलाकृती चामडे स्पर्धेने स्वतःकडे खेचण्याचा प्रयत्न करतात; त्यात शेवटी आर्याचा विजय होतो. नंतर मार्जालीय वेदीच्या दक्षिणेस मैथुन होते.[१५] महाव्रताच्या ह्या विधीत पुरातन नाट्यमय धार्मिक विधींचे दर्शन होते असे प्रतिपादन केले गेले आहे. पुंश्चली आणि ब्रह्मचारी यांचे एकमेकाला गालिप्रदान आणि नंतर होणारे मैथुन यात एक प्रकारचा *fertility rite* प्रजननक्षमता उत्पन्न करणारा विधी आहे. तसेच शुभ्र गोलाकृती चर्म म्हणजे सूर्य, शूद्र म्हणजे अन्धकार, आर्य म्हणजे प्रकाश आणि त्या दोघांच्या स्पर्धेत आर्याचा होणारा विजय म्हणजे प्रकाशाची अन्धकारावर होणारी मात, या घटनेवर आधारलेले धार्मिक नाट्यही ह्या विधीत अन्तर्भूत आहे असे प्रतिपादन कीथ यांनी केले आहे.[१६] या व अशा प्रकारच्या धार्मिक नाट्यातूनच संस्कृत नाटकांची उत्पत्ती झाली असे त्यांचे मत आहे. महाव्रत विधीत निर्दिष्ट झालेला ब्रह्मचारी किंवा काही प्रमाणात सोमविक्रय करणारा शूद्र हे संस्कृत नाटकांतील विदूषकाचे मूल होत असे म्हणून अर्वाच्य शिव्या देणाऱ्या ब्रह्मचाऱ्याशी सादृश्य दाखविण्यासाठी विदूषक शब्दाचा गालिप्रदान करणारा असा अर्थ त्यांनी केला आहे.[१७]

परंतु वैदिक कर्मकाण्डातील काही विधींत उत्तरकालीन संस्कृत नाटकांचे मूळ शोधण्याचे हे प्रयत्न यशस्वी झाले आहेत असे म्हणता येत नाही. सोमक्रयाच्या विधीत एक प्रकारचे नाट्य आहे हे मान्य करावयास हरकत नाही. आणि तो विधी एका पुराणकथेवर आधारलेला आहे हेही शक्य मानता येईल. पण हिलेब्रांट यांनीच म्हटल्याप्रमाणे तो विधी लोकनाट्याच्या स्वरूपाचा आहे. याचा अर्थ असा होतो की यज्ञयागातील विधीशी कोणत्याही प्रकारे संबद्ध नसलेले असे एक प्रकारचे नाट्य त्या वेळी सामान्य लोकांत प्रच-

१४ A. Hillebrandt, *Vedische Mythologie*, zweite Auflage, I Band (*Breslau*, 1927), pp. 247–258.

१५ पुंश्चल्वब्रह्मचारिणावन्योन्यमाक्षिपतः । शूद्रार्यौ चर्मणि परिमण्डले व्यायच्छेते । मार्जालीयं दक्षिणेन मिथुनं संभवति । –कात्यायनश्रौतसूत्र, १३.३.६-८. तसेच शाङ्खायनश्रौतसूत्र, १७.६.२.

१६ A. B. Keith, *The Sanskrit Drama* (Oxford, 1924), pp. 24-25.

१७ *Ibid.*, p. 39.

लित होते, आणि त्यातीलच एका प्रसंगाच्या अनुकरणाने सोमक्रयाच्या विधीचे स्वरूप निश्चित करण्यात आले. पण तसे असेल तर नंतरच्या संस्कृत नाटकांचे मूल कोणत्याही धार्मिक विधीत न शोधता लोकनाटयातच ते शोधणे अधिक सयुक्तिक होईल. सोमक्रयाच्या विधीप्रमाणेच महाव्रताच्या विधीतही एक प्रकारचे नाटय आहे. मैथुनाच्या निर्देशावरून असे दिसते की कीथ म्हणतात त्याप्रमाणे मुळात हा एक प्रकारचा *fertility rite* असावा. परंतु त्यात जो नाट्याचा अंश प्रतीत होतो त्याच्याशी संस्कृत नाटकाच्या उत्पत्तीचा संबंध जोडणे योग्य वाटत नाही. संस्कृत नाटकांतील विदूषकाचे मूळ लोकनाटयात आहे हे हिले-ब्रांट यांचे मत कीथना अनावश्यक आणि अयोग्य वाटते, कारण लोकनाट्य त्यावेळी अस्तित्वात होते याला काही प्रमाण नाही असे त्यांचे मत आहे.[१८] परंतु त्यांनी जोडलेला विदूषकाचा ब्रह्मचाऱ्याशी संबंध त्यापेक्षाही अधिक संशयास्पद आहे. विदूषक शब्दाचा गालिप्रदान करणारा असा अर्थ मुळीच प्रसिद्ध नाही. आणि विदूषकाची जी अनेक वैशिष्टये आहेत त्यांत गालिप्रदान करण्याच्या प्रवृत्तीचा समावेश नाही. ब्राह्मणांचे अतिरंजित स्वरूपात विडंबन करणाऱ्या ह्या पात्राचे मूळ वैदिक कर्मकाण्डात असण्याचा संभव फार अल्प आहे. याउलट असे विडंबन मुळातच लोकनाट्यात केले गेले असण्याचा दाट संभव आहे. तेव्हा ह्या वैदिक विधींपासून स्फूर्ती मिळून संस्कृत नाटकांच्या निर्मितीस प्रारम्भ झाला असे समजण्यापेक्षा त्या वेळी प्रचलित असलेल्या लोकनाट्याचा या विधींवर प्रभाव पडला आहे असे समजणेच अधिक उचित होईल.

## 'नट' शब्दाचा अर्थ

वैदिक युगात लोकनाट्य प्रचलित होते याला काही प्रमाण नाही असे कीथ यांनी म्हटले आहे त्याचे कारण वैदिक वाङ्मयात नट किंवा नाट्य हे शब्द आढळत नाहीत. पण नट शब्द आढळत नसला तरी त्याच्याशी समानार्थक असलेला शैलूष शब्द तेथे आढळतो. यजुर्वेदातील पुरुषमेधाच्या वर्णनात इतर अनेक शिल्पी आणि कलाकार यांच्या समवेत शैलूषाचा निर्देश केला आहे.[१९] शैलूष शब्द नटाचा वाचक आहे. तैत्तिरीय ब्राह्मणावर भाष्य करताना सायणाचार्यांनी म्हटले आहे की शैलूष आपल्या स्त्रियांच्या अनाचाराने उपजीविका प्राप्त करतात. नटांना जायाजीव म्हणजे पत्नीवर जगणारे अशी संज्ञा दिली गेली आहे हे प्रसिद्ध आहे. तेव्हा वैदिक युगात शैलूष या नावाने नटांचे अस्तित्व मान्य करण्यास प्रत्यवाय असू नये. तथापि कीथ यांना शैलूष शब्दाचा *actor* म्हणजे पाठ्यासहित अभिनय करणारा नट हा अर्थ मान्य नाही. त्यांच्या मते त्या शब्दाचा

१८ *Ibid.*, pp. 50–51.

१९ वाजसनेयिसंहिता, ३०.४; तैत्तिरीय ब्राह्मण, ३.४.२.

वादक (*musician*) किंवा नर्तक (*dancer*) एवढाच अर्थ समजणे पर्याप्त आहे.[२०] परंतु शैलूष शब्दाचे हे अर्थ मुळीच प्रसिद्ध नाहीत. त्याचा नट असाच अर्थ प्रसिद्ध आहे.

वैदिक युगात नट नव्हते असे मानले तर त्यानंतर थोड्याच अवधीत लिहिलेल्या पाणिनीच्या अष्टाध्यायीतील नट, त्यांची कला आणि शास्त्र यांच्या निर्देशाची नीट उपपत्ती लागणार नाही. शिलालिन् आणि कृशाश्व ह्या आचार्यांनी लिहिलेल्या नटसूत्रांचे अध्ययन करणारांना अनुक्रमे शैलालिन् आणि कृशाश्विन् अशा संज्ञा असल्याचे तेथे म्हटले आहे.[२१] ह्या नटसूत्रांत नटांना त्यांच्या व्यवसायाचे शिक्षण देणारे शास्त्र ग्रथित झाले होते असे मानणे आवश्यक आहे. नटाचा धर्म किंवा नटाचा आम्नाय या अर्थी नाट्य शब्द नट शब्दाला 'य' प्रत्यय लागून सिद्ध होतो असा नियम दिला आहे.[२२] तेव्हा पाणिनीच्या वेळी नटांच्या कलेचे शास्त्र बनले होते, त्या शास्त्रावर काही आचार्यांनी सूत्रबद्ध ग्रंथ लिहिले होते आणि त्या ग्रंथांचे अध्ययन होत असे याविषयी संशय घेता येण्यासारखा नाही. यावरून नट व त्यांची कला ही पाणिनीच्या बरीच वर्षे अगोदर म्हणजे वैदिक युगाच्या उत्तरार्धात अस्तित्वात होती असे मान्य करणे आवश्यक ठरते. सामान्यपणे नट म्हणजे *actor* पाठ्यासहित अभिनय करणारा असा अर्थ करावयास हरकत नाही. परंतु कीथ यांच्या मते अष्टाध्यायीत नट म्हणजे *pantomime* म्हणजे पाठ्यरहित मूक अभिनय करणारा एवढाच अर्थ अभिप्रेत आहे.[२३] आश्चर्याची गोष्ट अशी की पतञ्जलीच्या महाभाष्यात नट म्हणजे *actor* असा अर्थ आहे हे त्यांना मान्य आहे.[२४] यावरून पाणिनि आणि पतञ्जलि यांच्या दरम्यानच्या काळात नटांच्या कलेच्या स्वरूपात महत्त्वाचा बदल घडून आला होता असा त्यांच्या मताचा निष्कर्ष निघतो. परंतु असे काही घडले असेल असे मानण्यास काही आधार नाही. खरी गोष्ट अशी आहे की प्राचीन भारतात *pantomime* अथवा मूकाभिनयाची कला अस्तित्वात होती असे दाखविणारा कोणताही पुरावा नाही. लोकनाट्याच्या स्वरूपात सुद्धा नाट्याचे अस्तित्व मान्य न करण्याच्या आग्रही भूमिकेमुळे नट शब्दाचा असा अपरिचित अर्थ स्वीकारला गेला आहे असे दिसते.

अष्टाध्यायीत नटाव्यतिरिक्त नर्तकाचाही निर्देश आहे. त्यावरून नृत्यकला ही नटाच्या कलेहून म्हणजे नाट्याहून भिन्न होती हे उघड होते. त्याचप्रमाणे त्या दोघांहून भिन्न अशा गायन नावाच्या कलाकाराचा निर्देश आहे. केवळ गीत गाणाऱ्या ह्या कलाकाराहून नट भिन्न आहे. तथापि, महाभाष्यातील एका निर्देशावरून असे दिसते की नट प्रसंगविशेषीं

२० *Ibid.*, p. 25.

२१ पाराशर्यशिलालिभ्यां भिक्षुनटसूत्रयोः । ४.३.११० । कर्मन्दकृशाश्वादिनिः । ४.३.१११.

२२ छन्दोगौक्थिकयाज्ञिकबह्वृचनटाञ्ञ्यः । ४.३.१२९.

२३ Keith, *op. cit.*, p. 31.

२४ *Ibid.*, p. 49.

गात सुद्धा असे. २.४.७७ ह्या पाणिनीच्या सूत्रावरील भाष्यात 'अगासीन्नटः (नटाने गीत गायिले)' असे एक उदाहरण दिले आहे. पण यावरून नट आणि गायन हे एकच होत असे समजणे बरोबर होणार नाही. कारण तसे असते तर नट आणि गायन अशा दोन भिन्न संज्ञांचा अष्टाध्यायीत निर्देश झाला नसता. नटांच्या कलेचा आविष्कार रंगभूमीवर होत असे हे महाभाष्यावरून स्पष्ट आहे. अष्टाध्यायीतील १.४.२९ ह्या सूत्रावर भाष्य करताना पतञ्जलीने म्हटले आहे 'उपयोगे इति किमर्थम्। नटस्य शृणोति ग्रन्थिकस्य शृणोति.... आतश्चोपयोगो यदारम्भका रङ्गं गच्छन्ति नटस्य श्रोष्यामो ग्रन्थिकस्य श्रोष्याम इति।' नट आणि ग्रन्थिक यांच्या श्रव्य कलेचे दर्शन रंगभूमीवर होत असे आणि ते ऐकण्या व पहाण्यासाठी लोकसमुदाय जात असे अशी महाभाष्याच्या काळची परिस्थिती नाकारता येणार नाही.

## महाभाष्य व नाट्य

ग्रन्थिकांचा निर्देश महाभाष्यात दुसऱ्याही एके ठिकाणी केला आहे. प्रस्तुत संदर्भात महाभाष्यातील तेथील विवरणाचा अधिक विचार करणे आवश्यक आहे. अष्टाध्यायीतील ३.१.२६ ह्या सूत्रावर भाष्य करताना वार्त्तिकांच्या आधारे प्रयोजकाच्या रूपाचे अर्थ स्पष्ट करण्यासाठी 'कंसं घातयति' म्हणजे 'कंसवधमाचष्टे (कंसवधाचा वृत्तान्त सांगतो)', 'बलिं बन्धयति' म्हणजे बलिबन्धनाचा वृत्तान्त सांगतो, 'उज्जयिन्याः प्रस्थितो माहिष्मत्यां सूर्यमुद्गमयति' म्हणजे उज्जयिनीहून निघून माहिष्मतीला सूर्योदयाच्या वेळेस पोचतो (सूर्यमुद्गमयति म्हणजे सूर्योद्गमनं संभावयते) अशी उदाहरणे दिली आहेत. त्यांतील क्रियापदांच्या वर्तमानकाळी रूपांबद्दल पतञ्जलीने पुढीलप्रमाणे विवेचन केले आहे– 'भवेदिह वर्तमानकालता.... सूर्यमुद्गमयतीति तत्रस्थस्य हि तस्यादित्य उदेति। इह तु कथं वर्तमानकालता कंसं घातयति बलिं बन्धयतीति चिरहते कंसे चिरबद्धे च बलौ। अत्रापि युक्ता। कथम्। ये तावदेते शोभनिका नाम एते प्रत्यक्षं कंसं घातयन्ति प्रत्यक्षं च बलिं बन्धयन्तीति। चित्रेषु कथम्। चित्रेष्वप्युद्गीर्णा निपतिताश्च प्रहारा दृश्यन्ते कंसकर्षण्यश्च। ग्रन्थिकेषु कथं यत्र शब्दगडुमात्रं लक्ष्यते। तेऽपि हि तेषामुत्पत्तिप्रभृति आविनाशादृद्धीर्व्याचक्षाणाः सतो बुद्धिविषयान् प्रकाशयन्ति। आतश्च सतो व्यामिश्रा हि दृश्यन्ते। केचित्कंसभक्ता भवन्ति केचिद्वासुदेवभक्ताः। वर्णान्यत्वं खल्वपि पुष्यन्ति। केचिद्रक्तमुखा भवन्ति केचित्कालमुखाः।' ल्यूडर्स यांनी ह्या उताऱ्याचा विशेष अभ्यास करून '*Die Śaubhikas*' नावाचा प्रबंध लिहिला. हा प्रबंध पहावयाला मिळाला नाही. परंतु कीथ आणि कोनौ यांनी आपल्या ग्रंथांत केलेल्या निर्देशानुसार असे दिसते की ल्यूडर्सच्या मते नट मूक अभिनयद्वारा अथवा पडद्यावर पडणाऱ्या त्यांच्या छायांच्या द्वारा कंस अथवा बलीची कथा प्रस्तुत करीत आणि शौभिक (किंवा शोभनिक) ती कथा प्रेक्षकांना समजावून सांगत. त्याचप्रमाणे चित्रकार आपल्या

कंसवधविषयक अथवा बलिबन्धनविषयक चित्रांतील कथा प्रेक्षकांना समजावून सांगत.[२५] अशा प्रकारचा अर्थ करण्याचे कारण असे दिसते की मुळात पतञ्जलीने 'घातयति' आणि 'बन्धयति' या शब्दांचे अर्थ 'वधमाचष्टे', 'बन्धमाचष्टे' असे केले होते, तेव्हा ह्या उताऱ्यातील ह्या शब्दांचे तेच अर्थ स्वीकारणे आवश्यक मानले आहे. यास्तव शोभनिक आणि चित्रकार यांना कथन करणाराची भूमिका दिली आहे. परंतु हे मत ग्राह्य वाटत नाही. पतञ्जलीने 'प्रत्यक्षं घातयन्ति' अशा प्रकारचा शब्दप्रयोग केला आहे. जर 'घातयन्ति' चा 'वधमाचक्षते' असा अर्थ स्वीकारला तर 'प्रत्यक्षम्' शब्दाच्या अर्थाचे काही महत्त्व उरणार नाही. ह्या क्रियापदांतील प्रयोजकाच्या रूपामुळे वधादि क्रिया शोभनिक स्वतः न करता इतराकडून करवून घेत हे मान्य होण्यासारखे आहे. परंतु ह्या क्रिया केवळ मूक अभिनयाच्या द्वारा अथवा पडद्यावरील छायांच्या द्वारा दाखविल्या जात असे समजण्याचे कारण दिसत नाही. शोभनिक हे सूत्रधारसदृश होत असे समजता येईल. चित्रविषयक विवरणात पतञ्जलीने कंसाचा वध होत असल्याच्या दृश्याचा निर्देश केला आहे. तेथे 'घातयति' यातील प्रयोजकाचा अर्थ सुद्धा लागू पडण्यासारखा नाही असे दिसते. तद्वतच शोभनिकांच्या संबंधातही प्रयोजकाचा अर्थ अभिप्रेत नाही असे समजले तर शोभनिक म्हणजे नटच असे मानता येईल. चित्रकारांच्या बाबतीत तरी महाभाष्यातील शब्दांवरून ते स्वतः आपल्या चित्रांतील कथा प्रेक्षकांना समजावून सांगत असा निष्कर्ष निघत नाही. ग्रन्थिकांच्या वर्णनावरून असे दिसते की ते पुराणकथा सांगणाऱ्या पौराणिकांप्रमाणे असावेत. लिखित ग्रन्थावरून कथेचे वाचन करीत असल्यामुळे त्यांना ग्रन्थिक हे नाव पडले असावे. परंतु त्यांच्यात काही कंसभक्त असत व काही वासुदेवभक्त असत, काहींची तोंडे लाल रंगविलेली असत तर काहींची काळी हे निर्देश बुचकळ्यात पाडणारे आहेत. एकाच वेळेस अनेक ग्रन्थिक रंगभूमीवर येत, त्यांपैकी काही कृष्णाची बाजू मांडीत तर इतर कंसाच्या पराक्रमाचे वर्णन करीत आणि हे दोन पक्ष स्पष्ट करण्यासाठी ग्रन्थिक आपल्या मुखांना भिन्न भिन्न रंग लावून येत अशा प्रकारचे कथानिरूपण कधी काळी कोठे प्रचलित असल्याचे प्रसिद्ध नाही. नाट्यशास्त्रातील वर्णनाप्रमाणे नट भूमिकेला अनुरूप असा रंग अंगाला लावतात. दोन भिन्न पक्षात विभागणी आणि मुखाला लावलेला रंग या गोष्टींमुळे ग्रन्थिक पौराणिकापेक्षा नटासारखे अधिक असल्यासारखे वाटतात.

## छायानाट्य

ल्यूडर्स यांच्या विवेचनाचा निष्कर्ष असा दिसतो की पतञ्जलीच्या वेळी वाङ्मय-रूपात संस्कृत नाटके लिहिण्यास प्रारम्भ झाला होता असे म्हणता येण्यासारखे नाही. त्या वेळी नाट्य विद्यमान होते हे त्यांना मान्य आहे. पण हे नाट्य फक्त मूकनाट्याच्या स्वरू-

२५ Keith, *op. cit.*, pp. 33–35; Sten Konow, *Das Indische Drama* (Berlin and Leipzig, 1920), pp. 44–45.

याचे अथवा छायानाट्याच्या स्वरूपाचे होते असे त्यांचे म्हणणे आहे. परंतु प्राचीन काळी भारतात मूकनाटय अथवा छायानाटय प्रचलित होते असे म्हणण्याला काही आधार नाही. महाभाष्यातील 'नटस्य शृणोति, नटस्य श्रोष्यामः' ह्या वचनावरून हे स्पष्ट आहे की नट केवळ मूक अभिनय करीत हे मत स्वीकारणे शक्य नाही. छायानाटयाची ल्यूडर्सनी केलेली सूचना अधिक संभाव्य मानून कोनौ यांनी ती उचलून धरण्याचा प्रयत्न केला आहे. पडद्यावर पडणाऱ्या छायांच्या द्वारा प्रस्तुत केले जाणारे नाट्य महाभारताला परिचित आहे आणि थेरीगाथातील 'रुप्परूपक' शब्द छायानाट्याचा निदर्शक आहे ह्या पिशेल यांच्या मताचा निर्देश करून कोनौ यांनी असे प्रतिपादन केले आहे की अशोकाच्या शिलालेखातील 'रूप'दर्शन वस्तुतः छायादर्शनच होय, तसेच कौटिलीय अर्थशास्त्रातील 'रूपाजीव' शब्दाचा छायानाट्य प्रस्तुत करणारा असा अर्थ असावा. सीताबेंगा गुहेचा उपयोग छायानाट्यासाठी होत असे या मताचा पुरस्कार करून त्यांनी नेपथ्य शब्दाची एक निराळी व्युत्पत्ती सुचविली आहे. अष्टाध्यायी ३.३.६४ मध्ये निर्दिष्ट 'निपठ' किंवा 'निपाठ' शब्दापासून पाठय करण्याचे स्थान या अर्थी नैपाठ्य असा शब्द बनला. त्याचे णेवच्छ असे प्राकृत रूप होऊन त्या रूपाच्या पुनःसंस्कृतीकरणाने नेपथ्य शब्द सिद्ध झाला असे त्यांनी म्हटले आहे. त्यांच्या मते छायानाट्यातील पाठ्यसुद्धा नेपथ्यगृहात म्हणजे पडद्याच्या पाठीमागेच होत होते असे समजावे लागते. शेवटी पिशेल यांनी रूप, रूपक हे शब्द छायानाटयाचे निदर्शक असल्याचे म्हटले होते ते ग्राह्य ठरवून कोनौ यांनी संस्कृत नाटयाच्या प्रकारांसाठी वापरलेली रूपक ही संज्ञा मुळात त्या शब्दांशी संबद्ध अथवा एकरूप असल्याचे म्हटले आहे.[२६]

परंतु हे सर्व प्रतिपादन निर्मूल आहे असे प्रतीत होते. थेरीगाथातील रुप्परूपक शब्द किंवा अशोकाच्या शिलालेखातील रूप शब्द छायानाट्याशी संबद्ध आहे असे मानण्यास काहीही आधार नाही. कौटिलीय अर्थशास्त्रात रूपाजीवा असा स्त्रीलिंगी शब्द असून त्याचा अर्थ वेश्या हा आहे. त्यातील रूप शब्दाचा कोणत्याही प्रकारच्या नाट्याशी संबंध नाही. सीताबेंगा गुहेसंबंधी विवेचन पुढे केले आहे. येथे एवढे सांगितले तर पुरे की छायानाटयाचे प्रयोग त्या गुहेत होत असत अशा तऱ्हेचे मत स्वीकारता येण्यासारखे नाही. नेपथ्य शब्दाची सामान्यपणे केली जाणारी व्युत्पत्ती (नि+पथ पासून 'जेथून मार्ग खाली जातो ती जागा') संदेहमुक्त नाही हे खरे आहे. तथापि त्या शब्दाची कोनौ यांनी सुचविलेली व्युत्पत्तीं त्यापेक्षाही अधिक अग्राह्य वाटते. नेपथ्यगृहाचा उपयोग वेषभूषा परिधान करण्यासाठी करावयास सांगितला आहे. त्याचा पाठ्यासाठी उपयोग करावयास कोठेही सांगितलेले नाही. आणि छायानाटयात केवळ नटच पडद्याच्या आत असत असे

२६ S. Konow, *Das indische Drama,* pp. 45–46; also 9, 4.

नाही तर पाठ्याने प्रेक्षकांना कथा समजावून सांगणारे निवेदक सुद्धा पडद्याच्या आत असत ही कल्पना कोणत्याही तऱ्हेने पटण्यासारखी नाही. शेवटी नाटकप्रकारांचा निर्देश करण्यासाठी वापरलेल्या रूपक शब्दाचा छायानाट्याशी काही संबंध आहे असे दाखविणारा कोणताही पुरावा नाही ही गोष्ट स्पष्ट केली पाहिजे.

## नाट्यविषयक ग्रंथ

मूकनाट्य किंवा छायानाट्य यांचे अस्तित्व सिद्ध करण्याचे प्रयत्न सफल झाले आहेत असे म्हणता येत नाही. परंतु ते सफल झाले आहेत असे मानले तरी त्यामुळे पाठ्ययुक्त संस्कृत नाट्याचे इतर स्वरूपात अस्तित्व नाकारणे आवश्यक आहे असे समजण्याचे कारण नाही. पाणिनीने निर्दिष्ट केलेली शिलालिन् आणि कृशाश्व या आचार्यांची नटसूत्रे आज उपलब्ध नाहीत. तथापि, त्यांतील विषयांची आणि विवेचनपद्धतीची काहीशी कल्पना भरताच्या नाट्यशास्त्रावरून येण्यासारखी आहे. हा ग्रंथ स्वतंत्र नाही, संकलनात्मक स्वरूपाचा आहे हे त्यात अनेक ठिकाणी उद्धृत केलेल्या आनुवंशिक किंवा परंपरेने आलेल्या व नटांनी करावयाच्या अभिनयाचे विवरण करणाऱ्या श्लोकांवरून स्पष्ट आहे. नटांचा अभिनय, पाठ्य इत्यादी जो विशिष्ट व्यापार त्यासंबंधीची परंपरा पाणिनिनिर्दिष्ट नटसूत्रांपासून सुरू झाली असे समजण्यास काहीही प्रत्यवाय नाही. तेव्हा त्या नटसूत्रांत अभिनय, पाठ्य इत्यादींचे विवेचन प्राय: नाट्यशास्त्रातल्याप्रमाणेच केलेले असणार असे म्हटले तर ते चूक होणार नाही. त्याचप्रमाणे अभिनयादी नटव्यापाराचा ज्या पद्धतीचा आविष्कार – रंगमंचावर प्रेक्षकांच्या डोळ्यांदेखत – नाट्यशास्त्रात अभिप्रेत आहे त्याच पद्धतीचा तो प्राचीन नटसूत्रांतही अभिप्रेत होता असे समजण्यास काही हरकत दिसत नाही.

## वाङ्मयाचा प्रारम्भ

या संबंधात आणखी एका गोष्टीचा निर्देश करणे आवश्यक आहे. पाणिनिपतञ्जलींच्या काळी विदग्ध संस्कृत वाङ्मय निर्माण होऊ लागले होते. 'अधिकृत्य कृते ग्रन्थे (४.३.८७)' ह्या पाणिनीच्या सूत्रावरील एका वार्त्तिकात कात्यायनाने आख्यायिका नावाच्या वाङ्मयप्रकाराचा निर्देश केला आहे. त्या प्रकाराची पतञ्जलीने वासवदत्ता, सुमनोत्तरा आणि भैमरथी अशी तीन उदाहरणे दिली आहेत. त्यानंतरच्या सूत्रात पाणिनीने शिशुक्रन्दीय, यमसभीय, इन्द्रजननीय इत्यादी ग्रंथांची नावे बनविण्याविषयीचा नियम दिला आहे. इतरत्र त्याने आख्यान नावाच्या कथाप्रकाराचा आणि श्लोक व गाथा यांत रचना करणाऱ्यांचा निर्देश केला आहे. यावरून असे म्हणता येते की कथात्मक स्वरूपाच्या विदग्ध संस्कृत वाङ्मयाच्या निर्मितीला त्या काळी प्रारम्भ झाला होता. परंतु त्याचवेळी संस्कृत नाटके लिहिण्यासही प्रारम्भ झाला होता असे मात्र म्हणता येण्यासारखे नाही. पाणिनीला रूपक, नाटक, प्रकरण इत्यादी शब्द अवगत नाहीत हे मान्य केलेच पाहिजे.

## लोकनाट्य

मग प्रश्न असा उपस्थित होतो की पाणिनीने निर्दिष्ट केलेल्या नटसूत्रांचा उपयोग कोणत्या नाट्याच्या संदर्भात होत असावा ? या संबंधात हिलेब्रांट यांच्या मताचा उल्लेख करणे उचित होईल. त्यांच्या मते धार्मिक विधीशी संबद्ध नसलेले आणि सामान्य लोकांच्या मनोरंजनाचे साधन म्हणून असलेले एक प्रकारचे नाट्य भारतात प्राचीन कालापासून प्रचलित होते. याला लोकनाट्य असे म्हणता येईल. कोनौ यांनी निर्दिष्ट केलेल्या हिलेब्रांट यांच्या मतानुसार उत्तरकालीन संस्कृत नाटकांतील अनेक वैशिष्ट्यांचे मूळ ह्या लोकनाट्यात आहे. प्रारंभीचा सूत्रधार आणि नटी किंवा सूत्रधार आणि पारिपार्श्वक यांच्यातील संवाद, पात्रानुसार भाषेच्या शुद्ध आणि अशुद्ध रूपांचा मिश्र उपयोग, गद्य आणि पद्य यांचे मिश्रण, विदूषक ह्या पात्राची योजना इत्यादी संस्कृत नाटकातील गोष्टी लोकनाट्यातून आल्या आहेत असे त्यांनी प्रतिपादन केले आहे. कोनौ यांना सुद्धा हे मत मान्य आहे.[२७] हे जे नाट्य प्रचलित होते त्याच्या प्रवर्तकांना पाणिनिनिर्दिष्ट नटसूत्रांचा उपयोग होण्यासारखा होता असे म्हणावयास काही हरकत दिसत नाही. अर्थात कोनौ यांनी पुरती जोडली आहे त्याप्रमाणे हे लोकनाटय म्हणजे संस्कृत नाटक नाही, आणि संस्कृत नाटकाच्या उत्पत्तीस लोकनाट्याप्रमाणेच इतरही काही गोष्टी साहाय्यभूत झाल्या आहेत.

परंतु ही विचारसरणी कीथ यांना मान्य नाही. त्यांच्या मते लोकनाट्याचे अस्तित्व सिद्ध करण्यास पुरेसा पुरावा नाही. निश्चित स्वरूपाचा असा याविषयीचा पुरावा उपलब्ध नाही हे खरे आहे. तथापि, हे लक्षात ठेवले पाहिजे की वैदिक साहित्यात सामान्य लोकांचे जीवन प्रतिबिंबित झालेले क्वचितच दिसते. त्यात मुख्यत: उच्चवर्णीय आर्य लोकांच्या यागप्रधान धर्माचा आणि त्यांच्याच आचारविचारांचा आविष्कार झाला आहे. परंतु ह्या धर्माचे आचरण आणि ह्या आचारविचारांचे पालन समाजाच्या सर्व थरांत प्रसृत झाले होते असे म्हणता येण्यासारखे नाही. किंबहुना, सामान्य लोकात प्रचलित असलेल्या धर्माचे स्वरूप यागप्रधान धर्माहून बहुतांशी भिन्न होते असेच समजावे लागते. निरनिराळ्या देवतांची पूजा करणे, ठरलेल्या वेळी त्या देवतांचे उत्सव साजरे करणे व यात्रा भरविणे असे त्या धर्माचे स्थूल स्वरूप होते असे म्हणावयास हरकत नाही. धर्माशी साक्षात संबंध नसलेल्या कौटिलीय अर्थशास्त्रासारख्या ग्रंथात देवतांची पूजा, त्यांच्या संबंधात होणाऱ्या यात्रा, उत्सव इत्यादींचे अनेक उल्लेख आहेत.[२८] हे सर्वमान्य आहे की आर्य लोक भारतात आले त्या वेळी द्रविड आणि इतर वंशांतील लोक येथे अगोदरपासूनच स्थायी झालेले होते. कालान्तराने

२७ Konow, *op. cit.*, p. 44.

२८ शिववैश्रवणाश्विश्रीमदिरागृहाणि । – कौ. अ., २.४.१७; संकर्षणदैवतीय: । – कौ. अ., १३.३.५४; दैवतेज्यायां यात्रायाम् । – कौ. अ. १२.५.१; यात्रासमाजोत्सवप्रहवणानि । – कौ. अ., १.२१.२८; इत्यादी.

आर्य, द्रविड आदी सर्वांचा मिळून एक समाज बनल्यानंतर सुद्धा धर्माच्या बाबतीत एकरूपता प्रस्थापित झाली नाही. वैदिक धर्माचे स्वरूपच असे होते की त्याचा सर्वसामान्य जनतेत प्रसार होणे असंभाव्य होते. तेव्हा बहुसंख्य आर्येतर जमातींचे धर्माच्या बाबतीतील आचारविचार पूर्वापार चालत आले होते तसेच चालू राहावेत हे स्वाभाविक होते. आणि जी गोष्ट धर्माची तीच लोकांच्या मनोरंजनाच्या प्रकारांची. विशेषतः देवतांच्या यात्रा, उत्सव आदी प्रसंगी होणारे मनोरंजनाचे कार्यक्रम पूर्वापार चालत आले असले पाहिजेत हे उघड आहे आणि ह्या मनोरंजनाच्या विविध प्रकारांत नाट्याचा समावेश होत असावा असे सहज मानता येण्यासारखे आहे. या सर्व गोष्टींचा वैदिक व तत्संबद्ध वाङ्मयात साक्षात निर्देश नाही. पण यावरून त्यांचे अस्तित्व नाकारणे सयुक्तिक होणार नाही.

नाटय प्रस्तुत करणाऱ्या नटांचे संघ यात्रा, उत्सव आदी प्रसंगी जमणाऱ्या लोकांच्या समुदायापुढे आपल्या कलेचे प्रदर्शन करण्यासाठी एका गावाहून दुसऱ्या गावी याप्रमाणे फिरत असत असे एका जातककथेवरून दिसते. कणवेरजातकात सामा (श्यामा) नावाची गणिका आपल्या प्रियतमाच्या शोधार्थ नटांच्या कडे जाते, कारण ते सगळीकडे हिंडत असतात, असे कोणतेही ठिकाण नाही की जेथे ते जात नाहीत. ते जेथे जेथे जातील तेथे तेथे त्यांनी प्रथम तिच्या प्रियकराला उद्देशून रचलेली एक गाथा म्हणावी अशी ती त्यांना विनंती करते.[२९] हे हिंडणाफिरणारे नट सामान्य लोकांच्या मनोरंजनासाठी जे नाटय प्रस्तुत करीत ते लोकनाटयाच्या स्वरूपाचे असण्याचाच संभव आहे. आणि ह्याच लोकनाटयाचा प्रभाव वैदिक कर्मकाण्डातील काही विधींवर पडला आहे असे जे हिलेब्रांट यांचे मत आहे तेच अधिक सयुक्तिक वाटते. एखाद्या वस्तूच्या किमतीबद्दल झगडा उत्पन्न करून मारपीट करून विक्रेत्याला हुसकावून लावणे, ब्रह्मचारी आणि वेश्या यांचे परस्परांना गालिप्रदान इत्यादी गोष्टी मूलतः लोकनाटयातच प्रचलित असून तेथूनच त्यांचे वैदिक विधींत संक्रमण केले गेले आहे ही कल्पनाच अधिक ग्राह्य वाटण्यासारखी आहे.

बौद्ध वाङ्मयात आढळणाऱ्या नाट्यप्रयोगाविषयीच्या आणखी काही उल्लेखांचा पुढे निर्देश केला आहे. त्यांत प्रयोग करणारे नटाचार्य व नटसंघ दक्षिण देशातून आलेले किंवा दक्षिणदेशीय सूत्रधार व नट होते असे म्हटले आहे. दक्षिण देशाचा निर्देश या संदर्भात सूचक समजता येईल. त्या प्रदेशात प्राधान्येकरून आर्येतर जमातींची वस्ती होती. तेव्हा तेथील नटसंघ उत्तरेकडे जात यावरून असे अनुमान केले की नाट्याची ही कला दक्षिणेत विकसित झाली होती व तिला सुरुवातीस आर्येतर लोकांचा

२९ (सामा) नटे पक्कोसापेत्वा... 'तुम्हाणं अगमनट्ठानं नाम न'त्थि, तुम्हे गामनिगमराजधानियो गन्त्वा समज्जमंडले पठमं एव इमं गाथं गायेय्याथा'ति। –V. Fausbøll, *The Jātakas*, Vol. 3 (London, 1883), pp. 61–62.

आश्रय होता तर ते चूक ठरू नये. हे संभाव्य मानले तर लोकनाट्याविषयीच्या उपर्युक्त विधानांना बळकटी येण्यासारखी आहे.

लोकनाट्याचे प्राचीन काली अस्तित्व कीथ यांना मान्य नाही. तथापि, प्रहसन आणि भाण या नाट्यप्रकारांचा विचार करताना त्यांनी ते सामान्य लोकांत उद्भवले असावेत असे म्हटले आहे.[३०] त्याचप्रमाणे पूर्वरङ्गाबद्दल त्यांनी असे उद्गार काढले आहेत की तो एक सामान्य लोकात प्रचलित असलेला धार्मिक विधि आहे.[३१] यावरून त्यांनी लोकनाट्याचे अस्तित्व अप्रत्यक्षपणे मान्य केले आहे असे दिसते. मग त्यांनी हिलेब्रांट यांचे मत खोडून काढण्याचा प्रयत्न का करावा ते सहज लक्षात येत नाही. पण त्याचे कारण असे दिसते की संस्कृत नाटकाच्या उत्पत्तीसंबंधी कीथ यांनी एक विशेष सिद्धान्त मांडला आहे आणि त्या सिद्धान्ताशी लोकनाट्याच्या कल्पनेचा मेळ बसण्यासारखा नव्हता.

## धार्मिक विधी व नाट्य

कीथ यांचे असे मत आहे की संस्कृत नाटकाचे मूळ धार्मिक विधीतच शोधणे आवश्यक आहे. सामान्यतः सर्वच प्राचीन समाजांत नाट्य कोणत्या ना कोणत्या तरी धार्मिक विधीशीच संबद्ध असते. भारतात तर सर्वच जीवन धर्माशी निगडित झाले आहे. तेव्हा येथे नाट्यासारखा मनोरंजनाचा प्रकार सुद्धा मुळात धर्माशीच संबद्ध असावा म्हणजे त्याचा उगम एखाद्या धार्मिक विधीतून झाला असावा असे मानणेच योग्य आहे असे त्यांचे म्हणणे आहे. आणि त्यांच्या मते नाट्योत्पत्तीला अनुकूल असलेले धार्मिक विधी मूलतः एखाद्या महत्त्वाच्या प्राकृतिक संघर्षावर आधारित असतात. महाव्रत विधीत शुभ्र गोलाकार चामड्याबद्दल शूद्र आणि आर्य यांच्यात होणारा संघर्ष आणि त्यात शेवटी होणारा आर्यांचा विजय हा नाट्यमय प्रसंग अंधकार व प्रकाश यांच्यातील दैनंदिन संघर्षात प्रकाशाच्या होणाऱ्या विजयावर आधारित आहे असे त्यांनी म्हटले आहे. अशा प्रकारच्या धार्मिक विधीतच संस्कृत नाटकाचे अंतिम मूळ आहे असा त्यांच्या म्हणण्याचा आशय आहे.

## कृष्णभक्ति व नाट्य

परंतु कीथ यांच्या मते संस्कृत नाटकाच्या उत्पत्तीशी साक्षात संबंध आहे तो कृष्ण-कंस-संघर्षावर आधारित धार्मिक विधीचा. हा संघर्षही मुळात प्राकृतिक संघर्षच असून तो महाव्रतविधीतील संघर्षाचेच दुसरे रूप आहे. कृष्णकृत कंसवध ही मूलतः नवधान्योत्पत्तीची

३० 'The farce, Prahasana, on the other hand, has every sign of popular origin and vogue.' *Op. cit.*, p. 348. तसेच 'The monologue, Bhāṇa, has also an obviously popular character and origin.' *Ibid.*, p. 348.

३१ *Ibid.*, p. 51.

कथा. कंस म्हणजे जीर्णशीर्ण झालेल्या पुराणधान्यादी वनस्पतींचे सत्त्व (*outworn spirit of vegetation*) आणि कृष्ण म्हणजे त्याचा विनाश करून नवीन धान्यादी वनस्पतींची उत्पत्ती करणारे सत्त्व. पुराण सत्त्वाच्या दरवर्षी होणाऱ्या विनाशाला कंसवधरूप विधीचे स्वरूप दिले आहे. पण पुराण व नव धान्यसत्त्वांमधील हा संघर्ष शिशिर आणि ग्रीष्म या दोन ऋतूंतील संघर्षाच्या स्वरूपातही अभिव्यक्त होतो. महाव्रत विधीत अंधकार-प्रकाश-संघर्षा-बरोबरच शिशिर-ग्रीष्म-संघर्षाचेही दर्शन होते. म्हणून कृष्ण-कंस-संघर्ष महाव्रतविधीचेच निराळे रूप आहे म्हणजेच धार्मिक विधिस्वरूप आहे असे मानता येईल. महाभाष्यात कृष्णभक्तांना रक्तमुख म्हटले आहे आणि कंसभक्तांना कालमुख याचे कारण कृष्ण हा प्रकाशाचा आणि ग्रीष्माचाही प्रतिनिधी आहे आणि कंस अंधकाराचा आणि शिशिराचा. याप्रमाणे विवेचन करून कीथ यांनी असे प्रतिपादन केले आहे की शिशिरावर ग्रीष्माने मिळविलेल्या विजयावर आधारलेल्या नाट्यमय कृष्णभक्तिस्वरूप धार्मिक विधीपासूनच संस्कृत नाटकाची उत्पत्ती झाली. हा धार्मिक विधी यूरोपातील *passion play* नावाच्या नाट्यप्रकारासारखा होता असे म्हणून त्यांनी असे सांगितले आहे की प्राचीन ग्रीसमध्ये शोकान्त नाटक (*tragedy*) अशाच प्रकारच्या धार्मिक विधीपासून उत्पन्न झाले होते. परंतु भारतातील धार्मिक विधीत होणारा मृत्यू अन्ततः सुखास कारणीभूत होतो, तर ग्रीस-मधील नाट्यात होणारा मृत्यू शोककारक असतो असा त्या दोहोंत फरक आहे. संस्कृत नाटक नेहमी सुखान्त असते याचे मूळ त्याच्या उत्पत्तीस कारणीभूत झालेल्या प्राकृतिक संघर्षाच्या स्वरूपात आहे असे मत त्यांनी प्रदर्शित केले आहे.[३२]

संस्कृत नाटकाच्या उत्पत्तीचा संबंध कृष्णभक्तिविषयक धार्मिक विधीशी प्रथम लेव्हि यांनी सूचित केला होता.[३३] महाभाष्यातील कंसवधाचा निर्देश आणि वेबर यांनी वैष्णव मंदिरातील कृष्णजन्माच्या सोहळ्याचे केलेले वर्णन यांवर त्यांच्या विवेचनाचा भर होता. कीथ यांनी त्यात आणखी काही मुद्यांची भर घातली. संस्कृत नाटकांतील गद्याची प्रधान प्राकृत भाषा शौर-सेनी आहे, यावरून असे अनुमान निघते की ज्या लोकांमध्ये संस्कृत नाटकाची उत्पत्ती झाली त्यांची नेहमीच्या व्यवहारातील भाषा शौरसेनी होती. आणि ती भाषा जेथे प्रचलित होती तो प्रदेश म्हणजे मथुरा राजधानी असलेला शूरसेन देश कृष्णभक्तीचे पहिले आणि सर्वात महत्त्वाचे केन्द्र होते हे प्रसिद्ध आहे. वेबरकृत कृष्णजन्माच्या नाट्यमय उत्सवाच्या वर्णनाचा निर्देश करून कीथ यांनी बंगालमधील यात्रारूप नाट्याचाही उल्लेख केला आहे. त्यांनी असे प्रतिपादन केले आहे की संस्कृत नाटकाच्या अवनतीच्या काळातही यात्रांची लोकप्रियता अबाधित राहिली आहे आणि ह्या यात्रारूपी नाट्यप्रकाराचे साहित्यिक रूप जयदेवाच्या

३२ Keith, *op. cit.*, pp. 37–38.

३३ S. Levi, *Le théatre indien*, P. 336.

गीतगोविन्दात पहावयास मिळते. शेवटी भासाच्या नावावर प्रसिद्ध झालेल्या बालचरित नावाच्या नाटकाचा निर्देश करून कीथ यांनी असे म्हटले आहे की त्यात जे दानव आणि कंस यांच्या वधाचे दर्शन होते ते *passion play* मधून नाटकाची उत्पत्ती झाली याचे प्रमाण म्हणून मानता येईल.[३४]

परंतु संस्कृत नाटकाच्या उत्पत्तीविषयीचे हे मत मान्य होण्यासारखे नाही. कृष्णकृत कंसवधाचे मूळ एखाद्या प्राकृत संघर्षात आहे ही कल्पना मुळीच पटण्यासारखी नाही. कंस जीर्ण धान्यसत्त्वाचा अथवा शिशिरकालीन अंधकाराचा प्रतिनिधी आहे आणि कृष्ण नव धान्यसत्त्वाचा अथवा ग्रीष्मकालीन प्रकाशाचा असे सूचित करणारे कोणतेही प्रमाण नाही. महाभाष्यात कृष्णभक्तांना रक्तमुख आणि कंसभक्तांना कालमुख म्हटले आहे. परंतु यावरून कृष्ण व कंस यांचा कोणत्याही प्राकृतिक घटनेशी संबंध जोडता येण्यासारखा नाही. वस्तुतः महाभाष्यातील वर्णन रंगभूमीवरील ग्रंथिकांच्या संबंधात केलेले आहे. ते वर्णन नाटयशास्त्रातल्याप्रमाणे नटांच्या शरीरांना लावावयाच्या रंगाच्या संदर्भात केले असण्याचाच अधिक संभव आहे. परंतु त्यांच्या भक्तांप्रमाणेच कृष्ण आणि कंस हे अनुक्रमे रक्तमुख आणि कालमुख होते असे मानले तरी त्यामुळे त्यांचा नव धान्य आणि जीर्ण धान्य यांच्याशी संबंध कसा प्रस्थापित होतो ते समजणे कठीण आहे. तसेच रक्तवर्ण ग्रीष्मऋतूचा सूचक आणि कालवर्ण शिशिराचा हेही पटण्यासारखे नाही. शिवाय, शिशिराची समाप्ती होऊन ग्रीष्माचे आगमन होते तो काळ जीर्ण धान्यसत्त्वाच्या विनाशाचा आणि नव धान्यसत्त्वाच्या विजयाचा अशी परिस्थिती भारतात कधी काळी होती हे संशयास्पद आहे. तशी परिस्थिती कदाचित इंडो-यूरोपिअन युगात असेल. पण भारतात प्राचीन काळापासून नवधान्योत्पत्तीचा शरदृतूशी संबन्ध आहे. त्याच वेळेस आग्रयण इष्टी करण्याची प्रथा होती. दुसरी गोष्ट अशी की कृष्ण आणि कंस यांची कथा इतकी प्राचीन नाही की तिला प्राकृतिक घटनेवर आधारलेली अशी पुराण कथा समजता येईल. छांदोग्य उपनिषदात (३.१७.६) देवकीपुत्र कृष्णाचा निर्देश आहे. यावरून उपनिषत्काळी कृष्ण एक ऐतिहासिक पुरुष समजला जात होता हे उघड आहे. तत्पूर्वी कृष्णाचा कोठेही निर्देश नाही. त्याचप्रमाणे सर्व प्राचीन वाङ्मयात कंसाचे नाव अथवा कृष्णाने त्याचा वध केला असल्याची कथा कोठे आढळत नाही. तेव्हा कीथ म्हणतात त्या प्रकारची पुराण कथा वैदिकयुगामध्ये कृष्ण व कंस यांचा नावाशी संबद्ध होती हे मान्य करणे अशक्य आहे. म्हणून त्या कथेवर आधारलेल्या एका धार्मिक विधीतून संस्कृत नाट्य उदयास आले हा विचार ग्राह्य मानता येत नाही.

महाभाष्यात कंसवधाच्या घटनेवर आधारलेल्या प्रयोगाचा निर्देश आहे त्याचबरोबर बलिबंधनाच्या घटनेवर आधारलेल्या प्रयोगाचाही निर्देश आहे. वस्तुतः बलिबंधनाची ही

३४ Keith, *op. cit.*, pp. 40–41; 38.

कथाच एका प्राकृतिक घटनेवर आधारलेली अशी पुराणकथा आहे असे म्हणता येईल. कारण विष्णु ही वैदिक देवता असून त्याच्या तीन पदक्रमणांचा वैदिक वाङ्मयात निर्देश आहे. तेंव्हा विष्णुकृत बलीच्या बंधनावर आधारलेला एक धार्मिक विधी प्रचलित होता असे म्हटले तर ते अधिक संभाव्य वाटण्यासारखे आहे. तथापि, ते संभाव्य मानले तरी त्या विधीत संस्कृत नाटकाची उत्पत्ती शोधण्याचा प्रयत्न सफल होईल असे दिसत नाही. शिवाय, हे सुद्धा लक्षात ठेवले पाहिजे की महाभाष्यात जसा वासुदेवभक्तांचा निर्देश आहे तसाच कंसभक्तांचाही आहे. यावरून त्या ग्रंथात अभिप्रेत असलेले वासुदेवभक्तीचे स्वरूप उत्तरकालीन कृष्णभक्तीच्या स्वरूपासारखेच होते असे समजणे बरोबर नाही हे स्पष्ट होते. अन्यथा कंसभक्ती सुद्धा त्याच स्वरूपाची होती असे मानावे लागेल. वेबर यांनी केलेले कृष्णजन्माष्टमीच्या प्रसंगी होणाऱ्या समारंभाचे वर्णन वैष्णव मंदिरांत त्या वेळी होणाऱ्या उत्सवावर आधारित आहे. ह्या उत्सवाची परंपरा फार प्राचीन आहे असे समजण्याचे मुळीच कारण नाही. प्रायः वल्लभ-संप्रदायाच्या स्थापनेनंतर अशा तऱ्हेचे उत्सव मंदिरांत साजरे करण्याची प्रथा सुरू झाली याविषयी संशय नाही. आणि बंगालमध्ये प्रचलित असलेल्या यात्रांबद्दल तर असे निश्चितपणे म्हणता येईल की त्यांचे हे स्वरूप मध्ययुगाच्या पूर्वी विद्यमान नव्हते. चैतन्य आणि त्याचे शिष्य रूप आणि जीव गोस्वामी यांच्या प्रेरणेने कृष्णविषयक भक्तीला बंगालात जे स्वरूप प्राप्त झाले त्यातूनच ह्या नाट्यप्रकाराची उत्पत्ती झाली. कीथ यांनी सूचित केले आहे त्याप्रमाणे प्राचीन संस्कृत नाट्याचा त्याच्या अवनतीच्या कालातही टिकून राहिलेला अवशेष नसून तो नाट्याचा एक नूतन आविष्कार आहे. संस्कृत नाट्याचा त्याच्यावर साहजिकपणे प्रभाव पडला आहे इतकेच. जयदेवाचे गीतगोविन्द यात्रांचे वाङ्मयीन स्वरूपात दर्शन घडविते असे म्हणता येईल. त्यात नाट्यमय काही प्रसंग आहेत हे खरे आहे. परंतु त्यात संस्कृत नाटकाची प्रारंभीची अवस्था प्रतिबिम्बित झाली आहे असे मुळीच समजता येण्यासारखे नाही. आणि विशिष्ट रचना असलेल्या त्या काव्यातल्याप्रमाणे प्रारंभीच्या संस्कृत नाटकांचे विषय कृष्णभक्तिपर होते असा निष्कर्ष कोणत्याही दृष्टीने समर्थन करता येण्यासारखा नाही.

संस्कृत नाटकांत प्रधान प्राकृत भाषा शौरसेनी आहे हे खरे आहे. पण त्यावरून एवढेच म्हणता येईल की ती भाषा बोलली जात असे त्या प्रदेशात संस्कृत नाटके लिहिण्यास प्रारंभ झाला. परंतु त्या भाषेचा कृष्णभक्तीच्या आविष्काराशी काही विशेष संबंध आहे असे सूचित करणारे कोणतेही प्रमाण दाखविता येण्यासारखे नाही.

भासाच्या नावाने प्रसिद्ध झालेल्या बालचरित नाटकात कृष्णचरिताचे दर्शन होते. परंतु ते नाटक *passion play* च्या स्वरूपाचे आहे हे मत स्वीकारणे अशक्य आहे. प्राचीन ग्रीसमधील ट्रॅजेडीमध्ये ज्याला दुःख सहन करावे लागते किंवा ज्याचा वध होतो तो मुळात उदात्त व सत्प्रवृत्त असतो. युरोपमध्ये मध्ययुगात प्रचलित झालेल्या *passion play* मध्ये तर येशू ख्रिस्ताला मानवजातीच्या उद्धारार्थ सहन कराव्या लागणाऱ्या यातनांचे

आणि शेवटी त्याच्या होणाऱ्या वधाचे दर्शन होते. अशा तऱ्हेच्या *passion play* शी बालचरिताची तुलना कोणत्याही प्रकारे होऊ शकत नाही. त्यातील दानवांचा नाश आणि कंसाचा वध ह्या गोष्टी दुष्टांच्या दमनाच्या स्वरूपाच्या आहेत. संस्कृत नाटक नेहमी सुखान्त असते या गोष्टीचे मूळ कृष्ण-कंस कथेला आधारभूत असलेल्या प्राकृतिक संघर्षात आहे हे कीथ यांचे मतही स्वीकारता येत नाही. कारण वर म्हटल्याप्रमाणे त्या कथेला एखाद्या प्राकृतिक संघर्षाचा आधार आहे असे दाखविणारा कोणताही पुरावा नाही.

शिवाय, हे बालचरित नाटक संस्कृत नाटकाच्या प्रारंभिक अवस्थेचे प्रतिनिधिरूप आहे असे मानणेही शक्य नाही. हे नाटक भासकृतच आहे असे मानले तरी हे लक्षात ठेवले पाहिजे की कीथ यांनीच अश्वघोषाला भासाच्या पूर्वकालीन ठरविले आहे आणि अश्वघोषाच्या नाटकांचे जे अंश उपलब्ध झाले आहेत त्यांत कृष्णभक्तीचा कसल्याही प्रकारचा संबंध नाही. आणि बालचरित हे एकच नाटक कृष्णभक्तिविषयक आहे. त्याच्या समवेत भासाच्या नावानेच प्रसिद्ध झालेल्या इतर बारा नाटकांपैकी एकही त्या विषयाशी संबद्ध नाही. ही सर्व नाटके समकालीन मानली आहेत. त्यांपैकी एकच प्रारंभिक अवस्थेचे द्योतक मानणे कितपत योग्य होईल ? इतर नाटकांवरून हे स्पष्ट आहे की कोणत्या तरी धार्मिक विधीतून संस्कृत नाटकाची उत्पत्ती झाली असे सूचित करणारे काहीही चिन्ह त्यांत नाही तसेच भासपूर्वकालीन समजल्या गेलेल्या अश्वघोषाच्या नाट्यखंडातही अशा तऱ्हेचे काही चिन्ह नाही.

वास्तविक संस्कृत नाट्याच्या उत्पत्तीशी जर कोणत्या एका देवतेचा संबंध प्रस्थापित करणे शक्य असेल तर ती देवता शिव होय, कृष्ण नाही. नाट्यशास्त्रात असे म्हटले आहे. की अमृतमन्थन नावाच्या समवकाराचा आणि त्रिपुरदाह नावाच्या डिमाचा प्रयोग हिमालयावर शंकरापुढे करण्यात आला आणि त्यावेळेस प्रसन्न होऊन त्याने आपले नृत्य पूर्वरंगात समावेश करण्यासाठी दिले. कालिदासाच्या मालविकाग्निमित्र नाटकात नाट्य शिवाच्या अर्धनारीश्वर रूपात विभक्त झाले असल्याचे म्हटले आहे.[३५] आणि शिवाला नटराज म्हणतात हे प्रसिद्ध आहे. तेव्हा नाट्याच्या उत्पत्तीचा शिवाशी संबंध आहे असे मानणेच अधिक योग्य होईल. तथापि, शिवभक्तिरूप एखाद्या विशिष्ट धार्मिक विधीतच त्याचे मूळ शोधण्याचा प्रयत्न करणे आवश्यक आहे असे वाटत नाही.

## मंत्रतंत्र आणि नाट्य

संस्कृत नाटकाच्या उत्पत्तीचे विवेचन करताना गोंडा यांनी असे प्रतिपादन केले आहे की सर्वत्र समाजाच्या प्राथमिक अवस्थेत मानवाच्या सर्व कृती केवळ धार्मिक स्वरूपाच्याच

३५ रुद्रेणेदमुमाकृतव्यतिकरे स्वाङ्गे विभक्तं द्विधा । –माल. १.४.

नसतात, तर त्यांचा जादूटोण्याशीही संबंध असतो. त्यांच्या मते नृत्य, गीत, क्रीडा इत्यादी सर्व प्रकारच्या क्रिया मंत्रतंत्रात्मक धार्मिक विधींच्या स्वरूपाच्या (*magico-religious rites*) असतात. ह्या सर्व विधींचा अवलंब पृथ्वीपासून धान्योत्पत्ती व्हावी, स्त्रियांना गर्भधारणा व्हावी, युद्धात विजय प्राप्त व्हावा, अनिष्टाचा परिहार व्हावा, शुभाची प्राप्ती व्हावी, इच्छा सफल व्हाव्यात इत्यादी विविध प्रयोजनांच्या सिद्धीसाठी केला जातो. नृत्य, गीत, प्रार्थना, पूजा, रथस्पर्धा, कंदुकक्रीडा, द्यूत इत्यादी सर्व प्रकारच्या कृत्यांच्या द्वारा अशाच प्रकारच्या प्रयोजनांची सिद्धी अपेक्षित असते आणि त्या सर्व कृत्यांत जादूच्या स्वरूपाचे तंत्र अवश्य विद्यमान असते. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे महाव्रत आदी विधींत समाविष्ट केलेले प्रकार मूलतः सामान्य लोकांत प्रचलित होते आणि त्यांचा मूळ उद्देश मंत्रतंत्राच्या साहाय्याने ईप्सितसिद्धी करून घेणे हा होता. तसेच धार्मिक विधी आणि धर्मनिरपेक्ष व्यवहार अशा तऱ्हेचा भेद त्या वेळी केला जात नसे.[३६] या विवेचनानंतर गोंडा यांनी असे प्रतिपादन केले आहे की संस्कृत नाटकांची उत्पत्ती अशाच मंत्रतंत्रात्मक विधींपासून झाली. याला प्रमाण म्हणून संस्कृत नाटकांचे प्रयोग यात्रा, उत्सव आदी प्रसंगी होत असत ह्या गोष्टीचा निर्देश केला आहे. त्याचप्रमाणे विद्यमान संस्कृत नाटकांत सुद्धा काही कृती मंत्रतंत्रात्मक अथवा जादूच्या स्वरूपाच्या आहेत असे त्यांना वाटते. उदाहरणार्थ, मालविकाग्निमित्र नाटकात मालविकेने आपल्या कामनेच्या पूर्तीसाठी अशोकवृक्षाला केलेला पादप्रहार, स्वप्नवासवदत्ता नाटकातील कंदुकक्रीडा या गोष्टी त्यांना जादूच्या स्वरूपाच्या वाटतात. इतकेच काय, संस्कृत नाटकांत सर्वत्र आढळणारी निसर्गवर्णने सुद्धा त्यांना मंत्रतंत्रात्मक वाटतात.[३७]

गोंडा यांनी ज्या मंत्रतंत्रात्मक विधींचा निर्देश केला आहे तसल्याच स्वरूपाचे विधी समाजाच्या प्राथमिक अवस्थेत प्रचलित होते हे कदाचित मान्य करता येईल. अथर्ववेदात अशा काही विधींचे दर्शन घडतेच. तसेच उत्तरकाली सुद्धा मंत्रतंत्र, जादूटोणा वगैरे प्रचारातून नाहीसे झाले नाहीत असाही संभव आहे. तेव्हा जीवनाच्या काही भागावर मंत्रतंत्रादींची छाया पडली आहे असे वाटले तर ते अस्वाभाविक मानता येणार नाही. तथापि, ज्या समयी संस्कृत नाट्याची उत्पत्ती झाली असे मानता येण्यासारखे आहे त्या पाणिनि-पतञ्जलींच्या काळी नृत्य, गीत, पाठ्य, अभिनय इत्यादी नाटयोपयोगी सर्व प्रकारांच्या जादूटोण्याशी कधी काळी असलेल्या संबंधाची स्मृती जागृत होती हे मत स्वीकारणे कठीण आहे. पूर्वरंगातील नृत्य व गीत ही रंगप्रसादनाची साधने किंवा नान्दीत केली जाणारी प्रार्थना यात जादूचा काही संबंध आहे हे पटण्यासारखे नाही. कामनापूर्तीसाठीं केली जाणारी प्रत्येक कृती मंत्रतंत्रात्मक स्वरूपाचीच होती असे समजण्याचे कारण दिसत

३६ J. Gonda, 'Zur Frage nach der Ursprung und Wesen des indischen Dramas', *Acta Orientalia,* Vol. 19, (Leiden, 1943), pp. 353–354.

३७ *Ibid.*, PP. 362, 384, 388, 393 etc.

नाही. अशोकाच्या पादप्रहारात कामनापूर्तीची अपेक्षा आहे हे खरे आहे. पण त्यात काही मंत्रतंत्रात्मक विधीचा अवशेष आहे असे मानणे कठीण आहे. ती एक कविकल्पना असण्याचाच संभव आहे. स्वप्नवासवदत्तेतील कन्दुकक्रीडेत तर कोणतीही कामनापूर्ती अभिप्रेत असलेली दिसत नाही. आणि संस्कृत नाटकांतील निसर्गवर्णनपर श्लोक मंत्रतंत्रात्मक विधींतून निष्पन्न झाले आहेत हे मत ग्राह्य मानणे तर अत्यंत कठीण आहे.

नाटयशास्त्रात म्हटले आहे की नाटयवेदाची निर्मिती झाल्यावर नाटयाचा पहिला प्रयोग इन्द्रध्वजाच्या समारोहाच्या प्रसंगी करण्यात आला. त्या वेळी भरताने प्रथम नान्दीची योजना केली आणि त्यानंतर देवांनी दैत्यांवर मिळविलेल्या विजयाचे दर्शन घडविणारी एक नाटयकृती प्रस्तुत केली. ह्या नान्दीचा पुढे पूर्वरङ्गात समावेश झाला आणि प्रत्येक नाटयप्रयोगाच्या पूर्वी पूर्वरङ्गाची योजना करणे आवश्यक झाले. नान्दीपठनाखेरीज पूर्वरंगातील मुख्य विधि म्हणजे इन्द्रध्वजाची उभारणी आणि नृत्य, गीत यांच्या साहाय्याने त्याची पूजा. हा विधी एक प्रकारे धार्मिक स्वरूपाचा आहे यात शंका नाही. पण मुळात तो सामान्य लोकांतच प्रचलित होता असे दिसते. इन्द्रध्वजपूजेची तुलना मे-पोल (*Mav-pole*) आणि त्याच्या अनुषंगाने होणाऱ्या नाचगाण्याशी केली गेली आहे,[३८] ती यथार्थ वाटते. तथापि, हा पूजाविधी नाट्यप्रयोगाच्या वेळी आवश्यक मानला गेला यावरून त्या विधीतून किंवा तसल्याच प्रकारच्या दुसऱ्या एखाद्या विधीतून संस्कृत नाटक उदयास आले असे समजण्याचे कारण नाही. कोणत्याही कार्याच्या प्रारंभी विघ्नांचे निवारण व्हावे या उद्देशाने मंगल व्हावे अशी प्रार्थना करण्याची प्रथा फार प्राचीन आहे. मंगलाच्या ह्या अभ्यर्थनेत धर्माचा—कदाचित जादूचाही—काही अंश आहे असे मान्य करता येईल. परंतु त्यावरून ज्या कार्यासाठी मंगलाची कामना केली जाते ते कार्यही मुळात धार्मिक स्वरूपाचेच होते असे समजणे युक्तिसंगत वाटत नाही.

## नाटकाची उत्पत्ती

ह्या सर्व विवेचनावरून असा निष्कर्ष काढता येईल की वैदिक युगाच्या उत्तरार्धात संवादयुक्त नाट्य कोणत्या तरी स्वरूपात विद्यमान होते. हे नाट्य धार्मिक स्वरूपाचेच होते असे निश्चितपणे म्हणता येण्यासारखे नाही. उत्तरकालीन ग्रंथांवरून असे दिसते की उत्सव, यात्रा आदींच्या निमित्ताने ठिकठिकाणी हिंडणाऱ्या नटसंघांच्या द्वारा अशा नाट्याचे प्रयोग प्रस्तुत केले जात असत. नाट्यप्रयोगाच्या प्रारंभी नृत्य आणि गान यांना प्राधान्य असलेला एक प्रकारचा पूजाविधी केला जात असे. परंतु ह्या पूजाविधीचा नंतर प्रस्तुत होणाऱ्या नाटयाशी काही संबंध नसे. हा पूजाविधी वैदिक कर्मकाण्डात अन्तर्भूत नसून तो सामान्य लोकातच प्रचलित होता. आणि त्या सामान्य लोकांच्या मनोरंजनासाठीच नंतरचे नाट्य

३८ Keith, *op. cit.*, p. 41.

प्रस्तुत केले जात असे. हे नाटय म्हणजे लोकनाटय असे समजण्यास हरकत नाही. आणि ह्या लोकनाटयातूनच विदग्ध संस्कृत नाटक उदयास आले. पाणिनि-पतञ्जलींच्या काळी काव्यनिर्मितीस प्रारम्भ झाला होता. तेव्हा लोकनाटयाच्या दर्शनाने स्फूर्ती पावून काही कवींनी नाटयाला विदग्ध वाङ्मयात स्थान दिले आणि त्यांनी केलेली वाङ्मयीन रचना हीच संस्कृत नाटकाची उत्पत्ती असे म्हणता येईल.

असे दिसते की हे लोकनाटय विविध प्रकारचे होते. त्यात देवदानवांच्या पुरातन कथांचे दर्शन होत असे, त्याचप्रमाणे सामान्य लोकांच्या जीवनाचेही काही अंशी दर्शन होत असे. देवदानवादींच्या कथांवर आधारलेले नाटय समवकार, ईहामृग, डिम यांच्यासारखे होते, तर सामान्य माणसांच्या जीवनावरील नाटय प्रहसन, भाण यांच्यासारखे होते असे म्हणता येईल. संस्कृतातील निरनिराळ्या रूपकप्रकारांची उत्पत्ती विविध स्वरूपाच्या लोक-नाटयातून झाली हे सहज समजण्यासारखे आहे. जर कृष्णभक्तिरूप किंवा दुसऱ्या एखाद्या धार्मिक विधीतून संस्कृत नाटकाची उत्पत्ती झाली असे मानले तर रूपकांचे हे भिन्न प्रकार कसेअस्तित्वात आले याची नीट उपपत्ती लागणार नाही. नाटयशास्त्राच्या आधारे असे म्हणता येईल की प्रारंभी लोकनाटय देवादिकांच्या कथा प्रस्तुत करीत असे. अमृतमंथन आणि त्रिपुर-दाह यांचे दर्शन घडविणारे नाटयप्रयोग प्रथम झाले असे तेथे म्हटले आहे.

देवादिविषयक आणि सामान्यजनविषयक अशा लोकनाटयाच्या दोन स्वरूपांव्यतिरिक्त प्रसिद्ध राजांच्या चरितावर आधारलेले असे नाट्य संस्कृत नाटकांत अत्यंत महत्त्वाचे ठरले आहे. किंबहुना नाटक हा जो प्रधान रूपकप्रकार तो याच स्वरूपाचा असणे आवश्यक मानले आहे. तसा प्रकार लोकनाट्यात होता की नाही हे निश्चितपणे सांगता येणार नाही. परंतु ज्यावेळेस संस्कृत नाटके लिहिण्यास प्रारंभ झाला त्यावेळी काव्यासाठी विषय निवडताना इतिहासाचा मोठ्या प्रमाणावर उपयोग होत होता असे दिसते. पतञ्जलीने निर्दिष्ट केलेल्या वासवदत्ता, सुमनोत्तरा, भैमरथी ह्या आख्यायिका इतिहासावर आधारित असण्याचा संभव आहे. आपण हल्ली समजतो त्या स्वरूपाचा इतिहास प्राचीन काळी लिहिला जात नसे हे खरे आहे. तथापि, अनेक ऐतिहासिक कथा मौखिक परंपरेने प्रसृत होत होत्या यात शंका नाही. त्यांपैकी बऱ्याचशा कथा महाभारतात समाविष्ट झाल्या आहेत. संस्कृत नाटकाच्या उत्पत्तीच्या वेळी प्रस्तुत स्वरूपात महाभारत विद्यमान नसले तरी त्यातील पुष्कळ कथा प्राचीन आहेत हे सर्वमान्य आहे. अशा कथांतून निवडलेल्या प्रसंगांना नाटकांत सर्वाधिक महत्त्व यावे हे अस्वाभाविक नाही.

## इतिहास आणि नाटक

लोकनाट्याप्रमाणेच इतिहास-पुराणांतील कथांचाही संस्कृत नाटकाच्या उत्पत्तीत भाग आहे. या कथांचे प्राचीन काळी लोकसमुदायाच्या उपस्थितीत पठन होत असे. दीर्घ सत्राच्या

प्रसंगी देवादिकांच्या गोष्टी कथन करण्याची प्रथा होती. त्याचप्रमाणे मंदिरांत पुराणांतील कथा लोकांना ऐकविण्याची प्रथाही बरीच जुनी आहे. तसेच सूत, मागध आदी राजांच्या चरिताचा प्राय: पद्यात्मक असलेला भाग लोकांसमोर म्हणून दाखवीत हे सुद्धा मान्य होण्यासारखे आहे. भरत वंशाचा इतिहास मूळ 'भारत' ग्रंथात ग्रथित झाला होता आणि त्याचाच विस्तार होऊन महाभारत बनले असे मानतात. महाभारताचे सुद्धा पठन होत असे या प्रकारचे निर्देश आहेत. तेव्हा असा विचार मांडला जाणे स्वाभाविक होते की संस्कृत नाटकात जे पाठ्य आहे त्याचा उगम ह्या इतिहासपुराणादींच्या पठनात आहे. लेव्हि यांनी असे मत प्रदर्शित केले होते की महाभारताचे पठन करणारी अशी एक भारत नावाची जमात होती आणि जेव्हा प्राचीन इतिहासापासून नाट्य स्वतंत्र रूपाने अस्तित्वात आले तेव्हा ते प्रस्तुत करणारे लोक सुद्धा त्याच भारत ह्या प्राचीन नावाने ओळखले जाऊ लागले.[३९] नाटकातील पाठ्याचा संबंध इतिहासाच्या पठनाशी प्रस्थापित करताना कीथ यांनी सुद्धा भारत हे नाव इतिहास पठन करणारांचे होते हे मत स्वीकारून त्याचाच अपभ्रंश होऊन 'भाट' हे नाव अस्तित्वात आले असल्याचे म्हटले आहे.[४०]

संस्कृत नाटक प्राचीन इतिहासादींचे ऋणी आहे यात शंका नाही. परंतु इतिहासाचे ऋण मुख्यत: त्यातून निवडलेल्या विषयांपुरतेच मर्यादित आहे असे म्हटले तर ते चूक होणार नाही. इतिहासपुराणांच्या पठनपद्धतीचा नाट्यातील पाठ्यावर परिणाम झाला असल्याचा फारसा संभव नाही. इतिहासाच्या पठनात एका मनुष्याने केलेल्या कथनाला प्राधान्य असते, तर नाटकातील पाठ्यात दोन किंवा अधिक पात्रांमधील संवादाला प्राधान्य असते. आणि जर लोकनाट्याचे प्राचीनत्व मान्य केले तर पाठ्यासाठी दुसऱ्या कशाचा उपयोग झाला असे समजण्याची आवश्यकता उरणार नाही. दुसरी गोष्ट अशी की इतिहासाचे पठन करणारांना भारत अशी संज्ञा असल्याचे कोठेही म्हटलेले नाही. तसेच नटांना भरत अशी संज्ञा आहे, भारत अशी नाही. तेव्हा इतिहासाचे पठन करणारे भारतच पुढे नाट्य करू लागले, म्हणून इतिहासापासून नाट्याची उत्पत्ती झाली हे मत स्वीकारता येण्यासारखे नाही. आणि भारत आणि भाट या दोन शब्दांत काही संबंध आहे असे मुळीच दिसत नाही.

## हरिवंश

महाभारतात नटांचा निर्देश आहे, नाटकांचा नाही. परंतु हरिवंशात नाटकांचा प्रयोग करणाऱ्यांचा स्पष्ट निर्देश आहे. एका उत्सवाच्या प्रसंगी अप्सरांनी नृत्यगीतादिद्वारा यादवांचे मनोरंजन केले. त्यानंतर वेषभूषा केलेल्या प्रद्युम्न, सांब आदी यादवांना बरोबर घेऊन भद्र नावाचा नट वज्रनाभ दैत्याच्या निवासस्थानी गेला व त्याने रामायणाची कथा व

३९ S. Levi, *Le théatre indien*, p. 312.

४० A. B. Keith, *The Sanskrit Drama*, p. 30.

ऋष्यशृङ्ग-शान्ताची कथा यांवर आधारलेल्या नाटकाचे प्रयोग करून दाखविले. त्यात प्रद्युम्नाने नायकाची, सांबाने विदूषकाची, गदाने पारिपार्श्वकाची याप्रमाणे भूमिका केल्या. नंतर यादवांनी इतरही कथांवर आधारलेल्या नाटकांचे प्रयोग केले असल्याचे म्हटले आहे.[४१]

## बौद्ध नाटक

बौद्ध वाङ्मयात नाटकांचे निर्देश अनेक ठिकाणी आढळतात. अवदानशतकातील ७५ व्या कथेत असे सांगितले आहे की शोभावती नगरीच्या राजाच्या आज्ञेवरून दक्षिण देशातून आलेल्या नटाचार्य आणि त्याचा नटसंघ यांनी ककुच्छन्द बुद्धाच्या चरितावर आधारलेले एक 'बौद्ध नाटक' प्रस्तुत केले.[४२] अवदानशतकाचा चिनी भाषेत अनुवाद इसवी सनाच्या तिसऱ्या शतकात झाला होता. तेव्हा ह्या ग्रंथाची रचना एकदोन शतके तरी अगोदर झाली असणार हे उघड आहे.[४३] यावरून असे अनुमान निघते की इसवी सनाच्या प्रारंभाच्या सुमारास बौद्ध नाटकांचे प्रयोग होऊ लागले होते. त्याचप्रमाणे कंजूर नावाच्या तिबेटी ग्रंथात बोधिप्राप्तीपर्यन्तच्या गौतम बुद्धाच्या चरित्राचे दर्शन घडविणाऱ्या एका बौद्ध नाटकाच्या प्रयोगाचा निर्देश आहे. राजा बिम्बिसाराच्या समोर दक्षिणदेशीय सूत्रधार व नट यांनी तो प्रयोग केला होता असे तेथे म्हटले आहे.[४४] कालनिर्णयाच्या दृष्टीने ह्या निर्देशाला महत्त्व नाही. परंतु काही वर्षांपूर्वी मध्य आशियातील तुर्फान प्रदेशात एका विहारामध्ये काही बौद्ध नाटकांचे थोडे त्रुटित अंश हाती आले त्यांचे या दृष्टीने फार महत्त्व आहे. त्यांतील काही अंश प्रसिद्ध बौद्ध कवी अश्वघोष याच्या शारिपुत्र नावाच्या नऊ अंकी प्रकरणातील आहेत. इतर त्रुटित अंशही त्याच्याच दुसऱ्या नाटकांतील असण्याचा संभव आहे.[४५] अश्वघोष कुशानवंशीय सम्राट कनिष्काच्या समकालीन होता आणि कनिष्काचा काल इसवी सनाच्या पहिल्या शताब्दीचा उत्तरार्ध असे सामान्यपणे स्वीकृत झाले आहे. म्हणजे मध्य आशियात उपलब्ध झालेली ही नाटके इसवी सनाच्या पहिल्या किंवा दुसऱ्या शतकात लिहिली गेली होती हे मान्य करणे आवश्यक ठरते. ह्या अंशांच्या परिशीलनावरून ही गोष्ट स्पष्टपणे प्रतीत होते की ही नाटके लिहिली गेली त्यावेळेस संस्कृत नाट्य आपल्या सर्व वैशिष्ट्यांसह परिपूर्ण स्वरूपात अस्तित्वात आले होते. नाटक व प्रकरण यांत विषय आणि पात्रे यांच्या योजनेच्या बाबतीतील भिन्नता, संकृत आणि निरनिराळ्या प्राकृत भाषा यांचा पात्रानुसार

४१ हरिवंश, २.८८; २.८९; २.९१.

४२ अवदानशतक, ed. by J. S. Speyer, Vol. II (St. Petersbourg, 1906), pp. 29–30.

४३ *Ibid.*, Vol. I, Intro., p. V.

४४ Konow, *Das indische Drama*, p. 51.

४५ H. Lüders, *Bruchstücke buddhistischer Dramen* (Berlin, 1911).

मिश्र उपयोग, गद्य आणि पद्य यांचे मिश्रण, विदूषकाची योजना इत्यादी संकृत नाटकाची सर्व वैशिष्टये ह्या त्रुटित अंशांतही प्रत्ययास येतात. आता हे उघड आहे की संस्कृत नाटकाच्या उत्पत्तीचा अथवा प्रथमनिर्मितीचा मान बौद्धधर्मीयांना देता येण्यासारखा नाही. कारण प्राचीन बौद्ध वाङ्मयात पेक्खा (प्रेक्षा), नच्च (नृत्य) वगैरे पहाणे अथवा समज्जात (समाजात) जाणे भिक्षूंना निषिद्ध मानले आहे. महायान पंथाच्या उदयानंतरच बौद्ध कवी संस्कृतात साहित्य निर्माण करू लागले. ही साहित्यनिर्मिती इतरांनी अगोदरच प्रसृत केलेल्या विविध साहित्य-प्रकारांच्या अनुकरणाच्या स्वरूपाची होती असे समजणेच उचित होईल. बौद्ध कवींनी काव्यनाटकादी साहित्यप्रकारांचा उपयोग आपल्या धार्मिक विचारांच्या प्रचारासाठी केला. त्यांना त्या प्रकारांचे जनक मानणे योग्य होणार नाही. तेव्हा अश्वघोषाच्या बरीच वर्षे अगोदर म्हणजे इसवी सनाच्या प्रारंभाच्या पूर्वी संस्कृत नाटच आपल्या सर्व वैशिष्टयांसह अवतीर्ण झाले होते याविषयी शंका राहात नाही. पतञ्जलीच्या काळी ते अस्तित्वात होते असे मानले तर इसवीसनपूर्व दुसरे शतक हा संस्कृत नाटकाच्या उदयाचा काल असे समजण्यास काही हरकत दिसत नाही. पाणिनीच्या वेळेस नाटच होते, पण ते सध्याच्या स्वरूपात होते असे निश्चितपणे म्हणता येत नाही.

## प्राकृत नाटक

लेव्हि यांनी असे एक मत प्रदर्शित केले आहे की प्रथम नाटके संपूर्णपणे प्राकृत भाषांतच लिहिली जात होती, तसेच भासकालिदासादींच्या पूर्वी संपूर्ण प्राकृत नाटके विद्यमान होती. याचे कारण नाटक अगोदर सामान्य लोकांतच प्रचलित होते म्हणून त्यात विदग्ध लोकांची भाषा जी संस्कृत तिचा उपयोग केला जाणे असंभाव्य होते.[४६] या मताचा ह्या स्वरूपात स्वीकार करणे शक्य नाही. सामान्य लोकांत प्रचलित असलेल्या लोकनाटयाचे प्राचीनत्व मान्य करणे आवश्यक असल्याचे वर निर्दिष्ट केलेच आहे. ह्या लोकनाटयात प्रायः प्राकृतांचाच उपयोग होत असणार हेही मान्य होण्यासारखे आहे. परंतु ते लोकनाटच साहित्याच्या रूपात लेखनिविष्ट होत असे याला काही प्रमाण नाही. काही संस्कृत ग्रंथ मूळ प्राकृत भाषेत होते व पुढे त्यांचे संस्कृतीकरण झाले किंवा प्राकृत वाङ्मयाची निर्मिती अगोदर झाली आणि त्याच्या अनुकरणाने संस्कृत वाङ्मय निर्माण होऊ लागले यासारख्या मतांना काहीही आधार नाही. पाणिनीच्या वेळेस विदग्ध संस्कृत भाषेत ग्रंथरचना होत होती याचा निर्देश वर केला आहे. त्याच्याही अगोदर प्राकृतात ग्रंथरचना होत होती असे समजणे अशक्य आहे. वस्तुतः प्राकृत भाषा म्हणजे संस्कृताचीच अपभ्रष्ट रूपे होत. त्या दोहोंत फरक इतकाच की विदग्ध, सुसंस्कृत मनुष्यांच्या बोलण्यात शुद्ध, संस्कृत रूप येत असे, तर अशिक्षित लोकांच्या बोलण्यात त्याच भाषेची अपभ्रष्ट रूपे प्रचलित असत. बहुतेक भाषांच्या

४६ S. Levi, *Le theatre indien*, pp. 329 ff.

बाबतीत असाच प्रकार असल्याचे दिसून येते. आज सुशिक्षित लोकांच्या बोलण्यातील मराठी भाषा आणि अशिक्षित लोकांच्या बोलण्यातील गावंढळ मराठी यात जेवढा फरक आहे तेवढाच फरक संस्कृत आणि प्राकृत यांच्यात आहे, त्याहून अधिक नाही. तेव्हा गावंढळ मराठीत ग्रंथरचनेस प्रथम प्रारम्भ झाला आणि नंतर शुद्ध मराठीत असे समजणे जितके अयोग्य होईल तितकेच संस्कृत-प्राकृत ग्रंथरचनेविषयीचे उपरि-निर्दिष्ट मत आहे. लेव्हि यांनी यासंबंधात असाही मुद्दा मांडला आहे की नाट्यशास्त्रात अनेक पारिभाषिक शब्द आहेत त्यांपैकी पुष्कळसे संस्कृतोद्भव नसून देशी आहेत, त्यावरून हे शास्त्र संस्कृतशी संबंध नसलेल्या लोकांत उत्पन्न झाले असा निष्कर्ष निघतो. नाट्यशास्त्रातील काही पारिभाषिक शब्दांची समाधानकारक संस्कृत व्युत्पत्ती देणे शक्य नाही हे खरे आहे. परंतु त्यांचे प्रमाण लेव्हि समजतात तितके जास्त नाही. आणि वर निर्दिष्ट केले आहे त्याप्रमाणे नाट्य प्रथम सामान्य लोकांतच प्रचलित होते आणि हे लोक बहुतांशी आर्येतर वंशांतील होते. तेव्हा शिष्ट समाजात नाट्याचा प्रसार होताना काही संस्कृताहून भिन्न शब्द स्वीकृत होणे स्वाभाविक मानता येईल. परंतु ह्या शास्त्राची निर्मिती संस्कृतज्ञ लोकांनीच केली यात शंका नाही. पाणिनीने निर्दिष्ट केलेली नटसूत्रे संस्कृतमध्येच लिहिलेली असणार. तेव्हा संस्कृत जाणणारे लोकच ह्या शास्त्राचे अध्ययन करीत असणार हे उघड आहे.

## शकांचा संबंध

यासंबंधात लेव्हि यांनी असेही म्हटले आहे की संपूर्णपणे प्राकृतातच नाटके लिहिण्याची प्रथा बंद होऊन संस्कृत नाटके लिहिण्याला प्रारम्भ शक राजांच्या अमदानीत झाला. शक लोकांचे राज्य भारतात सुरू झाल्यावर संस्कृत भाषेचे पुनरुज्जीवन होऊ लागले होते. त्याच्या पूर्वी सातवाहनादींच्या राजवटीत प्राकृताचाच प्रचार जोरात होता. परंतु शकांनी संस्कृतलाच आश्रय दिला हे शक क्षत्रप रुद्रदामन् याच्या शिलालेखावरून स्पष्ट आहे. दुसरे असे की नाट्यशास्त्रात राजाला स्वामी आणि राजपुत्राला भर्तृदारक या संज्ञा आहेत. त्यांचे मूळ शक लोकांत प्रचलित असलेल्या संज्ञांत आहे. शकांची राजधानी उज्जयिनी होती आणि संस्कृत नाटकांत ज्या शौरसेनी, मागधी आणि माहाराष्ट्री भाषांचा उपयोग होतो त्यांचे संधिस्थान अथवा मिलनस्थान उज्जयिनी येथेच होते. तेव्हा संस्कृत नाटके लिहिण्यास प्रारंभ इसवी सनाच्या पहिल्या शतकात उज्जयिनीच्या शकांच्या काळी त्यांच्याच आश्रयाने झाला असा लेव्हि यांचा सिद्धांत आहे.[४७]

लेव्हींच्या या सिद्धान्तात कोनौ यांनी एक दुरुस्ती आवश्यक मानली आहे. ज्या शकांच्या कारकीर्दीत संस्कृत नाटकाची उत्पत्ती झाली ते उज्जयिनीचे शक नसून मथुरा येथे

४७ 'Some Terms from Kṣatrapa Inscriptions' (लेव्हि यांच्या लेखाचा बर्जेसकृत इंग्रजी अनुवाद), *Indian Antiquary*, Vol. 33, pp. 163-174.

राज्य करणारे शक होत असे त्यांचे म्हणणे आहे. याचे कारण असे की प्रारम्भीच्या संस्कृत नाटकांत माहाराष्ट्री प्राकृताचा उपयोग केलेला आढळत नाही आणि मुख्यत्वेकरून शौरसेनी प्राकृताचाच उपयोग केला असून ती मथुरा राज्याची बोली होती. मथुरेत शकांचे राज्य इसवी सनाचा प्रारम्भ व पहिली शताब्दी यावेळी होते. तेव्हा कोनौ यांच्या मतानुसार संस्कृत नाटके लिहिण्यास प्रारंभ मथुरेच्या राज्यात इसवी सनाच्या पहिल्या शतकात झाला हे अधिक संभवनीय आहे. लेव्हींच्या इतर युक्तीवादाला पुष्टी देण्यासाठी त्यांनी असे प्रतिपादन केले आहे की स्वामी ही संज्ञा संस्कृतात अन्यत्र कोठे राजाला लावलेली नाही आणि हा 'स्वामी' शब्द शकांच्या अधिपतिवाचक 'मुरुण्ड' शब्दाचा केवळ संस्कृत अनुवाद आहे. भरताच्या नाटचशास्त्रात स्वामी शब्द निश्चितपणे आढळत नाही, कारण तद्विषयक श्लोक भ्रष्ट आहेत, तथापि दशरूपादी उत्तरकालीन ग्रंथांत जो या शब्दाचा निर्देश आहे तो भरताच्या नाटचशास्त्रावरूनच उद्धृत केलेला असणार असे त्यांचे मत आहे.[४८]

कोनौ यांच्या प्रतिपादनातील एक गोष्ट मान्य होण्यासारखी आहे. संस्कृत नाटकाची उत्पत्ती उज्जयिनीपेक्षा शूरसेन देशात झाली असण्याचा अधिक संभव आहे. उज्जयिनींत माहाराष्ट्री, मागधी व शौरसेनी यांच्या सीमा एकमेकींना भिडल्या होत्या असे समजणे मुळीच शक्य नाही. मागधी फार पूर्वेकडे होती आणि माहाराष्ट्री फार दक्षिणेस. परंतु ह्या दोन्ही पंडितांनी संस्कृत नाटकाच्या उत्पत्तीचा शकांशी जो संबंध प्रस्थापित केला आहे तो पटण्यासारखा नाही. अशोक आणि सातवाहन राजे यांच्या वेळेस प्राकृत भाषांना राजाश्रय मिळाला होता हे खरे आहे. परंतु त्यावरून सर्व ग्रंथरचना त्या वेळी केवळ प्राकृतातच होत असे, संस्कृतात मुळीच नाही असा निष्कर्ष काढणे बरोबर नाही. पाणिनीच्या वेळेपासून पतञ्जलीच्या वेळेपर्यंत संस्कृतमध्ये आख्यान-आख्यायिकादींची रचना होत असे यात मुळीच संशय नाही. प्राकृत भाषेला राजाश्रय मिळाल्याचा परिणाम फार तर एवढाच झाला असेल की त्या भाषेत लेखन करण्यास प्रोत्साहन मिळाले असेल. परंतु त्यामुळे संस्कृतमधील लेखनात खंड पडला असेल असे समजण्याचे कारण नाही. राजाश्रयाशिवाय लेखन होतच नसे असे मानण्यास काही आधार नाही.

शकांच्या राजवटीच्या पूर्वी राजाला स्वामी असे म्हणत नसत हेही खरे नाही. राजनीतिशास्त्रात राज्याच्या सात प्रकृतींविषयीचा एक प्रसिद्ध सिद्धान्त आहे. त्यात पहिली आणि सर्वांत महत्त्वाची प्रकृती राजा मानली आहे आणि त्या प्रकृतीला स्वामी अशीच संज्ञा आहे. कौटिलीय अर्थशास्त्रात याविषयीच्या अनेक प्राचीन आचार्यांच्या मतांचा निर्देश केला आहे. त्यांत सर्वत्र राजाचा निर्देशक म्हणून स्वामी हाच शब्द वापरला आहे. मनुस्मृतिप्रभृती धर्मशास्त्रग्रंथांत सुद्धा पहिल्या प्रकृतीचा स्वामी असाच निर्देश केला आहे. सप्तप्रकृतिविषयक हा

४८ Konow, *op. cit.*, pp. 48–49.

सिद्धान्त शकांची राजवट सुरू झाल्यानंतर प्रस्थापित झाला असे मुळीच समजता येण्यासारखे नाही. शिवाय, शकांच्या एखाद्याच शब्दाचा संस्कृतमध्ये अनुवाद करण्याची आवश्यकता का उत्पन्न झाली याची कल्पना करता येत नाही. आणि मुख्य गोष्ट अशी की नाटयशास्त्रात (१७.७६) स्वामी असे युवराजास संबोधावयास सांगितले आहे, राजास नाही. तेव्हा शकांच्या वेळेस व त्यांच्या प्रोत्साहनाने संस्कृत नाटक उदयास आले हे मत ग्राह्य मानता येत नाही.

## ग्रीक नाट्याचा प्रभाव

संस्कृत नाटकाच्या उदयाच्या वेळेस भारताचा ग्रीस देशाशी संबंध आला होता. इसवीसनपूर्व चौथ्या शतकात अलेक्झांडर पंजाबपर्यंत दिग्विजय प्राप्त करीत आला होता हे प्रसिद्ध आहे. त्याच्याही पूर्वी ग्रीसवर आक्रमण करून जाणाऱ्या पर्शियन सम्राट झर्सिसच्या सैन्यात भारतीय योद्धे असल्याचे म्हटले आहे. विशेष म्हणजे इसवीसनपूर्व दुसऱ्या शतकात बॅक्ट्रियन ग्रीकांनी पंजाबात आपले राज्य प्रस्थापित केले होते आणि ते बरीच वर्षे टिकले. ग्रीसमध्ये ट्रॅजेडी आणि कॉमेडी ह्या दोन्ही नाट्यप्रकारांचा विकास अलेक्झांडरच्या पूर्वीच झाला होता. तेव्हा हे स्वाभाविक होते की काही पंडितांना संस्कृत नाटकाच्या उत्पत्तीवर ग्रीक नाट्याचा प्रभाव पडलेला दिसावा. असा संभव प्रथम वेबर यांनी निर्दिष्ट केला होता. त्यांच्या त्या मताचे विस्तृत समर्थन विंडिश यांनी आन्तरराष्ट्रीय प्राच्यविद्यापरिषदेच्या पाचव्या अधिवेशनात वाचलेल्या एका प्रबंधात केले होते.[४९] या प्रबन्धातील विवेचन जरी अपुऱ्या माहितीवर आधारलेले होते आणि जरी ते सर्वमान्य झालेले नाही तरी त्याचा विचार करणे उपयुक्त होईल.

प्रथम ही गोष्ट स्पष्ट केली पाहिजे की भारतात नाट्याचे प्रयोग फार प्राचीन काळापासून होत असत आणि ते परकी नाटयापासून स्फूर्ती घेऊन अस्तित्वात आले नव्हते हे विंडिश यांना मान्य आहे. त्यांच्या मते ह्या प्राचीन नाटयाची उत्पत्ती अभिनयाचा महाभारत आदीच्या पठनाशी संयोग होऊन झाली, नृत्य-गीत यांच्याशी संयोग होऊन नाही. नट्, नट, नाटक हे सर्व शब्द प्राकृत आहेत, यावरून नाटयाची उत्पत्ती सामान्य लोकांसाठी झाली होती व ती एक लोककला होती हे स्पष्ट होते. नाटयाला त्यावेळी वाङ्मयीन स्वरूप प्राप्त झालेले नव्हते. परंतु नंतर ग्रीक नाटयापासून स्फूर्ती घेऊन संस्कृत नाटकाच्या रूपाने नाटय वाङ्मयीन स्वरूपात अवतीर्ण झाले. ही संभाव्यता प्रस्थापित करण्यासाठी विंडिश यांनी अनेक प्रमाणे सादर केली आहेत.

४९ E. Windisch, 'Der Griechische Einfluss im indischen Drama', *Abhandlungen und Vorträge des Fünften Internationalen Orientalisten–Congresses,* zweite Hälfte (Berlin, 1882), pp. 3-106.

इसवीसनपूर्व चौथ्या शतकापासून पुढे भारतीयांचा ग्रीक नाटयाशी परिचय होणे संभाव्य होते. अलेक्झांडर पंजाबमध्ये काही महिने होता आणि त्याच्या बरोबर ग्रीक शास्त्रज्ञ व पंडित यांखेरीज कलाकार सुद्धा होते. प्लूटार्कने सांगितले आहे की पर्शिया, सूसा आणि गेड्रोसिया येथील युवक अलेक्झांडरसमोर युरिपिडीज आणि सोफोक्लीज यांच्या ट्रॅजेडी गाऊन दाखवीत. परंतु विंडिश यांना हे मान्य आहे की भारतीय नाटयाचे या ट्रॅजेडींशी साम्य अत्यन्त अल्प आहे. त्यांच्या मते संस्कृत नाटयाचे न्यू अटिक कॉमेडीशी खूपच साम्य आहे. तेव्हा ह्याच कॉमेडीच्या प्रभावाने संस्कृत नाटकाच्या निर्मितीस प्रारंभ झाला असावा. ह्या कॉमेडीचे सुवर्णयुग इसवीसनपूर्व ३४० ते २६० हा कालखंड होता. बॅक्ट्रियन ग्रीकांनी इसवीसनपूर्व दुसऱ्या शतकात पंजाबात आपले राज्य प्रस्थापित केले होते. त्या राजांच्या आश्रयाने ह्या ग्रीक कॉमेडीचे प्रयोग भारतात होत असावेत आणि ते भारतीयांच्या अवलोकनात येत असण्याचा संभव आहे. याप्रमाणे ह्या ग्रीक नाटयाच्या प्रभावाने संस्कृत नाटकाची उत्पत्ती झाली असावी असे विंडिश यांनी प्रतिपादन केले आहे.

ग्रीक कॉमेडी आणि संस्कृत नाटक यांमध्ये विंडिश यांनी जी तुलना केली आहे तिच्यासंबंधी एकदोन गोष्टी लक्षात ठेवणे आवश्यक आहे. त्यांनी ज्यावेळेस आपला प्रबंध लिहिला त्या वेळी न्यू ॲटिक कॉमेडीचे काही त्रुटित अंशच उपलब्ध होते, एकही संपूर्ण कॉमेडी तोपर्यंत उजेडात आली नव्हती. म्हणून त्या ग्रीक कॉमेडीच्या अनुकरणाने लॅटिन भाषेत टेरेन्स, प्लॉटस आदी नाटककारांनी ज्या कॉमेडी लिहिल्या त्यांच्याच आधारे विंडिश यांनी विवेचन केले आहे. दुसरी गोष्ट अशी की त्यांची अशी धारणा होती की मृच्छकटिक हे संस्कृत नाटकाच्या प्रारंभावस्थेचे निदर्शक आहे. ह्या दोन्ही गोष्टी त्यांच्या विवेचनाचा पाया कच्चा करणाऱ्या अशा आहेत. तथापि, त्यांनी प्रस्तुत केलेल्या मुद्यांची उपेक्षा करता येण्यासारखी नाही.

ग्रीक कॉमेडी आणि संस्कृत नाटक यांमध्ये मुख्यत्वेकरून पुढीलप्रमाणे साम्य असल्याचे विंडिश यांनी म्हटले आहे : (१) ग्रीक नाट्यातील प्रोलॉग (*prologue*) आणि संस्कृत नाटकांतील प्रस्तावना. (२) कथानकाची अंकांत विभागणी. तथापि, विंडिश यांना हे मान्य आहे की ग्रीक नाट्यात अंक नव्हते. ग्रीक भाषेत अंकाचा निदर्शक शब्द नाही. तेव्हा हे साम्य यादृच्छिक असण्याचा संभव ते मान्य करतात. (३) प्रकाश, स्वगत, अपवारित इत्यादी रंगभूमीवरील भाषणप्रकारांविषयीचे संकेत. (४) कोणाची ओळख पटण्यासाठी अभिज्ञान-चिन्हांचा उपयोग, शाकुन्तलातील आंगठी, विक्रमोर्वशीयातील कुमार आयूचा बाण, रत्नावलीतील रत्नमाला इत्यादी. (५) मृच्छकटिकाच्या कथानकाचे कॉमेडीच्या सर्वसाधारण कथानकाशी असलेले साम्य. त्यातील विट म्हणजे रोमन कॉमेडीतील *parasitus edax*, शकार म्हणजे *miles gloriosus* आणि विदूषक म्हणजे *servus currens*. (६) नाट्यशास्त्रानुसार नटसंघात सूत्रधार, पारिपार्श्वक, विदूषक, विट आणि शकार असे पाच

पुरुष नट असत. त्याचप्रमाणे ग्रीक कॉमेडी करणाऱ्या नाटकमंडळीतही पाच पुरुष नटच असत.

ह्या साम्यस्थलांपैकी काही अपुऱ्या माहितीवर आधारलेली आहेत, काही चुकीच्या समजुतीवर आधारलेली आहेत, तर बाकीची निर्णायक स्वरूपाची नाहीत. काही वर्षांपूर्वी मिनान्दर ह्या न्यू ॲटिक कॉमेडीच्या प्रधान प्रवर्तकाने लिहिलेल्या तीन कॉमेडींचे बहुतांश भाग उपलब्ध झाले. त्यावरून असे दिसते की अंकांत विभागणी न्यू कॉमेडीत नव्हती. ट्रॅजेडी किंवा ओल्ड कॉमेडीप्रमाणेच कोरसच्या साहाय्याने कथानकाचे विभाजन दर्शविले जात असे. अंकांत विभागणी रोमन कॉमेडीतच आढळते. त्याचप्रमाणे मिनांदरच्या तिन्ही कॉमेडींतील पात्रे अथेन्समधील स्त्री-पुरुष नागरिक, दास, दासी, कृषक, गणिका अशा प्रकारची भिन्न स्वरूपाची आहेत. त्यांचे संस्कृत नाटकांतील पात्रांशी विशिष्ट असे साम्य नाही. मृच्छकटिकातील विटशकारादींशी साम्य असणारी पात्रे त्यात नाहीत. आणि मृच्छ-कटिक हे संस्कृतातील प्रारंभीचे नाटक नसल्यामुळे त्याच्या आधारावर केलेला युक्तिवाद साहजिकच अग्राह्य ठरतो. तीच गोष्ट रोमन कॉमेडीच्या आधारे केलेल्या युक्तिवादाची.

मिनांदरच्या कॉमेडींवरून हे स्पष्ट होते की अभिज्ञानचिन्हाच्या द्वारा एखाद्या व्यक्तीची ओळख पटणे ही न्यू कॉमेडीच्या कथानकातील प्राणभूत घटना होती. प्राचीन अथेन्समध्ये नागरिकाला नको असलेले नवजात अर्भक टाकून दिले जात असे, पण तसे करताना रक्षाकरण्डक किंवा त्यासारखी वस्तू अर्भकाच्या शरीराशी संबद्ध ठेवली जात असे. ह्याच अभिज्ञानचिन्हाच्या साहाय्याने मोठेपणी त्या बालकाची ओळख पटते. संस्कृत नाटकांत अभि-ज्ञानचिन्हाचा असा उपयोग केलेला दिसत नाही. शिवाय, ज्या नाटकांत अभिज्ञानचिन्हाचा उपयोग केला आहे ती संस्कृत नाट्याच्या प्रारंभीची असे म्हणता येण्यासारखे नाही.

ग्रीक नाट्यात प्रोलॉग असे, पण त्याचे स्वरूप संस्कृत नाटकांतील प्रस्तावनेहून बहुतांशी भिन्न होते. त्यात प्राय: कवी आपल्या नाटकाबद्दल किंवा त्यातील कथानकाबद्दल निवेदन करीत असे. त्यावरून प्रस्तावनेची कल्पना सुचली असे समजणे आवश्यक दिसत नाही. रंगभूमीवरील विविध प्रकारच्या भाषणांच्या संकेताबद्दल असे म्हणता येईल की हे साम्य निर्णायक स्वरूपाचे नाही. स्वगत, अपवारित हे प्रकार प्रत्यक्ष जीवनात कधी कधी आढळून येणाऱ्या गोष्टींचे नाटयरूप आविष्कार होत. तेव्हा हे संकेत दोन्ही देशांत स्वतंत्रपणे उद्भूत झाले असल्याची शक्यता नाकारता येणार नाही. नाटयशास्त्रातील नटसंघात विंडिश यांनी निर्देशिलेल्या पाच पुरुष नटांव्यतिरिक्त इतर पुरुष नट असत आणि शिवाय नटीही असे.

### यवनिका

पडद्याला नाटयशास्त्रात यवनिका असा शब्द आहे. ग्रीकांसाठी प्राचीन काळी वापरण्यात येणाऱ्या यवन शब्दाशी त्या शब्दाचा संबंध जोडला जाणे स्वाभाविक होते.

विंडिश यांनी ग्रीक रंगभूमीवरील *skené* अथवा भिंतीच्या अनुकरणाचा निदर्शक असा हा शब्द असल्याचे म्हटले आहे. ग्रीसमध्ये नट जेथे अभिनय करीत ती जागा आणि तिच्या पाठीमागची जागा यांमध्ये स्केने अभिधान असलेली व एक दरवाजा असलेली भिंत असे. त्या दरवाजातून पात्रे पाठीमागच्या *postscenium* मधून पुढील *proscenium* मध्ये म्हणजे रंगभूमीवर प्रवेशनिष्क्रमणादी करीत. पाठीमागचा भाग नेपथ्यगृहासारखा हे उघड आहे. तेव्हा स्केनेशी जर कशाचे सादृश्य असेल तर नेपथ्यगृह आणि रंगभूमी यांच्यामधील दोन दरवाजे असलेल्या भिंतीचे, रंगशीर्ष आणि रंगपीठ यांच्या मध्ये असलेल्या यवनिकेचे नाही. वस्तुतः ग्रीक रंगभूमीवर पडदा ही वस्तूच नव्हती. तेव्हा त्याच्या अनुकरणाने म्हणून संस्कृतात यवनिका शब्द आला असण्याचा संभव नाही. आणि कोनौ यांनी म्हटल्याप्रमाणे जर खरोखरीच ग्रीक नाटयाचा प्रभाव पडून संस्कृत नाटकाची उत्पत्ती झाली असती तर त्या गोष्टीची निदर्शक खूण ग्रीक रंगभूमीवर नसलेल्या पडद्याच्या रूपात न दाखविता नाटयाच्या एखाद्या महत्त्वाच्या भागाशी यवन शब्दाचा संबंध जोडून प्रदर्शित करणेच उचित झाले असते.

ही अडचण लक्षात घेऊन लेव्हि यांनी असे सुचविले आहे की यवनिकेमधील यवन शब्द ग्रीक लोकांचा वाचक न समजता त्याने पर्शियन लोकांचा बोध होतो असे समजावे आणि यवनिका म्हणजे पर्शियातून आणलेला चित्राकृतियुक्त पट (*persian tapestry*) असा अर्थ करावा.[५०] परंतु हा अर्थही पटण्यासारखा नाही. ग्रीक आणि पर्शियन या दोघांनाही यवन शब्द लावीत हे मान्य केले तरी रंगभूमीवरील पडद्यासाठी पर्शियन टॅपेस्ट्री आयात केली जात असे ही गोष्ट संभवनीय वाटत नाही. या संबंधात शक्यता अशी दिसते की ह्या शब्दाचे मूळ रूप यवनिका नसून जवनिका असे होते आणि त्यात कोणत्याही लोकांचा निर्देश अभिप्रेत नाही. जवनिका शब्द पडदा ह्या अर्थी संस्कृत वाङ्मयात अन्यत्रही आढळतो. तो शब्द जू म्हणजे जोराने जाणे, वेगाने सरकणे ह्या धातूपासून निष्पन्न झाला असून मुळात तो 'पटी'चे विशेषण असावा. जवनिका पटी म्हणजे वेगाने इकडून तिकडे सरकणारा कपडा. नाट्यशास्त्रात एके ठिकाणी 'पटे चैवापकर्षिते (१२.३)' असे पडदा सरकविण्याच्या क्रियेचे निदर्शक वचन आहे, त्यावरून ह्या सूचनेला पुष्टी मिळते.

## सीताबेंगा व जोगिमारा गुहा

ग्रीक नाट्याच्या संस्कृत नाट्यावरील प्रभावाचे आणखी एक प्रमाण प्रस्तुत केले जाते. नाट्यशास्त्रात ज्या नाट्यमंडपांचे वर्णन आहे त्यांपैकी कोणत्याही प्रकाराचे ग्रीसमधील अर्धगोलाकृति प्रेक्षागृहाशी (*amphitheatre*) काहीही साम्य नाही. तथापि, काही पंडितांच्या मते ग्रीक अँफिथिएटरसारखे एक नाट्यगृह भारतात विद्यमान आहे. छोटानागपूर-

५० S. Levi, *op. cit.*, p. 348.

मधील रामगढ जिल्ह्याच्या सराइकेला शहरापासून काही मैल अंतरावर असलेल्या एका पहाडावर सीताबेंगा आणि जोगिमारा नावाच्या दोन गुहा आहेत. त्यांपैकी सीताबेंगा गुहेच्या बाहेर अर्धगोलाकृती रचना आहे. यावरून ही गुहा ग्रीक अँफिथिएटरच्या अनुकरणाने नाट्यप्रयोगांसाठी तयार करण्यात आली असे या गुहांचे वर्णन करताना ब्लोश यांनी प्रतिपादन केले आहे.[५१] या मताच्या समर्थनार्थ त्यांनी या दोन गुहांतील शिलालेखांचा निर्देश केला आहे. त्यांपैकी सीताबेंगा गुहेत प्राकृत भाषेत पुढील पंक्ती आहेत –

**'अदिपयंति हृदयं सभावगरु कवयो एरातयं ...**
**दुले वसंतिया हासावानुभूते कुदस्फतं एवं अलंग (त)'**

या पंक्तींचे सार पुढीलप्रमाणे सांगता येईल – 'स्वभावतः श्रेष्ठ असलेले कवी लोकांचे हृदय उद्दीपित करतात... वसंतऋतूतील दोलोत्सवात शुभ्र कुन्दमाला परिधान करून लोक हास्य अनुभवतात.' जोगिमारा गुहेतील लेख पुढील प्रकारचा आहे –

**'शुतनुक नम**
**देवदशिक्यि**
**शुतनुक नम देवदशिक्यि**
**तं कमयिथ बलनशेये**
**देवदिन्ने नम लूपदखे'**

(यात पहिल्या तीन शब्दांची पुनरुक्ती झाली आहे). या लेखाचा अर्थ असा – 'वाराणसीचा निवासी देवदत्त नावाचा रूपद्रष्टा सुतनुका नावाच्या देवदासीवर प्रेम करतो.' ह्या लेखांच्या आधारे असे अनुमान करण्यात आले आहे की ह्या गुहांचा उपयोग नाट्यप्रयोगासाठी, कमीतकमी काव्यपठनासाठी होत होता. प्राचीन भारतात गुहांचा उपयोग मौज करण्यासाठी आणि मनोरंजनाचे कार्यक्रम करण्यासाठी सुद्धा केला जात असे असे ल्यूडर्स यांनी प्रतिपादन केले आहे.[५२] कुमारसंभवातील हिमालयाच्या वर्णनात दरीगृहात वनेचर सुरतक्रीडा करीत (१.१०) आणि त्या प्रसंगी दरीगृहाच्या द्वाराशी मेघांचा पडद्यासारखा उपयोग होत असे (१.१४), तसेच मेघदूतात नीचैर्गिरी पर्वतावरील शिलावेश्माचा याच क्रीडेसाठी उपयोग केला जात होता असे कालिदासाने म्हटले आहे, त्यावरून लेण्यांचा मनोरंजनाच्या कार्यक्रमासाठी उपयोग होत होता याविषयी ल्यूडर्स यांना शंका नाही. यासंबंधात त्यांनी मथुरा

५१ T. Bloch, 'Caves and Inscriptions in Rāmgarh Hill', *Archaeological Survey of India,* Annual Report, 1903–1904, pp. 123–131.

५२ H. Lüders, 'Indische Höhlen als Vergnügungsorte', *ZDMG,* Vol. 58 (1904), pp. 867–868.

येथील एका जैन शिलालेखातील 'लेणशोभिका' ह्या शब्दाचा निर्देश केला आहे. कोणत्या तरी प्रकारच्या नाटयाचे प्रयोग शौभिक करीत असे महाभाष्यावरून स्पष्ट आहे. तेव्हा लेणशोभिका म्हणजे लेण्यात तसले नाटय प्रस्तुत करणारी नटी असे त्यांचे मत आहे. जोगिमारा शिलालेखातील देवदासी शब्दाचा हाच अर्थ असावा असे ब्लोश यांनी म्हटले आहे. त्याचप्रमाणे लूपदख म्हणजे रूपद्रष्टा हा शब्दही रूपके म्हणजे नाटके प्रस्तुत करणारा नट असे मानले आहे.

नाट्यप्रयोगासाठी गुहांचा उपयोग होत असे हे प्रतिपादन केल्यावर ब्लोश यांनी सीताबेंगा गुहेच्या बाहेरच्या भागाचे वर्णन करून तेथील रचना ग्रीक अँफिथिएटरच्या अनुकरणाने करण्यात आली असे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. गुहा आतील बाजूस ४६ फूट लांब आणि २४ फूट रुंद अशी लंबचौरस असून तिन्ही भिंतींना लागून दगडाचेच बाक तयार केले आहेत. गुहेच्या बाहेरच्या बाजूस डावीकडे वर गुहेत चढून जाण्यासाठी बऱ्याच पायऱ्या दगडात खोदल्या आहेत. या पायऱ्यांच्या उजवीकडे गुहेच्या दर्शनी भागाला समांतर असे पायरीपायरीने उतरत जाणारे दगडात खोदलेले बाक आहेत. हे चढण्याउतरण्यासाठी केले असण्याचा संभव नसून त्यांचे अँफिथिएटरशी साम्य आहे असे ब्लोश यांचे म्हणणे आहे. शिवाय हे बाक जेथे संपतात त्या ठिकाणी समोर एक लहानसे पठार आहे, त्याचा नाट्यप्रयोग प्रस्तुत करण्यासाठी उपयोग केला जाई. गुहेच्या आत जे बाक आहेत तेथून खालचा प्रयोग दिसणे शक्य नसल्यामुळे ब्लोश यांनी असे सुचविले आहे की ती प्रेक्षकांनी विश्रांती घेण्याची जागा असावी. तिन्ही बाकांवर मिळून एका वेळेस पन्नास माणसे विश्रांती घेऊ शकतील असा त्यांचा अंदाज आहे.

या गुहेत नाट्य कशा प्रकारे केले जात असावे याविषयी कोनौ यांनी निराळेच मत प्रदर्शित केले आहे. गुहेच्या दर्शनी भागी दोन्ही टोकांना दगडात खोल भोके आहेत. कोनौ यांच्या मते या भोकांत खांब पुरले जात असत आणि ह्या खांबांच्या आधारे दर्शनी भागावर एक पडदा लावला जाई. ह्या पडद्यावर छायांच्या साहाय्याने नाटय प्रस्तुत केले जात असे असे त्यांचे मत आहे.[५३] नाटयशास्त्रातील 'कार्यः शैलगुहाकारो द्विभूमिर्नाटयमंडपः । मन्दवातायनोपेतो निर्वातो धीरशब्दवान् ॥ (२.८०-८१)' ह्या श्लोकाच्या आधारे शैलगुहा नाटप्रयोगासाठी भरतालाही अभिप्रेत असावी असे त्यांनी सूचित केले आहे.

ह्या दोन गुहांच्या प्रयोजनाविषयीचे हे मत मुळीच ग्राह्य मानता येण्यासारखे नाही. त्यात जे लेख आहेत ते नाटयप्रयोगाचे निदर्शक आहेत असे समजणे शक्य नाही. सीताबेंगा गुहेतील लेखात श्रेष्ठ कवींची स्तुती असून वसन्तऋतूतील दोलोत्सवात होणाऱ्या मौजेचा निर्देश आहे. त्यावरून ही गुहा नाटयप्रयोगासाठी किंवा काव्यपठनासाठी उप-

५३ Konow, *op. cit.*, p. 4.

योगात आणली जात असे असे मुळीच सूचित होत नाही. जोगिमारा गुहेतील लेखात एका प्रेमिकाने देवदासीवरील आपल्या प्रेमाला वाचा फोडली आहे इतकेच. नाटयप्रयोग होत असल्याचे सूचित करण्यासारखे त्यात काहीही नाही. देवदासी मंदिरांत नृत्य करीत. त्यांना नटी समजणे बरोबर नाही. आणि लूपदख शब्द नटाचा बोधक आहे असे समजणे तर बिलकुल शक्य नाही. विशेष म्हणजे जोगिमारा गुहेचा कोणत्याही प्रकारच्या नाटयप्रयोगासाठी उपयोग होण्याची शक्यता सुद्धा नाही.

ल्यूडर्स यांनी म्हटल्याप्रमाणे कालिदासाच्या वर्णनावरून पर्वतावरील गुहांचा उपयोग सुरतक्रीडेसाठी होत असावा हे संभाव्य मानता येईल. जोगिमारा गुहेतील लेख अशा प्रसंगाची साक्ष म्हणून कोरला गेला असण्याची शक्यता आहे. परंतु ही किंवा अशाच प्रकारची चैन करण्यासाठी गुहांचा उपयोग केला जात असे यावरून त्यांचा नाट्यप्रयोगासाठीही उपयोग होत होता असे समजणे कसे शक्य आहे? आणि शोभिका शब्दाचा नटी असा अर्थ मान्य केला तरी गुहेमध्ये नाटय प्रस्तुत करणाऱ्या विशिष्ट नटया असत आणि त्यांना लेणशोभिका ही स्वतंत्र संज्ञा होती असे समजणे कितपत योग्य होईल?

सीताबेंगा गुहेच्या बाहेर जो अँफिथिएटरसारखा भाग आणि त्यापुढे पठार आहे तेथे नाटयप्रयोग होत असत असे समजणे सुद्धा कठीण आहे. ह्या पठारावर नाट्य प्रस्तुत केले जाई असे मानले तर नेपथ्यगृहाची काय व्यवस्था असावी असा प्रश्न उपस्थित होतो. ग्रीक नाटयगृहात स्केने-भिंतीच्या पलीकडे *postscenium* नावाचा प्रेक्षकांना अदृश्य असा भाग असे. तशा प्रकारची काहीही व्यवस्था ह्या पठारावर केली गेली असल्याची शक्यता नाही. तसेच गुहेच्या आतील भाग प्रेक्षकांना विश्रांती घेण्यासाठी राखून ठेवला असल्याची कल्पना विचित्र वाटते. विश्रांतीसाठी जागेची कोणाला आवश्यकता असेल तर ती नट-नटींना, प्रेक्षकांना नाही. ब्लोश ह्यांनी सीताबेंगा गुहेच्या दर्शनी भागाचा जो फोटो सोबत जोडला आहे तो पाहून त्याचे ग्रीक नाटयगृहाशी साम्य असल्याचे मुळीच प्रतीत होत नाही. कोनौ यांनी येथे छायानाटय प्रस्तुत केले जात असावे असे जे मत मांडले आहे ते तर मुळीच स्वीकारता येण्यासारखे नाही. गुहेच्या दर्शनी भागावर पडदा असून त्यावर छाया पाडल्या जात असे मानले तर छाया कोठून पाडल्या जात आणि प्रेक्षक कोठे बसत असा प्रश्न उपस्थित होतो. छाया गुहेच्या आतूनच पाडल्या जाण्याची शक्यता आहे. बाहेर उतार असल्यामुळे तेथून पाडता येण्याची मुळीच शक्यता नाही. पण छाया गुहेच्या आतून पाडल्या जात याचा अर्थ नट व नटी गुहेतच अभिनय करीत असत. मग हे छायानाट्य पहाणारे प्रेक्षक कोठे बसत? बाहेरच्या अँफिथिएटरसदृश बाकांतर बसून ते पहात असे समजणे शक्य नाही. कारण हे बाक खाली उतरत जाणाऱ्या पायऱ्यासारखे असल्यामुळे पडद्यावरील छाया सर्व प्रेक्षकांना सारख्याच दिसणे शक्य नाही आणि मुख्य म्हणजे ह्या बाहेरच्या बाकांवर प्रेक्षक बसल्यास त्यांची पाठ पडद्याकडे वळलेली असेल, तेव्हा त्यांना ते छायानाटय कसे दिसणार?

खरी गोष्ट अशी आहे की नाटयप्रयोगासाठी शहरापासून दूर असलेल्या डोंगरावरील गुहांचा उपयोग होत असे ही गोष्ट मुळातच अस्वाभाविक आहे. सामान्यतः नाटय-प्रयोग यात्रा, उत्सव यांसारख्या प्रसंगी केले जात आणि त्यावेळी तात्पुरत्या उभारलेल्या नाटयमंडपावरच काम भागविले जाई. कायमच्या स्वरूपाचे नाटयगृह बांधणे कोठे संभाव्य असेल तर ते शहरातच किंवा त्याच्या परिसरात, शहरापासून दूर असलेल्या डोंगरावर नाही. स्त्रिया, मुले, वृद्ध माणसे इत्यादी सुद्धा नाटके पहायला जातात असे नाटय-शास्त्रात म्हटले आहे. ही सर्व मंडळी नाटक पहाण्यासाठी इतक्या दूर डोंगर चढून येत यावर विश्वास ठेवणे कठीण आहे. त्यात पुन्हा अडचण अशी की ह्या दोन गुहांकडे जाण्याचा जो मार्ग आहे त्या मार्गावर एकशेऐंशी फूट लांब व हत्ती सहज जाऊ शकतील इतक्या उंचीचा एक मोठा बोगदा आहे. त्याला हाथीपोळ असे म्हणतात. दुपार उलटून गेल्यावर नाटयप्रयोग पहाण्यासाठी लोक या बोगद्यातून जात आणि प्रयोग पाहिल्यावर त्यातून रात्रीच्या वेळी परतत ही गोष्ट असंभाव्य वाटते.

कोनौ यांनी नाटयशास्त्रातील ज्या श्लोकाचा निर्देश केला आहे त्यात नाटय-मंडपाचा आकार शैलगुहासारखा असावा एवढेच म्हटले आहे. नटांचे शब्द आणि वाद्यांचे ध्वनी अनायासे सर्वत्र ऐकू यावेत हा या आकारामागील उद्देश आहे असे अभिनवगुप्ताने स्पष्टीकरण केले आहे. ह्या श्लोकात आकाराचे गुहेशी साम्य असावे असे म्हटले आहे. त्यावरून प्रत्यक्ष शैलगुहाच नाटयप्रयोगासाठी भरताला अभिप्रेत होती असा निष्कर्ष निघत नाही. आणि ही गोष्ट सुद्धा लक्षात ठेवली पाहिजे की नाटयाशी संबंध जोडणे शक्य झाले आहे अशी ही एकच सीताबेंगा गुहा आहे. भारतात सर्वत्र असंख्य शैलगुहा आहेत. पण इतर कोठेही गुहेचा नाटयप्रयोगासाठी उपयोग होत असावा असे अंधुक सूचन करणेही शक्य झालेले नाही. जर गुहांचा तसा उपयोग नाटयशास्त्राला खरोखरच मान्य असता तर इतरत्रही त्याची चिन्हे अवश्य निदर्शनास आली असती.

सीताबेंगा गुहा नाटयप्रयोगासाठी उपयोगात आणली जात होती हे मत याप्रमाणे अस्वीकार्य असल्यामुळे तिच्या रचनेवर ग्रीक अँफिथिएटरचा प्रभाव पडला होता हे मतही निर्मूल ठरते. वस्तुतः ग्रीक नाटयगृह आणि पर्वतावरील गुहा यांच्यात कोणत्याच प्रकारचा संबंध नाही. ग्रीक नाटयगृह नेहमी शहरातच किंवा त्यापासून अगदी जवळच बांधण्यात येत असे. तेव्हा त्याचे अनुकरण करावयाचे ठरविले तर शहरापासून दूर डोंगराच्या वरील भागी असलेली गुहा त्यासाठी योग्य ठिकाण म्हणून निवडले गेले हे कसे संभाव्य मानता येईल ? आणि अनुकरण केले असल्याचे चिन्ह कोणते तर फक्त खाली जाणाऱ्या किंचित अर्धगोलाकृती दगडी पायऱ्या. ग्रीक नाट्यगृहात आवश्यक असलेली स्केने नावाची भिंत, त्यापुढील आणि मागील अशी झालेली जागेची विभागणी याचे कोणतेही चिन्ह त्या ठिकाणी

नाही. आणि ही सुद्धा एक आश्चर्याची गोष्ट होईल की ग्रीक नाट्यगृहाचा प्रभाव पंजाबपासून छोटा नागपूरपर्यंत अन्यत्र कोठेही दिसून येऊ नये आणि सहसा त्याचे दर्शन त्या प्रदेशातील एका निर्जन टेकडीवर व्हावे. वास्तविक ग्रीकांची सत्ता पंजाबमध्ये कित्येक वर्षे होती. जर ग्रीक नाट्यगृहाचे अनुकरण होण्याचा कोठे संभव असल्याचे मानता येईल तर तो पंजाबमध्ये. पण त्या ठिकाणी त्याचे कसलेच चिन्ह नाही. तेव्हा ग्रीक नाट्यगृहाचा भारतातील नाटयमंडपनिर्मितीवर प्रभाव पडला होता हेच संशयित असल्यामुळे ग्रीक नाटयापासून स्फूर्ती घेऊन संस्कृत नाटक उदयास आले या मताला त्याने पुष्टी मिळण्यासारखी नाही.

## ग्रीक व संस्कृत नाट्य

वस्तुत: ग्रीक नाट्य व संस्कृत नाटय यांच्या मूलभूत प्रकृतींत पुष्कळच फरक आहे. ग्रीक ट्रॅजेडी व संस्कृत नाटक यांच्यात विषयाच्या बाबतीत काही अंशी साम्य आहे. पुरातन कथांतील उदात्तप्रकृती व्यक्तींच्या चरिताचे दर्शन दोहोंतही घडते. पण ते घडविण्याचा प्रकार आणि त्याचे प्रयोजन यांबाबतीत दोहोंत महत्त्वपूर्ण भिन्नता आहे. ट्रॅजेडीमध्ये एकाच दिवशी एकाच ठिकाणी घडणाऱ्या परस्परांशी सर्व प्रकारे संबद्ध असणाऱ्या घटनांचा अनिवार्य परिणाम म्हणून दु:खकारक शेवट होतो. यात काल, स्थल आणि घटना यांच्या बाबतीतील एकतेला (*unity*) महत्त्वाचे स्थान असून अति गतिमान असलेल्या कथानकाचा दु:खद अंत होणे आवश्यक होते. संस्कृत नाटकात स्थलकालाची एकता मुळीच आवश्यक मानलेली नाही. रामकथेवरील नाटकांत अयोध्या, पंचवटी, लंका आदी एकमेकापासून दूर असलेली स्थले आणि चौदा वर्षांइतका कालावधी यांची योजना सहज होऊ शकते. तसेच घटनांच्या एकतेवरही संस्कृत नाटकांत भर दिलेला दिसत नाही. तथापि, हे लक्षात ठेवले पाहिजे की पताका, प्रकरी यांसारखे प्रासंगिक उपकथानक मुख्य कथानकाच्या परिपोषाला उपयुक्त असले पाहिजे असे नाटयशास्त्रात म्हटले आहे. म्हणजे कथानकाची सुसूत्रता संस्कृत नाट्यात अपेक्षित आहेच.

पण याहून महत्त्वाचा फरक कथानकाच्या आशयाच्या संबंधात दिसून येतो. ग्रीक ट्रॅजेडीत नायकाला मुख्यत: दैवाने निर्माण केलेल्या परिस्थितीशी झगडणे आवश्यक होते आणि त्यात त्याला अनंत यातना सहन कराव्या लागून अन्तत: तो पराभूत होतो व प्रसंगी त्याचा मृत्यूही ओढवतो. परंतु या पराभवातच त्याचे महानुभावत्व प्रकट होते, कारण दैवाशी झगडण्यातच पुरुषार्थ मानला आहे. अशा तऱ्हेच्या कल्पनेला सस्कृत नाटकात मुळीच अवकाश नाही. नाटकाचा जो नायक त्याला अंती फलाची प्राप्ती झालीच पाहिजे असा दंडक आहे. तेव्हा नायक पराभूत होऊन नाटकाचा शेवट दु:खात होणे शक्य नाही. ग्रीक ट्रॅजेडी आणि संस्कृत नाटक यांच्यातील ह्या भेदाचे मूळ प्राचीन ग्रीक व भारतीय या दोघांच्या स्वभावधर्माच्या भिन्नतेत अथवा जगाकडे पहाण्याच्या दृष्टिकोणाच्या भिन्नतेत

असण्याचा संभव आहे. पण ते काहीही असले तरी ह्या दोन प्रकारच्या नाट्यांची प्रकृती बहुतांशी भिन्न असल्याचे प्रकर्षाने जाणवते. आणि त्यामुळे एकाचा दुसऱ्यावर प्रभाव पडला असल्याची शक्यता वाटत नाही.

ग्रीक नाट्याचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे त्यात केला जाणारा कोरसचा उपयोग. ट्रॅजेडी आणि जुनी व नवी कॉमेडी यात सर्वत्र कोरसची योजना आहे. अंक हा प्रकार ग्रीक नाट्याला अवगत नाही. जर खरोखरच ग्रीक नाट्यापासून प्रेरणा घेऊन संस्कृत नाटक उत्पन्न झाले असते तर संस्कृत नाट्यात कोरसचे दर्शन कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपात झालेच असते. परंतु त्याचे कोठेही काही चिन्ह नाही. ग्रीक नाट्यप्रयोगाचे आणखी एक वैशिष्ट्य असे की ज्या पात्राची भूमिका करावयाची त्याला अनुरूप असा मुखवटा (*mask*) धारण करूनच नट रंगभूमीवर येत. तसा काही प्रकार संस्कृत नाट्य-प्रयोगात नव्हता. इतकेच नाही तर मुखावरील नेत्र, भुवया आदी विविध अवयवांनी करावयाच्या अभिनयाच्या विस्तृत वर्णनावरून हे स्पष्ट आहे की नटाने मुखवटा धारण करून रंगभूमीवर अवतीर्ण व्हावे ही कल्पना संस्कृत नाट्याला माहीतही नव्हती. ग्रीक नाट्यप्रयोगात स्त्रियांची कामे पुरुष नटच करीत. महाभाष्यात स्त्रीच्या वेषात असणाऱ्या पुरुषाला भ्रूकुंस असे म्हटले आहे.[५४] पण हे स्त्रीची भूमिका करणाऱ्या पुरुष नटाचे वर्णन आहे हे निश्चित नाही. त्यात हिजड्याचा निर्देश असण्याचाही संभव आहे. तथापि नाट्यशास्त्रात पुरुष नटांनी करावयाच्या स्त्रीभूमिकांना उद्देशून रूपानुरूपा योजना असे म्हटले आहे. पण त्याचबरोबर स्त्रियांनीही पुरुष पात्रांच्या भूमिका करण्यास हरकत नाही असे म्हटले आहे. तेव्हा या संबंधात ग्रीक नाट्यप्रयोगाचा संस्कृत नाट्य-प्रयोगाच्या पद्धतीवर प्रभाव पडला असे म्हणता येण्यासारखे नाही.

संस्कृत नाट्याची दोन प्रधान वैशिष्ट्ये आहेत. एक गद्य आणि पद्य ह्या दोहोंचाही एकाच कृतीत उपयोग आणि दुसरे संस्कृतबरोबर प्राकृत भाषांचाही उपयोग. अशा प्रकारची वैशिष्ट्ये ग्रीक नाट्यात आढळत नाहीत. ग्रीक नाट्याच्या प्रेरणेने संस्कृत नाट्याची उत्पत्ती झाली असे मानल्यास ही वैशिष्ट्ये कोठून आली या प्रश्नाचे उत्तर त्यात सापडणार नाही.

खरी गोष्ट अशी दिसते की संस्कृत नाटकाची उत्पत्ती दुसऱ्या कोणत्या तरी नाट्याच्या अनुकरणाने झाली असावी असे समजण्याची मुळी सुद्धा आवश्यकता नाही. त्यासाठी आवश्यक असणारी सर्व सामग्री भारतातच विद्यमान होती. अनेक पंडितांनी

५४ 'स्तनकेशवती स्त्री स्याल्लोमशः पुरुषः स्मृतः' इति लिङ्गात्स्त्रीपुंसयोर्ज्ञाने सति भ्रूकुंसे टाप् प्राप्नोति । यद्धि लोके दृष्ट्वैतदवसीयत इयं स्त्रीति अस्ति तद् भ्रूकुंसे। (४.१.३ सूत्रावरील महाभाष्य).

भारतातील लोकनाटयाचे प्राचीनत्व मान्य केले आहे. ज्यांना हे मान्य नाही त्यांच्या मते प्राचीन काळी धार्मिक नाट्य अस्तित्वात होते. म्हणजे कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपात नाट्याची परंपरा भारतात फार प्राचीन काळापासून आहे हे सर्वमान्य आहे. नटांच्या कलेचे शास्त्र प्रस्थापित होऊन त्यावर पाणिनीच्या काळी संस्कृत भाषेत ग्रंथ-रचना झाली होती. त्याच सुमारास आख्यान, आख्यायिका आदी स्वरूपाच्या संस्कृत विदग्ध वाङ्मयाच्या निर्मितीस प्रारंभ झाला होता. देवदेवतांच्या पुरातन कथा, प्राचीन इतिहास, लोककथा आदी नाटयासाठी आवश्यक विषय प्राचीन काळापासून उपलब्ध होते. ह्या सर्व सामग्रीच्या संयोगाने विदग्ध संस्कृत नाटयाच्या निर्मितीस स्वतंत्रपणेच प्रारंभ झाला असावा असे समजण्यास काही हरकत दिसत नाही. ही गोष्ट पतञ्जलीच्या काळी किंवा किंचित मागेपुढे घडून आली असणे संभवनीय आहे.

## नाट्यशास्त्राचे पाठ

प्रस्तुत भाषांतरासाठी नाट्यशास्त्राचे जे पाठ स्वीकारले आहेत ते मुख्यत्वेकरून बडोदे येथून गायकवाड्स् ओरिएंटल् सीरीज्मधे प्रकाशित झालेल्या प्रतीला अनुसरून आहेत. त्याच प्रतीत अभिनवगुप्ताची टीका छापलेली असल्यामुळे असे होणे स्वाभाविक झाले. तथापि त्या प्रतीत जे श्लोक काही हस्तलिखितात आढळत नसल्यामुळे संपादकांना प्रक्षिप्त वाटले आणि ज्या श्लोकांवर अभिनवगुप्ताची टीका नाही असे श्लोकही मूळ ग्रंथातच समाविष्ट केले असून त्यांना चालू क्रमांकच दिले आहेत. हे प्रक्षिप्त वाटणारे श्लोक कंसात दिले आहेत हे खरे आहे. परंतु इतर श्लोकांबरोबर एकाच क्रमात छापले असल्यामुळे हे श्लोक भरतकृत नाहीत ही गोष्ट स्पष्ट होत नाही. प्रस्तुत भाषांतरात हे श्लोक मूळ नाटयशास्त्रात समाविष्ट न करता टीपांत उद्धृत केले आहेत. त्यामुळे ह्या दोन अध्यायांतील श्लोकांची संख्या व त्यांचे क्रमांक यांच्या बाबतीत भिन्नता उत्पन्न झाली आहे. बडोदे प्रतीत अठराव्या अध्यायात एकशे साडेसव्वीस आणि एकोणविसाव्या अध्यायात एकशे चोपन श्लोक क्रमवार दिले आहेत, तर प्रस्तुत भाषांतरात अनुक्रमे एकशे सोळा आणि एकशे तीसच श्लोक स्वीकृत केलेले दिसतील.

श्लोकांतील पाठ मुख्यतः बडोदे प्रतीवरूनच घेतले आहेत. तथापि, काही थोड्या ठिकाणी त्या प्रतीतील पाठ न स्वीकारता अन्य प्रतींतील पाठ पसंत केले आहेत. स्वीकृत न झालेले निरनिराळ्या प्रतींतील पाठ तळटीपांत दिले आहेत. तेथे निरनिराळ्या प्रतींचा निर्देश पुढीलप्रमाणे केला आहे – **ब** = बडोदे प्रत, **नि** = निर्णयसागर प्रत, **का** = काशी येथे प्रसिद्ध झालेली प्रत आणि **घो** = मनोमोहन घोष यांनी प्रसिद्ध केलेली प्रत. डॉ. घोष यांनी मुख्यतया काशी प्रतीचे अनुसरण केले आहे. त्या प्रतीप्रमाणे प्रस्तुतचे १८ व १९ हे अध्याय अनुक्रमे २० व २१ असे आहेत. त्याचे कारण तीत इतरांच्या

नवव्या अध्यायाचे ९ व १० असे आणि सतराव्या अध्यायाचे १८ व १९ असे दोन दोन अध्याय केले आहेत. त्या प्रतीचे आणखी एक वैशिष्ट्य असे की त्यात लास्यांगांचे वर्णन एकविसाव्या अध्यायात न करता विसाव्या अध्यायात समाविष्ट केले आहे. अगोदरचा अध्याय आर्यावृत्तात आणि नंतरचा अनुष्टुभ छंदात आहे हे लक्षात घेतले असता लास्यांगांचे वर्णन करणारे अनुष्टुभ श्लोक नंतरच्या अध्यायातच मूळ असण्याचा अधिक संभव आहे.

श्लोकांचे भाषांतर करताना त्यांचा जो स्वाभाविक अर्थ असावा असे वाटले तोच मुख्यतः विचारात घेतला आहे. पण तो अर्थ अभिनवगुप्ताने केलेल्या व्याख्येशी सर्वत्र जुळता आहे असे नाही. किंबहुना, अनेक ठिकाणी असा प्रत्यय येतो की अभिनवगुप्ताने लावलेला अर्थ श्लोकात अभिप्रेत असण्याची शक्यता नाही. १८.१५, १९.५, १९.१५, १९.२६, १९.३७ इत्यादी श्लोकांची अभिनवगुप्तकृत व्याख्या पाहिल्यास हे स्पष्ट होते. तसेच पुष्कळ वेळा शब्दांचे स्वाभाविक अर्थ न स्वीकारता त्याने निराळेच अर्थ केले आहेत. उदाहरणार्थ, प्रयोगतः (१८.१), विषय (१८.१०), गुणैः (१८.११), सगुणाम् (१९.११), प्राज्ञैः (१९.२५), दीप्त (१९.५१) इत्यादी. अशा ठिकाणी अभिनवगुप्ताने केलेला अर्थ स्वीकारणे शक्य झाले नाही, तरी सामान्यतः श्लोकाचा अर्थ लावताना त्याच्या व्याख्येचा फार उपयोग झाला यात शंका नाही.

अभिनवगुप्ताच्या पूर्वी नाट्यशास्त्रावर अनेक पंडितांनी टीका लिहिल्या होत्या. त्यांपैकी उद्भट, लोल्लट आणि शङ्कुक यांच्या भिन्न मतांचा निर्देश त्याने प्रस्तुत दोन अध्यायांवरील टीकेत काही ठिकाणी केला आहे. त्या शिवाय अनेक जागी नावनिर्देश न करता त्याने प्राचीन टीकाकारांचा निर्देश 'केचित्' किंवा 'अन्ये' अशा शब्दांनी केला आहे. अगोदरच्या टीकाकारांच्या भिन्न भिन्न मतांच्या ह्या उल्लेखांवरून हे स्पष्ट होते की नाट्यशास्त्रातील काही श्लोकांच्या अर्थाबद्दल प्राचीन काळापासून भिन्न मते प्रचलित झाली होती. ह्या प्राचीन टीकांपैकी सध्या कोणतीच उपलब्ध नाही. त्यांच्याविषयी जी काय माहिती मिळते ती अभिनवगुप्ताच्या व्याख्येवरूनच.

## अभिनवभारती

अभिनवभारतीचे भाषांतर करण्यासाठी प्रथम त्या व्याख्येतील पाठ शुद्ध करून घेणे आवश्यक होते. बडोदे येथील प्रतीत छापलेली ह्या दोन अध्यायांवरील व्याख्या असमाधानकारक आहे. अनेक जागी अर्थबोध होणे फार कठीण आहे. अभिनवभारतीची दोन हस्तलिखिते उपलब्ध झाली आहेत. दक्षिण भारतात तीनचार ठिकाणी मिळून प्राप्त झालेल्या एका हस्तलिखितावरून तयार केलेली प्रत मद्रास येथील गव्हर्मेन्ट ओरिएंटल मॅन्युस्क्रिप्टस् लायब्ररीत आहे. दुसरे हस्तलिखित त्रिवेंद्रम येथे केरळ युनिव्हर्सिटीच्या संग्रहात आहे. या

दोहोंचा उपयोग करून श्री कवींनी अभिनवभारती छापली आहे. तेव्हा मूळ हस्तलिखिताचा उपयोग झाला तर पहावे म्हणून मद्रास येथील प्रतीची नक्कल करून मागविली. तिचा प्रस्तुत कामी फार उपयोग झाला हे भाषांतरानंतरच्या टीपांवरून दिसून येईल. ही नक्कल करून पाठविल्याबद्दल मद्रास येथील लायब्ररीच्या अधिकाऱ्यांचे व त्या कामी साह्य केल्याबद्दल पुण्याच्या भांडारकर इन्स्टिटयूटच्या क्युरेटरांचे आभार मानणे आवश्यक आहे.

त्रिवेंद्रम येथील हस्तलिखितावरून तयार केलेली प्रत वाराणसी येथील सरस्वती भवन भंडारमध्ये आहे. वाराणसीतील ह्या प्रतीवरून तयार केलेली प्रत पुण्याच्या भांडारकर इन्स्टिट्यूटमध्ये आहे. पाठशुद्धीच्या कामी ह्या प्रतीचा उपयोग झाला तर पहावा या हेतूने मला मिळालेल्या मद्रास प्रतीशी भांडारकर इन्स्टिट्यूटमधील प्रत ताडून पाहिली. पण असे आढळून आले की दोन्ही प्रतींत अशुद्ध पाठ आणि त्रुटि यांसंबंधात काहीच फरक नाही. मद्रासच्या प्रतीचे मूळ हस्तलिखित आणि त्रिवेंद्रमचे हस्तलिखित ही मूळ एकाच हस्तलिखितावरून तयार केलेली आहेत यात शंका नाही. प्रस्तुत टीपांमध्ये 'हस्तलिखित' असा जो निर्देश आहे तो मद्रास येथील प्रतीचा. 'मुद्रित' असा निर्देश अर्थात बडोदे येथून प्रसिद्ध झालेल्या अभिनवभारतीचा.

टीपांवरून असे दिसून येईल की जागजागी मुळातील पाठांची दुरुस्ती करणे आवश्यक झाले आहे. शुद्ध केलेले बहुतेक पाठ स्वीकार्य ठरतील अशी आशा आहे. तथापि हे मान्य केलेच पाहिजे की काही थोड्या ठिकाणी सुचविलेली दुरुस्ती सर्वांना पटेलच असे नाही. किंबहुना, अशा काही ठिकाणी मलाच खात्री वाटत नाही. शिवाय, दोनचार ठिकाणी पाठ इतके अशुद्ध आहेत की ते तसेच राहू देण्याशिवाय गत्यन्तर नव्हते. तीच गोष्ट क्वचित आढळणाऱ्या त्रुटींची. असे ग्रंथ छापण्याची सामान्य पद्धत अशी आहे की अशुद्ध पाठ मुळात तसाच ठेवून केलेली अगर सुचविलेली दुरुस्ती त्याच्यापुढे कंसात छापावयाची. पण त्याने सामान्य वाचकाचा गोंधळ उडतो. यास्तव येथे टीका दुरुस्त पाठांसहितच छापून मूळ अशुद्ध पाठांचे निर्देशपूर्व विवेचन टीपांमध्ये केले आहे. यामुळे टीकेचा अर्थबोध सुलभतेने होऊ शकेल, आणि मूळ पाठही टीपांत पहावयास मिळतीलच.

अभिनवभारतीच्या भाषांतराचे काम फारसे त्रासदायक नाही. श्लोकांचे अर्थ समजावून सांगण्यासाठी अभिनवगुप्ताने सामान्यतः सोपीच भाषा वापरली आहे. आपल्या व्याख्येचे स्वरूप कशा प्रकारचे असणार ते त्याने सुरुवातीसच पुढील शब्दांत सांगितले आहे –

**उपादेयस्य संपाठस्तदन्यस्य प्रतीकनम् ।**
**स्फुटव्याख्या विरोधानां परिहारः सुपूर्णता ॥ ५ ॥**

लक्ष्यानुसरणं श्लिष्टवक्तव्यांशविवेचनम् ।
संगतिः पौनरुक्त्यानां समाधानसमाकुलम् ॥ ६ ॥
संग्रहश्चेत्ययं व्याख्याप्रकारोऽत्र समाश्रितः ॥

प्रस्तुत दोन अध्यायांवरील अभिनवभारतीत ह्या गोष्टींचा सर्वत्र प्रत्यय आल्याशिवाय राहात नाही.

वर उद्धृत केलेल्या व्याख्याप्रकारात उदाहरण देण्याच्या प्रकाराचा खास निर्देश नाही. कदाचित 'लक्ष्यानुसरण' मध्ये तो अन्तर्भूत असावा. प्रस्तुत अध्यायांच्या व्याख्येत जागजागी उदाहरणे देणे आवश्यक होते. वीथ्यंगे, संधी, संध्यंगे, पताकास्थानक इत्यादींचे स्वरूप स्पष्ट होण्यास उदाहरणे उपयुक्त ठरली आहेत. अभिनवगुप्ताने दिलेली उदाहरणे बहुतेक सध्या प्रसिद्ध असलेल्या अशा नाटकातीलच आहेत. तथापि, कित्येक उदाहरणे कृत्यारावण, मायापुष्पक, पुष्पदूषितक, पाण्डवानन्द, देवीचन्द्रगुप्त यासारख्या सध्या अज्ञात असलेल्या नाटकांतून उद्धृत केली आहेत. संध्यंगांच्या उदाहरणांच्या बाबतीत असे दिसते की त्यासाठी वेणीसंहार नाटक (मुखसंधीच्या अंगांसाठी) आणि रत्नावली नाटिका (इतर चार संधींतील अंगांसाठी) यांचाच उपयोग केला आहे. ह्या नाट्यकृतींची रचनाच भरताचे नियम पुढे ठेवून केलेली असण्याचा संभव आहे. यासंबंधात ही गोष्ट ध्यानात घेण्यासारखी आहे की दशरूपावरील अवलोक टीकेत धनिकाने संध्यंगांची उदाहरणे मुख्यतः ह्याच दोन नाट्यकृतींतून उद्धृत केली आहेत.

वर म्हटल्याप्रमाणे काही ठिकाणी अभिनवगुप्ताने नाट्यशास्त्रातील श्लोकांचा स्वाभाविक अर्थ न देता शब्दांची व त्यांच्या अर्थांची ओढाताण करून अर्थ निष्पन्न केला आहे. याचे एक कारण असे दिसते की भरतानंतर ज्या कोहलप्रभृती आचार्यांनी नाट्यशास्त्रावर ग्रंथ लिहिले होते त्यांच्या मतांचाही निर्देश प्रस्तुत नाट्यशास्त्रात आहे असे त्याला वाटत असावे. शास्त्र मुळातच संपूर्ण स्वरूपात अवतीर्ण होते, त्याचा विकास वगैरे काही होत नाही असा विचार प्रसृत असल्यामुळे समन्वय करणे आवश्यक वाटून स्वाभाविक नसलेले अर्थ केले गेले असे म्हणता येईल. तथापि, हें लक्षात ठेवले पाहिजे की एके ठिकाणी (१८.१०१ व्याख्येनंतरच्या अंशात) अभिनवगुप्ताने असे स्पष्ट म्हटले आहे की कोहलाचे मत भरतमुनीच्या मताशी विरुद्ध असल्यामुळे त्याची उपेक्षाच केली पाहिजे.

हे असे स्वाभाविक नसलेले अर्थ लावण्यात अभिनवगुप्ताचे बुद्धिपाटव साहजिकच अभिव्यक्त होते. त्याशिवाय त्याच्या बुद्धीची चतुरस्रता सर्वत्रच प्रत्ययास येते.

# अभिनवभारतीसमेतं भरतमुनिप्रणीतम्

# नाट्यशास्त्रम्

## [1]अष्टादशोऽध्यायः

[2]वर्तयिष्याम्यहं विप्रा दशरूपविकल्पनम् ।
नामतः कर्मतश्चैव तथा चैव प्रयोगतः ॥ १ ॥

हे विप्रांनो, मी आता दहा रूपकप्रकारांचे विविध स्वरूप (त्यांची) नावे, व्याख्या आणि त्याचप्रमाणे प्रयोग ह्यांचे द्वारा स्पष्ट करून दाखविणार आहे.

रूपं यदेतद्बहुधा चकास्ति तद्येन भावी भविता न जातु।
तच्चक्षुरर्कात्मकमीश्वरस्य वन्दे वपुस्तैजससारधाम्नः ॥

जे हे रूप अनेक प्रकारे प्रकाशमान होत आहे, ज्याच्यामुळे पुढे होणारा प्राणी कधीही होणार नाही, त्या सूर्यस्वरूपी ईश्वराच्या नेत्राला – तेजोमय साराचे निधान असलेल्या (ईश्वराच्या) मूर्तीला – मी वंदन करतो.

अभिनवभारतीत प्रत्येक अध्यायाच्या प्रारंभी मंगलश्लोक आहेत. हे सर्व श्लोक शिवस्तुतिपर असून त्यांत शिवाच्या एखाद्या विशिष्ट स्वरूपाला अथवा मूर्तीला वंदन केलेले असते. सामान्यतः, अध्यायातील विषयाच्या सूचक अशा शद्बांनी प्रारंभीच्या मंगलश्लोकात शिवस्वरूपाचा निर्देश केलेला असतो. तदनुसार दहा रूपकांचे विवेचन करणाऱ्या प्रस्तुत अध्यायाच्या प्रारंभीच्या मंगलश्लोकात 'रूप' शद्बाचा उपयोग केला आहे. शिवाच्या आठ तनूंपैकी अर्क म्हणजे सूर्य ही एक आहे हे प्रसिध्द आहे. तसेच सूर्य हा ईश्वराचा नेत्र होय ही कल्पनाही सर्वांच्या परिचयाची आहे. ह्या दोन्ही कल्पनांची प्रस्तुत श्लोकात सांगड घातलेली दिसते. कारण, 'चक्षुः' आणि 'वपुः' हे दोन्ही शब्द 'वन्दे' ह्या

१ का विंशो. २ नि कथयिष्यामहं.

क्रियापदाचे कर्म असल्यामुळे त्यांच्यात सामानाधिकरण्य मानणे आवश्यक आहे. एका दृष्टीने जो नेत्र तो दुसऱ्या दृष्टीने शरीर अशी कल्पना अभिप्रेत असावी. पण ही कल्पना तितकीशी आकर्षक वाटत नाही. 'तैजससारधाम्नः' हे 'ईश्वरस्य' चे विशेषण आहे.

श्लोकाच्या दुसऱ्या चरणाचा अर्थ सर्वथा स्पष्ट नाही. सूर्यामुळे 'भावी' केव्हाही अस्तित्वात येणार नाही याचा अर्थ सूर्याच्या प्रसादाने मनुष्याला मुक्ती मिळून त्याला कधीही पुनर्जन्म प्राप्त होत नाही अशा तऱ्हेचा असावा असे वाटते. 'भावी' हा शब्द पुल्लिंगी असल्यामुळे त्याचे विशेष्य 'मनुष्यः', 'जन्तुः', 'प्राणी' अशासारखेच एखादे मानणे आवश्यक आहे. जर तो शब्द नपुंसकलिंगी असता तर हे वाक्य सृष्टिसंहाराविषयी आहे असे समजणे कदाचित शक्य झाले असते. पण ती कल्पना अभिप्रेत असेलसे वाटत नाही. संहार अस्तित्वात असलेल्या सृष्टीचा होतो. 'भावी' शब्दाने तिचा निर्देश अनुचित ठरला असता. सूर्योपासनेने मोक्ष मिळतो ही कल्पना अधिक ग्राह्य वाटते. पण विरोधालंकारासाठी योजलेल्या 'भावी न भविता' ह्या शब्दप्रयोगामुळे ती स्पष्ट होत नाही.

**दशरूपकोपकारि काक्वादियोजनामिति तत्स्वरूपं वक्तव्यमिति संगतिरुक्तैव, तद्वर्तयिष्यामीति किमनेनोच्यते । तदस्य प्रयोजनं प्रदर्श्यते । कश्चिदेवमाशङ्कते 'रसा भावा' इत्यादिसूत्रसारसंग्रहे दशरूपशब्दस्य नामापि न श्रुतम्, तत्कथमुक्तं 'दशरूपविधाने पाठ्यम्' इति । तं प्रत्याह वर्तयिष्यामीति । रूप्यते प्रत्यक्षीक्रियते योऽर्थस्तद्वाचकत्वात्काव्यानि रूपाणि । रूप्यन्त अभिनीयन्त इति वा काव्यान्येव रूपाणि । दशानां रूपाणां विभागः कल्प्यते अस्मादिति दशरूपविकल्पनं सूत्रम् । तेनायं षष्ठीसमासः दशरूपमिति । बहुव्रीहौ दशरूपं काव्यमिति भेदान्तरापाकरणं स्यादित्याशङ्क्य द्विगुः । पात्रादिप्रक्षेपश्च यो व्याख्यातस्तत्प्रयासमात्रमेव ।**

काकु आदींची योजना दहा रूपकांना उपकारक आहे, यास्तव त्या रूपकांचे स्वरूप स्पष्ट करून सांगितले पाहिजे अशी (ह्या अध्यायाची) संगती निर्दिष्ट झालीच आहे; मग 'वर्तयिष्यामि' इत्यादी ह्या श्लोकात का म्हटले आहे? तेव्हा ह्या श्लोकाचे प्रयोजन दाखवून देतो. कोणी अशी शंका घेईल की 'रस, भाव' इत्यादी नाट्याच्या अंगांचा संग्रह करणाऱ्या सूत्रामध्ये दशरूप शब्दाचा नामनिर्देशही नाही, मग 'दशरूपांच्या विधानात पाठ्य (योजावे)' असे कसे म्हटले आहे? त्या शंकेखोराच्या समाधानासाठी 'वर्तयिष्यामि' इत्यादी म्हटले आहे. जो पदार्थ 'रूप्यते' म्हणजे प्रत्यक्ष दिसतो (तो रूप आणि) त्याची वाचक असल्यामुळे काव्यांना रूप अशी संज्ञा आहे. किंवा 'रूप्यन्ते' म्हणजे अभिनयाने व्यक्त केली जातात म्हणून काव्यांना प्रत्यक्षच रूप अशी संज्ञा आहे. दहा रूपांच्या विभागाची कल्पना ज्यामुळे केली जाईल ते दशरूपविकल्पन सूत्र. म्हणजे 'दशरूप' इत्यादी हा षष्ठी समास होय. दहा रूपे ज्याची आहेत असे काव्य या अर्थी दशरूप हा बहुव्रीहि समास

मानल्यास (रूपकाच्या) इतर प्रकारांचा समावेश होणार नाही असा संभव असल्यामुळे हा समास द्विगु मानावा. आणि पात्रांच्या योजनेविषयी जी व्याख्या केली आहे ती सर्व केवळ (निरर्थक) मेहनत होय.

कोणा प्राचीन टीकाकाराने ह्या अध्यायाची संगती लावण्यासाठी केलेली पहिल्या श्लोकातील दशरूप शब्दाची प्रदीर्घ मीमांसा प्रस्तुत परिच्छेदात उद्धृत केली असून शेवटी अभिनवगुप्ताने ही मीमांसा निरर्थक व अनावश्यक असल्याचे म्हटले आहे. प्रारंभी असा आक्षेप घेण्यात आला आहे की नाट्यशास्त्रातील ह्या पहिल्या श्लोकात केलेल्या प्रतिज्ञेची काहीच आवश्यकता नव्हती; कारण, मागील सतराव्या अध्यायात काकु, स्वर इत्यादी पाठ्याच्या गुणांचे विवेचन करताना हे पाठ्यगुण दशरूपकांना उपकारक होत असे म्हटले आहे, तेव्हा त्यानंतर दश रूपकांचे विवेचन क्रमप्राप्तच होते. ह्या अध्यायाची संगती अशा रीतीने आपोआपच सिद्ध झाली असता ह्या श्लोकात 'दहा रूपकांचे स्वरूप मी स्पष्ट करणार आहे' अशी प्रतिज्ञा करण्याचे कारण काय ? ह्या आक्षेपाला त्या प्राचीन टीकाकाराने उत्तर दिले आहे ते असे. सहाव्या अध्यायात रस, भाव, अभिनय इत्यादी नाट्याच्या सर्व अंगांचा परिपूर्ण निर्देश केला आहे. पण त्या ठिकाणी दशरूप हा शब्द कोठेही आढळत नाही. तेव्हा सतराव्या अध्यायात उपयोजिलेल्या दशरूप शब्दाला आक्षेप घेणे संभवनीय असल्यामुळे प्रस्तुत श्लोकातील प्रतिज्ञा समर्थनीय ठरते. साकाङ्क्ष आणि निराकाङ्क्ष अशा दोन प्रकारच्या काकूंचे वर्णन १७.१११ ह्या श्लोकात व त्यानंतरच्या गद्य भागात आहे. 'रसा भावा ह्यभिनया धर्मी वृत्तिप्रवृत्तयः । सिद्धिः स्वरास्तथातोद्यं गानं रङ्गश्च संग्रहः ॥' हा संग्रहश्लोक सहाव्या अध्यायातील दहावा आहे. 'दशरूपविधाने तु पाठ्यं योज्यं प्रयोक्तृभिः' असे १७.१४९ मध्ये म्हटले आहे.

'रूप्यते इ०' यात व्युत्पत्तीच्या आधारे रूप शब्दाचा काव्य असा अर्थ केला आहे. रूप् म्हणजे प्रत्यक्ष दिसणे ह्या धातुपासून सिद्ध झालेल्या रूप शब्दाचा मूळ अर्थ प्रत्यक्ष दिसणारी गोष्ट. त्यापासून गौणार्थाने रूप म्हणजे गोष्ट प्रत्यक्ष दाखविणारे नाटकादी काव्य. — 'रूप्यन्ते अभिनीयन्ते इ०' यात रूप् धातूच्या अभिनय करणे ह्या भिन्न अर्थाच्या साहाय्याने रूप म्हणजे ज्याचा अभिनय केला जातो ते नाटकादी काव्य असा मुख्यार्थच सिद्ध केला आहे. ही दुसरी व्युत्पत्ती सुचविणारे मुळातील वाक्य बडोदे येथील प्रतीत छापावयाचे राहून गेले आहे. — 'दशानां रूपाणां इ०' यात श्लोकातील 'दशरूपविकल्पनम्' ह्या शब्दाचा अर्थ स्पष्ट करून दाखविला असून ह्या विशेषणाला 'सूत्रम्' हे विशेष्य पुरविले आहे. 'सूत्रं वर्तयिष्यामि' यात सूत कातण्याची क्रिया ध्वनित होते. — 'तेनायं षष्ठीसमासः' हे शब्द 'दशरूपविकल्पनम्' ह्या समासाला उद्देशून आहेत. 'दशरूपाणां विकल्पनम्' असा हा षष्ठी तत्पुरुष समास समजावयाचा. 'दशरूपमिति' याऐवजी 'दशरूपविकल्पनमिति' असा पाठ अपेक्षित आहे आणि तोच मूळ असण्याचा संभव आहे. 'दशरूपम्' हाच षष्ठीसमास असे म्हटले असण्याची शक्यता नाही. — 'बहुव्रीहौ इ०' यात 'दशरूप' हा समास बहुव्रीहि न समजता द्विगु समजावा असे प्रतिपादिले आहे. 'दश रूपाणि अस्य तत् (काव्यम्)' असा बहुव्रीहि समास समजल्यास दहाच प्रकारांचा निर्देश होऊन काव्याचे नाटिका, तोटक, सट्टक इत्यादी जे इतर भेद आहेत त्यांना वगळले असल्याची शंका उत्पन्न होण्याचा संभव आहे. समास द्विगु समजल्यास तशी शंका उत्पन्न होणार नाही. 'बहुव्रीहौ'च्या पूर्वी मुळात 'तेन' हा अधिक शब्द आढळतो. तो निरर्थक असल्यामुळे गाळला

आहे. ह्याच्या अगोदरच्या वाक्याच्या प्रारंभी असलेल्या 'तेन' शब्दाची येथे चुकीने पुनरुक्ती झालेली दिसते. – 'पात्रादिप्रक्षेपश्च इ०' ह्या वाक्याचा अर्थ स्पष्ट नाही. अध्यायसंगती सांगण्याच्या संदर्भात त्या टीकाकाराने रूपकप्रकारांत करावयाच्या पात्रयोजनेसंबंधी काही विधाने केली होती असे दिसते. परंतु, ह्या संदर्भात ती विधाने कशा स्वरूपाची असतील याची नीट कल्पना करता येण्यासारखी नाही. अभिनवगुप्ताला हा सर्व खटाटोप व्यर्थ वाटतो, कारण ह्या अध्यायाची संगती त्याच्या मते पुढीलप्रमाणे सहज लावता येण्यासारखी आहे.

**तदयमर्थः । यतः सूत्राद् वाचिकशब्दे प्रकृतिप्रत्ययार्थविभागः कल्प्यते, तत्र वाग्भाग एवायं वितत्य वर्ण्यते । तेन तदेव सूत्रं वर्णितं विवरणेन प्रपञ्चितं भवतीति नानिर्दिष्टं निरूप्यते किंचिदिति ।**

तेव्हा पुढीलप्रमाणे अर्थ समजावा. ज्याप्रमाणे संग्रहसूत्रात निर्देशिलेल्या वाचिकाच्या अनुरोधाने शब्दांतील प्रकृति, प्रत्यय, अर्थ ह्या भेदांचे विवरण केले आहे, त्याप्रमाणे हा (दशरूपविषयक) वाचिकाचाच भाग विस्ताराने वर्णन केला जात आहे. म्हणून तेच सूत्र येथे वर्णिले जात आहे म्हणजे त्याचाच विवरणात्मक विस्तार केला जात आहे, तेव्हा पूर्वी ज्याचा निर्देश नाही अशा कोणत्याही नवीन गोष्टीचे येथे निरूपण केलेले नाही.

अभिनवगुप्ताचे म्हणणे असे आहे की श्लोकातील दशरूपांच्या विवेचनासंबंधीच्या प्रतिज्ञेने एखाद्या नवीन विषयाचा उपन्यास केला आहे असे समजणे बरोबर नाही. कारण, सहाव्या अध्यायातील संग्रहसूत्रात ज्या वाचिकाचा निर्देश केला आहे त्याचाच एक भाग म्हणून दशरूपकात्मक काव्याचे विवेचन केले आहे. – 'यतः ··· तत्र' ही अव्यये 'यथा ··· तथा' या अर्थी समजल्यास वाक्याचा अर्थ लक्षात येण्यास मदत होते. – 'सूत्रात्' ह्या शब्दानंतर मुळात 'आङ्गिको' हा शब्द अधिक आहे. परंतु, आंगिक अभिनयाचा कोणत्याही प्रकारचा निर्देश प्रस्तुत ठिकाणी अप्रस्तुत असल्यामुळे तो शब्द गाळणेच उचित मानले आहे. 'सूत्रात्' शब्दाचे पंचमीचे रूपही समर्पक वाटत नाही. असा संभव आहे की मुळात 'सूत्रादागते' यासारखा एखादा पाठ असावा व आङ्गिक-वाचिक यांच्या नेहमीच्या साहचर्यामुळे 'सूत्रादाङ्गिको' हा पाठ उत्पन्न झाला असावा. 'वाचिकशब्दे' म्हणजे वाचिक अभिनयात वापरावयाच्या शब्दांच्या संबंधात. – 'प्रकृतिप्रत्ययार्थ-विभागः' हा विचार चौदाव्या अध्यायाच्या प्रारंभी केला आहे. – 'तदेव सूत्रम्' म्हणजे ज्या संग्रह-सूत्रात वाचिकाचा निर्देश आहे (६.२३) ते सूत्र.

पहिल्या श्लोकातील प्रतिज्ञेसंबंधी हा विवाद उत्पन्न होण्याचे कारण असे की सहाव्या अध्यायात नाट्याच्या अंगांचा निर्देश करताना भरताने काव्याचा म्हणजे रूपकांचा मुळीच उल्लेख केला नाही. त्याने निर्देशिलेली सर्व अंगे नाट्यप्रयोगाच्या प्रक्रियेशी सबंद्ध अशी आहेत. काव्यनिर्मिती त्याहून भिन्न स्वरूपाची. तिचा विचार प्रस्तुत अध्यायात आहे. हा विचार अभिनव-गुप्त म्हणतो त्याप्रमाणे वाचिक अभिनयाचाच एक भाग आहे असे मानणे समाधानकारक वाटत नाही. प्राचीन टीकाकाराने म्हटल्याप्रमाणे ही नवीनच प्रतिज्ञा आहे असे समजणे अधिक योग्य वाटते.

**नामत इत्युद्देशेन, कर्मत इति लक्षणेन । क्रियते तेन विजातीयाद्व्यावृत्तिरिति कर्म लक्षणम् । प्रकृष्ट उचितो योगः परस्परसंबन्धो यथा प्रकरणनाटकलक्षणयोगात् नाटिकेति । वृत्तिविभागस्तु लक्षण एवानुप्रविष्ट इति नासौ प्रयोगः । तथा चेति तेनैव प्रयोगप्रकारेणान्योऽपि परस्परसंबन्धवैचित्र्यकृतो भेद उत्प्रेक्ष्य इत्यर्थः । प्रयोगाय प्रयोगत इति व्याख्याने प्रयोगत इति विफलमेव। उक्तव्याख्याने तु कोहलादिलक्षिततोटकसट्टकरासकादिसंग्रहः फलम् नाटिकाया उदाहरणत्वादिति ।**

नामतः म्हणजे नावनिर्देश करून, कर्मतः म्हणजे व्याख्या करून. त्याच्यामुळे विजातीय पदार्थापासून भिन्नता प्रस्थापित केली जाते म्हणून कर्म शब्दाचा व्याख्या असा अर्थ होतो. प्रकृष्ट म्हणजे उचित असा योग म्हणजे परस्परसंबंध (असा प्रयोग शब्दाचा अर्थ), जसे प्रकरण व नाटक यांच्या लक्षणांच्या परस्परसंबंधापासून नाटिका (निष्पन्न केली आहे). वृत्तींची भिन्न भिन्न योजना लक्षणांतच अंतर्भूत असल्यामुळे प्रयोग शब्दाचा वृत्ति-विभाग असा अर्थ समजता येत नाही. 'तथा च' म्हणजे त्याच प्रयोगप्रकाराने इतरही परस्पर-संबंधातील वैचित्र्यामुळे उत्पन्न होणाऱ्या भिन्न भिन्न प्रकारांची कल्पना करावी असा अर्थ आहे. 'प्रयोगतः' याचा अर्थ प्रयोगासाठी असा केल्यास 'प्रयोगतः' हा शब्द निरर्थक ठरेल. वर केलेल्या अर्थाप्रमाणे कोहलप्रभृतींनी वर्णिलेल्या तोटक, सट्टक, रासक इत्यादी प्रकारांचाही समावेश होईल; कारण, नाटिकेचा निर्देश केवळ उदाहरणासाठी केला आहे.

या परिच्छेदात अभिनवगुप्ताने नाट्यशास्त्राच्या श्लोकातील शब्दांचे अर्थ स्पष्ट केले आहेत. 'क्रियते इ०' कर्म शब्दाचा लक्षण म्हणजे व्याख्या असा अर्थ सिद्ध करण्यासाठी त्या शब्दाची व्युत्पत्ती दिली आहे. मुळात 'व्यावृत्तिः' नंतर 'इति' शब्द नाही. पण अर्थ स्पष्ट होण्यासाठी तो आवश्यक आहे. – 'प्रकृष्ट इ०' श्लोकातील 'प्रयोगतः' यातील प्रयोग शब्दाचा योग्य असा परस्परसंबन्ध हा नवीनच अर्थ येथे केला आहे. तसे करण्याचे कारण पुढे सांगितले आहे. – 'यथा प्रकरण इ०' पुढे ५२ व्या आर्येत प्रकरण व नाटक यांच्या संबन्धातून निष्पन्न होणाऱ्या नवीन रूपकप्रकाराचा निर्देश असून त्यापुढील तीन आर्यांमध्ये नाटिकेचे लक्षण दिले आहे. प्रयोग शब्दाच्या केलेल्या अर्थाच्या स्पष्टीकरणार्थ उदाहरण म्हणून त्याचा येथे निर्देश केला आहे. 'वृत्तिविभागस्तु इ०' प्रयोग शब्दाचा वृत्तिविभाग म्हणजे भारती, सात्त्वती, आरभटी व कैशिकी या चार वृत्तींपैकी कोणकोणत्या वृत्ती कोणत्या रूपकप्रकारात आवश्यक याचे निदर्शन असाही अर्थ संभवतो. पण तो प्रस्तुत ठिकाणी ग्राह्य मानता येत नाही. कारण रूपकाचे लक्षण सांगताना त्याला अनुरूप असलेल्या वृत्तींचा निर्देश त्यात अन्तर्भूत असतोच. – 'प्रयोगाय प्रयोगतः इ०' नेहमी-प्रमाणे प्रयोग शब्दाचा नाट्यप्रयोग असा अर्थ करून 'प्रयोगतः' म्हणजे नाट्यप्रयोगासाठी असे समजले तर ह्या शब्दाचा श्लोकात केलेला उपयोग निरर्थक ठरेल. अभिनवगुप्ताच्या म्हणण्याचा असा आशय दिसतो की नाट्यप्रयोगासाठी म्हणून मी रूपकांचे विवरण करणार आहे असे भरताने म्हणण्यात काहीच स्वारस्य नाही. रूपक हे प्रयोगासाठीच आहेत हे गृहीत धरले पाहिजे; कारण, सर्व प्रकारचे नाट्य प्रयोगावरच अधिष्ठित आहे. तेव्हा प्रयोग शब्दाचा नेहमीचा अर्थ केला, तर त्या-

पासून काही विशेष अर्थाचा लाभ होत नाही. – 'उक्तव्याख्याने' म्हणजे अभिनवगुप्ताने वर केलेल्या प्रयोग शब्दाच्या अर्थाप्रमाणे. – 'कोहलादि' कोहल हा भरतानंतर झालेला नाट्यशास्त्रावरील ग्रंथकार. त्याचा ग्रंथ सध्या उपलब्ध नाही. – तोटक, सट्टक व रासक यांची लक्षणे उत्तरकालीन साहित्यदर्पण आदीं ग्रंथांत आढळतात.

**नाटकं सप्रकरणमङ्को व्यायोग एव च।**
**भाणः समवकारश्च वीथी प्रहसनं डिमः ॥२॥**
**ईहामृगश्च विज्ञेयो दशमो नाट्यलक्षणे।**
**एतेषां लक्षणमहं व्याख्यास्याम्यनुपूर्वशः ॥३॥**

नाट्याच्या लक्षणात नाटक व प्रकरण, अङ्क त्याचप्रमाणे व्यायोग, भाण व समवकार, वीथी, प्रहसन, डिम आणि ईहामृग हे दहा प्रकार अन्तर्भूत आहेत असे जाणावे. आता मी ह्यांची लक्षणे क्रमवार स्पष्ट करून सांगतो.

**तत्रोद्देशं तावदाह नाटकमित्यादि । सप्रकरणमिति सहशब्देनाङ्कप्रवेशकसंध्यादिसाम्यं नाटकेन प्रकरणस्याह । नाम्नामर्थो लक्षण एव व्याख्यास्यते।**

**सत्यपिच पुराणादौ उपदेशदायिनि कर्मफलसंबन्धप्रदर्शके तत्रोच्चावचमनियतकविकन्थाप्रायम्, इह तु किंचित्प्रयोज्यं किंचित्सूच्यं किंचिदूह्यं किंचिदुपेक्ष्यमिति वैचित्र्ययोगः संध्यादिव्यवस्थेति दशरूपं सप्रयोजनमिति । एतत्तु फल्गुप्रायं फलम् । तत्पूर्वमेवोक्तं प्रत्यक्षतोदितरसावेशजनितनिर्वृतिसारत्वादस्येतिहासादेर्विशेष इति । ऊह्यसूच्यादिविभागास्त्वितिहासादावप्यस्त्येवेति । न च पाठफलं दशरूपकमपि तु प्रयोगपर्यन्तमेतादित्युक्तप्रायम् ।**

**तत्र महासामान्यरूपं काव्यलक्षणेऽध्याये कृतमित्यवान्तरसामान्यलक्षणमुद्देशानन्तरं वक्तव्यमिति दर्शयति । प्राक् च सामान्यलक्षणं ततो विशेषलक्षणानि चोद्देशक्रमेणेति चानुपूर्व्यार्थः ।**

त्यात प्रथम 'नाटकम्' इत्यादी श्लोकांत (रूपकांचा) नामनिर्देश करतात. 'सप्रकरणम्' यातील सह शब्दाने अंक, प्रवेशक, संधि इत्यादी बाबतींत प्रकरणाचे नाटकाशी साम्य आहे असे दाखवितात. (रूपकांच्या ह्या) नावांचे अर्थ लक्षण सांगताना स्पष्ट केले जातील.

हितकर उपदेश देणारे व कर्म आणि फल यांचा परस्परसंबन्ध दाखवून देणारे पुराण आदी ग्रंथ विद्यमान असले तरी त्यांत उत्कृष्ट-कनिष्ठ, कोणत्याही एकाच कवीची निर्मिती नसल्यामुळे प्रायः गोधडीवजा असे लिखाण असते. याउलट ह्या रूपकप्रकारांमध्ये काही

अंश प्रयोग करण्यास योग्य असतो, काही सूचित केला जातो, काहीचे अनुमान करावे लागते, तर काहींची उपेक्षा करावी लागते. अशा रीतीने वैचित्र्य उत्पन्न होते हे संधी आदींची व्यवस्था व प्रयोगसहित दशरूप यांच्या निर्देशावरून स्पष्ट आहे. परंतु (दशरूपकांचे) हे अगदी क्षुल्लक फल होय. त्यांचे खरे फल प्रत्यक्षपणे उदित झालेल्या रसाच्या आवेशामुळे उत्पन्न होणारा आनंद हेच ह्या दशरूपाचे सार होय, म्हणून तेच त्याची इतिहासादी ग्रंथांहून भिन्नता दाखविणारे वैशिष्ट्य होय असे पूर्वीच सांगितले आहे. शिवाय अनुमान करावयाचा, सूचित होणारा अंश इत्यादी प्रकार इतिहासादी ग्रंथांतही असतातच. आणि दशरूपकाचे फल केवळ पठन केल्याने प्राप्त होणारे असे नसून ते प्रयोगाच्या परिणामी उत्पन्न होते हे सांगितलेलेच आहे.

त्यात (सर्व काव्यांना लागू होणारे) सर्वसामान्य लक्षण काव्यलक्षण नावाच्या अध्यायात केले आहे, तेव्हा आता (रूपकांनाच लागू होणारे) परिमित सामान्य लक्षण नामनिर्देशानंतर सांगणे आवश्यक आहे हें दाखवितात. प्रथम सामान्यलक्षण आणि नंतर रूपकांची क्रमानुसार विशेष लक्षणे असा 'अनुपूर्वशः' ह्या शब्दाचा अर्थ आहे.

'सत्यपि इ०' या परिच्छेदात कोणा प्राचीन टीकाकाराने पुराणादी ग्रंथ व दशरूपक यांच्यातील भेदाचे केलेले विवेचन उद्धृत करून अभिनवगुप्ताने तशा प्रकारचा भेद अग्राह्य ठरविला आहे व त्याबाबतीतील आपले स्वतःचे मत मांडले आहे. – 'उच्चावचम्' म्हणजे काही अंश रोचक तर काही रसहीन. – 'अनियतकविकन्थाप्रायम्' यावरून असे दिसते की ह्या टीकाकाराच्या मते पुराण कोणा एकाच कवीची रचना नसून अनेक कवींची कृती मिळून ती एक गोधडी बनली आहे. हे मत आधुनिक संशोधकांच्या मताशी जुळते असे आहे. – 'दशरूपं सप्रयोजनम्' यातील प्रयोजन शब्द प्रयोग ह्या अर्थी वापरला आहे असे दिसते. दोहोत एकच धातू आहे आणि पुढील (१८.४) श्लोकात 'दशरूपं प्रयोगतः' असेच म्हटले आहे. नेहमीच्या अर्थाने प्रयोजन शब्दाचा येथे उपयोग अस्थानी होय. – 'प्रत्यक्षतोदित- इ०' समासाचा विग्रह 'प्रत्यक्षतया उदितः इ०' असा आहे. रसनिष्पत्तीच्या प्रक्रियेचे व त्यामुळे होणाऱ्या आनंदाचे प्रदीर्घ विवेचन सहाव्या रसाध्यायावरील अभिनवभारतीत केले आहे. – 'इति। ऊह्यसूच्यादि-' ही मुळातील 'इत्यूह्यम् सूच्यादि-' ची दुरुस्ती आहे. ती उघडच आवश्यक आहे. – 'अपि तु' यातील 'तु' मुळात नाही, पण तो अर्थासाठी आवश्यक असल्यामुळे घातला आहे. – 'प्रयोगपर्यन्तम्' यातील 'पर्यन्त' चा शेवट असा शब्दशः अर्थ समजण्याचे कारण नाही. परिणाम असा अर्थ अधिक समर्पक वाटतो.

'काव्यलक्षणेऽध्याये' सोळाव्या अध्यायाचे काव्यलक्षण असे नाव आहे व त्यात सर्वसामान्य काव्याची लक्षणे, अलंकार, गुण, दोष इत्यादींचे विवेचन आहे. – 'अवान्तरसामान्य' म्हणजे काव्यान्तर्गत दशरूपक. – 'प्राक् च ... आनुपूर्व्यर्थः' यात श्लोकातील 'अनुपूर्वशः' शब्दाला उद्देशून केलेले विधान आहे.

**सर्वेषामेव काव्यानां मातृका वृत्तयः स्मृताः ।**
**आभ्यो विनिःसृतं ह्येतद्दशरूपं प्रयोगतः ॥४॥**

सर्वच काव्यांचे उद्गमस्थान (चार) वृत्ती होत असे मानले आहे; कारण हे दहा रूपक प्रकार प्रयोगाच्या उद्देशाने ह्यांच्यापासून निष्पन्न झाले.

**तत्र सामान्यलक्षणमाह सर्वेषामेव काव्यानां मातृका इति । तत्र केचिदाहुः वृत्तिप्रभवत्वं दशरूपकस्य सामान्यलक्षणम्, वृत्तीनां तदङ्गानां चानभिनेयकाव्येष्वसंभवात् । एतच्चासत् । आस्तां काव्यार्थः, सर्वो हि संसारो वृत्तिचतुष्केण व्याप्त इत्युक्तं प्रथम एवाध्यायेऽस्माभिः । यदि चाभिनेयविषय एव वृत्तिव्यवहारः, तदा वृत्त्यध्याये यद्वृत्तीनां समुत्थाननिरूपणं 'यां यां वृत्तिषु संश्रिताम्' इत्यादि तत्सर्वमसंगतम् । भगवतो हि नाभिनेतृता, किंतु स्वचेष्टावेशमात्रम् । सर्वशब्दे च प्रकृतनाटकादिविषये वर्ण्यमाने प्रथमं श्लोकार्धं पुनरुक्तार्थमेव । यत्तु 'स्वनामधेयैर्भरतैः' इति, 'बहुगीतनृत्तवाद्या' इति, 'वागङ्गाभिनयवती' इति च भरतव्यवहारो गीताभिनययोगश्च नानभिनेय इति तदप्यकिंचित्करम् । तावाद्धि न वृत्तीनां लक्षणम् । 'या वाक्प्रधाना' इत्येतावदेव भारत्या लक्षणम्, अन्यत्तु प्रयोगदर्शनामिति तत्रैव व्याख्यास्यामः । वृत्त्यङ्गान्यपि सर्वकाव्येषु सन्त्येव ।**

त्या संबन्धात 'सर्वेषामेव काव्यानां मातृकाः' इत्यादी श्लोकात सामान्य लक्षण सांगतात. याविषयी काही टीकाकारांचे म्हणणे आहे की वृत्तींपासून उत्पत्ती हे (फक्त) दशरूपकाचेच सामान्य लक्षण आहे, कारण ज्यांचा अभिनय करता येण्यासारखा नाही अशा काव्यप्रकारांत वृत्ती आणि त्यांची अंगे संभवनीय नाहीत. पण हे म्हणणे बरोबर नाही. काव्याचा विषय तर राहूच द्या, पण संपूर्ण संसारच चार प्रकारच्या वृत्तींनी व्यापलेला आहे हे आम्ही पहिल्याच अध्यायात सांगितले आहे. आणि जर वृत्तींचा व्यवहार अभिनयास योग्य अशा काव्यांतच होतो असे मानले तर वृत्तिविषयक अध्यायातील 'यां यां वृत्तिषु संश्रिताम्' इत्यादी वचनांत वृत्तींच्या निर्मितीचा जो निर्देश आहे तो असंगत ठरेल. कारण भगवान् विष्णूची अभिनय करणाऱ्याची भूमिका नव्हती, तर तो केवळ त्याच्या स्वाभाविक चेष्टांचा आविष्कार होता. आणि 'सर्व' शब्दाने प्रस्तुत नाटकादी रूपकांचाच निर्देश अभिप्रेत असेल तर श्लोकाचा पहिला अर्धा अंश पुनरुक्तच होईल. आणि (वृत्तींच्या वर्णनातील) 'स्वनामधेयैर्भरतैः', 'बहुगीतनृत्तवाद्या' आणि 'वागङ्गाभिनयवती' ह्या वचनांत निर्देशिलेला नटांचा व्यापार आणि गीत व अभिनय यांचा उपयोग अभिनयास अयोग्य असलेल्या काव्यात नाही असे जे म्हटले आहे ते सुद्धा निरुपयोगी आहे. कारण, तेच काही वृत्तींचे लक्षण नाही. 'या

वाक्प्रधाना' एवढेच भारती वृत्तीचे लक्षण होय, इतर गोष्टी प्रयोगाच्या सोयीसाठी सांगितल्या आहेत हे आम्ही त्या ठिकाणीच स्पष्ट करू. आणि वृत्तींची अंगे सुद्धा सर्व काव्यांमध्ये विद्यमान असतातच.

'केचिदाहुः' ह्या टीकाकारांच्या मते वृत्तींपासून उत्पत्ती फक्त रूपकांचीच होते, अभिनय करण्यास अयोग्य अशा इतर प्रकारांची नाही. हे मत अभिनवगुप्ताने विस्तृतपणे खोडून काढले आहे. – 'अनभिनेयकाव्येषु' हा दुरुस्त करून घेतलेला पाठ आहे. मुद्रित पाठ 'अभिनये काव्येषु' असा आहे, तर हस्तलिखितात 'अभिनयकाव्येषु' असा पाठ आहे. सर्व विवेचन लक्षात घेता केलेल्या दुरुस्तीच्या आवश्यकतेबद्दल शंका राहात नाही. – 'उक्तं प्रथम एवाध्याये' पहिल्या अध्यायातील 'भारतीं सात्त्वतीं चैव' इत्यादी ४१ व्या श्लोकाची व्याख्या करताना अभिनवगुप्ताने असे म्हटले आहे की पुरुषार्थचतुष्टयाच्या सिद्धीसाठी वाचिक, मानसिक व शारीरिक व्यापार आवश्यक आहेत, आणि हे तीन प्रकारचे व्यापार म्हणजेच अनुक्रमे भारती, सात्त्वती आणि आरभटी ह्या तीन वृत्ती होत. हा व्यापार सौष्ठवयुक्त व सौन्दर्यमय झाला म्हणजे कैशिकी वृत्ति निष्पन्न होते. याप्रमाणे सर्व संसार वृत्तींनी व्याप्त आहे ही गोष्ट अभिनवगुप्ताने त्या ठिकाणी स्पष्ट केली आहे. – 'यां यां वृत्तिषु इ०' संपूर्ण श्लोक असा आहे –

**यां यां देवः समाचष्टे क्रियां वृत्तिषु संस्थिताम् ।**
**तां तदर्थानुगैर्जप्यैर्द्रुहिणः प्रत्यपूजयत् ॥ (२०.१५).**

यात विष्णूच्या स्वाभाविक क्रियाच वृत्तिरूप होत्या असे म्हटले आहे. या श्लोकात मुद्रित पाठ संस्थिताम्' असा आहे. अभिनवगुप्ताने प्रस्तुत ठिकाणी 'संश्रिताम्' असा पाठ दिला आहे. – 'प्रथम श्लोकार्धे' हा थोडा दुरुस्त केलेला पाठ आहे. मुळात 'प्रथमश्लोकार्धे' असा सामासिक पाठ आहे. दुरुस्ती अर्थ स्पष्ट होण्यासाठी आवश्यक आहे हे उघड आहे. – 'पुनरुक्तार्थमेव' कारण, द्वितीयार्धात दशरूपकांच्या उत्पत्तीचा निर्देश आहे; तेव्हा प्रथमार्धातील 'सर्व काव्ये' याचा 'दशरूपक' एवढाच अर्थ केला तर दोन्ही अर्धांत एकच अर्थ निष्पन्न होऊन पुनरुक्ती झाल्यासारखे होईल. 'स्वनामधेयैः इ०' विसाव्या वृत्त्यध्यायात भारती वृत्तीचे वर्णन पुढीलप्रमाणे आहे –

**या वाक्प्रधाना पुरुषप्रयोज्या स्त्रीवर्जिता संस्कृतपाठ्ययुक्ता ।**
**स्वनामधेयैर्भरतैः प्रयुक्ता सा भारती नाम भवेत्तु वृत्तिः ॥ (२०.२६).**

भरत म्हणजे नट. ते ह्या वृत्तीचा उपयोग करतात यावरून ही भारती वृत्ति अभिनययोग्य काव्याशीच संबद्ध आहे हे सिद्ध होते असा ह्या टीकाकारांचा युक्तिवाद आहे. – 'बहुगीत- इ०' कैशिकी वृत्तीचे वर्णन असे आहे –

**या श्लक्ष्णनेपथ्यविशेषचित्रा स्त्रीसंयुता या बहुनृत्तगीता ।**
**कामोपभोगप्रभवोपचारा तां कैशिकीं वृत्तिमुदाहरन्ति ॥ (२०.५३)**

गीतांच्या निर्देशावरून ही वृत्ति प्रयोगाशी संबद्ध आहे असे ह्या टीकाकारांचे म्हणणे आहे. ह्या श्लोकात 'बहुनृत्तगीता' एवढेच आहे, पण अभिनवगुप्ताने या ठिकाणी 'बहुगीतनृत्यवाद्या' अशा स्वरूपात ते वचन उद्धृत केले आहे. बडोदे येथील प्रतीत वरील श्लोकानंतर ह्याच वृत्तीच्या वर्णनपर आणखी दोन श्लोक दिले आहेत, त्यांपैकी एकात 'बहुवाद्यनृत्तगीता' असे वचन आहे. पण ते दोन्ही श्लोक निःसंशय प्रक्षिप्त आहेत. त्यांच्यावर अभिनवगुप्ताची टीका नाही. तेव्हा त्याने हे अवतरण त्या श्लोकातून घेतले असण्याची शक्यता नाही. – 'वागङ्गाभिनयवती' सात्त्वती वृत्तीचे वर्णन पुढील आर्येत आहे –

**वागङ्गाभिनयवती सत्त्वोत्थानवचनप्रकरणेषु।**
**सत्त्वाधिकारयुक्ता विज्ञेया सात्त्वती वृत्तिः॥(२०.४२).**

ह्या वृत्तीचा तर अभिनयाशी साक्षात् संबंध प्रस्थापित केला आहे. तेव्हा ह्या वृत्तीपासून अभिनेय काव्यच उत्पन्न होते असे हे टीकाकार म्हणतात. – 'नानभिनेय' मुद्रित प्रतीतील 'नानाभिनेय' हा मुद्रणदोष असावा. 'अनभिनेये' असा सप्तम्यन्त शब्द अभिप्रेत आहे. 'काव्ये' हे त्याचे विशेष्य. – 'तावद्धि न इ०' यातील 'न' मुळात नाही; पण अर्थासाठी तो आवश्यक असल्यामुळे तो घातला आहे. अभिनवगुप्ताचे म्हणणे असे की वृत्तींच्या वर्णनांतून टीकाकारांनी उद्धृत केलेली वचने ही काही त्या वृत्तींच्या लक्षणांचा प्रधान भाग नाही. भारतीचे लक्षण 'वाक्प्रधाना' या वचनातच समाविष्ट आहे, इतर सर्व प्रयोगासाठी उपयुक्त अशी माहिती आहे. – 'प्रयोगदर्शनम्' हा हस्तलिखितातील पाठ आहे. छापील पाठ 'प्रयोगप्रदर्शनम्' असा आहे. – 'वृत्त्यङ्गानि' प्रत्येक वृत्तीची चार चार अंगे आहेत. त्यांचे वर्णन विसाव्या अध्यायात आहे.

**नन्वेवं वृत्तिजत्वं कथं दशरूपकलक्षणम्। उच्यते। प्रयोगत इत्येतदर्थकमेव। तदयमर्थः – यद्यपि सर्वेषामभिनेयानभिनेयानां काव्यानां वृत्तयश्चेष्टा मातर इव, ताभ्योऽपि वाच्यरूपत्वेन कविहृदये व्यवस्थिताभ्यः काव्यमुत्पद्यते, तथापि प्रयोगं प्रयुज्यमानतां प्रयोगयोग्यत्वमभिसंधाय वृत्तिभ्यो विनिःसृतमभिनेयं काव्यम्। प्रत्यक्षभावनायोग्यवृत्तिचतुष्टयाभिधायकत्वं दशरूपसामान्यलक्षणमित्यर्थः।**

यावर आक्षेप – असे असेल तर वृत्तींपासून उत्पत्ती हे दशरूपकाचे लक्षण असे कसे म्हणता येईल? कसे ते सांगतो. प्रयोगतः म्हणजे ह्या प्रयोगासाठीच (हे लक्षण केले आहे). तेव्हा याचा अर्थ असा – जरी अभिनयास योग्य व अभिनयास अयोग्य अशा सर्व प्रकारच्या काव्यांना वृत्ती म्हणजे चेष्टा मातृसदृश आहेत आणि वाच्य स्वरूपात कवीच्या हृदयात प्रस्थापित झालेल्या त्या वृत्तींपासून (सर्व प्रकारचे) काव्य प्रसव पावते, तरी प्रयोग म्हणजे प्रयुज्यमानता अथवा प्रयोगयोग्यता ह्याच्या अनुरोधानेच अभिनेय काव्य वृत्तींपासून उत्पन्न होते. एकूण अर्थ असा की प्रत्यक्ष भावित होण्यास योग्य असा चार वृत्तींचा आविष्कार हे दशरूपाचे सामान्य लक्षण होय.

'एवं' म्हणजे वृत्तींपासून सर्वच प्रकारचे काव्य उत्पन्न होते असे मानले तर. – वृत्तिजत्वं इ०' हे श्लोकाच्या द्वितीयार्धात सांगितले आहे. – 'प्रयोगम् अभिसंधाय' ही श्लोकातील 'प्रयोगतः' शब्दाची व्याख्या आहे आणि प्रयोग शब्दाचा प्रयुज्यमानता किंवा प्रयोगयोग्यता असा अर्थ केला आहे. मुद्रित पाठ 'प्रयुज्यमानत्वात्' असा आहे. त्यापेक्षा हस्तलिखितातील 'प्रयुज्यमानतां' हा पाठच अधिक योग्य वाटतो. – 'प्रत्यक्षभावनायोग्य- इ०' ही भावना प्रयोग पहाणाऱ्या प्रेक्षकांना होते.

**दशानां नाटकादीनां रूपमिति षष्ठीसमासः। अन्ये त्वाहुः। एकैकस्य रूपकस्य दश दश रूपाणि संभवन्ति। तथा च वीथ्यङ्गानां सर्वत्र संभवः । परगतवचनानुभाषणरूपभाणयोगश्च किं ब्रवीषीत्याकाशभाषिते। एवमन्यदपि। तेन दश रूपाणि यस्य तद्दशरूपं काव्यमित्यर्थः। अत एव न सकलः प्रबन्धो नाटकम्, अपि तु प्रबन्धस्य किंचिद्रूपम्। तल्लक्षणांशबाहुल्यात्तु तद्व्यपदेशयोगः । अत एव न दशसंख्या विभागार्था येन सट्टकादीनां त्यागः स्यात्। तत्रापि हि दशरूपलक्षणयोगोऽस्त्येव। एतच्च स्वावसरेषु वितनिष्यामः।**

नाटक इत्यादी दहा प्रकारांचे रूप या अर्थी दशरूप हा षष्ठीतत्पुरुष समास आहे. पण इतर टीकाकार म्हणतात – एकेका रूपकाची दहा दहा रूपे संभवतात. उदाहरणार्थ, वीथीची अंगे सर्व प्रकारात संभवतात. तसेच, दुसऱ्याचे वचन उद्धृत करून त्यावर वक्तव्य करण्याची भाणाची विशेषता (इतर प्रकारांतही) आकाशभाषितात आढळते. याचप्रमाणे इतर प्रकारही संभवतात. म्हणून 'दहा रूपे आहेत ज्याची' ते दशरूप काव्य असा अर्थ आहे. म्हणूनच नाटक म्हणजे सर्व प्रबंध नव्हे, तर प्रबन्धाचा काही भागच. पण नाटकाच्या लक्षणातील बहुतांश त्यात असल्यामुळे ते नाव दिले जाते. म्हणूनच दहा ही संख्या विभाग दाखविणारी नाही की ज्यायोगे सट्टक आदी प्रकारांचा समावेश होणार नाही. कारण, त्यांनाही दशरूपाची लक्षणे लागू पडतात. आणि हे आम्ही योग्य वेळी स्पष्ट करून दाखवू.

'षष्ठीसमासः' पहिल्या श्लोकावरील टीकेत दशरूप हा द्विगु समास असल्याचे एका प्राचीन टीकाकाराचे मत उद्धृत केले आहे. ते अभिनवगुप्ताला अमान्य होते असे निश्चित म्हणता येत नाही. दोन ठिकाणी दशरूप समासाचे दोन निरनिराळे विग्रह त्याला अभिप्रेत असणे असंभाव्य नाही. – 'एकैकस्य इ०' या टीकाकारांचे म्हणणे असे की कोणताही रूपकप्रकार घेतला तरी त्यात दहाही रूपकप्रकारांचे अंश विद्यमान असतात. उदाहरणार्थ, नाटकात वीथ्यङ्गे असतात म्हणजे त्या स्वरूपात वीथी विद्यमान असते, आकाशभाषिताच्या रूपाने भाण विद्यमान असतो, इत्यादी. त्यांच्या मते दशरूप हा बहुव्रीहि समास होय. – 'न सकलः प्रबन्धो नाटकम्' ज्या काव्याला 'नाटक' संज्ञा दिली जाते, त्यात इतर नऊ रूपकप्रकारांचे अंशही विद्यमान असतात; म्हणून सर्वच्या सर्व काव्य 'नाटक' नसते. केवळ त्यात नाटकाची लक्षणे मुख्यत्वेकरून असतात म्हणून त्याला नाटक ही संज्ञा देतात. – 'दशसंख्या विभागार्था' हा हस्तलिखितातील

पाठ आहे. मुद्रित प्रतीत 'दशसंख्याविभागार्थो' असा पाठ आहे. त्याने अर्थबोध होत नाही. त्याचप्रमाणे वर '-वचनानुरूपभाषणरूपभाण-' या मुद्रित पाठातील पहिला -रूप- शब्द हस्तलिखितात नाही. तो अनावश्यक असल्यामुळे हस्तलिखिताचाच पाठ स्वीकारला आहे. – ह्या टीकाकारांचे मत अभिनवगुप्ताला मान्य होते असे म्हणता येत नाही. दशरूप समासाचा त्याने भिन्न विग्रह करून दाखविला आहे. आणि प्रत्येक रूपकप्रकारात इतर नऊ प्रकारही विद्यमान असतात हे मत सामान्यपणे मान्य होण्यासारखे नाही. तथापि त्या टीकाकारांनी केलेले शेवटचे विधान की दहा ही संख्या परिमाण निश्चित करणारी नाही ते अभिनवगुप्ताला मान्य होते, किंबहुना तसा त्याचा आग्रह आहे यात शंका नाही.

**जातिभिः[1] श्रुतिभिश्चैव स्वरा ग्रामत्वमागताः।**
**यथा तथा वृत्तिभेदैः काव्यबन्धा भवन्ति हि ॥५॥**

ज्याप्रमाणे (संगीतात) जाती व श्रुती ह्यांच्या (भिन्नते) मुळे स्वरांना (भिन्न) ग्रामत्व प्राप्त होते त्याप्रमाणे वृत्तींच्या भेदांमुळे (भिन्न भिन्न) काव्यबंध निर्माण होतात.

**ननु प्रयोगयोग्यचेष्टाप्रतिपादकत्वं चेत्सामान्यलक्षणं तर्हि चेष्टातिरिक्तस्य कस्यचिदसंभाव्यत्वान्नास्त्येव विशेषलक्षणमेषामित्याशङ्काशमनं विशेषलक्षणावकाशं दर्शयितुमाह जातिभिः श्रुतिभिश्चेत्यादि। दृष्टान्तेन प्रकृतं घटयन् व्युत्पादनीयमपि व्युत्पादयतीति समानतन्त्रसिद्धमेव दृष्टान्तमदीदृशत्। स्वरेषु ग्रहादिदशकविभागनियता जातिः। रक्तोऽरक्तो वा ध्वनिर्ध्वनिस्थानं तदन्तरालं च श्रुतिः, कर्माधिकरणकरणव्युत्पत्त्याश्रयात्। स्त्रियाः खलनाविति हि नादृतं लक्ष्ये। तत्र षाड्जीप्रभृतयो जातयः सप्त, पञ्चमस्य चतस्रः श्रुतयो धैवतस्य तिस्र इति षड्जग्रामः। गान्धार्याद्या एकादश जातयः, पञ्चमस्त्रिश्रुतिर्धैवतस्तु चतुःश्रुतिरिति मध्यमग्रामः।**

प्रयोगाला योग्य अशा चेष्टांचा आविष्कार हेच जर दशरूपकांचे सामान्यलक्षण असेल तर चेष्टांशिवाय इतर कोणतीही गोष्ट संभाव्य नसल्याकारणाने ह्यांचे विशेषलक्षण असूच शकत नाही या शंकेचे समाधान करून विशेषलक्षणाला अवकाश आहे हे 'जातिभिः श्रुतिभिश्च' इत्यादी श्लोकाने दाखवितात. विवेचनाचा विषय असलेल्या गोष्टीचा दृष्टान्ताशी सांगड घालणारा (वक्ता) ज्याला बोध करावयाचा त्याला बोध सुद्धा करू शकतो म्हणून समान विषय असलेल्या शास्त्रातील दृष्टान्त देतात. स्वरांच्या संबंधात ग्रह वगैरे दहा भेदांनी निश्चित झालेली ती जाति. रागयुक्त अथवा रागरहित असा ध्वनी, ध्वनीचे स्थान आणि त्यामधील अवकाश म्हणजे श्रुति, – कर्म, अधिकरण आणि करण यांच्या द्वारा व्युत्पत्तीच।

१ नि एतेषां चातिभिश्चैव.

आधार घेऊन. रूप सिद्ध करताना 'स्त्रियाः खल्नौ' ह्या वार्तिकाकडे दुर्लक्ष केले आहे. त्यांत षाड्जीप्रभृती सात जाती, पञ्चमाच्या चार श्रुती, धैवताच्या तीन असे षड्जग्रामात असते. गान्धारीप्रभृती अकरा जाती, तीन श्रुती असलेला पञ्चम, पण चार श्रुतींचा धैवत असे मध्यमग्रामात असते.

'नास्त्येव विशेष- इ०' वर म्हटल्याप्रमाणे प्रयोगक्षम चेष्टांचा आविष्कार हे दशरूपकांचे सामान्य लक्षण ठरले तर प्रत्येक रूपकाच्या विशेषलक्षणाला काही अवकाश राहाणार नाही अशी शंका उद्भवण्याचे जे कारण दिले आहे – चेष्टा खेरीज करून दुसरी कोणतीही गोष्ट संभवत नाही म्हणून – ते तितकेसे समर्पक वाटत नाही. चेष्टांच्या भिन्न भिन्न स्वरूपामुळे निरनिराळे रूपकप्रकार उद्भवू शकतील असे सहज सुचण्यासारखे आहे आणि श्लोकावरील टीकेत अभिनवगुप्ताने हीच गोष्ट स्पष्ट करून शंकेचे निरसन केले आहे. – 'दृष्टान्तेन प्रकृतं घटयन्' म्हणजे जो कोणी चर्चेचा विषय असलेल्या गोष्टीची दृष्टान्ताशी सांगड घालतो तो. 'व्युत्पादनीयम्' म्हणजे ज्याला व्युत्पत्ती म्हणजे बोध अथवा उपदेश करावयाचा आहे असा मनुष्य. – 'समानतन्त्र' संगीतशास्त्र हे नाट्यशास्त्राच्या दृष्टीने समान विषय असलेले असे शास्त्र आहे. – 'ग्रहादिदशक' अठ्ठाविसाव्या अध्यायात जातींच्या ह्या दहा विभागांचा निर्देश आहे –

**ग्रहांशौ तारमन्द्रौ च न्यासोऽपन्यास एव च।**
**अल्पत्वं च बहुत्वं च षाडवौडविते तथा॥** (२८.६६).

जाति म्हणजे सामान्यपणे संगीतातील राग. – 'रक्तोऽरक्तो इ०' या वाक्यात श्रुति शब्दाचे तीन अर्थ दिले आहेत – ध्वनी, ध्वनीचे स्थान आणि ध्वनींमधील अंतर. ध्वनी दो‍ प्रकारचा असल्याचे म्हटले आहे – रागयुक्त व रागरहित. 'ध्वनिस्थानं' हा हस्तलिखितातील पाठ आवश्यक आहे. 'ध्वनिः स्थानं' हा मुद्रित पाठ चुकीचा वाटतो. – 'कर्माधिकरण- इ०' यात श्रुति शब्दाचे हे तीन अर्थ तीन निरनिराळ्या व्युत्पत्तींनी संभवतात हे सांगितले आहे. श्रु धातूचे कर्म म्हणून 'श्रूयते असौ श्रुतिः' ह्या व्यत्पत्तीने ध्वनि असा अर्थ निष्पन्न होतो. 'श्रूयते अस्मिन् इति श्रुतिः' यात अधिकरणार्थी सप्तमीने ध्वनिस्थानाचा बोध होतो. आणि 'श्रूयते अनेन इति श्रुतिः' यातील करणार्थी तृतीयेने अन्तरालाचा बोध होतो. – 'स्त्रियाः खल्नौ विप्रतिषेधेन' असे पाणिनींच्या ३.३.१२६ ह्या सूत्रावर वार्त्तिक आहे. खल् प्रत्यय लागल्यास श्रुपासून श्रव शब्द सिद्ध होईल आणि अन लागल्यास श्रवण शद्व सिद्ध होईल. अभिनवगुप्ताचे म्हणणे असे दिसते की ह्या रूपांचा उपयोग केला नाही याचा अर्थ ह्या वार्त्तिकाकडे दुर्लक्ष केले आहे. – 'लक्ष्य' म्हणजे श्रु धातूपासून बनवावयाचे रूप. – 'षाड्जीप्रभृतयः' षड्जग्रामातील सात जातींची नावे पुढीलप्रमाणे आहेत – षाड्जी, आर्षभी, धैवती, निषादवती, षड्जोदीच्यवा, षड्जकैशिकी आणि षड्जमध्यमा (२८.४०-४१). – 'गान्धार्याद्याः' मध्यमग्रामातील अकरा जातींची नावे गान्धारी, मध्यमा, गान्धारोदीच्यवा, पञ्चमी, रक्तगान्धारी, गान्धारपञ्चमी, मध्यमोदीच्यवा, नन्दयन्ती, कर्मारवी, आन्ध्री आणि कैशिकी अशी आहेत (२८.४२-४३). या सर्वांची विस्तृत माहिती अठ्ठाविसाव्या अध्यायात दिली आहे.

**वस्तुतस्तु षड्जसमुदायो ग्रामः। तत्र स्वरा इति श्रुतिपक्षे बहुवचनं लक्ष्यविदः समर्थयन्ति। मध्यमग्रामे पञ्चमपरित्यक्तां श्रुतिं धैवत एवोपभुङ्क्त इत्यत्र**

**प्रमाणाभावात्सर्व एव द्वित्रिश्रुतिकाः श्रुत्युत्कृष्टतया समधिकश्रुतयः क्रियन्ते, काकल्यन्तराभ्यां च चतुस्त्रिश्रुतयो न्यूनश्रुतय इति सर्वस्वराणां श्रुतिकृतं वैचित्र्यमस्तीति । एतच्च स्वावसरे वक्ष्याम इत्यास्ताम् ।**

स्वरे म्हणजे षड्ज आदी स्वरांच्या समुदायाला ग्राम म्हणतात. त्यात श्रुतींच्या संबंधात 'स्वराः' यातील बहुवचनाचे समर्थन लक्ष्य जाणणारे पुढीलप्रमाणे करतात. मध्यमग्रामात पंचमस्वराने त्याग केलेली श्रुति धैवतस्वरच स्वतःत अन्तर्भूत करतो याबद्दल काही प्रमाण नसल्यामुळे दोन किंवा तीन श्रुती असलेल्या सर्वच स्वरांत श्रुतीच्या उत्कर्षाने अधिक श्रुती उत्पन्न केल्या जातात आणि काकली व अन्तर यांच्या द्वारा चार किंवा तीन श्रुती असलेले स्वर कमी श्रुतींनी युक्त होतात, तेव्हा सर्वच स्वरांत श्रुतींच्या मुळे उत्पन्न झालेले वैचित्र्य असते. आणि हे आम्ही योग्य प्रसंगी स्पष्ट करू, तेव्हा तूर्त हे राहू द्या.

'स्वरा इति श्रुतिपक्षे बहुवचनम् इ०' याचा अर्थ असा असावा – श्रुतींच्या बाबतीत विचार करता षड्जग्राम आणि मध्यमग्राम यांतील फरक फक्त पंचम व धैवत या दोन स्वरांपुरताच मर्यादित आहे. षड्जग्रामात पंचम चतुःश्रुति व धैवत त्रिश्रुति तर मध्यमग्रामात पंचम त्रिश्रुति व धैवत चतुःश्रुति असे असते. तेव्हा ह्या दोनच स्वरांचा श्रुतींच्या संबंधात विचार आवश्यक असता श्लोकातील 'स्वराः' ह्या बहुवचनाची उपपत्ती कशी लावावयाची, 'स्वरौ' असे द्विवचन अपेक्षित आहे अशी शंका घेतली गेली असे दिसते. – 'लक्ष्यविदः' लक्ष्य म्हणजे ज्याचे लक्षण करावयाचे तो पदार्थ, प्रस्तुत संदर्भात स्वर, श्रुति इत्यादी. लक्ष्यविदः म्हणजे ह्यांचे स्वरूप जाणणारे विद्वान. – 'पञ्चमपरित्यक्तां श्रुतिं' मध्यमग्रामात पंचमात चार श्रुती ऐवजी तीनच श्रुती असतात, तेव्हा तो स्वर एका श्रुतीचा त्याग करतो असे म्हणता येईल. – 'धैवत एव इ०' मध्यमग्रामात धैवतात तीन ऐवजी चार श्रुती असतात. पण ही अधिक आलेली श्रुति म्हणजे पंचमातून वगळलेली श्रुतिच होय असे मानण्याला आधार नाहीः ह्यावरून असे अनुमान काढले आहे की स्वरांतील श्रुती कमी अधिक होणे ही गोष्ट पंचम व धैवत ह्या दोन स्वरांपुरतीच मर्यादित नाहीं. – 'द्वित्रिश्रुतिकाः श्रुत्युत्कृष्टतया' हा संपादकांनी दुरुस्त केलेला पाठ आहे व तो आवश्यक वाटतो. कारण, मुळातील 'द्वित्रिश्रुतिकास्तया' मधील 'तया' चा काही अर्थ लागत नाही. शिवाय, अठ्ठाविसाव्या अध्यायात उत्कर्षामुळे स्वरातील श्रुतींची संख्या वाढते आणि अपकर्षामुळे ती कमी होते असे म्हटले आहे. – 'काकल्यन्तराभ्याम्' अठ्ठाविसाव्या अध्यायातील विवेचनावरून असे दिसते की दोन श्रुती असलेल्या निषाद व गान्धार या स्वरांतील श्रुतींचा प्रकर्ष झाला म्हणजे निषादाला काकली संज्ञा प्राप्त होते व गान्धाराला अन्तर अशी संज्ञा – 'एवं निषाद काकलीसंज्ञो गान्धारश्चान्तरसंज्ञो भवति' (२८.३४ नंतरचे गद्य). पण प्रस्तुत ठिकाणी असे विधान केलेले दिसते की चार व तीन श्रुती असलेल्या स्वरांत श्रुतींचा अपकर्ष होऊन दोनच श्रुती अवशिष्ट राहातात तेव्हा ते स्वरही काकली व अन्तर यांसारखे होतात. – 'सर्वस्वराणां इ०' याचा अर्थ असा की केवळ पंचम व धैवत या दोन स्वरांतच श्रुतींतील बदलामुळे वैचित्र्य उत्पन्न होते असे नसून सर्व स्वरांच्या बाबतीत ते उत्पन्न होऊ शकते. म्हणून 'स्वराः' ह्या शब्दातील बहुवचन समर्थनीय ठरते.

इह त्वनेन दृष्टान्तेनैतदुक्तं भवति । स्वरसमुदायरूपत्वाविशेषेऽपि स्वराणां पर्यायतः प्राथम्यप्राधान्याल्पत्वभूयस्त्वपूर्णत्वापूर्णत्वारोहावरोहान्त्यत्वमध्यत्वादिप्रविभागभेदैर्यथान्यः षड्जग्रामोऽन्यो मध्यमग्रामः, तथैव वृत्तीनां स्वरस्थानीयानां प्राथम्यप्राधान्यादिना दशकेन रूपकं रूपकान्तराद्भिद्यते। यथा चतुःश्रुतिः पञ्चमस्त्रिश्रुतिश्च भवन् ग्रामान्यत्वं करोति, तथा सैव वृत्तिः श्रुतिस्थानीयैरङ्गैः क्वचित्संपूर्णा क्वचिदूनेत्येवमपि रूपकविभाग इत्येतत् जातिभिः श्रुतिभिरिति द्वयेन दर्शितम् ।

प्रस्तुत श्लोकात ह्या दृष्टान्ताने पुढीलप्रमाणे अर्थ सिद्ध केला आहे. ज्याप्रमाणे (दोन्ही ग्रामांचे) स्वरांचा समुदाय हे स्वरूप उभयतांना समान असले तरी कार्यवशात् स्वरांच्या प्राथम्य, प्राधान्य, अल्पत्व, भूयस्त्व, पूर्णत्व, अपूर्णत्व, आरोह, अवरोह, अन्त्यत्व, मध्यत्व इत्यादी निरनिराळ्या प्रकारांच्या आविष्कारामुळे षड्जग्राम निराळा व मध्यमग्राम निराळा बनतो, त्याचप्रमाणे स्वरस्थानी असलेल्या वृत्तींच्या प्राथम्य, प्राधान्य इत्यादी दहा प्रकारच्या आविष्कारामुळे रूपकरूपकांत भेद उत्पन्न होतात. आणि ज्याप्रमाणे चार श्रुती असलेला पंचमस्वर तीन श्रुतींचा होऊन भिन्न ग्राम उत्पन्न करतो, त्याप्रमाणे एकच वृत्ति श्रुतिस्थानी असलेल्या अंगांनी क्वचित संपूर्ण तर क्वचित न्यून होते; अशा रीतीनेही रूपकांचे भेद उत्पन्न होतात. हे 'जातिभिः' व 'श्रुतिभिः' या दोन शब्दांनीं दाखविले आहे.

'प्राथम्य' म्हणजे प्रथम कोणता स्वर योजावयाचा ते. – 'आरोहावरोह' मुद्रित प्रतीत 'अवरोह' शब्दाचा मुद्रणदोषाने लोप झाला आहे. – 'अन्यः षड्जग्रामः इ०' येथे ग्राम शब्दाने त्याने उत्पन्न होणाऱ्या जाती समजावयास पाहिजे. ग्राम दोनच आहेत व त्यांमधील भिन्नता प्राथम्यादींनी उत्पन्न होणारी अशी नाही. ह्या गोष्टींमुळे अठरा प्रकारच्या भिन्न भिन्न जाती अस्तित्वात येतात. – 'ग्रामान्यत्वम्' म्हणजे षड्जग्रामाचे मध्यम ग्रामात रूपांतर. – 'जातिभिः इ०' एकूण अर्थ असा की रूपकप्रकारांतील भेद जातींमधील भेदांप्रमाणे आहेत, तसेच ते श्रुतींच्या कमीअधिकपणामुळे स्वरसमूहांत उत्पन्न होणाऱ्या भेदांप्रमाणे आहेत. वस्तुतः ग्राम दोनच असल्यामुळे श्लोकात काव्यबन्धाची ग्रामाशी केलेली तुलना विशेष समर्पक नाही. म्हणूनच ग्राम शब्दाचा व्यापक अर्थ करावा लागतो.

**ग्रामौ पूर्णस्वरौ द्वौ तु यथा वै षड्जमध्यमौ।**
**सर्ववृत्तिविनिष्पन्नौ काव्यबन्धौ[1] तथा त्विमौ॥६॥**
**ज्ञेयं प्रकरणं चैव तथा नाटकमेव च।**
**सर्ववृत्ति[2]विनिष्पन्नं नानाबन्ध[3]समाश्रयम्॥७॥**

१ घो काव्यबन्धे. २ नि पूर्ववृत्त-. ३ का नाटयावस्था-, घो नानावस्था-.

परंतु, ज्याप्रमाणे पूर्ण स्वर असलेले षड्ज व मध्यम हे दोनच ग्राम आहेत त्याचप्रमाणे सर्व वृत्तींनी निष्पन्न झालेले असे हे (पुढील) दोनच काव्यबंध होत. सर्व वृत्तींपासून निष्पन्न झालेले व विविध प्रकारच्या रचनांनी युक्त असे प्रकरण आणि नाटक हें दोनच (रूपकप्रकार) होत असे जाणावे.

**अथ वृत्तिविभागं संक्षेपतोऽभिधत्ते ग्रामौ पूर्णस्वराविति । जात्याश्रययोर्जातिद्वारेण षाडवौडविकांशकयोगे न्यूनस्वरताप्यस्तीति षड्जग्रामरागो मध्यमग्रामरागश्चेह ग्रामशब्देन व्यपदिष्ट इति केचित् । तदसत् । इह हि ग्रामशब्देन जातिसमुदायोऽभिधीयते । तत्र यद्यप्यंशके न्यूनस्वरतापि भवति, तथापि समुदायस्य पूर्णतायाः का हानिः। तस्मादयमत्रार्थः। यथा विचित्रसंनिवेशतालम्बनसुन्दरतमसंपूर्णस्वरसमुदायरूपाद् ग्रामद्वयाद्विभागकल्पनया जात्यंशकानां पूर्णापूर्णादिस्वरभेदभाजां प्रसवः, एवं नाटकप्रकरणाभ्यां पूर्णवृत्तिवृत्त्यङ्गाभ्यां वृत्तिन्यूनानां च रूपकभेदानां परिकल्पनम् ।**

आता 'ग्रामौ पूर्णस्वरौ' इत्यादी श्लोकात वृत्तींचा विभाग संक्षेपाने सांगतात. काही टीकाकारांच्या मते जातींचा आश्रय असलेल्या ग्रामांत जातींच्या द्वारा षाडव व औडव यांच्या अंशकांचा योग होत असल्यामुळे स्वरांची संख्या कमी सुध्दा होते, म्हणून ग्राम शब्दाने या ठिकाणी षड्जग्रामातील राग व मध्यमग्रामातील राग ह्यांचा निर्देश अभिप्रेत आहे. पण ते बरोबर नाही. या ठिकाणी ग्राम शब्दाने जातिसमुदाय निर्दिष्ट आहे. त्यात जरी काही अंशकांमध्ये स्वर कमी असले तरी त्यामुळे समुदायाच्या पूर्णत्वाला काय हानी पोहोचते ? म्हणून या ठिकाणी अर्थ असा. ज्याप्रमाणे मनोरम अशा रचनेचा अवलंब केल्यामुळे अत्यंत सुंदर व संपूर्ण स्वरांचा समुदायरूप असलेल्या दोन ग्रामांपासून पूर्ण, अपूर्ण आदी स्वरांच्या भेदांनी युक्त जात्यंशकांची भिन्न भिन्न रूपात उत्पत्ती होते, त्याप्रमाणे वृत्ती आणि वृत्त्यंगे पूर्ण स्वरूपात असलेल्या नाटक व प्रकरण ह्या दोन प्रकारांपासून कमी वृत्ती असलेल्या रूपकप्रकारांची कल्पना केली आहे.

'जात्याश्रययोः' याचे विशेष्य 'ग्रामयोः' हे समजले पाहिजे. – 'षाडवौडविकांशकयोगे' षाडव व औडव हे जातींचे दोन प्रकार आहेत (वर उद्धृत केलेला २८.६६ हा श्लोक पहा). षाडव म्हणजे सहा स्वर असलेली जाति व औडव म्हणजे पाचच स्वर असलेली. ह्या टीकाकारांचे म्हणणे असे की श्लोकात 'पूर्णस्वरौ ग्रामौ' असे शब्द असल्यामुळे ग्राम म्हणजे जातिसमुदाय असा अर्थ करणे योग्य होणार नाही, कारण जातीच्या काही अंशांत कमी स्वर असतात. – 'षड्जग्रामरागः इ०' सर्व सातही स्वर असलेल्या षड्ज व मध्यम ग्रामांतून निष्पन्न झालेले राग असा अर्थ ह्या टीकाकारांनी स्वीकारला आहे. पण अभिनवगुप्ताने हे मत चूक ठरवून ग्राम म्हणजे जातिसमुदाय हाच अर्थ मान्य केला आहे. काही अंशात कमी स्वर असले

तर कोठे बिघडले असे त्याने विचारले आहे. पण श्लोकातील 'पूर्णस्वरौ' शब्दाची याने संगती लागत नाही असे म्हणता येण्यासारखे आहे. – 'यथा विचित्र- इ०' अभिनवगुप्ताने श्लोकाचा अर्थ केला आहे तो असा – ज्याप्रमाणे संपूर्ण स्वर असलेल्या षड्ज व मध्यम ह्या दोन ग्रामांपासून कमीअधिक स्वर असलेल्या जात्यंशकांची उत्पत्ती होते त्याप्रमाणे वृत्ति व वृत्त्यंगे यांनी पूर्ण असलेल्या नाटक व प्रकरण ह्या दोन रूपकप्रकारांपासून वृत्तींच्या न्यूनतेमुळे इतर रूपकप्रकार उत्पन्न होतात. पण नाट्यशास्त्रातील मूळ श्लोकांत अशा तऱ्हेचा काही निर्देश नाही. ह्या दोन श्लोकांत एवढेच म्हटले आहे की नाटक व प्रकरण ह्या दोन रूपकप्रकारांत सर्व म्हणजे चारही वृत्ती विद्यमान असतात. 'सर्व वृत्तींपासून नाटक व प्रकरण हे प्रकार निष्पन्न होतात' एवढेच विधान आहे, इतर प्रकारांच्या निष्पत्तीचा कोणत्याही प्रकारचा उल्लेख नाही.

**वीथी समवकारश्च तथेहामृग एव च।**
**उत्सृष्टिकाङ्को व्यायोगो भाणः प्रहसनं डिमः॥८॥**
**कैशिकीवृत्तिहीनानि रूपाण्येतानि कारयेत्।**
**अत ऊर्ध्वं प्रवक्ष्यामि काव्यबन्धविकल्पनम्॥९॥**

वीथी, समवकार, ईहामृग, उत्सृष्टिकाङ्क, व्यायोग, भाण, प्रहसन आणि डिम हे रूपकप्रकार कैशिकीवृत्तीने विरहित असे करावेत.

यापुढे मी विविध काव्यप्रकारांच्या रचनेचे वर्णन करणार आहे.

**तत्र वृत्तिन्यूनानि रूपकाण्याह वीथीत्यादि । शेषाणि रूपाणीति वक्तव्ये प्रतिपदं नामग्रहणं ज्ञापयति एतदनुक्तान्यपि रूपकाणि संभवन्ति । अत एव रूपकविशेषगणनम् आभ्यो विनिःसृतमिति लक्षणस्योदाहरणमात्रम् । तेन वृत्तीनां विनियोगसमुच्चयविकल्पैः वृत्त्यङ्गानां च बहवो रूपकभेदा भवन्ति । तेषां परं कोहलादिभिर्नाममात्रं प्रणीतम् । लक्षणेन त्विह संगृहीता एव ते ।**

त्यांपैकी कमी वृत्ती असलेले रूपकप्रकार 'वीथी' इत्यादी श्लोकात सांगतात. इतर बाकीची रूपके असे म्हणाव्याच्या ऐवजी त्या प्रत्येकाचा नावाने निर्देश केला आहे त्यावरून असे सूचित केले आहे की येथे नामनिर्देश न झालेले इतरही रूपकप्रकार संभवतात. म्हणूनच विशिष्ट रूपकांचा नामनिर्देश केवळ 'ह्या वृत्तींपासून निष्पन्न झाले' या लक्षणाच्या उदाहरणादाखल होय. म्हणून वृत्तींच्या व वृत्त्यंगांच्या एकत्रित अथवा वैकल्पिक उपयोगामुळे पुष्कळ रूपकप्रकार उत्पन्न होतात. परंतु कोहलप्रभृतींनी त्यांचा केवळ नामनिर्देश केला आहे. पण या ग्रंथात लक्षणाच्या द्वारा त्यांचा समावेश केलाच आहे.

'रूपकविशेषगणनम्' ही गणना वर श्लोक २ व ३ यांत केली आहे. – 'आभ्यो विनिःसृतम्' हे रूपकाचे लक्षण वर श्लोक ४ मध्ये केले आहे. – 'विनियोगसमुच्चयविकल्पैः' यानंतर हस्तलिखितात 'समुच्चयैः' हा अधिक शब्द आढळतो. तो लेखनदोष आहे.– 'वृत्त्यङ्गानां च' याचा सुद्धा अन्वय 'विनियोगसमुच्चयविकल्पैः' शी करावयाचा आहे.

तत्र नाटकप्रकरणे एव सर्ववृत्तिपूर्णे इति नियमः, न तु विपर्ययः, मुद्राराक्षसस्य कैशिकीहीनस्य कृत्यारावणस्य च नाटकस्य दर्शनात्, वेणीसंहारे च सात्त्वत्यारभटीमात्रं दृश्यत इति केचित् । अन्ये तु तत्राप्यवश्यं वृत्त्यन्तरानुप्रवेशोऽस्ति यदि, परमितिवृत्ताव्यापकत्वान्न लक्ष्यते । अपूर्णवृत्तित्वेऽपि विरूपकतैव स्यात् ।

काही टीकाकारांच्या मते नाटक व प्रकरण हे दोनच प्रकार सर्व वृत्तींनी पूर्ण असतात असा नियम आहे, पण याच्या उलट विधान बरोबर नाही; कारण, कैशिकी वृत्ति नसलेली मुद्राराक्षस व कृत्यारावण ही नाटके आहेत, आणि वेणीसंहार नाटकात केवळ सात्त्वती व आरभटी वृत्तींचे दर्शन होते. पण दुसरे टीकाकार म्हणतात की त्या नाटकांतही इतर वृत्तींचे अस्तित्व अवश्य असते, पण सर्व कथानकाला व्यापून नसल्यामुळे ते लक्षात येत नाही. वृत्ती पूर्ण नसल्या तर नाटक विरूपकच होईल.

'विपर्ययः' म्हणजे ज्यात सर्व वृत्ती नाहीत त्याला नाटक किंवा प्रकरण ही संज्ञा देता येणार नाही. – 'यदि परमितिवृत्ताव्यापकत्वान्न लक्ष्यते' हा हस्तलिखितातील पाठ आहे. मुद्रित पाठ 'यदि परिमितवृत्तिव्यापकत्वात् लक्ष्यते' असा आहे. तो बरोबर नाही हे उघड आहे. 'न लक्ष्यते' अर्थासाठी आवश्यक आहे, आणि मग 'परम्' आणि 'इतिवृत्त-अव्यापकत्वात्' हे आवश्यक ठरतात. परिमित-वृत्तीच्या व्यापकतेला काही अर्थ नाही. – 'यदि' हे 'यद्यपि' या अर्थी वापरलेले दिसते. वस्तुतः ह्या अव्ययाची आवश्यकता नाही. – 'विरूपकता' यातील 'रूपक' शब्दात श्लेष अभिप्रेत दिसतो.

सकलाङ्गप्रक्रियापरिपूर्णत्वादेव नाटकं प्रकरणं च प्रधानम् । तथाहि कश्चिद्विनेयः प्रसिद्धिमनुरुध्यमानो दृष्ट इति सुप्रसिद्धेतिवृत्ते नाटके प्रसिद्धे वस्तुनि विनेयः । कश्चित्तु विनेयोऽभिनववस्तुवृत्तकौतुकपरतन्त्र इति किमेतदपूर्वमिति समुत्पाद्यवस्तुना प्रकरणेन विनीयते । विनयश्चास्य धर्मार्थकामेषु सर्वपुरुषार्थेष्वपवर्गे च तथा भवति यदि सकलतदुपयोगिव्यापाराश्रयणम् । सकलव्यापाराक्षिप्तं पूर्णवृत्तिकत्वमिति द्विवृत्तित्रिवृत्त्यादिकं न नाटकं भवति, रूपकान्तरमेव तु तदाभासं तत्सर्वम् ।

कैशिकीविहीनत्वेऽपि यथा शृङ्गारयोगः समवकारे तथा तल्लक्षणं वर्णयिष्यामः ।

सर्व अंगांच्या प्रक्रियांनी परिपूर्ण असल्यामुळे नाटक व प्रकरण हे दोन प्रधान प्रकार होत. म्हणजे असे. ज्याला उपदेश करावयाचा असा कोणी प्रसिद्ध गोष्टीचाच पाठपुरावा करीत असलेला दिसून येतो, म्हणून त्याला सुप्रसिद्ध कथानक असलेल्या नाटकात प्रसिद्ध असलेल्या गोष्टीने उपदेश करता येतो. परंतु उपदेशपात्र असा दुसरा कोणी नवीन कथानकातील घटनांविषयी कुतूहलाने भारलेला असतो म्हणून हे काय नवीन असे भासविणाऱ्या कविकल्पित कथानक असलेल्या प्रकरणाच्या द्वारा त्याला उपदेश केला जातो. आणि त्याला धर्म, अर्थ व काम या पुरुषार्थांविषयी व मोक्षाविषयी उपदेश तरच केला जाईल जर त्याला उपयुक्त असलेल्या सगळ्या व्यापारांचा (रूपकात) अन्तर्भाव असेल तर. आणि सगळ्या व्यापारांचे निरूपण म्हणजे सर्व वृत्तींनी पूर्ण असणे असे असल्यामुळे दोन वृत्ती असलेले, तीन वृत्ती असलेले इत्यादी प्रकार नाटक नसून ते सर्व त्याच्यासारखे भासणारे दुसरेच रूपकप्रकार होत.

कैशिकी वृत्ती नसली तरी समवकारात शृंगाराचा योग कसा होतो ते आम्ही त्याच्या लक्षणाच्या व्याख्येत दाखवून देऊ.

'नाटकं प्रकरणं च' मुद्रित पाठ 'नाटकात्प्रकरणं च' उघडच चुकीचा आहे. – 'तथाहि' नाटक व प्रकरण सर्व वृत्तींनी परिपूर्ण का असावे याच्या आता होणाऱ्या कारणमीमांसेचा हा उपन्यास आहे. – 'कश्चिद्विनेयः' मुळातील 'कैश्चिद्' ची 'कश्चिद्' अशी दुरुस्ती आवश्यक असल्यामुळे केली आहे. विनेय म्हणजे ज्याला उपदेश करावयाचा असा मनुष्य, प्रस्तुत संदर्भात प्रेक्षक. काव्याचे व्युत्पत्ति म्हणजे उपदेश देणे हे सुद्धा एक प्रयोजन आहे. – पुढील 'कश्चित्तु' व 'विनेयः' या दोन शब्दांच्या मध्ये मुळात 'किमेतदपूर्वमिति प्रसिद्धे वस्तुनि रूपकान्तरमेव तु तदाभासं तत्सर्वं' इतका मजकूर अधिक आहे. हा येथे चुकीने पडला आहे. 'किमेतदपूर्वमिति' हा अंश पुढील वाक्यात 'विनेयो' नंतर किंवा '-परतन्त्र इति' नंतर संभाव्य आहे. 'विनेयो' शब्दातील संधि लक्षात घेऊन तो अंश '-परतन्त्र इति' नंतर घातला आहे. 'प्रसिध्दे वस्तुनि' हा अंश मागच्या वाक्यातच संभाव्य असल्यामुळे तेथे त्याला जागा करून दिली आहे. मात्र तेथे कथानक या अर्थी 'इतिवृत्त' शब्द अगोदरच वापरलेला असल्यामुळे 'वस्तु' म्हणजे कथानक असे न समजता गोष्ट, बाब असे समजावे लागेल. नंतरचा 'रूपकान्तरमेव तु तदाभासं' हा अंश लेखनप्रमादामुळे द्विरुक्त झाला आहे. दोनतीन ओळींनंतर योग्य जागी हे शब्द पुन्हा आढळतात. तेव्हा या ठिकाणी ते गाळले पाहिजेत यात शंका नाही. शेवटचे 'तत्सर्वम्' हे शब्द इतरत्र कोठेही बसण्यासारखे नसून 'तदाभासं' नंतर ते सार्थ होऊ शकतात म्हणून त्यांची पुढे योजना केली आहे. – 'सकलतदुपयोगिव्यापाराश्रयणम्' मुळात 'सकलं' असा स्वतंत्र शब्द आहे. पण सकल हे व्यापारचे विशेषण असल्यामुळे त्याचा समासात अन्तर्भाव आवश्यक आहे. – या ठिकाणी केलेला युक्तिवाद असा की सर्व पुरुषार्थांविषयी उपदेश करावयाचा असेल तर सर्व प्रकारच्या व्यापारांचे रूपकात दर्शन घडविणे आवश्यक आहे, आणि असे दर्शन सर्व वृत्तींच्या उपयोगानेच घडविता येईल. म्हणूनच सर्व वृत्तींचा वापर करणारे नाटक व प्रकरण हे सर्व रूपकांत श्रेष्ठ असे वर म्हटले आहे.

मुळात 'तत्कैशिकी- इ०' असे आहे. त्यातील 'तत्' हा वर निर्देशिलेल्या 'तत्सर्वम्' चा ह्या ठिकाणी अवशिष्ट राहिलेला अंश. मागील वाक्याच्या शेवटी 'तत्सर्वम्' ची योजना केली आहे. प्रस्तुत वाक्यात श्लोकातील 'कैशिकीवृत्तिहीनानि' या वचनामुळे उत्पन्न होणाऱ्या शंकेचा निर्देश केला आहे. समवकार हा रूपकप्रकार कैशिकीरहित असतो असे येथे म्हटले आहे. पण समवकारात शृंगार असतो असे त्याच्या लक्षणात म्हटले आहे आणि शृंगाराच्या आविष्कारासाठी कैशिकी वृत्ति आवश्यक आहे. तेव्हा समवकारात शृंगार कसा शक्य आहे? या शंकेचे समाधान अभिनवगुप्ताने पुढे ६७ व्या श्लोकावरील व्याख्येत केले आहे. – मुद्रित प्रतीत 'शृङ्गारयोगः' नंतर एक 'तथा' अधिक पडला आहे. तो गाळणे आवश्यक आहे.

**ननु पूर्णवृत्तिकत्वाविशेषेऽपि नाटकप्रकरणयोः को भेदः कैशिकीहीनत्वे चाविशिष्टे वीथ्यादेर्मिथः को विशेष इत्याशङ्कां वारयन् कर्मशब्दाक्षिप्तविशेष-लक्षणार्थं दर्शयति अत ऊर्ध्वमित्यादिना। काव्यस्य बन्धनं परस्पराश्रयसंबन्धेनैव एकवाक्यताकरणसंबन्धः, स विकल्प्यते येन तद्विशेषलक्षणं वक्ष्यामीति।**

सर्व वृत्तींनी पूर्ण असणे हा समान धर्म असता नाटक व प्रकरण यांत भेद काय, तसेच कैशिकीवृत्तिरहित असणे हे सामान्यलक्षण असणाऱ्या वीथी वगैरे प्रकारांत परस्पर भेद काय या शंकेचे समाधान करण्यासाठी कर्म शब्दाने निर्दिष्ट झालेले विशेषलक्षण 'अत ऊर्ध्वम्' इत्यादीने दाखवितात. काव्याचा बन्ध म्हणजे (विविध भागांच्या) परस्परांच्या आश्रयरूप संबन्धामुळेच (काव्यात) एकवाक्यतेच्या उत्पत्तीच्या स्वरूपाचा संबन्ध; त्या संबन्धाची कल्पना ज्याने केली जाते ते (काव्यबन्धविकल्पन, म्हणजेच) विशेषलक्षण. ते मी सांगणार आहे.

नवव्या श्लोकाच्या उत्तरार्धाची ही व्याख्या आहे. – 'कर्मशब्दाक्षिप्त-' पहिल्या श्लोकात असलेल्या 'कर्मतः' मधील कर्म शब्दाचा हा निर्देश आहे. – 'काव्यस्य बन्धनं इ०' यात श्लोकातील 'काव्यबन्धविकल्पनम्' या समासाच्या अर्थाची फोड केली असून त्या शब्दाचा 'विशेषलक्षण' असा अर्थ सिद्ध केला आहे.

**प्रख्यातवस्तु[१]विषयं प्रख्यातोदात्तनायकं चैव।**
**राजर्षिवंश्य[२]चरितं तथैव दिव्याश्रयोपेतम्॥ १०॥**
**नानाविभूति[३]भिर्युतमृद्धिविलासादिभिर्गुणैश्चैव।**
**अङ्कप्रवेशका[४]ढ्यं भवति हि तन्नाटकं नाम॥ ११॥**

ज्यात प्रसिद्ध कथानक व विषय असतात, त्याचप्रमाणे ज्याचा नायक प्रसिद्ध व उदात्त असतो, ज्यात एखाद्या राजर्षीच्या वंशात उत्पन्न झालेल्या राजाचे चरित असते, तसेच

१ नि -विषये. २ नि -वंश-. ३ नि -भूतिसंयुत-. ४ नि -काव्यं.

ज्यात दिव्य व्यक्तींचा आश्रय घेतलेला असतो, जे विविध प्रकारच्या विभूतींनी आणि समृद्धी, विलास इत्यादी गुणांनी युक्त असते आणि जे अंक व प्रवेशक यांनी समृद्ध असते ते (काव्य) नाटक ह्या नावाने ओळखले जाते.

**नाटकं प्रकरणादपि प्रधानम् । प्रसिद्ध्युपजीविनी हि कल्पना वस्तुसंभावना अनुभवमूलत्वात्तस्याः । उत्प्रेक्षा अपि हि प्रमाणावगतेष्वेव वस्तुषु स्वातन्त्र्येण योजनामात्रेण व्याप्रियन्ते षड्दन्तो हस्ती खे धावतीति । तेनेतिहासादिप्रमाणसिद्ध-वस्तुप्रदर्शकं नाटकं तावल्लक्षयितुमाह प्रख्यातवस्तुविषयमित्यादि ।**

नाटक हे प्रकरणापेक्षाही श्रेष्ठ. कारण, कल्पना अथवा वस्तूची संभावना ही प्रसिद्ध अशा गोष्टीवर अवलंबून असते, अनुभवातच तिचे मूळ असते म्हणून. कारण, उत्प्रेक्षांचा वापर सुद्धा (प्रत्यक्षादी) प्रमाणांनी अवगत झालेल्या वस्तूंच्याच संबंधात केवळ स्वतंत्र योजना करून केला जातो; उदाहरणार्थ, सहा दात असलेला हत्ती आकाशात धावतो इत्यादी. म्हणून प्रथम इतिहास वगैरे प्रमाणांनी सिद्ध झालेली गोष्ट दाखविणाऱ्या नाटकाचे लक्षण 'प्रख्यातवस्तुविषयम्' इत्यादी शब्दांत करतात.

'प्रमाणावगतेषु' मुद्रित प्रतीतील 'प्रमाणागतेषु' हा पाठ नजरचुकीने आला असावा. – 'षड्दन्तो इ०' हे विधान सर्वथा उत्प्रेक्षित अथवा काल्पनिक आहे. पण यातील प्रत्येक अंश – सहा, दात, हत्ती इत्यादी – प्रमाणांनी अवगत झालेला आहे. – '-प्रमाणसिद्धवस्तु-' मुळातील '-प्रमाणवस्तुसिद्ध-' याची ही दुरुस्ती आवश्यक आहे हे उघड आहे.

**प्रख्याते भारतादौ यद्वस्तु तद् विषयोऽस्य; तत्रापि किंचिदप्रसिद्धं भवति तन्निराकरणाय प्रख्यातोदात्तेति श्रीशङ्कुकः । एतत्तु प्रख्यातं वस्तु विषयोऽस्येति इयता गतार्थमित्युपाध्याया इत्थमाहुः । इह त्रिविधया प्रसिद्ध्या प्रसिद्धत्वं भवति । अमुक एवंकारी अमुत्र देश इति तत्र प्रकर्षेण ख्यातं वस्तु तथा विषयो मालवपाञ्चालादिदेशो यस्मिन् । चक्रवर्तिनोऽपि हि वत्सराजस्य कौशाम्बी-व्यतिरिक्ते विषये कार्यान्तरोपक्षेपेण विना यन्निरन्तरं निर्वर्णनं तद्वैरस्याय भवति, तत्र प्रसिद्धिखण्डनेन प्रतीतिविघातात्, का कथा रसचर्वणायाः । एवं द्वे प्रसिद्धी उक्ते, प्रख्यातोदात्तेत्यनेन तृतीया प्रसिद्धिरुक्ता ।**

प्रख्यात अशा भारतादी प्रदेशात जी वस्तु ती विषय आहे ज्याचा असे (नाटक); तेथे सुद्धा एखादी गोष्ट अप्रसिद्ध असते तिचे निवारण करण्यासाठी प्रख्यातोदात्त असे म्हटले आहे अशी श्रीशङ्कुकाची व्याख्या. परंतु प्रख्यात वस्तु विषय आहे ज्याचा ह्या विग्रहाने केलेल्या अर्थात ही गोष्ट सुद्धा समाविष्ट आहे म्हणून आमचे गुरुजी

पुढीलप्रमाणे व्याख्या करतात. या जगात तीन प्रकारच्या प्रसिद्धीमुळे प्रसिद्धत्व प्राप्त होते. अमुक मनुष्य असे कार्य करणारा अमुक प्रदेशात आहे या विधानाच्या अनुरोधाने प्रकर्षाने ख्यात अशी वस्तु व विषय म्हणजे माळव, पांचाल आदी देश ज्यात (असा विग्रह करावयाचा). कारण, चक्रवर्ती असलेल्याही वत्सराजाचे कौशाम्बीव्यतिरिक्त इतर देशात एखाद्या कार्याचे निमित्त नसताना सतत वास्तव्याचे वर्णन जर केले तर त्याने विरस होईल, कारण त्यामुळे प्रसिद्धीचा भंग होऊन प्रतीतीतच विघ्न उत्पन्न होईल, मग रसास्वादाची कसली गोष्ट? याप्रमाणे या दोन प्रसिद्धी सांगितल्या. तिसऱ्या प्रसिद्धीचा 'प्रख्यातोदात्त' यात निर्देश आहे.

'श्रीशङ्कुकः' ह्या प्राचीन टीकाकाराचा निर्देश अभिनवभारतीत अनेक जागी केला आहे. – 'एतत्' म्हणजे 'प्रख्यातोदात्त-' ही गोष्ट. – 'उपाध्यायाः' म्हणजे नाट्यशास्त्रावरील अभिनवगुप्ताचे गुरुजी भट्ट तोत. – 'प्रकर्षेण ख्यात इ०' यात श्लोकातील पहिल्या शब्दाचा निराळ्या अर्थी विग्रह केला आहे. त्यात विषय म्हणजे देश असा अर्थ केला आहे. पण तो मूळ नाट्यशास्त्रकाराला अभिप्रेत असेलसे वाटत नाही. – 'कार्यान्तरोपक्षेपं विना' कार्याच्या निमित्ताने उदयन उज्जयिनीत व मगधात होता, पण तो काही काळच, निरंतर नव्हे. – 'प्रतीतिविघातात्' ही मुळातील 'प्रतीतिविधानात्'ची संपादकांनी केलेली दुरुस्ती आवश्यक आहे. काव्याच्या प्रतीतीच्या आड येणाऱ्या अनेक प्रकारच्या विघ्नांचा निर्देश सहाव्या अध्यायात रससूत्रावरील टीकेत केला आहे. त्यातील पहिल्या प्रकारात प्रस्तुत प्रसिद्धिभंगाचा समावेश होतो.

उदात्त इति वीररसयोग्य उक्तः । तेन धीरललितधीरप्रशान्तधीरोद्धतधीरोदात्ताश्चत्वारोऽपि गृह्यन्ते । राजर्षिवंश्येत्यनेन प्रख्यातमपि यद्वस्तु ऋषितुल्यानां राज्ञां वंशे न साधु नोचितम्, तथा प्रख्यातत्वेऽपि देवचरितं स्वप्रभावादिबहुलतयोपदेशायायोग्यम्, इति नैतदुभयं निबन्धनीयमिति फलतः प्रतिषेधो दर्शितः । राजान ऋषय इवेत्युपमितसमासः, तद्वंशे साधु चरितं यस्मिन्निति बहुव्रीहिः । न च सर्वथा देवचरितं तथावर्णनीयम्, किंतु दिव्यानामाश्रयत्वेन प्रकरीपताकानायकादिरूपेण उपेतमुपगमोऽङ्गीकरणं यत्र । तथाहि नागानन्दे भगवत्याः पूर्णकरुणानिर्भरायाः साक्षात्करणे व्युत्पत्तिर्जायते – निरन्तरभक्तिभावितानामेवं नाम देवताः प्रसीदन्ति, तस्माद्देवताराधनपुरःसरमुपायानुष्ठानं कार्यमिति । यदि तु मुख्यत्वेनैव देवचरितं वर्ण्यते तत्तावद्विप्रलम्भकरुणाद्भुतभयानकरसोचितं चेन्निबध्यते, तन्मानुषचरितमेव संपद्यते । प्रत्युत देवानामधियाधानं प्रसिद्धिविघातकम्, तत्र चोक्तो दोषः । विप्रलम्भाद्यभावे तु का तत्र विचित्रता, रञ्जनाया एतत्प्राणत्वात् । अत एव हृदयसंवादोऽपि देवचरिते दुर्लभः । न च तेषां दुःखमस्ति यत्प्रतीकारोपाये व्युत्पादनं स्यात् । नायिका तु दिव्याप्यविरोधिनी

**यथोर्वशी, नायकचरितेनैव तद्वृत्तस्याक्षेपात् । डिमादौ तु दिव्यानां नायकत्वेऽभि-प्रायमावेदयिष्याम इति ।**

'उदात्त' ह्या शब्दाने वीररसाला योग्य असा नायक अभिप्रेत आहे. म्हणून धीरललित, धीरप्रशान्त, धीरोद्धत आणि धीरोदात्त या चारही प्रकारचे नायक समजावयाचे. 'राजर्षिवंश्य' या वचनाने – प्रख्यात असलेली सुद्धा जी गोष्ट ऋषितुल्य राजांच्या वंशात साधु नसणारी म्हणजे उचित नसणारी अशी असते. ती, तसेच प्रख्यात असले तरी देवांचे चरित, त्यांचे प्रभाव आदी विशेषच त्यात बहुतांशी असल्यामुळे, उपदेश देण्यास असमर्थ म्हणून ते, या दोन्ही गोष्टींची नाटकात योजना करू नये – अशा निष्कर्षाच्या रूपात प्रतिषेध दाखविला आहे. 'राजानः ऋषयः इव' याप्रमाणे राजर्षि हा उपमितसमास आहे; त्यांच्या वंशात साधु म्हणजे चांगले (ते वंश्य) असे चरित ज्यात आहे ते (नाटक) असा बहुव्रीहि समास आहे. आणि देवांचे चरित कोणत्याही प्रकारे दाखवावयाचे नाही असे नाही, तर दिव्य पुरुषांचा आश्रयत्वाने म्हणजे प्रकरी किंवा पताका यांच्या नायक वगैरे रूपाने उपेत म्हणजे उपगम, स्वीकार ज्यात आहे ते (नाटक). उदाहरणार्थ, नागानन्द नाटकात करुणेने परिपूर्ण अशा गौरी देवीच्या साक्षात्कारामुळे (प्रेक्षकाला) असा बोध होतो की भक्तीने पूर्णपणे भारावलेल्यांना देवता अशा रीतीने प्रसन्न होतात, तेव्हा देवताराधनप्रधान उपायांचे अनुष्ठान केले पाहिजे. पण जर देवतांच्या चरिताचेच प्राधान्याने वर्णन केले तर ते विप्रलम्भ, करुण, अद्भुत व भयानक रसांना परिपोषक असे दाखविल्यास त्याला मानवांच्या चरिताचेच स्वरूप येईल. उलट, देवांना सर्वज्ञताविहीन दाखविल्यास ते प्रसिद्धीच्या विरुद्ध होईल, त्यात वर सांगितलेला दोष उत्पन्न होईल. परंतु विप्रलम्भादी नसल्यास त्यात वैचित्र्य कोठून येणार ? कारण हेच रंजकतेला प्राणभूत होत. म्हणून देवचरिताशी प्रेक्षकाचा हृदयसंवाद होणे सुद्धा कठीण आहे. आणि त्यांना दुःख होत नाही की, ज्यामुळे दुःख दूर करण्याच्या उपायांचा बोध होऊ शकेल. तथापि, नायिका दिव्य असण्यास हरकत नाही, जशी उर्वशी आहे; कारण, नायकाच्या चरितातच तिचा वृत्तान्त अन्तर्भूत असतो. परंतु, डिम आदी प्रकारांत दिव्य नायक असावेत याविषयीचा अभिप्राय आम्ही पुढे सांगू.

'धीरललित- इ०' या चार प्रकारच्या नायकांचे वर्णन २४.१७-१९ या श्लोकांत आहे. उदात्ततेचा गुण फक्त धीरोदात्त नायकातच असतो असे नाही. – 'राजर्षिवंश्येत्यनेन इ०' 'वंश्य' याचा अर्थ 'वंशे साधु' म्हणजे वंशाला उचित, अनुरूप असेल ते. नाटकात 'राजर्षिवंश्य' असावे यावरून असा निष्कर्ष काढला आहे की जे त्या कुलाला अनुरूप नसेल ते प्रसिद्ध असले तरी त्याचा नाटकात अन्तर्भाव करू नये. 'स्वप्रभावादि-' मुद्रित पाठ 'वरप्रभावादि-' असा आहे. तो विशेष समर्पक नाही. – 'उपदेशायायोग्य-म्' म्हणणे त्यात प्रेक्षकांना उपदेश करण्यास उपयोगी असे काही नसते; मानवी जीवनापासून ते सर्वथा भिन्न असते. – 'उपमितसमास' पाणिनीच्या २.१.५६ 'उपमितं व्याघ्रादिभिः सामान्याप्रयोगे' ह्या

सूत्रानुसार. – श्लोकातील 'दिव्याश्रयोपेतम्' या शब्दाची फोड जरा निराळ्या प्रकाराने केली आहे. उपेत हे उपगम अथवा स्वीकार ह्या अर्थी भाववाचक नाम मानले असून 'दिव्यानां आश्रयत्वेन उपेतं अङ्गीकारः यस्मिन् तत् ( नाटकम् )' असा बहुव्रीहि समासाचा विग्रह केला आहे. दिव्य पुरुषांचा उपयोग नाटकात आश्रयरूपाने म्हणजे कथानकाच्या प्रासङ्गिक अंशातच करावा, मुख्य भागात करू नये असा एकूण अर्थ. – 'प्रकरीपताका-' ह्यांचे वर्णन पुढील एकोणविसाव्या अध्यायात केले आहे. – 'व्युत्पत्तिः' म्हणजे काव्यापासून होणारा बोध अथवा मिळणारी शिकवण. – 'देवानामधियाधानम्' याचा अर्थ स्पष्ट नाही. कारण, पाठ शुद्ध आहे असे निश्चित म्हणता येत नाही. 'अधिया' हे 'अधी' शब्दाचे तृतीयेचे रूप मानता येईल व अ-धी म्हणजे बुद्धीचा अभाव असा अर्थ करता येईल. पण तो सर्वथा असमाधानकारक आहे. विप्रलम्भादीचा आवेश हे काही बुद्धीच्या अभावाचे लक्षण नाही. कदाचित् अधीरताधानम्' असा मूळ पाठ असावा. – 'उक्तो दोषः' म्हणजे प्रतीतीत विघ्न उत्पन्न होऊन रसचर्वणा शक्य होणार नाही. – 'एतत्प्राणत्वात्' ही मुळातील 'एतत्प्रमाणत्वात्' ची केलेली दुरुस्ती आहे. 'प्रमाण' ला प्रस्तुत संदर्भात काही अर्थ नाही. – 'व्युत्पादनम्' म्हणजेही प्रेक्षकांना बोध.

**प्रसिद्धित्रययुक्तमपि वस्तु न सफलं व्युत्पत्तये भवतीत्यत आह नानाविभूतिभिर्युतं धर्मार्थकाममोक्षविभवैः फलभूतैर्विचित्ररूपैर्युक्तम् । तत्राप्यर्थकामौ सर्वजनाभिलषणीयाविति तद्बाहुल्यं दर्शनीयमिति कथयति ऋद्धिविलासादिभिरिति । ऋद्धिरर्थस्य राज्यादिसमृद्धिः । विलासेन कामो लक्ष्यते । आदिशब्दः प्रधानवाची, तत्प्रधानाभिः फलसंपत्तिभिर्युक्तमित्यर्थः । तेन राज्ञा सर्वं राज्यं ब्राह्मणेभ्यो दत्त्वा वानप्रस्थं गृहीतव्यमित्येवंप्रायं फलं नोपनिबन्धनीयम् । फलमपि हि दृष्टसुखार्थं बाहुल्येनेति तत्रास्य प्रतीतिर्विरसीभवेत् । गुणैरित्यप्रधानभूतानि चेष्टितानि हेयानि प्रतिनायकगतानि अपायप्रधानानि तैर्युक्तम्, तेषां पूर्वपक्षस्थानीयानां प्रतिक्षेपेण सिद्धान्तकल्पस्य नायकचरितस्य निर्वाहात् । जनपदकोशादिसंपत्तिः समृद्धिः, कौमुदीमहोत्सवादयो विलासाः, संधिविग्रहादयो गुणा इति व्याख्यानं चाणक्यपरिचयवेदनमात्रफलं, वस्तुशब्देन राजर्षिवंश्यचरितशब्देन च सर्वस्यार्थराशेः संग्रहात् । अवान्तरवस्तुसमाप्तौ विश्रान्तये ये विच्छेदा अङ्काः, ये च निमित्तबलादप्रत्यक्षदृष्टानां चेष्टितानामावेदकाः प्रवेशकाः, तैराढ्यं नाटकं नाम रूपकम् ।**

तीन प्रकारच्या प्रसिद्धींनी युक्त असलेले सुद्धा कथानक बोध देण्यात सफल होणार नाही म्हणून म्हणतात 'नानाविभूतिभिर्युतम्' म्हणजे फलस्वरूप असणाऱ्या धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्या विविध रूपाच्या विभवांनी युक्त असलेले (नाटक). त्यातही अर्थ व काम यांची सर्व लोकांना अभिलाषा असते म्हणून ते प्राधान्येकरून दाखवावेत असे 'ऋद्धिविलासादिभिः' याने सांगतात. ऋद्धी अर्थाची म्हणजे राज्य आदीची समृद्धी. विलास शब्दाने कामाचा निर्देश होतो. आदि शब्दाचा प्रधान असा अर्थ आहे. (ऋद्धि व विलास) हे दोन ज्यांत प्रधान आहेत अशा फलसंपत्तींनी युक्त असा एकूण अर्थ. म्हणून राजाने सर्व राज्य ब्राह्मणांना

अर्पण करून वानप्रस्थ स्वीकारावा अशा आशयाचे फल ग्रथित करू नये. कारण, फल सुद्धा मुख्यत्वेकरून दृष्ट सुखासाठी (अपेक्षित) असते म्हणून तसल्या कथानकाने प्रेक्षकाला विरसता उत्पन्न होईल. 'गुणैः' म्हणजे गौण असलेली, त्याज्य असलेली, प्रतिनायकाच्या ठिकाणी असलेली व मुख्यतः अपायकारक अशी चेष्टिते, त्यांनी युक्त. पूर्वपक्षसदृश असलेल्या त्या गुणांच्या उच्छेदामुळे सिद्धान्तस्थानी असलेले नायकाचे चरित्र संपादित होते म्हणून. समृद्धी म्हणजे जनपद, कोश इत्यादींची संपन्नता, विलास म्हणजे कौमुदीमहोत्सव इत्यादी आणि गुण म्हणजे संधी, विग्रह इत्यादी – ह्या व्याख्येचे फल एवढेच की व्याख्याकाराचा चाणक्याशी परिचय असल्याचे ती दाखविते. कारण वस्तु ह्या शब्दाने व राजर्षिवंश्यचरित ह्या शब्दाने अर्थाच्या सर्व समूहाचा अन्तर्भाव केलाच आहे. अवान्तर कथानकाची समाप्ती झाल्यावर विश्रांतीसाठी नाटकाचे जे विभाग ते अंक आणि कारणपरत्वे प्रत्यक्ष न दिसणारी चेष्टिते निवेदन करणारे ते प्रवेशक, त्यांनी समृद्ध ते नाटक नावाचे रूपक.

'न सफलं' ही मुळातील 'न निष्फलं' ची केलेली दुरुस्ती आहे. केवळ प्रसिद्धींनी युक्त असे कथानक असले की त्यापासून बोध प्राप्त होतोच असे नाही हा अर्थ अभिप्रेत असल्यामुळे ही दुरुस्ती आवश्यक आहे हे उघड आहे. – 'विभूति' शब्दाचा अर्थ पुरुषार्थरूप विभव असा केला आहे, आणि नाटकाचे तेच फल होय असे मानले आहे. – 'आदिशब्दः प्रधानवाची' आदि शब्दाचा हा निराळाच अर्थ केला आहे. – 'फलमपि हि दृष्टसुखार्थं बाहुल्येन' येथेही थोडी दुरुस्ती केली आहे. हस्तलिखितात 'फलमपि दृष्टसुखार्थं हीति बाहुल्येन' असा पाठ आहे. मुद्रित पाठ 'तत्फलमपि दृष्टसुखार्थी हि लोको बाहुल्येन' असा आहे. त्यात 'फलम्' चा अन्वय लागत नाही. 'दृष्टसुख' म्हणजे या जगातच प्राप्त होणारे सुख. – 'तत्र' म्हणजे ज्यात राजाने वानप्रस्थ घेतल्याचे दाखविले आहे त्या नाटकात. – 'गुणैः' चा 'गौण चेष्टितांनी' असा केलेला अर्थही नेहमीपेक्षा निराळा आहे. तो मूळ श्लोकात अभिप्रेत असेल असे म्हणता येण्यासारखे नाही. – 'निर्वाहात्' निर्वाह म्हणजे तडीस जाणे, सिद्ध होणे, यशस्वी होणे. – 'इति व्याख्यानम्' अशी व्याख्या श्रीशङ्कुकाने केली असावी. कारण पुढील श्लोकावरील व्याख्येत श्रीशङ्कुकाचे उध्दृत केलेले मत अर्थशास्त्राला धरूनच आहे. – 'कौमुदीमहोत्सवादयः' यात मुद्राराक्षसाचे स्मरण असावे. – 'चाणक्य' याने कौटिलीय अर्थशास्त्राचा निर्देश अभिप्रेत आहे. – 'अवान्तर' म्हणजे मधले, दरम्यानचे.

**नृपतीनां यच्चरितं नानारसभावचेष्टितं[1] बहुधा ।**
**सुखदुःखोत्पत्तिकृतं भवति हि तन्नाटकं नाम ॥ १२ ॥**

नाना प्रकारचे रस, भाव व चेष्टित असलेले, पुष्कळ प्रकारे सुख व दुःख यांच्या उत्पत्तींनी घडलेले असे जे राजांचे चरित तेच नाटक होय.

१ का -चेष्टितैर्, नि -संभृतं.

**तस्मादस्य तन्नामेत्याह नृपतीनां यच्चरितमिति । यद् यस्मान्नृपतीनां संबन्धि व्युत्पाद्यानां सामर्थ्यान्नृपतीनामेव नाटकं नाम तच्चेष्टितं प्रह्वीभावदायकं भवति, तथा हृदयानुप्रवेशरञ्जनोल्लासनया हृदयं शरीरं चोपायव्युत्पत्तिपरिघट्टितया चेष्टया नर्तयति । नट नतौ नृतौ इत्युभयथा हि स्मरन्ति । तदिति तस्माद्धेतोः नामास्य नाटकमिति ।**

म्हणून ह्याचे ते (नाटक असे) नाव आहे हे 'नृपतीनां यच्चरितम्' इत्यादी श्लोकात सांगतात. 'यत्' म्हणजे ज्याअर्थी राजांच्या संबंधी असलेले नाटक नावाचे त्यांचे चेष्टित ज्यांना बोध द्यावयाचा अशांमध्ये – औचित्यामुळे राजांच्याच मध्ये – नम्रता उत्पन्न करते, तसेच हृदयात प्रवेश करून रंजकतेचा विकास साधून तद्द्वारा हृदयाला व शरीराला उपायांच्या बोधाशी निगडित अशा चेष्टेने नाचायला लावते. नट् धातू नति म्हणजे नम्र होणे व नृति म्हणजे नाचणे ह्या दोन्ही अर्थात दिला आहे. तत् म्हणजे त्याकारणाने ह्याचे नाव नाटक होय.

'व्युत्पाद्य' म्हणजे ज्यांना बोध करावयाचा असे प्रेक्षक. – 'सामर्थ्यान्नृपतीनामेव' प्रस्तुत ठिकाणी व्युत्पाद्य प्रेक्षक फक्त राजेलोकच असे मानले आहे. याचे कारण असे की 'नटयति इति नाटकम्' या व्युत्पत्तीतील नटयति शब्दाचा एक अर्थ 'नम्र करते' असा केला आहे. नाटकात राजाचे चरित पाहून फलस्वरूप नम्रतेचा बोध होणे राजांच्याच बाबतीत संभाव्य आहे अशी ही कल्पना आहे. राजांच्या चरितापासून साक्षात् बोध राजांनाच होऊ शकतो हे सामान्यपणे मान्य होण्यासारखे आहे. 'सामर्थ्यात्' म्हणजे योग्यतेमुळे, उचिततेमुळे. – 'उपायव्युत्पत्तिपरिघट्टितया' अमुक प्रकारच्या दुःख आदीवर अमुक प्रकारचा उपाय अशा तऱ्हेचा होणारा बोध म्हणजे 'उपायव्युत्पत्ति', त्याच्याशी दृढपणे निगडित झालेली अशी चेष्टा. – 'नर्तयति' ही दुसरी प्रक्रिया सर्व प्रेक्षकांच्या बाबतीत घडून येते असे समजण्यास हरकत नाही. – 'नट नतौ नृतौ' हा हस्तलिखितातील पाठच बरोबर आहे. मुद्रित पाठ 'नट नृतौ नृत्ते' चुकीचा आहे; त्यात 'प्रह्वीभावदायकं भवति' या अगोदर निर्देशिलेल्या अर्थाचा समावेश नाही आणि नृति व नृत्त ह्यांच्या अर्थात काही फरक नाही. – 'तत्' म्हणजे 'नटयति' म्हणून या प्रकाराला नाटक असे नाव आहे. 'नम्र करते' व 'नाचायला लावते' असे नटयति शब्दाचे दोन अर्थ केले आहेत.

**ननु पुराणाद्युपनिबद्धोऽपि तदर्थः कस्मान्नटनेनेदं भावयतीति आह नानेति । बहुप्रकारान् रसान् भावयन्ति संपादयन्ति यानि चेष्टितानि नटव्यापारात्मानोऽभिनयाः, तैरेतत्प्रह्वीभावदायकं हृद्यतमरसास्वादसूचीद्वारप्रवेशितं तत्कर्तव्यसूत्रं हृदयरोहणरूढशौर्यादिधर्मरत्नग्रथनकारि भवतीति ह्युक्तमसकृत् ।**

पुराणादी ग्रंथांत ती गोष्ट मांडलेली असताही नटनाने हे भावित का करतात या आक्षेपाला उत्तर म्हणून 'नाना-' इत्यादी म्हटले आहे. पुष्कळ प्रकारचे रस भावित करतात म्हणजे संपादित करतात ती चेष्टिते म्हणजे नटांच्या व्यापाराच्या स्वरूपाचे अभिनय,

त्यांच्यामुळे हे (नाटक) नम्रतादायक होते व अत्यंत हृदयंगम अशा रसास्वादरूपी सुईच्या दाराने आत ओवलेले प्रेक्षकाचे कर्तव्यरूपी सूत हृदयांत वाढलेल्या शौर्यादिधर्मरूपी रत्नांचे ग्रथन करण्यास समर्थ होते असे आम्ही अनेक वेळा सांगितले आहे.

'तदर्थः' म्हणजे राजाने नम्र असावे इत्यादी उपदेश. – 'कस्मान्नटनेनेदं' हस्तलिखितातील 'तस्मान्नतानेनेदं' या पाठावरून ही दुरुस्ती केली आहे. मुद्रित पाठ 'कस्मान्नटानेवेदं' असा आहे. यातील 'कस्मात्' आवश्यक आहे; कारण 'ननु' ने निदर्शित होणारा आक्षेप त्याशिवाय मांडला जात नाही. पण 'नटान्' हे भावयति चे कर्म असंभाव्य आहे. 'नटन' ही नाटक शब्दाच्या वरील व्युत्पत्तीत अभिप्रेत असलेली क्रिया. मूळ 'नटनेन' चा 'नतानेन' असा भ्रष्ट पाठ झाला हे उघड आहे. आक्षेप घेतला आहे तो असा की पुराणांत वगैरे अशा तऱ्हेचा उपदेश असताना नाटकाच्या द्वारे तो देण्याची आवश्यकता काय? – 'बहुप्रकारान् रसान् भावयन्ति' मुद्रित पाठ 'बहुप्रकारा अत्र संभावयन्ति' असा आहे, तो बरोबर नाही. प्रस्तुत ठिकाणी 'नानारसभावचेष्टितम्' या वचनाची व्याख्या केली आहे ती अशी – 'नाना' म्हणजे पुष्कळ प्रकारच्या 'रसान्' म्हणजे रसांना 'भावयन्तीति भावानि' म्हणजे भावित करणारी 'चेष्टितानि' म्हणजे नटांचा अभिनय 'यस्मिन् तत्' म्हणजे ज्यात आहे अशा प्रकारचे नाटक. येथे भाव शब्दाचा नेहमीचा अर्थ घेतला नसून त्याला 'भावित करणारे' या अर्थी चेष्टितचे विशेषण मानले आहे. – 'हृद्यतम- इ०' रसास्वादाला सुईने केलेल्या प्रवेशद्वाराची उपमा दिली आहे, उपदेशद्वारा होणाऱ्या कर्तव्याच्या जाणिवेला सुईच्या द्वारा आत प्रवेश करणाऱ्या दोऱ्याची आणि बोध झालेल्या शौर्यादी धर्मांना त्या दोऱ्यात ओवलेल्या रत्नांची. हे ग्रथनाचे कार्य प्रेक्षकाच्या हृदयात घडते. या सर्वाचा आशय असा की रसास्वाद घेत असता प्रेक्षकाला आपल्या कर्तव्याचा बोध होऊन त्याच्या अंगी शौर्यादी आवश्यक गुण बाणतात. – 'असकृत्' मुख्यतः पहिल्या व सहाव्या अध्यायांवरील टीकेत.

ननु नृपतिचरित एव किमित्ययमास्वादो न देवचरित इत्याह बहुधेति। बहुप्रकाराः उपायवैचित्र्याद्याः सुखदुःखोत्पत्तयस्तासां कृतं संपादनं यत्र। देवचरिते तु तन्नास्तीत्युक्तम् अत एव प्रतीतिविघातस्य वैरस्यदायिनः संभवो यत्र तन्नाटके नोपनिबद्धव्यम्। तेन वर्तमानराजचरितं चावर्णनीयमेव, तत्र विपरीतप्रसिद्धि-बाधया अध्यारोपस्याकिंचित्करत्वात् योगनन्दरावणादिविषयसच्चरिताध्यारोपवत्। एतदर्थमेव प्रख्यातग्रहणं प्रकर्षद्योतकं पुनः पुनरुपात्तम्। अत एव वेदशास्त्रं न नाटकं, नियोगेन हि तत्र पुमान्प्रवर्त्यते, न फलोत्पत्त्या। फलप्राधान्यपक्षेऽपि तत्र संदेहः। एवं पुराणादावपि। इह तु बाधोदयासहिष्णुप्रत्यक्षायमाणाचिर-विलम्बितप्रतीतिसिद्धा सुखदुःखोत्पत्तिरिति।

राजांच्या चरितातच हा आस्वाद घेता येतो, देवांच्या चरितात नाही असे का ते 'बहुधा' इत्यादी शब्दांत सांगतात. पुष्कळ प्रकारच्या म्हणजे उपायांच्या वैचित्र्य आदींनी

युक्त अशा सुख व दुःख यांच्या उत्पत्ती, त्यांचे कृत म्हणजे संपादन ज्यात आहे ते नाटक. देवांच्या चरितात ते नसते हे सांगितलेच आहे. म्हणूनच ज्यामुळे प्रतीतीत विघ्न उत्पन्न होऊन विरसता उत्पन्न होण्याचा संभव असेल असे काही नाटकात योजू नये. आणि यास्तव वर्तमानकालीन राजाचे चरित सुद्धा वर्णन करू नये, कारण त्यात विपरीत प्रसिद्धीचा बाध करून (सत्प्रवृत्तीचा) केलेला अध्यारोप निरुपयोगी ठरतो, योगनन्द, रावण इत्यादींच्या बाबतीत केलेल्या सच्चरिताच्या अध्यारोपाप्रमाणे. ह्याचसाठी प्रकर्ष दाखविणाऱ्या प्रख्यात शब्दाचा पुन्हा पुन्हा उपयोग केला आहे. म्हणून वेदशास्त्र काही नाटक नाही, कारण त्यात आज्ञा म्हणून मनुष्य प्रवृत्त केला जातो, फलाच्या उत्पत्तीसाठी नाही. फलाला प्राधान्य तेथेही असते हा पक्ष मान्य केला तरी त्याविषयी संदेह उत्पन्न होतोच. हीच गोष्ट पुराण आदींची. परंतु येथे (ह्या नाटकाच्या संबंधात) बाधक गोष्टीचा प्रादुर्भाव सहन न करणाऱ्या, प्रत्यक्षवत् होणाऱ्या व तात्कालिक अशा प्रतीतीने सिद्ध होणारी अशी सुखदुःखांची उत्पत्ती असते.

'बहुधा' चा संबंध उत्तरार्धातील 'सुखदुःखोत्पत्तिकृतम्' शी जोडला आहे. – 'उपाय-वैचित्र्याद्याः' हे 'बहुप्रकाराः' चे स्पष्टीकरण आहे, आणि ते 'सुखदुःखोत्पत्तयः' चे विशेषण मानले आहे. उपाय म्हणजे सुखदुःखादी उत्पन्न होण्याची कारणे. – 'कृतं' चा अर्थ संपादन, सिद्ध करणे असा केला असून 'सुखदुःखोत्पत्तीनां कृतं यत्र तन्नाटकम्' असा विग्रह केला आहे. – 'तन्नास्ति' तत् म्हणजे सुखदुःखोत्पत्तीचे संपादन. – 'विपरीतप्रसिद्धि- इ०' याचा अर्थ असा दिसतो की नाटकात राजाचे चरित चांगल्या स्वरूपात दाखविले जाईल व प्रत्यक्षात ते तसे नसल्याचे माहीत असणार. तेव्हा त्या नाटकाचा बोधाच्या दृष्टीने काही उपयोग होण्यासारखा नाही. 'विपरीत' म्हणजे विरुद्ध असलेली, वाईट. 'अध्यारोप' म्हणजे त्या राजावर नाटकात केला जाणारा चांगल्या वर्तणुकीचा आरोप. 'योगनन्दरावणादि- इ०' उदाहरणादाखल असे म्हटले आहे की योगनन्द, रावण वगैरे दुष्ट माणसांवर सच्चरिताचा आरोप केला तर त्याचा जसा काही उपयोग होणार नाही त्याप्रमाणे. योगनन्द म्हणजे मायावी, खोटा नन्द. कथासरित्सागरातील कथेत त्याचा निर्देश आहे. हस्तलिखितातील 'सच्चरित' च्या ऐवजी मुद्रितात 'चरित' एवढेच आहे. पण अर्थ सुसंगत होण्यासाठी 'सच्चरित' आवश्यक आहे. – 'नियोगेन' वेदांत 'यजेत' इत्यादी विधीच्या स्वरूपात आज्ञा असतात. – 'फलप्राप्तिपक्षेऽपि' म्हणजे वेदातील 'स्वर्गकामः यजेत' इत्यादी विधिवाक्यात फलप्राप्तीचा सुद्धा निर्देश असतो, तेव्हा त्यासाठी मनुष्य प्रवृत्त होतो असे म्हणता येईल. – 'तत्र संदेहः' म्हणजे स्वर्गरूपी फलप्राप्ती होते की नाही हे संदिग्ध असते. ते फल तात्काल (व या जन्मी) मिळणारे नसते. याउलट नाटकाचे फल तात्काल प्राप्त होते. – 'बाधोदया- इ०' यात 'प्रतीति' ची तीन विशेषणे योजिली आहेत.

**अनेन वाक्येनैतदुक्तं भवति । यद्यपि सर्वरूपकाणामर्थो हृदये प्रविष्टो विनेयांश्चावनतान् करोति – तत एव नाटकशब्दः सामान्यवचनोऽपि 'कार्योत्पन्नानि नाटके' इत्यादिषु स्थानेषु दर्शितः – तथापि येऽवश्यव्युत्पाद्या राजानो – यद्व्युत्पत्ति-**

द्वारेण विश्वं व्युत्पन्नम् – ते तदीयहृदयसंवादयोग्यनृपतिचरितप्रदर्शनेन प्रधानतया प्रधानेऽर्थे व्युत्पाद्यन्ते, अमात्यादयस्तदङ्गत्वेनैव, प्रयोगस्य च यथोचितं समुद्गकस्थगगनवद्व्युपादकव्युत्पाद्यभावात्। तेन प्रधानपुरुषार्थे प्रधानविनेयानामन्यत्रान्येषां वेदयतोऽवनतिं व्युत्पत्तिं ददाति, तत एव नाटकमुच्यते।

ह्या वाक्याचा पुढीलप्रमाणे अर्थ अभिप्रेत आहे. जरी सर्व प्रकारच्या रूपकांचा अर्थ हृदयात प्रविष्ट होऊन बोध होण्यास योग्य मनुष्यांना नम्र करतो आणि म्हणूनच 'कार्योत्पन्नानि नाटके' इत्यादी ठिकाणीं नाटक शब्द सामान्यवाचक असल्याचेही दाखविले आहे– तथापी ज्या राजेलोकांना प्रथम बोध करणे आवश्यक आहे – कारण त्यांच्या द्वारा अखिल विश्वाला बोध होऊ शकतो – त्यांना हृदयसंबादास योग्य अशा राजांचे चरित दाखवून मुख्यत्वेकरून त्यांना मुख्य गोष्टीविषयी बोध दिला जातो, अमात्य आदींना केवळ त्याचे अंग म्हणून, व प्रयोगात उचिततेप्रमाणे पेटाऱ्यातील आकाशासारखे व्युत्पादकत्व व व्युत्पाद्यत्व असतात याकारणाने. तेव्हा मुख्य विनेयांना प्रधान पुरुषार्थाच्या संबंधात व इतरांना अन्य संबंधात संवेदन असणाऱ्याला नम्रता व बोध देते म्हणूनच त्याला नाटक म्हणतात.

'विनेयांश्चावनतान्' यातील 'च' चे प्रयोजन स्पष्ट नाही. 'अवनतान्' च्या जागी मुद्रित पाठ 'विनीतान्' आहे. पण अवनतान् हाच पाठ ह्या संदर्भात योग्य आहे. – 'सामान्यवचनः' म्हणजे सर्व रूपकप्रकारांचा वाचक, केवळ नाटक ह्या विशिष्ट प्रकाराचा नाही. – 'कार्योत्पन्नानि नाटके' असे वचन कोठे आढळत नाही. पण १७.४८ ह्या श्लोकात 'काव्यं भवति नाटके' असे आहे. – 'येऽवश्य-' मुद्रितात 'ह्यवश्य-' असे आहे. – 'तें' ही मुळातील 'तेन' ची दुरुस्ती आहे. – 'प्रधानेऽर्थे' म्हणजे राजाने कसे वागावे यासंबंधी. – 'तदङ्गत्वेन' यातील 'तत्' म्हणजे प्रधान अर्थ. – 'समुद्गकस्थगगनवत् व्युत्पादकव्युत्पाद्यभावात्' प्रयोगच व्युत्पादक व व्युत्पाद्य असतो असे येथे म्हटले आहे. म्हणजे प्रयोग बोध देणारा असतो व प्रयोगालाही बोध होण्यासारखा असतो. हे दुसरे कसे शक्य आहे ते स्पष्ट नाही. तसेच 'पेटाऱ्यात असलेल्या गगनासारखा' ह्या तुलनेचे स्वरूपही स्पष्ट नाही. पेटीतील गगनाशी नाट्यगृहातील प्रयोगाची तुलना केली आहे. प्रयोगाचा बाह्य जगातील मनुष्यांवर परिणाम होतो (व्युत्पादक), त्याचबरोबर तो जगात घडणाऱ्या गोष्टींवर आधारित असतो (व्युत्पाद्य), अशा प्रकारची कल्पना असावीसे वाटते. गगनाच्या संबंधात पेटीतील गगन बाह्य आकाशाचे व्युत्पाद्य व व्युत्पादक आहे, म्हणजे बाहेरच्या आकाशाने आतील आकाशाचा बोध होऊ शकतो व आतील आकाशाने बाह्य आकाशाचा बोध होऊ शकतो, कारण दोन्हींचे स्वरूप एकच आहे, अशा प्रकारची कल्पना अभिप्रेत दिसते. – 'वेदयतः' ह्या शब्दाची ह्या स्वरूपात काही आवश्यकता दिसत नाही. कारण अगोदरच बहुवचनी षष्ठ्यन्त शब्द वापरलेले आहेत. तेव्हा ह्या एकवचनी षष्ठ्यन्त शब्दाचा उपयोग बरोबर वाटत नाही. कदाचित मूळ पाठ 'वेदनतः' किंवा 'संवेदनतः' असा असावा.

श्रीशङ्कुकस्तु व्याचष्टे विजिगीषुररिर्मध्यमोदासीनौ मित्रं मित्रमित्रमिति, एषां चरितं बहुवचनेन लभ्यते। अन्ये त्वाहुः पूर्वं राजर्षिवंशप्रभवा नायका उक्ताः,

अनया त्वार्यया चन्द्रगुप्तबिन्दुसारादयोऽपि संगृह्यन्त इति । व्याख्यातमर्थद्वय-मेतत्पूर्वयार्ययैव संगृहीतमिति प्रथमव्याख्यात एव युक्तोऽर्थः ।

परंतु श्रीशङ्कुकाने अशी व्याख्या केली आहे की राजे म्हणजे विजिगीषु, अरि, मध्यम, उदासीन, मित्र आणि मित्रमित्र; त्यांचे चरित असा अर्थ ('नृपतीनां' यातील) बहुवचनाने प्राप्त होतो. इतर टीकाकार तर म्हणतात की पूर्वी राजर्षींच्या वंशात उत्पन्न झालेल्या नायकांचा निर्देश केला आहे, पण प्रस्तुत आर्येने चन्दगुप्त, बिन्दुसार आदी राजांचाही समावेश केला आहे. हे दोन केलेले अर्थ पूर्वीच्या आर्येतच अन्तर्भूत आहेत, म्हणून प्रथम केलेला अर्थच योग्य होय.

'विजिगीषु- इ०' अर्थशास्त्रात बारा राजांच्या राजमंडलाचा निर्देश आहे. त्यांपैकी प्रमुख म्हणून ह्या सहांचा येथे निर्देश केलेला दिसतो. – 'पूर्वयार्थैव संगृहीतम्' अभिनवगुप्ताचे म्हणणे असे दिसते की 'प्रख्यातोदात्तनायकम्' मध्ये शङ्कुकनिर्दिष्ट राजांचा समावेश होतो, तसाच चन्द्र-गुप्तादींचाही होतो.

यत्तु कैश्चिदभिधीयते –

देवा धीरोद्धता ज्ञेयाः स्युर्धीरललिता नृपाः ।
सेनापतिरमात्यश्च धीरोदात्तौ प्रकीर्तितौ ।
धीरप्रशान्ता विज्ञेया ब्राह्मणा वणिजस्तथा ।

इति वचने पर्यालोच्यमाने देवादीनां नाटकनायकत्वानुपपत्तेर्धीरललित एक एव नायक इति तदसत् । न हि जनकप्रभृतीनां रामादीनामपि वा धीरललितत्वम्, यदाह 'धीरोदात्तं जयति चरितं रामनाम्नश्च विष्णोः' इति । यत्तु पठितं तत्र धीरललितत्वं राज्ञ एव वर्णनीयं नान्यस्य, सेनापत्यमात्ययोर्धीरोदात्तत्वमेव, देवानां धीरोद्धतत्वमेव, द्विजादीनां धीरप्रशान्तत्वमेव, इत्येवंपरं द्रष्टव्यम् । अत एव प्रख्यातोदात्तेत्यत्र चत्वारोऽपि नायकाः स्वीकृता इति व्याख्येयम् ।

काही टीकाकार असे जे म्हणतात की 'देव धीरोद्धत होत असे समजावे, नृपती धीरललित असावेत, सेनापती आणि अमात्य धीरोदात्त होत असे म्हटले आहे आणि ब्राह्मण व वणिक धीरप्रशान्त होत असे जाणावे' ह्या नाट्यशास्त्रातील वचनाचा विचार केल्यास देव आदी नाटकाचे नायक होऊ शकणार नाहीत म्हणून धीरललित असा एकच नायक होऊ शकतो ते बरोबर नाही. कारण, जनकप्रभृती किंवा राम आदी सुद्धा धीरललित होते असे म्हणता येण्यासारखे नाही. 'राम नाव असलेल्या विष्णूचे धीरोदात्त चरित विजयी होते' असेच म्हटले आहे. पण नाट्यशास्त्रात जे वचन आहे त्याचा आशय असा समजावा की

धीरललितत्व हे राजाच्याच ठिकाणी असलेले दाखवावे, इतर कोणाच्या नाही, सेनापती व अमात्य यांच्या ठिकाणी धीरोदात्तत्वच दाखवावे, देवांच्या ठिकाणी धीरोद्धतत्वच दाखवावे आणि ब्राह्मण आदींच्या ठिकाणी धीरप्रशान्तत्वच दाखवावे. म्हणूनच 'प्रख्यातोदात्त' या वचनात चारही प्रकारचे नायक स्वीकृत झाले आहेत अशी व्याख्या केली पाहिजे.

'देवा धीरोद्धता' इत्यादी श्लोक २४·१८–१९ येथे आढळतील. – 'प्रख्यातोदात्तनायकम' असे वरील दहाव्या श्लोकात आहे.

**एवं निर्वचनमनयार्यया दर्शितम् ।**

याप्रमाणे ह्या आर्येत नाटक शब्दाची व्युत्पत्ती दाखविली आहे.

**अस्यावस्थोपेतं कार्यं प्रसमीक्ष्य बिन्दुविस्तारात् ।**
**कर्तव्योऽङ्कः सोऽपि तु गणान्वितं नाट्यतत्त्वज्ञैः ॥ १३ ॥**

ह्या नाटकाचे अवस्थांनी युक्त असलेले कार्य नीट विचारात घेऊन बिंदूच्या विस्ताराच्या अनुरोधाने नाट्याचे तत्त्व जाणणाऱ्यांनी अंक—आणि तोही संख्येने युक्त असा — रचावा.

**प्रख्यातवस्तुप्रभृतिरर्थोऽन्यत्र सुप्रसिद्धः, अङ्कप्रवेशकौ त्वप्रसिद्धौ इत्यङ्कस्वरूपं तावद्वितत्य कथयति अस्यावस्थोपेतामिति । अस्य नाटकस्य यत्कार्यं बिन्दुकृतया विस्तारणया विततीकरणरूपया अननुसंधानजननबलादेकावस्थानुरूपमाधिकारिकमितिवृत्तं संपाद्यम्, तदवस्थया प्रारम्भादिकयोपेतं परिपूर्णं प्रकर्षेण संबन्धं प्रेक्ष्य अङ्कः कर्तव्यः । एतदुक्तम् – इतिवृत्तस्य बिन्दुसूत्रस्यूतस्य प्रारम्भाद्यवस्थापञ्चकचारिणो यदा प्रारम्भावस्था पूर्णत्वमेति तदाङ्कच्छेदो बिन्दुद्वारानुसंधीयमानद्वितीयाङ्काभिधेयरूपो विधेयः । एवं प्रयत्नाद्यवस्थाचतुष्टयेऽपि वाच्यमिति पञ्च तावदङ्का इति मुख्यः कल्पः ।**

प्रख्यातवस्तु वगैरे गोष्टी इतरत्र सुप्रसिद्ध आहेत, पण अंक व प्रवेशक हे प्रसिद्ध नाहीत म्हणून प्रथम अंकाचे स्वरूप 'अस्यावस्थोपतम्' इत्यादी श्लोकात विस्ताराने सांगतात. 'अस्य' म्हणजे ह्या नाटकाचे जे कार्य बिन्दूच्या प्रसारित करण्याच्या क्रियेच्या स्वरूपाच्या

१ **नि** अङ्कावस्थोपेतं कार्यं प्रसमीक्ष्य बिन्दुविस्तारात् । कर्तव्योऽङ्कस्तज्ज्ञैः स तु सम्यङ् नाटके विधिवत् ॥, **का घो** नानावस्थान्तरितो बिन्दोः संहार(**घो** संचार)मात्रमधिकृत्य । कर्तव्याङ्केऽ(**घो** व्योङ्को)प्येवं स तु सम्यङ् नाटके तज्ज्ञैः ॥.

विस्तारणाने अनुसंधान उत्पन्न न झाल्याकारणाने एकाच अवस्थेला अनुरूप असे जे साध्य करावयाचे असलेले प्रधान कथानक त्याच्या प्रारंभ आदी अवस्थेने उपेत म्हणजे परिपूर्ण असा प्रकृष्ट संबंध लक्षात घेऊन अंक रचावा. याचा अर्थ असा. बिन्दुरूप सूत्रात ओवलेल्या, प्रारंभप्रभृती पाच अवस्थांतून जाणाऱ्या कथानकाची प्रारंभावस्था जेव्हा पूर्ण होते तेव्हा अंकाची विभागणी बिन्दूच्या द्वारा अनुसंधानाने युक्त दुसरा अंक असे नाव असलेल्या स्वरूपाची करावी. असेच प्रयत्न आदी इतर चार अवस्थांच्या बाबतीत सुद्धा समजावे. याप्रमाणे नाटकात पाच अंक असावेत ही मुख्य व्यवस्था.

'अननुसंधान- इ०' बिन्दूचे नेहमीचे कार्य कथानकातील अनुसंधानाचे म्हणजे कथानक विकसित होत असता त्यात एकसूत्रता राखण्याचे. प्रस्तुत ठिकाणी असे म्हटले आहे की कथानकाची एक अवस्था संपली की अनुसंधानाचे सातत्य नाहीसे होते. म्हणून श्लोकातील 'कार्य' शब्दाचा एका अवस्थेतच संपादित करावयाचे कार्य असा मर्यादित अर्थ केला आहे. – 'प्रकर्षेण संबन्धं प्रेक्ष्य' ही श्लोकातील 'प्रसमीक्ष्य' शब्दाची व्याख्या आहे. – 'पञ्च तावदङ्काः' प्रत्येक अवस्थेसाठी एक अंक ह्या हिशोबाने.

**नन्वेवं न्यूनत्वे आधिक्ये वाङ्कानां कथं निर्बन्ध इत्याह नाट्यतत्त्वज्ञैरनयैव दिशा सोऽङ्कोऽपिशब्दादन्यथापि कर्तव्यः। तुर्विशेषं द्योतयति। यदा प्रारम्भावस्थाप्रधानं भवतीति तदा तस्या एवोपक्रमोपसंहारावस्थाद्वयापेक्षया द्वावङ्कौ, अन्यासामेकैकाङ्कतेति यावत्। सर्वासामवस्थाद्वययोगेन संपादनमिति षडङ्कत्वात् प्रभृति सप्तजातप्राप्तौ दशाङ्कत्वम्, कांचिदवस्थां प्रधानीकृत्य यदावस्थान्तरेण मिश्रीकृत्य बध्नाति तदा नाटिकाया न्यूनाङ्कत्वम् इत्येतत्तुशब्देन तत्त्वज्ञशब्देन च दर्शितम्। तत्रावस्थाः 'प्रारम्भश्च प्रयत्नश्च' इत्यादिना वक्ष्यन्ते, 'प्रयोजनानां विच्छेदे यदविच्छेदकारणम्' इति बिन्दुर्वक्ष्यते, 'यदाधिकारिकं वस्तु सम्यग्' इति कार्यम्।**

असे असेल तर अंकांच्या कमी किंवा अधिक संख्येबद्दल आग्रह कशासाठी ह्याचे उत्तर म्हणून सांगतात की नाट्याचे तत्व जाणणाऱ्यांनी याच प्रकारे तो अंक – 'अपि' शब्दाच्या उपयोगामुळे दुसऱ्या प्रकारे सुद्धा – करावा. 'तु' शब्दाने विशेष दाखविला जातो. ज्यावेळेस कथानकात प्रारंभावस्थेला प्राधान्य असते तेव्हा त्या अवस्थेच्याच प्रारंभीची आणि अखेरची अशा दोन अवस्थांच्या अनुरोधाने दोन अंक व इतर अवस्थांचे प्रत्येकी एकेक अंक असे करावे. सर्वच अवस्थांची कार्ये दोन दोन अवस्थांत संपादित होणे शक्य असल्यामुळे सहा अंकांपासून सात, आठ, नऊ व दहा अंक, तसेच एखाद्या अवस्थेला प्राधान्य देऊन तिच्यात दुसऱ्या एखाद्या अवस्थेचा समावेश करून रचना करतात तेव्हा नाटिकेत संख्येने कमी अंक – हे 'तु' शब्दाने व 'तत्त्वज्ञ' शब्दाने दाखविले आहे. त्यांपैकी

अवस्थांचे वर्णन 'प्रारम्भश्च प्रयत्नश्च' इत्यादी श्लोकात केले जाईल, बिन्दूचे वर्णन 'प्रयोजनानां विच्छेदे यदविच्छेदकारणम्' यात करण्यात येईल व 'यदाधिकारिकं वस्तु सम्यग्' यात कार्याचे वर्णन.

नाटकात अंक किती असावेत यासंबंधी हे विवेचन मुळातील 'गणान्वितं' या शब्दाच्या अनुरोधाने उत्पन्न झाले आहे असे दिसते. त्यातील 'गण' शब्दाचा (अंकांची) 'संख्या' असा अर्थ केला असावा. '(अंकांचा) समूह' हा अर्थही संभाव्य आहे. गणान्वितम् हा अव्ययीभाव समास समजावा. मूळचा पाठ 'गणान्वितो' असा पुल्लिंगी असण्याचा संभव आहे. – 'निर्बन्ध' म्हणजे आग्रह. – 'प्रारम्भावस्थाप्रधानं' हस्तलिखितात 'प्रारम्भावस्थावद्शिवप्रधानं' असा भ्रष्ट पाठ आहे. मुद्रितपाठ 'प्रारम्भावधिप्रधानं' ही त्याची केलेली दुरुस्ती असावी. पण मुळात 'अवधि' पेक्षा 'अवस्था' शब्द असण्याचाच अधिक संभव आहे हे प्रस्तुत संदर्भात स्पष्ट आहे. –'सप्तजातप्राप्तौ' ह्या वचनाचा काहीच अर्थ लागत नाही. अशी शक्यता आहे की 'सप्ताष्टनवदशाङ्कत्वम्' असा मूळ पाठ असावा. 'षडङ्कत्वात्प्रभृति' ला अनुरूप 'दशाङ्कत्वपर्यन्तम्' असे वचन नसून केवळ 'दशाङ्कत्वम्' एवढेच आहे, यावरून वरील सूचनेला पुष्टी मिळण्यासारखी आहे. ह्या सूचनेला अनुसरून भाषांतर केले आहे. – 'प्रारम्भश्च' इत्यादी श्लोक पुढे १९.७ येथे आहे. 'प्रयोजनानां' इत्यादी श्लोक १९.२२ येथे आणि 'यदाधिकारिकं' इत्यादी १९.२५ येथे. त्या ठिकाणी त्यांची व्याख्या पहावी.

**अङ्क इति रूढिशब्दो भावैश्च रसैश्च रोहयत्यर्थान् ।**
**नानाविधानयुक्तो यस्मात्तस्माद्भवेदङ्कः ॥ १४ ॥**

अंक हा रूढी (वाढ) ह्या अर्थाचा शब्द आहे. ज्याअर्थी विविध घडामोडींनी युक्त होऊन रस आणि भाव ह्यांच्या साहाय्याने कार्याची वाढ करतो त्याअर्थी त्याला अंक असे म्हणतात.

**अथ कस्मादङ्क इत्याह अङ्क इति रूढिशब्द इति । भावै रसैश्च गूढश्छन्नो व्याप्तोऽर्थोऽङ्कशब्देन यादृच्छिकेनोच्यत इति भट्टलोल्लटाद्या गूढ इति पाठं व्याचक्षिरे । अन्ये रोहयत्यर्थानिति पठन्ति व्याचक्षते च । रूढी रोहणं तेनोत्सङ्गोऽङ्क उच्यते । यो नाटकांशः शृङ्गारादिरसैर्विभावानुभावव्यभिचारिणोऽर्थान् तथा भावैर्विभावाद्यैर्यथास्वं भावादीनर्थान् हृदयमारोपयति अर्थान्वहति, नानाप्रकारैश्च वक्ष्यमाणैः 'ये नायका निगदिता' इत्यादिभिर्विधानैरुपेतः, तस्मादुत्सङ्गवदारोहणसंबन्धादङ्क इत्युच्यते । एतत्पुष्कलमिव, अजाविना रूढेरत्रार्थे वृत्त्यदर्शनात् ।**

आता अंक असे का म्हणतात ते 'अङ्क इति रूढिशब्दः' यात सांगतात. भट्टलोल्लट प्रभृती टीकाकार यांनी 'गूढ' असा पाठ घेऊन भाव व रस यांनी गूढ म्हणजे झाकलेला,

व्यापलेला असा जो पदार्थ त्याला यदृच्छेने अंक म्हणतात अशी व्याख्या केली आहे. दुसरे टीकाकार 'रोहयत्यर्थान्' असा पाठ घेऊन त्याचा पुढीलप्रमाणे अर्थ करतात. रूढि म्हणजे वर चढणे, त्यावरून मांडीला अंक म्हणतात. नाटकातील जो अंश शृंगारादी रसांच्या योगे विभाव, अनुभाव व व्यभिचारिभाव ह्या गोष्टी तसेच विभाव आदी भावांच्या योगे ज्याचे त्याचे योग्य असे भाव वगैरे गोष्टी हृदयात आरोपित करतो, ह्या गोष्टींचा भार वाहतो, आणि पुढे सांगितलेल्या 'ये नायकाः निगदिताः' इत्यादी विविध प्रकारच्या विधानांनी युक्त असा असतो, म्हणून उत्सङ्गाप्रमाणे आरोहणाशी संबंध असल्यामुळे (तो अंश) अंक ह्या नावाने ओळखला जातो. हे पुष्कळच झाले. कारण,....शिवाय रूढि शब्दाचे (उत्सङ्ग) ह्या अर्थी निर्वचन दिलेले नाही.

'याद्दच्छिकेन' म्हणजे व्युत्पत्ती वगैरेनी सिद्ध न झालेला असा, योगायोगाने रूढ झालेला. – 'गूढ इति पाठम्' वस्तुतः 'गूढशब्द इति पाठम्' असे पाहिजे. कारण, 'गूढः' असे स्वतंत्र पद मानल्यास आर्येच्या पहिल्या चरणात तेरा मात्रा होतील. तसा पाठ कोणी स्वीकारला असल्याची शक्यता नाही. – 'रूढी रोहणं इ०' या टीकाकारांनी रूढि शब्दाच्या द्वारा अंक म्हणजे उत्संग किंवा मांडी असा अर्थ केला आहे. कारण त्यावर 'रोहण' म्हणजे वर चढण्याची क्रिया होते. शरीरावयव असलेल्या अंकाच्या बाबतीतील हे व्याख्यान नाटकातील अंकाच्या बाबतीत या आर्येत 'अर्थान् रोहयति' ह्या शब्दांत लागू करून दाखविले आहे असे ह्या टीकाकारांचे म्हणणे आहे. – मुद्रित पाठात 'अङ्कः' शब्द गाळला आहे. पण तो आवश्यक आहे. – 'रसैः इ०' रसांच्या द्वारा विभाव वगैरे हृदयात प्रवेश करतात हे विधान सहाव्या अध्यायातील रसनिष्पत्तीच्या वर्णनाशी विसंगत आहे. – 'यथास्वम्' म्हणजे अमुक विभावाचे अमुक व्यभिचारिभाव इत्यादी. ही कल्पनाही नाट्यशास्त्रानुसारी नाही. – 'अर्थान् वहति' म्हणजे मांडी ह्या अर्थी अंक ज्याप्रमाणे पदार्थ आपल्यावर ठेवून घेतो, त्याप्रमाणे नाटकातील अंकही रसादींच्या द्वारा निरनिराळे अर्थ आपल्यात समाविष्ट करून घेतो. – 'ये नायका निगदिताः' इत्यादी ही पुढील सोळावी आर्या आहे. – 'एतत्पुष्कलमिव' याचा अर्थ असा दिसतो की ह्या प्रदीर्घ विवेचनात काही तथ्य नाही. – 'अजाविना' या शब्दांचा काही अर्थ लागत नाही. शेवटच्या 'विना' चा 'शिवाय' असा अर्थ असावा. परंतु, पहिली दोन अक्षरे म्हणजे कोणत्या मूळ शब्दाचे अपभ्रष्ट रूप आहेत ते लक्षात येत नाही. – 'रूढेरत्रार्थे वृत्त्यदर्शनात्' यात थोडी दुरुस्ती आहे. मुद्रित पाठ 'रूढैरत्रार्थैर्वृत्त्यदर्शनात्' असा आहे, तर हस्तलिखितात 'रूढैरत्रार्थे वृत्तिदर्शनात्' असे आहे. अभिनवगुप्ताचे येथे असे म्हणणे दिसते की रूढि ह्या शब्दाचा उत्सङ्ग असा जो अर्थ केला त्याला आधार नाही, म्हणून रूढि म्हणजे उत्सङ्ग अथवा अङ्क हे मत ग्राह्य मानता येत नाही; आणि नाटकातील अंकाचे कार्य त्या अंकासारखेच आहे हेही खरे नाही.

**तस्मादयमत्रार्थः । अङ्क इत्ययं लक्षणे रूढः शब्दः । अन्यतो व्यवच्छेदकं लक्षणम् । एतदपि च नाट्यरूपकस्य नानात्वमन्यतो भेदं विधत्तेऽनभिनेयात् । अभिनेये हि य एकदेशः स रसभावैरुपलक्षितानप्यर्थान् रोहयति हृदयसंवाद-**

**साधारणताकरणेन प्रत्यक्षभावनया रसाध्यायोक्तया। अभिरोहणं बीजस्येवाङ्कुराकारतया रसाकारोदयप्ररोहो भवति। स चाभिनेयरूपकांशैरेव संपद्यत इत्यनभिनेयात् भेदमादधानोऽभिनेयस्य रूपकस्य लक्षणं भवत्येव।**

म्हणून या ठिकाणी अर्थ असा. अङ्क हा लक्षण या अर्थी रूढ शब्द आहे. लक्षण म्हणजे दुसऱ्या पदार्थांपासून भिन्नता दाखविते ते. आणि हे (अङ्करूप लक्षण) सुद्धा नाट्यात्मक रूपकाचा निराळेपणा, इतरापासून म्हणजे ज्याचा अभिनय करता येत नाही अशा काव्यप्रकारापासून भिन्नता प्रस्थापित करते. कारण, अभिनयास योग्य अशा काव्यात जो भाग असतो तो रस आणि भाव यांनी उपलक्षित झालेल्या गोष्टीही रसाध्यायात सांगितलेल्या हृदयसंवादाच्या साधारणीकरणाने प्रत्यक्ष होणाऱ्या भावनेने वाढीस लावतो. वाढीस लावणे म्हणजे ज्याप्रमाणे बीजाची अंकुराच्या स्वरूपात त्याप्रमाणे त्या गोष्टींची रसोदयाच्या स्वरूपात वाढ होणे. आणि हा प्ररोह अभिनयास योग्य अशा रूपकाच्या भागांमुळेच सिद्ध होतो म्हणून (भागरूप अंक) अभिनयास अयोग्य अशा काव्यापासून भिन्नता दाखवितो तेव्हा तो अभिनेय रूपकाचे लक्षण ठरतोच.

'लक्षणे रूढः शब्दः' अभिनवगुप्ताने अङ्क शब्दाचा रूढ अर्थ लक्षण आहे असे जे म्हटले आहे त्याचे मूळ अङ्क म्हणजे चिह्न, खूण या अर्थात असावेसे वाटते. – 'रसभावैरुपलक्षितान्' म्हणजे रस, भाव व त्यांनी सूचित झालेल्या इतरही गोष्टी. – 'प्रत्यक्षभावनया' हृदयसंवाद होऊन साधारणीकरण झाले म्हणजे रसोदय होतो व त्याची प्रत्यक्ष अनुभूति होते. ही अनुभूति म्हणजेच अर्थाचे रोहण. मुद्रित पाठ 'प्रत्यक्षीभावनया' असा आहे. च्वि-रूप अभिप्रेत असेलसे वाटत नाही. – 'रसाकारोदय-' येथे 'रसोदयाकार-' हे अधिक सुगम झाले असते. – 'स चाभिनेय-' मुद्रित पाठ 'स चानभिनेय-' हा मुद्रणदोष असावा. – 'संपद्यते' मुद्रित पाठ 'संपाद्यते' यातील प्रयोजकाचे रूप अनावश्यक आहे.

प्रस्तुत आर्येनंतर बडोदे प्रतीत पुढील आर्या अधिक आढळते –

**अङ्कसमाप्तिः कार्या काव्यच्छेदेन बीजसंहारः।**
**वस्तुव्यापी बिन्दुः काव्यसमुत्थोऽत्र नित्यं स्यात्॥**

ही आर्या नाट्यशास्त्राच्या काही हस्तलिखितांत आढळत नाही, म्हणून श्री कवींनी ती कंसात दिली आहे. डॉ. घोष यांनी 'काव्यच्छेदे न' या पाठात ती स्वीकारली आहे. पण ती मूळ असेलसे वाटत नाही. अङ्काचे स्वरूप स्पष्ट करणाऱ्या पुढील आर्येचा ह्या आर्येत केवळ अनुवाद आहे.

यत्रार्थस्य समाप्तिर्यत्र च बीजस्य भवति संहारः ।
किंचिदवलग्नबिन्दुः सोऽङ्क इति सदावगन्तव्यः ॥ १५॥

ज्यामध्ये (एखाद्या) कार्याची समाप्ती होते आणि ज्यामध्ये बीजाचा (अंशतः) समारोप होतो व ज्यात बिंदू थोडासा संबद्ध असतो तो अंक होय असे सदा जाणावे.

एवमङ्कशब्दस्यान्वर्थो व्याख्यातः, स्वरूपं तु वक्तव्यम्, तद्दर्शयति यत्रार्थस्य समाप्तिरिति । प्रारम्भाद्यवस्थालक्षणोऽर्थो यत्र समाप्यते सोऽङ्कः । असमाप्तायामपि वा अवस्थायां यदा बीजस्य संहरणं यथास्वं संधिभेदेनोचितं भवति तदाप्यङ्कच्छेदः । तत्रोत्पत्तिरुद्घाटनमुद्भेदो गर्भनिर्भेदः फलसमानयनमिति मुखादिषु यथाक्रमं बीजस्य दशाविशेषाः संहारशब्दवाच्याः । अङ्कविच्छेदे चार्थविच्छेदो मा भूदित्यवलग्नः संबद्धो बिन्दुर्यत्र तादृशोऽङ्कः कर्तव्यः । यथा तापसवत्सराजे तृतीयाङ्कसमाप्तौ –

आदौ मानपरिग्रहेण गुरुणा दूरं समारोपितां
पश्चात्तापभरेण तानवकृता नीतां परं लाघवम् ।
उत्सङ्गान्तरवर्तिनीमनुगमात्संपिण्डिताङ्गीमिमां
सर्वाङ्गप्रणयप्रियामिव तरुश्छायां समालम्बते ॥ (३.१७)

इति राज्ञ उक्त्या पद्मावत्याः परिणयाभ्युपगमनुसंदधत्या प्राप्तिसंभवाख्यतृतीयावस्थाप्रदर्शिनि भाविनि चतुर्थेऽङ्के बिन्दुर्योजितः । एवमङ्कस्वरूपमनेन निरूपितमिति चिरन्तनाः ।

याप्रमाणे अङ्क शब्दाचा अर्थ स्पष्ट करून सांगितला आहे, पण त्याच्या स्वरूपाचे वर्णन केले पाहिजे; ते आता 'यत्रार्थस्य समाप्तिः' इत्यादी वचनात करतात. प्रारम्भ वगैरे अवस्थांच्या स्वरूपाची गोष्ट ज्यात समाप्त होते तो अङ्क. अथवा अवस्थेची समाप्ती झालेली नसताही जेव्हा बीजाचा संहार संधींच्या भिन्नतेप्रमाणे त्या त्या संधीत उचित असा होतो तेव्हा सुद्धा अंक तोडला जातो. त्यांत मुखप्रभृती पाच संधींमध्ये अनुक्रमे उत्पत्ती, उद्घाटन, उद्भेद, गर्भनिर्भेद आणि फलसमानयन ह्या बीजाच्या ज्या विशिष्ट दशा त्या संहार शब्दाने निर्दिष्ट आहेत. आणि अंकाची समाप्ती होते तेथे एकसूत्रतेचा भंग होऊ नये म्हणून अवलग्न म्हणजे संबद्ध आहे बिन्दु ज्यात अशा तऱ्हेचा अंक करावा. उदाहरणार्थ, तापसवत्सराज नाटकात तिसऱ्या अंकाच्या शेवटी 'सुरुवातीस मोठ्या मानाचा अवलंब केल्यामुळे

१ घो न.

दूर ठेवली गेलेली, नंतर कृशता उत्पन्न करणाऱ्या तापाच्या भाराने अगदी लहान झालेली, जवळ आल्यामुळे संकुचित अवयवांनी मांडीवर बसलेली अशी जी छाया तिला वृक्ष सर्व गात्रांत प्रणय दाखविणाऱ्या प्रियेप्रमाणे आलिंगन देतो' ह्या पद्मावतीशी विवाहाच्या स्वीकाराचे अनुसंधान करणाऱ्या राजाच्या उक्तीने प्राप्तिसंभव नावाची तिसरी अवस्था दाखविणाऱ्या नंतरच्या चौथ्या अंकासाठी बिन्दूची योजना केली आहे. याप्रमाणे ह्या आर्येत अंकाच्या स्वरूपाचे निरूपण केले आहे अशी प्राचीन टीकाकारांची व्याख्या आहे.

ह्या परिच्छेदात प्रस्तुत आर्येची प्राचीन टीकाकारांनी केलेली व्याख्या विस्तृतपणे उद्धृत केली आहे. ती अभिनवगुप्ताला मान्य नसून पुढील परिच्छेदात त्याने स्वतःची निराळीच व्याख्या दिली आहे. – 'असमाप्तायाम्' ही मुळातील 'अङ्कसमाप्तायाम्' ची केलेली दुरुस्ती आहे. व ती आवश्यक आहे. प्रस्तुत संदर्भात 'अवस्था अंकात समाप्त झाली असता सुद्धा' याला काहीच अर्थ नाही. येथे असे अभिप्रेत आहे की सामान्यतः एका अवस्थेचे चित्रण एका अंकात पूर्ण होते, पण कधी कधी एका अवस्थेचा आविष्कार एका अंकात समाप्त झालेला नसतो. त्यावेळी कथानकाच्या बीजाची विशिष्ट दशा समाप्त होईल तेथे अंक पुरा करावा असे येथे सांगितले आहे. – 'यथास्वं संधिभेदेन' मुख, प्रतिमुख, गर्भ, विमर्श आणि निर्वहण ह्या पाच संधींमध्ये बीज उत्तरोत्तर वाढत जाते व प्रत्येक संधीत बीजाचे विशिष्ट स्वरूप दृष्टीस पडते. पण येथे अडचण अशी आहे कि पाच संधी हे पाच अवस्थांना अनुसरून असल्यामुळे अवस्थेची समाप्ती न झाली तर तिचे दर्शन घडविणाऱ्या संधीतील बीजाचा संहार सुद्धा अपूर्णच असणार. तेव्हा अङ्कच्छेदा-साठी निराळा प्रसंग उत्पन्न होण्याचा संभव आहे असे दिसत नाही. – 'अवलग्नः संबद्धो' यातील 'संबद्धो' ही मुळातील 'संबन्धो'ची केलेली दुरुस्ती आहे. 'अवलग्न'चा अर्थ सांगणारा हा शब्द धातुसाधित विशेषण असला पाहिजे हे उघड आहे. –'आदौ मान- इ०' हा श्लोक मध्याह्नाचे वर्णन करणारा आहे. यात तरुच्छायेला प्रणयिनीची उपमा दिली असून अनेक शब्द श्लिष्ट आहेत. 'मान' म्हणजे मोजमाप, प्रमाण आणि ताठरपणा, रुसवा. 'पश्चात्ताप' यातील 'पश्चात्' शब्द स्वतंत्र असून 'ताप' म्हणजे सूर्याची उष्णता असा प्रकृतविषयक अर्थ आहे. प्रणयिनीच्या संबंधात पश्चात्ताप असा एक शब्द समजावयाचा. 'तानव' म्हणजे कृशता. 'संपिण्डित' म्हणजे गोळा झालेले, संकुचित झालेले.

**तच्चैतत्पुनरुक्तम् । 'अस्यावस्थोपेतं कार्यं प्रसमीक्ष्य' इत्येतेन हि कियन्नोक्तं यदनेन लक्षणेनाभिधीयते । तस्मादिदमत्रार्थतत्त्वम् । अङ्कस्वरूपं तावद् 'अस्यावस्थोपेतम्' इत्यनेनैवोक्तम् । नामनिर्वचनं च 'अङ्क इति रूढिशब्दः' इत्यनेन दर्शितम् । अनया त्वार्यया अङ्कस्य त्रैविध्यमुच्यते । तथा चोक्तं कोहलादौ –**

**त्रिधाङ्कोऽङ्कावतारेण चूडयाङ्कमुखेन वा ।**
**अर्थोपक्षेपणं चूडा बह्वर्थैः सूतबान्दिभिः ।**
**अङ्कस्याङ्कान्तरे योगस्त्ववतारः प्रकीर्तितः ॥**
**विश्लिष्टं मुखमङ्कस्य स्त्रिया वा पुरुषेण वा ।**
**यदुपक्षिप्यते पूर्वं तदङ्कमुखमिष्यते ॥**

अत्रार्थस्य कस्यचित्सम्यगन्यत एवानभिसंधानपूर्विकाप्तिः प्राप्तिरिति चूडा दर्शिता। तद्यथा रत्नावल्यां वैतालिकपाठाद् 'दृशामुदयनस्य' इत्यन्तः उपयोगी सम्यगर्थः प्राप्तः, तत्प्रत्याभिज्ञामूलत्वात्सागरिकानुरागस्य। तथा चाह 'अअं सो राआ उदअणो' इत्यादि। तदर्थमेव च वसन्तक्रीडादि सर्वमुपक्षिप्तम्। तदेव च राजानुरागस्य शय्याफलकादिकृतस्य मूलमिति चूलिकेत्युक्तम्। तेन प्रथमश्चूलिकाङ्कः। यत्र त्वङ्के सर्वेषामङ्कानां योऽर्थो बीजलक्षणस्तस्य संहारः संमिलितत्वेन प्राप्तिर्भवति सोऽवताराङ्कः। यथा रत्नावल्यां द्वितीयोऽङ्कः। तत्र हि 'ईरिसिस्स कण्णआजणस्स ईरिस एव्व वरे अहिलासेण होदव्वं' इत्यादि प्रकृतमेव सर्वं वर्ण्यते। यत्र त्वनुसंधानमात्रप्राणत्वेन तदुपयोगितया वृत्तान्त उच्यते तदुपाश्लिष्टमङ्कमुखम्। स एवेह किंचिदवलग्नबिन्दुरिति तृतीयो भेद उक्तः। यथा रत्नावल्यां तृतीयेऽङ्के ऐन्द्रजालवृत्तान्तनिरूपणम्। चूलिकातश्चास्य भेदः, चूलिकाङ्कस्यापि तदभिसंधानाभावात्। इह त्वभिसंधानं यौगन्धरायणादीनामस्त्येव।

पण ही व्याख्या म्हणजे पुनरुक्ती होय. 'अस्यावस्थोपेतम्' इत्यादी वरील आर्येत असे काय सांगितलेले नाही की जे ह्या लक्षणात सांगितले आहे? म्हणून ह्या ठिकाणी खरा अर्थ पुढीलप्रमाणे आहे. अंकाचे स्वरूप 'अस्यावस्थोपेतम्' या आर्येतच सांगितले आहे. आणि अंक ह्या नावाची व्युत्पत्ती 'अङ्क इति रूढिशब्दः' या आर्येत दाखविली आहे. आता ह्या आर्येत अंक तीन प्रकारचा असतो हे सांगतात. त्याप्रमाणे कोहल आदींच्या ग्रंथांत म्हटले आहे – 'अंकावतार, चूडा अथवा अंकमुख असा तीन प्रकारचा अंक असतो. पुष्कळ अर्थ सूचित करणाऱ्या सूत, वैतालिक आदींनी केलेल्या अर्थाच्या उपक्षेपाला चूडा असे म्हणतात. एका अंकाच्या दुसऱ्या अंकाशी होणाऱ्या योगास अंकावतार म्हणतात. अंकाचा प्रारंभीचा अलग प्रवेश जेव्हा स्त्रीद्वारा किंवा पुरुषद्वारा अगोदर उपक्षेपित केला जातो तेव्हा त्याला अंकमुख म्हणतात.' प्रस्तुत ठिकाणी 'अर्थस्य' म्हणजे कोणत्या तरी अर्थाची 'सम्यक् आप्तिः' म्हणजे दुसरीकडूनच अभिसंधानाशिवाय होणारी प्राप्ती या शब्दांत चूडा प्रकाराचा निर्देश आहे. उदाहरणार्थ, रत्नावली नाटिकेत वैतालिकाने म्हटलेल्या श्लोकापासून 'दृशामुदयनस्य' या अंतिम वचनात उपयोगी असा सम्यक् अर्थ प्राप्त होतो, कारण त्या ओळख पटण्यातच सागरिकेच्या अनुरागाचे मूळ आहे. त्यामुळे ती म्हणते 'हा तो राजा उदयन काय?' आणि त्याचसाठी वसन्तक्रीडाप्रभृती सर्व गोष्टींची योजना केली आहे. आणि हेच शयनीय, चित्रफलक आदींनी उत्पन्न होणाऱ्या राजाच्या अनुरागाचे मूळ म्हणून त्याला चूलिका असे म्हटले आहे. त्यावरून रत्नावलीचा पहिला अंक चूलिकाङ्क असे ठरते. परंतु ज्या अंकामध्ये सर्व अंकांचा जो बीजस्वरूप अर्थ त्याचा संहार म्हणजे एकवटलेली प्राप्ती होते तो अंक अंकावतार होय. उदाहरणार्थ, रत्नावलीतील दुसरा अंक,

कारण त्यात 'अशा सुंदर कन्यकेला अशा सुयोग्य वराचीच अभिलाषा असणार' इत्यादी वचनांत सर्व प्रकृत गोष्टींचेच वर्णन आहे. परंतु ज्या अंकात केवळ अनुसंधानच प्राणभूत असल्यामुळे त्याला उपयोगी असा वृत्तान्त कथन केला जातो तो निकटचा अंकमुख होय. ह्याच तिसऱ्या प्रकाराचा निर्देश प्रस्तुत आर्येत 'किंचिद्वलग्नबिन्दुः' या शब्दांत केला आहे. उदाहरणार्थ, रत्नावलीच्या तिसऱ्या अंकातील ऐन्द्रजालिकाच्या वृत्तान्ताचे वर्णन. आणि हा प्रकार चूलिकेहून भिन्न आहे. कारण चूलिकाङ्काच्या बाबतीत त्याच्या अभिसंधानाचा अभाव असतो, पण ह्या प्रकरणात यौगन्धरायण आदींचे अभिसंधान असतेच.

'कोहलादौ' कोहल आदींचे ग्रंथ सध्या उपलब्ध नाहीत. ह्या ठिकाणी उद्धृत केलेल्या कोहलादींच्या मताप्रमाणे चूलिका, अङ्कावतार व अङ्कमुख ही तीन प्रकारच्या अंकांची नावे होत. पण सध्या उपलब्ध असलेल्या नाट्यशास्त्रावरील उत्तरकालीन ग्रंथांत ह्या तीन गोष्टी आणि विष्कम्भक व प्रवेशक हे पाच अर्थोपक्षेपक होत असे म्हटले आहे. नाट्यशास्त्राच्या काही हस्तलिखितांतही पुढील अध्यायात ह्या पाच अर्थोपक्षेपकांचे वर्णन आढळते. पण ते श्लोक त्या ठिकाणी असल्याचे अभिनवगुप्ताला अवगत नाही. तेव्हा ते मागाहून घातले असण्याचाच संभव आहे. – 'विश्लिष्टं मुखम्' हा हस्तलिखितातील पाठ 'विश्लिष्टमुखम्' ह्या मुद्रित पाठापेक्षा अधिक योग्य आहे. विश्लिष्ट म्हणजे सुटे झालेले, अलग झालेले. ह्या शब्दाचा विशेष प्रकारे जोडलेला असाही अर्थ होऊ शकतो. अभिनवगुप्ताने तो अर्थ विचारात घेतलेला दिसतो. – 'सम्यग्' इ० मुळातील समाप्तिः शब्दाची सम्यग् आप्तिः अशी फोड करून सम्यक् शब्दाचा अनुसंधानाशिवाय होणारी असा अर्थ केला आहे. – 'दृशामुदयनस्य' पहिल्या अंकाच्या शेवटी शेवटी वैतालिकांचा स्तुतिपाठ आहे, त्यात 'दृशां प्रीत्युत्कर्षकृतः तव उदयनस्य पादान् आसेवितुम्' इत्यादी वचन आहे. – 'इत्यन्तः' म्हणजे वरील शब्दांत झालेला वैतालिकांच्या वचनाचा शेवट. – 'राजानुरागस्य' राजाचा अनुराग दुसऱ्या अंकात उत्पन्न होतो. पण तो शय्या, चित्रफलक आदी सागरिकेच्या अनुरागाच्या निदर्शक गोष्टींनी उत्पन्न होतो. तेव्हा तो सागरिकेच्या अनुरागातून म्हणजे पहिल्या अंकातील प्रसंगातूनच उत्पन्न होतो. म्हणून पहिला अंक ह्या सर्वाचे मूळ. – 'मूलमिति चूलिकेत्युक्तम्' वस्तुतः चूडा किंवा चूलिका याचा अर्थ शीर्षस्थ केस, शेंडी असा आहे. अभिनवगुप्ताने त्याचा मूळ शब्दाच्या अर्थाशी संबंध जोडलेला दिसतो. – 'कण्ण-आजणस्स' रत्नावलीच्या उपलब्ध प्रतीतील पाठ 'कण्कआरअणस्स (कन्यकारत्नस्य)' असा आहे. – 'वृत्तान्त उच्यते' मुळात 'वृत्तान्तमुच्यते' असे आहे. वृत्तान्त शब्द पुल्लिंगी आहे. – 'उपश्लिष्टम्' चिकटलेले असा शब्दशः अर्थ. – 'तृतीयेऽङ्के इ०' रत्नावलीच्या सध्या उपलब्ध असलेल्या प्रतीत ऐन्द्रजालिकाचा वृत्तान्त तिसऱ्या अंकात नसून चौथ्या अंकात आहे. आणि चौथ्या अंकातच तो संभाव्य आहे. 'तृतीये' हे चुकीने पडलेले दिसते. – 'चूलिका तस्याश्च भेदः' हा मुद्रित पाठ चुकीचा आहे. – 'तदभिसंधानाभावात्' यातील 'तत्' म्हणजे प्रकृत वस्तु. चूलिकेत त्याचे अभिसंधान नसते म्हणजे हेतुपूर्वक केलेला निर्देश नसतो, तर प्रकृताचा सहजगत्या झालेला उपक्षेप असतो. – 'यौगन्धरायणादीनाम्' ऐन्द्रजालिकाचा वृत्तान्त ही यौगन्धरायणानेच योजिलेली एक क्लृप्ती होती. म्हणून त्यात यौगन्धरायणाचे अभिसंधान म्हणजे हेतुपूर्वक योजना आहे.

तेनायं संक्षेपः । अङ्के यद्वर्णनीयं वस्तु तत्तावद् द्विधा प्रधानं तदुपयोगि च, तदुपयोग्यपि किंचिद्दैववशादुपयोगं याति, किंचिदभिसंधिबलादिति त्रिविधोऽङ्कार्थः। स कदाचिदेकस्मिन्नङ्के मिश्रभावेनापि निबध्यत इति । चूलिकाङ्कमुखयोरङ्कभेदयोः प्रधानार्थस्पर्शो नैवास्तीति ।

तेव्हा थोडक्यात अर्थ असा. अंकामध्ये वर्णने करावयाच्या गोष्टी दोन प्रकारच्या असतात – एक मुख्य व दुसरी तिला उपयोगी पडणारी अशी. उपयोगी पडणारी गोष्ट सुद्धा क्वचित दैवयोगाने उपयोगी पडते, तर क्वचित अभिसंधीच्या बळावर. याप्रमाणे अंकातील अर्थ तीन प्रकारचा असतो. तो कदाचित एकाच अंकात मिश्रित स्वरूपात सुद्धा निबद्ध होतो. चूलिका अणि अङ्कमुख या दोन अंकप्रकारांत मुख्य गोष्टीचा स्पर्श सुद्धा नसतो.

'किंचिद्दैववशात्' यात चूलिकेचा निर्देश अभिप्रेत आहे. – 'अभिसंधि' म्हणजे हेतुपूर्वक योजना. यात अंकमुखाचा निर्देश आहे. – 'चूलिका- इ०' चूलिका आणि अंकमुख यांत मुख्य कथानकाशी काही संबंध नसतो असे येथे म्हटले आहे. पण वर रत्नावलीच्या पहिल्या अंकाला चूलिकाङ्क म्हटले आहे आणि चौथ्या अंकाला अङ्कमुखाङ्क म्हणावे असे अभिप्रेत आहे. या दोन अंकांचा मुख्य कथानकाशी संबंध नाही असे कसे म्हणता येईल ? चूलिका म्हणजे फक्त वैतालिकाचा स्तुतिपाठ व अङ्कमुख म्हणजे केवळ ऐन्द्रजालिकाचा प्रसंग असे समजले तर त्यांचा मुख्य कथानकाशी साक्षात संबंध नाही असे मानता येईल. पण मग सबंध अंकांना हीं नावे देणे अनुचित ठरेल. उत्तरकालीन शास्त्रकारांनी चूलिकादींना अर्थोपक्षेपक ठरविले आहे, अंकाचे प्रकार मानले नाही हे अधिक सुसंगत आहे. किंबहुना अभिनवगुप्ताने प्रस्तुत आर्येचा लावलेला अर्थ मान्य होण्यासारखा नसल्यामुळे तो नाट्यशास्त्रकाराला अभिप्रेत असण्याची शक्यता नाही. प्राचीन टीकाकारांनी म्हटल्याप्रमाणे आर्येत एकाच प्रकारच्या अंकाचे निरूपण आहे. आणि मागच्याचीच येथे केवळ पुनरुक्ती आहे असे नाही.

मूळ आर्येत डॉ. घोष यांनी 'यत्र च' च्या जागी 'यत्र न' अशी दुरुस्ती करून 'ज्यात बीजाची संपूर्णपणे विल्हेवाट लावली जात नाही' असा अर्थ केला आहे. पण तसे करण्याची आवश्यकता दिसत नाही. संहार शब्दाने तात्पुरता समारोप सुद्धा समजता येण्यासारखा आहे.

ये नायका निगदितास्तेषां प्रत्यक्षचरित[1]संभोगः ।
नानाव[2]स्थोपेतः कार्यस्त्वङ्कोऽ[3]विकृष्टस्तु ॥ १६ ॥

जे नायक म्हणून सांगितले आहेत त्यांचे चरित व त्यांचे उपभोग प्रत्यक्ष दाखविणारा व विविध अवस्थांनी युक्त असा, परंतु फार लांबलचक नसलेला असा अंक रचावा.

१ नि -संयोगः. २ नि -वस्थान्तरितः. ३ नि विकृष्टस्तु, का यथार्थरसः.

**तथा प्रवेशकद्वारेण मुख्यचरितमपि दर्शनीयमिति शङ्कां वारयितुमाह ये नायकाः इति । धीरोदात्तादयो विजिगीषुतन्मित्रप्रभृतयो वा ये नायकाः प्रतिनायकाश्च तेषां चरितमुपायानुष्ठानं तथा संभोगः प्रत्यक्षः संनिहितः साक्षाद्दृश्यमानो न तु सूच्यमानो यत्र तादृगङ्कः । नयति प्राप्नोतीतिवृत्तं फलं वेति नायकः । चरितप्रत्यक्षतया व्युत्पत्तिः प्रेक्षकाणाम् । संभोगाप्रत्यक्षत्वे च तद्गतकेवलक्लेशदर्शनात्केवलं वैरस्यं सामाजिकस्य स्यात् किमनेन महता कष्टेनेति । तत एवोक्तं 'न निःसुखः स्याद्' इति । नानाप्रकारावस्थाः प्रतिनायकगतौ चरितसंभोगावनुपादेयावविषये चेति हेयावस्थौ, नायकगतौ तु तद्वैपरीत्यादुपादेयावस्थाविति तुशब्दस्यार्थः । अविकृष्ट इत्यदीर्घः । दीर्घो हि प्रयोक्तृप्रेक्षकाणां खेदाय स्यात् ।**

त्याचप्रमाणे प्रवेशकाच्या द्वारा मुख्य पात्रांचे चरित सुद्धा दाखविता येईल या शंकेचे निवारण 'ये नायकाः' इत्यादी शब्दांत करतात. धीरोदात्तप्रभृती अथवा विजिगीषु, त्याचा मित्र इत्यादी जे नायक व प्रतिनायक असतात त्यांचे चरित म्हणजे त्यांनी योजलेले उपाय आणि त्यांचा संभोग हे प्रत्यक्ष म्हणजे अगदी संनिध, साक्षात् दिसणारे, केवळ सूचित केले जाणारे नव्हे असे ज्यात असतात तशा प्रकारचा अंक. नयति म्हणजे इतिवृत्त किंवा फल आपल्याबरोबर नेतो तो नायक. चरित प्रत्यक्ष दिसल्यामुळे प्रेक्षकांना बोध प्राप्त होतो. आणि संभोग जर प्रत्यक्ष दिसला नाही तर त्यांच्या केवळ क्लेशाचेच दर्शन झाल्यामुळे 'हे महान् कष्ट कशासाठी' अशा विचाराने प्रेक्षकांचा केवळ विरसच होईल. म्हणूनच म्हटले आहे की राजाने सुखाचा त्याग करू नये. नाना प्रकारची अवस्था म्हणजे प्रतिनायकाचे चरित व संभोग अस्वीकार्य व विषय होण्यास अयोग्य म्हणून त्याज्य अवस्थेचे, परंतु नायकाचे चरित व संभोग त्याच्या उलट स्वीकार्य अवस्थेचे हे 'तु' शब्दाने दाखविले आहे. अविकृष्ट म्हणजे दीर्घ नसलेला. कारण, दीर्घ अंकाने प्रयोग करणारांना व प्रेक्षकांना शीणच होईल.

मुळात 'मुख्यचरितमपि' व 'शङ्कां' यांच्यामधील शब्द गहाळ झाला आहे. 'दर्शनीयमिति' किंवा 'वर्णनीयमिति' या अर्थाचे वचन आवश्यक आहे हे उघड आहे. 'दर्शनीयमिति' हे शब्द घातले आहेत. – 'नयति इ०' यात नायक शब्दाची व्युत्पत्ती दिली आहे. – 'व्युत्पत्तिः' म्हणजे बोध. – 'केवलं वैरस्यं' यातील 'केवलं' शब्द मुद्रित प्रतीत नाही. पण तो असल्यास बरे. – 'न निःसुखः स्यात्' हे वचन कौटिलीय अर्थशास्त्र (१.३.७) येथून उद्धृत केले आहे. त्याच्या अगोदरचे शब्द आहेत 'धर्मार्थाविरोधेन कामं सेवेत'. – 'नानाप्रकारावस्थाः' हस्तलिखितात 'नानाप्रकारावस्था' असा एकवचनात पाठ आहे, तर मुद्रितात '-वस्थौ' असा द्विवचनात आहे. बहुवचन अधिक योग्य. निर्दिष्ट केलेल्या चारही अवस्थांचा समावेश होऊ शकतो.

**नायकदेवीगुरुजनपुरोहितामात्यसार्थवाहानाम्**
**नैकरसान्तरविहितो ह्यङ्क इति स वेदितव्यस्तु ॥१७॥**

नायक, राण्या, गुरुजन, पुरोहित, अमात्य आणि सार्थवाह ह्यांच्याशी संबद्ध व अनेक, विविध रसांनी सजविलेला तो अंक होय असे समजावे.

**एवं प्रधानवर्णनीयस्य वृत्तमुक्त्वा तदुपयोगिवृत्तस्य दिशं दर्शयितुमाह नायकदेवीत्यादि । नायका अमुख्याः पताकादीनाम् । देव्यो महादेवीभोगिनी-प्रभृतयः । गुरुजनो मातृपितृभ्रात्राचार्यादिः । सार्थवाहोऽत्र सेनापतिः, इतिवृत्त-वशाद्वणिगेव वा । एषां संबन्धी अङ्कः, एतदर्थाभिधायक इति यावत् । अत एव नैकेन विचित्रेण रसविशेषेण युक्तः । तथाहि देवीयोगे शृङ्गारः नायके वीर इति । एवमन्यदुत्प्रेक्ष्यम् । नायकानां देव्यादय इत्यन्ये । अङ्क इति अनेकरसाङ्कितत्वादपि अङ्क इति नामेत्यर्थः ।**

याप्रमाणे मुख्यतया वर्णन करावयाच्या पात्रांचे वृत्त सांगितल्यानंतर त्याला उपयोगी अशा वृत्ताचे दिग्दर्शन करण्यासाठी 'नायकदेवी-' इत्यादी आर्या सांगतात. नायक म्हणजे मुख्य नसलेले, पताका आदींमध्ये असलेले. देवी म्हणजे महादेवी, भोगिनी इत्यादी. गुरुजन म्हणजे माता, पिता, भ्राता, आचार्य इत्यादी. सार्थवाह म्हणजे प्रस्तुत ठिकाणी सेनापती, किंवा कथानकाच्या अनुरोधाने वणिक असाच अर्थ. यांच्याशी संबद्ध असलेला तो अंक, म्हणजे ह्या गोष्टींचे दर्शन घडविणारा. म्हणूनच 'नैकेन' म्हणजे विविध प्रकारच्या रसविशेषांनी युक्त असा. उदाहरणार्थ, देवीच्या संबंधात शृंगार, नायकाच्या संबंधात वीर. याप्रमाणे अन्य रसांची ही कल्पना करावी. दुसरे टीकाकार 'नायकांच्या देवी इत्यादी' असा अर्थ करतात. 'अङ्क इति' याचा अर्थ अनेक रसांनी अङ्कित झाल्यामुळेही त्याला अङ्क असे नाव प्राप्त झाले.

'अमुख्याः पताकादीनाम्' ही मुळातील 'मुख्याः पताकादयः' ची केलेली दुरुस्ती आहे. मुख्य नायक या ठिकाणी अभिप्रेत असण्याचा संभव नाही. कारण, प्रधान वृत्ताला उपयोगी असे जे प्रासङ्गिक वृत्त त्यासंबंधीचे विवेचन प्रस्तुत आर्येत आहे असे सुरुवातीस म्हटले आहे. आणि 'पताका-दयः' असा प्रथमान्त शब्द नायकांचे वर्णन करण्यास योजिला असण्याचा संभव कमी. – महादेवी, भोगिनी यांचे वर्णन पुढे चोविसाव्या अध्यायात श्लोक ३३–३५ व ४३ यांत केले आहे. – 'सार्थवाहोऽत्र सेनापतिः' याचे कारण नाटकात राजकुलाशी संबद्ध अशा व्यक्तींचेच चित्रण अपेक्षित आहे. – 'अन्ये' हे दुसरे टीकाकार या ठिकाणी नायकांचा निर्देश आहे असे मानीत नाहीत, कारण मागील आर्येत त्यांचा स्वतन्त्रपणे निर्देश केला आहे. – 'अङ्क इति नाम' म्हणजे अङ्क शब्दाची '(रसैः) अङ्कितः इति अङ्कः' अशी व्युत्पत्ती समजावी.

१ नि -परिजन-.

ह्या आर्येनंतर मुद्रित पुस्तकात पुढील आर्या अधिक आढळते –

पञ्चापरा दशपरा ह्यङ्काः स्युर्नाटके प्रकरणे च ।
निष्कामः सर्वेषां यस्मिन्नङ्कः स विज्ञेयः ॥

अभिनवगुप्ताला ती अवगत नाही व अनेक हस्तलिखितांत ती आढळत नाही यावरून ती मूळची नाही असे समजण्यास हरकत नाहीं. शिवाय पुढे २५ व २१ ह्या आर्यांत हिच्यातील आशय अधिक सुसंगतपणे मांडला आहे.

क्रोधप्रसाद[1]शोकाः शापोत्सर्गोऽथ[2] विद्रवोद्वाहौ ।
अद्भुत[3]संभवदर्शन[4]मङ्के प्रत्यक्षजानि स्युः ॥ १८ ॥

क्रोध, प्रसाद, शोक, शापाची समाप्ती, गडबड, विवाह, अद्भुताचा संभव व त्याचे दर्शन – ह्या गोष्टी अंकामध्ये प्रत्यक्ष घडलेल्या असाव्यात.

न केवलं चरितसंभोगावेव प्रत्यक्षौ किं त्वन्यदपि यत्र रञ्जनातिशयोऽस्तीति दर्शयन्नाह क्रोधप्रसादशोका इति । शापोत्सर्गः शापकृतस्यानर्थस्य नाशः यथोक्तस्य दुरितस्याभावः । शङ्का भयत्रासकृतो विद्रव इति गर्भसंधौ वक्ष्यते । उद्वाहो विवाहः । अद्भुतस्य संभवोऽभ्युपगम उपक्रमो दर्शनं च निर्वाह इति । एतच्चान्यस्यापि रञ्जकवर्गस्योपलक्षणम् । अक्षजं ज्ञानं प्रति गतानीति प्रत्यक्षजानि । प्रत्यक्षशब्देन तदेकदेश उच्यते, तत्र जातानीत्यन्ये । इयतश्च वर्गस्य प्रत्यक्षता तावद्भवति, कदाचित्त्वप्रत्यक्षत्वमपि ।

केवळ चरित व संभोगच प्रत्यक्ष असावेत असे नाही तर इतरही ज्यात खूप रंजन करणाऱ्या गोष्टी असतात ते असावे हे 'क्रोधप्रसादशोकाः' इत्यादी शब्दांत सांगतात. शापोत्सर्ग म्हणजे शापाने केलेल्या अनर्थाचा नाश, उच्चारलेल्या दुरिताचा अभाव. भय व त्रास उत्पन्न करणाऱ्या वस्तूविषयीची शंका म्हणजे विद्रव हे गर्भसंधीत सांगितले जाईल. उद्वाह म्हणजे विवाह. अद्भुताचा संभव म्हणजे त्याचा स्वीकार, प्रारंभ आणि दर्शन म्हणजे ते शेवटास नेणे. आणि ह्या गोष्टी इतरही रंजक गोष्टींचे उपलक्षण होत. अक्षज म्हणजे ज्ञान, त्याकडे गेलेल्या म्हणून 'प्रत्यक्षजानि' अशा गोष्टी. इतर टीकाकार म्हणतात की प्रत्यक्ष शब्दाने त्याचा एक भाग अभिप्रेत आहे, तेथे उत्पन्न झालेल्या म्हणून 'प्रत्यक्षज' गोष्टी. एवढ्या गोष्टींचे प्रत्यक्ष दर्शन होते, पण कधी कधी त्या अप्रत्यक्षही असतात.

१ नि -प्रमाद-. २ नि -ऽध्व-. ३ नि -संश्रय-. ४ घो -मङ्केऽप्रत्यक्ष-.

'यथोक्तस्य दुरितस्याभावः' हा सुचविलेला दुरुस्त पाठ आहे. हस्तलिखितात मागचा व पुढचा शद्ब मिळून 'नाशमयथोक्तस्य...ताभावस्याशङ्का-' असा भ्रष्ट पाठ आहे. त्यात दोन अक्षरांची जागा मोकळी आहे. मुद्रित पाठ 'नाशः, यथोक्तस्यानर्थकाभावस्य शङ्का-' असा आहे. पण 'शङ्का' पासून नवीन वाक्य सुरू होते हे १९.८३ मध्ये दिलेल्या विद्रवाच्या व्याख्येवरून स्पष्ट आहे. तेव्हा ह्या वाक्याच्या शेवटी 'अभावः' असा प्रथमांत शब्द आवश्यक आहे हे उघड आहे. हस्तलिखितातील '...ता' वरून दुरित शब्द सुचला. पण 'अनर्थस्याभावः' असाही मूळ पाठ असण्याची शक्यता आहे. – 'अक्षजम्' अक्ष म्हणजे इन्द्रिये, त्यांनी उत्पन्न होणारे ते अक्षज म्हणजे ज्ञान. अक्षजाप्रत म्हणजे ज्ञानाप्रत जाणाऱ्या गोष्टी त्या प्रत्यक्षज. ह्या शब्दाचा 'ज्यांचे ज्ञान होते अशा' असा अर्थ केला आहे. – 'प्रत्यक्षशब्देन तदेकदेश उच्यते' याचा अर्थ असा दिसतो की प्रत्यक्ष म्हणजे सदासर्वकाळ समोर दिसणारे असा नसून फक्त काही काळच दिसणारे असा आहे. – 'इयतश्च वर्गस्य' याने क्रोध, प्रसाद इत्यादींच्या समूहाचा बोध होतो. ते कधी प्रत्यक्ष दिसतात, तर कधी ते अप्रत्यक्षपणे दाखविले जातात, म्हणून 'प्रत्यक्ष' शब्दाने प्रत्यक्षाचा एक भाग समजला पाहिजे, असे ह्या टीकाकारांचे म्हणणे असावेसे वाटते. 'इयतश्च' हा हस्तलिखितातील पाठ आहे. मुद्रितात 'जातानीत्यन्येन्द्रियवर्गस्य' असे आहे. तो पाठ असंभाव्य आहे. – 'अप्रत्यक्षत्वमपि' ही मुळातील 'अप्रत्यक्षमपि' ची दुरुस्ती आहे. भाववाचक नाम आवश्यक आहे.

मूळ आर्येत डॉ. घोष यांनी 'ऽप्रत्यक्षजानि' अशी दुरुस्ती केली आहे. पण ते बरोबर नाही. क्रोध, शोक वगैरे गोष्टी नाटकात प्रत्यक्षच दिसतात.

एकदिवसप्रवृत्तं[1] कार्यस्त्वङ्कोऽर्थबीजमधिकृत्य[2] ।
आवश्यककार्याणामविरोधेन प्रयोगेषु ॥ १९ ॥

प्रयोगांमध्ये अवश्य करावयाच्या कार्यांना अडचण येणार नाही अशा रीतीने एका दिवसात घडणाऱ्या कार्यबीजावर आधारित असा अंक रचावा.

**अथाङ्कस्य प्रयोगकालपरिमाणमियदिति दर्शयति एकादिवसप्रवृत्तमिति । तादृशमवान्तरेणार्थेन प्रयोजनेन युक्तं बीजमुपायानुष्ठानं वर्णनीयताया अधिकृत्याङ्कः कर्तव्यो यस्य प्रकृष्टं च यद्वर्तनं प्रयोगरूपं तदेकदिवसेनेति मुहूर्तपञ्चदशकेनैव । यतस्तावन्तं कालमावश्यकानि भोजनादीनि शक्यनिरोधनानि । ततः परं तु प्रयोगकालश्चेत् तत्प्रेक्षकप्रयोक्तृणां तदाप्यावश्यकस्य संध्यावन्दनभोजनादेरविरोधेनेति ।**

१ नि -प्रवृत्तः. २ नि -ऽथ बीजमाश्रित्य.

आता अंकाच्या प्रयोगकालाचा अवधी इतका असावा हे 'एकदिवसप्रवृत्तम्' इत्यादी शब्दांत सांगतात. त्याप्रकारच्या अवान्तर अर्थाने म्हणजे प्रयोजनाने युक्त अशा बीजाला म्हणजे जे वर्णन करावयाचे त्याच्या उपाययोजनेला धरून अंक निर्माण करावा, ज्याची प्रकृष्ट अशी प्रयोगस्वरूपाची स्थिती एक दिवसाची म्हणजे पंधरा मुहूर्तांचीच असावी. कारण तितका वेळ-पर्यंत आवश्यक अशी भोजनादी कार्ये थांबवून धरणे शक्य होते. परंतु त्यानंतर जर प्रयोगाचा काल वाढला तर तशा प्रसंगीही प्रेक्षकांच्या व तो प्रयोग करणाऱ्यांच्या संध्योपासना, भोजन आदी आवश्यक कार्याला अडथळा येणार नाही असा करावा.

'तादृशम्' म्हणजे ज्यात क्रोध, प्रसाद आदी प्रत्यक्ष दिसतात अशा प्रकारचा. वस्तुतः हे अंकाचे विशेषण असावे; पण येथे त्याचा 'बीजम्' शी अन्वय करावा लागतो. – 'अवान्तरेण' म्हणजे निरनिराळ्या प्रयोजनांपैकी कोणत्या तरी एका प्रयोजनाने. – 'बीज' ची व्याख्या 'उपाया-नुष्ठान' अशी केली आहे. – 'प्रकृष्टं च यद्वर्तनम्' ही आर्येतील 'प्रवृत्तम्' शब्दाची व्याख्या आहे. शेवटी त्याचा अर्थ प्रयोग असा केला आहे. अभिनवगुप्ताने हा जो ह्या आर्येचा अर्थ लावला आहे तो मोठा विलक्षण वाटतो. एका अंकाच्या प्रयोगाला बारा तासांचा अवधी लागला तर पाच अंक असलेल्या नाटकाच्या प्रयोगाला अडीच दिवसांहून अधिक वेळ लागेल व दहा अंकी नाटक तर सतत पाच दिवस चालू राहील. तेव्हा एक दिवस हे अंकाच्या अवधीचे प्रमाण आहे हे अभिनवगुप्ताचे मत मान्य करणे कठीण आहे. आणि आवश्यक कार्ये म्हणजे प्रेक्षकांची व नटांची नेहमी करावयाची संध्यावदन, भोजन इत्यादी कार्ये हा अर्थही मान्य होण्यासारखा नाही. एक अंक चालू असेपर्यंत म्हणजे बारा तास ही कार्ये रोखून धरता येतील हे सुद्धा खरे वाटत नाही. या आर्येचा सरळ अर्थ असा दिसतो की एका अंकात ज्या घटना दाखवावयाच्या त्या एकाच दिवसात घडलेल्या असाव्यात, आणि त्या घटना अशा असाव्यात की प्रयोग करताना जी कार्ये आवश्यक असतात त्यांना बाध येऊ नये, म्हणजे त्या प्रयोगक्षम असाव्यात. – 'ततः परं तु इ०' म्हणजे अभिनवगुप्ताच्या म्हणण्याप्रमाणे एका अंकाचा प्रयोग बारा तासांहून अधिक कालही चालण्यास हरकत नाही; फक्त त्यामुळे संध्यावंदनादी नित्य कार्यांत व्यत्यय येता कामा नये. हे कसे शक्य आहे ते लक्षात येत नाही.

**एकाङ्के[1] न कदाचिद्बहूनि कार्याणि योजयेद्धीमान् ।**
**आवश्यकाविरोधेन तत्र कार्याणि[2] कार्याणि ॥ २० ॥**

बुद्धिसंपन्न कवीने कधी एका अंकात पुष्कळ कार्यांची योजना करू नये. त्या ठिकाणी कार्ये अवश्य करावयाच्या कार्यांत विघ्ने आणणार नाहीत अशा तऱ्हेने योजावीत.

१ ब नि एकाङ्केन २ नि काव्यानि.

**एवं कार्यानेकत्वमेकत्राङ्के निषिद्धम् । क्वचित्त्वभ्युपगतमपि । अन्ये तु सर्वामेवार्यां निषेधपरत्वेनाहुः । अन्ये त्वेकाङ्केनेति तृतीयां मन्यमानाः सर्वेयमार्या विधिपरेत्याहुः ।**

याप्रमाणे एका अंकात अनेक कार्यांच्या योजनेचा निषेध केला आहे. परंतु क्वचित तिचा स्वीकारही केला आहे. पण दुसरे टीकाकार सर्वच आर्या निषेधपर आहे असे म्हणतात. दुसरे कोणी 'एकाङ्केन' असे तृतीयेचे रूप मानून ही सर्व आर्या विधिपर आहे असे म्हणतात.

प्रस्तुत आर्येवरील अभिनवगुप्ताच्या टीकेचा प्रारंभीचा भाग गहाळ झाला आहे. नेहमी-प्रमाणे आर्येचे प्रयोजन सांगून प्रारंभीचे शब्द उद्धृत करणारे वाक्य व दोन्ही अर्धांचा अर्थ स्पष्ट करणारी वाक्ये त्याने रचली असणार यात शंका नाही. ती नाहीशी झाली आहेत. फक्त उपसंहारात्मक वाक्य व इतर टीकाकारांचा उल्लेख एवढाच भाग उपलब्ध आहे. – 'निषिद्धम्' अभिनवगुप्ताचा पाठ 'एकाङ्के न' आहे. – 'क्वचित्तु इ०' आर्येतील 'कदाचित्' मुळे हे विधान शक्य झाले आहे, व त्याला आर्येच्या द्वितीयार्धात आधार आहे असेही अभिनवगुप्ताचे मत दिसते. – 'एकाङ्केन' असा तृतीयान्त पाठ बहुतेक मुद्रित प्रतींत आहे. – 'विधिपरा' म्हणजे एका अंकात अनेक कार्यांची योजना करावी असा ह्या आर्येचा अर्थ आहे. – ह्या आर्येतील 'आवश्यक' शब्दाचा अर्थ भोजनादी कार्ये असाच केलेला असावा. कारण पुढील आर्येवरील टीकेच्या प्रारंभी त्यांचाच निर्देश आहे.

**रङ्गं तु ये प्रविष्टाः सर्वेषां भवति तत्र निष्क्रामः ।**
**बीजार्थयुक्तियुक्तं[1] कृत्वा कार्यं[2] यथार्थरसम् ॥ २१ ॥**

रंगभूमीवर ज्यांचा प्रवेश झालेला असतो त्या सर्वांचे, बीजाच्या कार्याच्या योजनेने युक्त असे (व) समुचित रसांनी पूर्ण असे आचरण केल्यानंतर निष्क्रमण त्या प्रसंगी (अंकाच्या अंती) होते.

**यान्यवश्यंभावेन कार्याणि भोजनादीनि तानि किं प्रत्यक्षेणैव दर्शनीयानीति यः शङ्कते तं प्रत्याह रङ्गं त्विति । तत्रेत्यावश्यके कर्तव्ये । न चासमाप्तावुपक्षिप्तावान्तरकार्ये पात्रनिष्क्रमणमिति दर्शयति बीजार्थेति । उपक्षेपात्मनो बीजस्य यत्प्रयोजनं तेन या युक्तिः संबन्धः तत्र युक्तमुपायभूतं कार्यं प्रयोजनानुसारि विशिष्टरससंपदोपेतं विधाय तत्परिसमाप्तौ यवनिकया तिरोधानरूपं निष्क्रमणं दर्शनीयम् । बीजार्थयुक्तिरुत्पत्त्युद्घाटनोद्भेदगर्भनिर्भेदफलसमानयनात्मेत्यन्ये ।**

१ नि -मुक्तं. २ नि काव्यं.

अवश्य करावयाची अशी जी भोजनादी कार्ये ती काय प्रत्यक्षच दाखवावयाची अशी जो शंका घेईल त्याला उद्देशून 'रङ्गं तु' इत्यादी म्हणतात. 'तत्र' म्हणजे आवश्यक कार्य त्याच्या निमित्ताने. आणि ज्याचा उपक्षेप केला आहे असे अवान्तर कार्य समाप्त झाल्याशिवाय पात्रांचे निष्क्रमण होऊ नये हे 'बीजार्थ-' इत्यादी शब्दांत सांगतात. उपक्षेपरूप जे बीज त्याचे जे प्रयोजन त्याच्याशी जी युक्ति म्हणजे संबन्ध त्याच्याशी युक्त म्हणजे उपायाच्या स्वरूपाचे असलेले कार्य प्रयोजनाला अनुसरणारे व विशेष प्रकारच्या रसांच्या संपत्तीने युक्त असे रचून ते समाप्त झाल्यावर पडद्याच्या साहाय्याने अदृश्य होण्याच्या स्वरूपाचे निष्क्रमण दाखवावे. दुसऱ्या टीकाकारांच्या मते बीजार्थयुक्ति म्हणजे बीजाची उत्पत्ती, उद्घाटन, उद्भेद, गर्भनिर्भेद व फलसमानयन यांची योजना.

'इति यः शङ्कते' मागील आर्यातील 'आवश्यक' शब्दाचा अभिनवगुप्ताने लावलेल्या अर्थामुळेच अशी शंका उपस्थित करणे शक्य झाले आहे. – 'यत्प्रयोजनम्' प्रयोजन ही मुळातील 'अर्थ' शब्दाची व्याख्या आहे. – उत्पत्त्यु- इ०' बीजाच्या ह्या पाच स्थिती मुखादी पाच संधीत अनुक्रमे अभिव्यक्त होतात हे पुढील अध्यायात सांगितले आहे.

यानंतर बडोदे प्रतीत पुढील श्लोक कंसात दिला आहे –

**न बहूनीह कार्याणि त्वेकाङ्के विनियोजयेत् ।**
**आवश्यकानां कार्याणां विरोधो हि तथा भवेत् ॥**

हा श्लोक प्रक्षिप्त आहे यात शंका नाही. मागच्या विसाव्या आर्येतल्या विधानाचीच यात पुनरुक्ती आहे. शिवाय या अध्यायातील इतर सर्व श्लोक आर्यावृत्तात असता अनुष्टुभ छंदातील हा श्लोक मध्येच वापरला असण्याची शक्यता नाही. ह्या प्रक्षिप्त श्लोकाने मागच्या आर्येतील 'एकाङ्के न' या पाठाला दुजोरा मिळतो.

**ज्ञात्वा दिवसावस्थां क्षणयाममुहूर्तलक्षणोपेताम् ।**
**विभजेत्सर्वमशेषं पृथक्पृथक्कार्यमङ्केषु[1] ॥ २२ ॥**

क्षण, याम व मुहूर्त यांच्या विभागांनी युक्त अशी दिवसाची स्थिती लक्षात आणून (कवीने) संपूर्ण कार्याची निरनिराळ्या अंकांत निःशेष अशी विभागणी करावी.

**एवमितिवृत्तनियममङ्के प्रदर्श्य तदितिवृत्तकालनियमं दर्शयति । क्षणयाममुहूर्तानां यानि लक्षणानि कर्तव्यानि अस्मिन् क्षणे संध्यानुष्ठेयेत्यादीनि तैरुपेतां दिवसस्यावस्थां ज्ञात्वा सर्वं कार्यं प्रत्यङ्कं सर्वात्मना परिपूर्णरूपमत एवाशेषं विभजेत् विभागेन दर्शयेत्, 'नाडिकाभिरष्टधा दिनं रात्रिं च विभज्य छायाप्रमाणेन वा' इति । तेन एकदिवससंपादितमुपयोगि चेष्टितमङ्के बध्नीयादिति तात्पर्यम् ।**

१ नि -क्काव्य-.

याप्रमाणे अंकामध्ये कथानकाचे नियमन दाखविल्यावर त्या कथानकाच्या कालाचे नियमन आता दाखवितात. क्षण, याम आणि मुहूर्त यांची जी लक्षणे म्हणजे कर्तव्ये, या या क्षणाला संध्योपासना केली पाहिजे इत्यादी, त्यांनी युक्त अशी दिवसाची अवस्था लक्षात घेऊन सर्व कार्य म्हणजे प्रत्येक अंकात सर्वतऱ्हेने परिपूर्ण अशा प्रकारे आणि म्हणूनच काही शेष राहाणार नाही अशा तऱ्हेने विभक्त करावे म्हणजे त्याची विभागणी करून दाखवावी, 'नाडिकांच्या साहाय्याने दिवसाचे तसेच रात्रीचे आठ भाग करून अथवा छाये-च्या प्रमाणाने (ते करून)' या वचनाला अनुसरून. म्हणून तात्पर्य असे की अंकामध्ये एका दिवसात संपादित होणाऱ्या अशा उपयोगी चेष्टिताची रचना करावी.

'इतिवृत्तनियममङ्के' हे मागील एकविसाव्या आर्येत दाखविले आहे. – 'लक्षणानि' लक्षण शब्दाचा कर्तव्य हा अर्थ अप्रसिद्ध आहे. – 'प्रत्यङ्कं' ही मुळातील 'प्रत्येकं' ची केलेली दुरुस्ती आहे. 'प्रत्येकम्' ने अर्थाचा बोध स्पष्टपणे होत नाही. – 'नाडिकाभिः इ०' हे वचन कौटिलीय अर्थशास्त्रावरून घेतले आहे. तेथे (१.१९.६) 'नाडिकाभिरहरष्टधा रात्रिं च विभजेत् छाया-प्रमाणेन वा' असा किंचित भिन्न पाठ आहे. राजाच्या दिनचर्येचे त्या ठिकाणी विस्तृत वर्णन आहे.

**दिवसावसानकार्यं यद्यङ्के नोपपद्यते सर्वम् ।**
**अङ्कच्छेदं कृत्वा प्रवेशकैस्तद्विधातव्यम् ॥ २३ ॥**

(एका) दिवसात समाप्त होणारे कार्य जर अंकामध्ये संपूर्णपणे दाखविता येण्यासारखे नसेल तर अंकसमाप्ती करून प्रवेशकांच्या साहाय्याने ते दाखवावे.

**ननु तन्मध्ये यत्कार्यं मध्याह्नस्नानभोजनादि तद्दिवसमध्य एव वा यद्वृत्तं दूरस्थं दशरथमरणादि तत्कथं वाच्यमित्याह दिवसावसानकार्यमिति । दिवसेऽ-वसानं समाप्तिर्यस्य तत्सर्वं कार्यं यद्यङ्के प्रत्यक्षेण प्रदर्शयितुं न युज्यते तदाङ्क-च्छेदं कृत्वा प्रवेशकैः प्रदर्शनीयम् । अदृष्टमप्यर्थं हृदि प्रवेशयन्तीति प्रवेशकाः चूलिकाङ्कावताराङ्कमुखप्रवेशकविष्कम्भका इहाभिप्रेताः । तथा च कोहलोऽर्थोपक्षे-पकपञ्चकमुक्तवान् ।**

त्या दिवसामध्ये करावयाचे जे मध्याह्नीचे स्नान, भोजन वगैरे कार्य किंवा त्या दिवसामध्येच दूर ठिकाणची दशरथाचा मृत्यू इत्यादि जी घटना ती कशी दाखवावयाची या शंकेचे समाधान 'दिवसावसानकार्यम्' या शब्दांत करतात. दिवसात अवसान म्हणजे समाप्ती ज्याची होते ते सर्व कार्य जर अंकात प्रत्यक्षपणे दाखविणे उचित होत नसेल तेव्हा अंकाचा शेवट करून प्रवेशकांच्या द्वारा ते दाखवावे. न दिसणारी गोष्ट सुद्धा हृदयात पोच-

वितात म्हणून त्यांना प्रवेशक म्हणतात. या ठिकाणी चूलिका, अङ्कावतार, अङ्कमुख, प्रवेशक आणि विष्कम्भक हे अभिप्रेत आहेत. आणि त्याप्रमाणे कोहलाने हे पाच अर्थोपक्षेपक सांगितले आहेत.

'अदृष्टमपि इ०' ही प्रवेशक शब्दाची व्युत्पत्ती आहे. – 'चूलिका- इ०' मागे चूलिका, अङ्कावतार व अङ्कमुख ही तीन प्रकारच्या अंकांची नावे होत असे म्हटले होते व त्या मताला कोहलाचाच आधार दिला होता. प्रस्तुत ठिकाणी ह्यांना अर्थोपक्षेपक मानले असून ते कोहलमत-नुसारीच असल्याचे म्हटले आहे. वस्तुतः वर पंधराव्या आर्येवरील टीकेत कोहलाचे जे वचन उद्धृत केले आहे त्यात अर्थोपक्षेपणाचाही निर्देश आहे.

या आर्येनंतर बडोदे प्रतीत पुढील श्लोक कंसात दिला आहे–

विप्रकृष्टं तु यो देशं गच्छेत्कार्यवशानुगः ।
अङ्कच्छेदेऽथ संक्षेपान्निर्दिशेत्तं प्रवेशकैः ॥

या अर्थाचे विधान पुढे अट्ठाविसाव्या आर्येत केले आहे. अनुष्टुभ छंदातील त्याची ही पुनरुक्ती प्रक्षिप्तत्व मानली पाहिजे हे उघड आहे.

संनिहितनायकोऽङ्कः कर्तव्यो नाटके प्रकरणे वा ।
परिजनकथानुबन्धः प्रवेशको नाम[1] विज्ञेयः ॥ २४ ॥

नाटकामध्ये किंवा प्रकरणामध्ये नायक उपस्थित असलेला असा अंक रचावा. परि-जनांमधील गोष्टींशी संबद्ध असलेला तो प्रवेशक होय असे जाणावे.

एवमङ्कलक्षणं वितत्याभिहितमर्धेनोपसंहरन्नर्धान्तरेणाङ्कसंधानरूपस्य प्रवेशकस्य सामान्यलक्षणं दर्शयन्नार्यां पठति संनिहितनायक इत्यादि । नायकशब्देन तच्चरितसंभोगौ तौ संनिहितौ प्रत्यक्षौ यत्र । एकाङ्केऽपि रूपकेऽङ्को नायकचरितप्रत्यक्षताशून्यः कार्यः, किं पुनरन्यत्रेति प्रकरणे नाटके वेत्युक्तम् । अन्ये त्वेतदुत्तरार्धेन संबन्धयन्तो रूपकान्तराणि प्रवेशकशून्यानि भवन्तीत्याचक्षते । परिजनेनानुबद्ध इति चतुर्णां लक्षणं सूतमागधादेश्चूलिकाङ्गस्य स्त्रीपुरुषादेर्वाङ्कमुखोपकरणस्य चेटीकञ्चुक्यादेर्वा प्रवेशकविष्कम्भोपयोगिनः परिजनत्वात् । कथयैव परस्परश्लिष्टयानुबद्धोऽङ्कावतारः । यथोक्तम् –

अङ्कान्तर एवाङ्को निपतति यस्मिन् प्रयोगमासाद्य ।
नाट्यार्थकथायोगाद् विज्ञेयोऽङ्कावतारोऽसौ ॥ इति ।

१ का घो वापि कर्तव्यः.

याप्रमाणे विस्ताराने सांगितलेल्या अंकाच्या लक्षणाचा प्रथमार्धात समारोप करून द्वितीयार्धात अंकांचे संधानरूप अशा प्रवेशकाचे सामान्य लक्षण दाखविणारी 'संनिहितनायकः' इत्यादी आर्या प्रस्तुत करतात. नायक शब्दाने त्याचे चरित व संभोग (अभिप्रेत आहेत,) ते संनिहित म्हणजे प्रत्यक्ष ज्यात आहे असा. एक अंकी रूपकप्रकारात सुध्दा अंक नायकाचे चरित प्रत्यक्ष नसलेला असा करू नये, मग इतर प्रकारांची काय गोष्ट हे दाखविण्यासाठी 'प्रकरणे नाटके वा' असे म्हटले आहे. पण दुसरे टीकाकार ह्याचा उत्तरार्धाशी अन्वय लावून इतर रूपकप्रकार प्रवेशकाशिवाय असतात असा अर्थ करतात. 'परिजनांनी जोडलेला' हे चार अर्थोपक्षेपकांचे लक्षण आहे. कारण चूलिकेचे अंग असलेले सूत, मागध इत्यादी, अङ्कमुखाला कारणीभूत होणारे स्त्री, पुरुष आदी, अथवा प्रवेशक व विष्कम्भक यांत उपयोगी पडणारे चेटी, कंचुकी आदी हे परिजन होत. परस्परसंबद्ध अशा कथेनेच जोडलेला तो अंकावतार. म्हटलेलेच आहे–'प्रयोगाच्या समयी नाट्यातील कथेच्या संयोगाने जेव्हा दुसऱ्या अंकात एक अंक समाविष्ट होतो तेव्हा त्याला अङ्कावतार म्हणावे.'

'-प्रत्यक्षताशून्यः' याची फोड '-प्रत्यक्षता + अशून्यः' अशी केली पाहिजे. किंवा दुसरा पर्याय, 'न नायक- इ०' असा पाठ स्वीकारला पाहिजे. हा पर्याय अधिक संभाव्य आहे. – परिजनेनानुबद्धः' अभिनवगुप्ताचा मूळ आर्येतील पाठ 'परिजनकथानुबद्धः' असा आहे असे दिसते. तो अधिक सुगम आहे. त्याने त्या शब्दाची 'परिजनानुबद्ध' व 'कथानुबद्ध' अशी फोड केली आहे. त्यापैकी पहिले वचन चार अर्थोपक्षेपकांचे निदर्शक आहे व दुसरे अंकावताराचे असा त्याने अर्थ लावला आहे. 'परिजनेनानुबद्धः' ह्या हस्तलिखितातील पाठाच्या जागी मुद्रित पाठ 'परिजनकथानुबन्धः' असा आहे, तो बरोबर नाही. कथेचा पुढे स्वतंत्र निर्देश आहे. – अङ्कान्तरे इ०' ह्या आर्येतील वर्णनावरून असा ग्रह होतो की अंकावतार म्हणजे प्रवेशान्तर्गत प्रवेश अथवा नाटकांतर्गत नाटक (play within a play). असे प्रवेश प्रियदर्शिका नाटिकेत व उत्तररामचरितात आहेत. 'अङ्कान्तरे अङ्कः निपतति' ह्याचा दुसरा काही अर्थ समाधानकारक होईलसे वाटत नाही. परंतु सर्व टीकाकारांनी व नंतरच्या ग्रंथकारांनी एका अंकाच्या शेवटचा प्रवेशच पुढील अंकाच्या प्रारंभी चालू राहतो अशी योजना असा अङ्कावतारचा अर्थ केला आहे. उदाहरणार्थ, मालविकाग्निमित्रातील दुसरा अंक. Play within a play ला नंतरच्या काळी गर्भाङ्क अशी संज्ञा दिली गेली आहे.

**प्रकरणनाटकविषये पञ्चाद्या दशपरा[१] भवन्त्यङ्काः ।**
**[२]अङ्कान्तरसंधिषु च प्रवेशकास्तेषु तावन्तः ॥ २५ ॥**

प्रकरण आणि नाटक ह्यांच्यामध्ये पाच ते दहापर्यंत अंक असतात आणि अंकांमधील संधींमध्ये तेवढेच प्रवेशक त्यांत असतात.

१ नि -परास्तथा चैव. २ नि अङ्काः कर्तव्याः स्युर्नानारसभावसंयुक्ताः.

**तत्रायं प्रवेशकोऽङ्कार्थसंधानाय भवतीति पूर्वोपक्षिप्तमङ्कं संख्यानुवादद्वारेण दर्शयति प्रकरणनाटकविषय इति । संध्यवस्थानपरिपूर्णोपनिबद्ध एवाङ्का उपक्रमोपसंहारवैतत्ये दश, कस्यचित्संक्षेपेण षडित्येवम् । अतो न्यूनाधिकत्वमनुचितमित्यर्थः । अङ्कमध्येषु तु संधानानि विचित्राणि संपादयितुं पञ्चविधः प्रवेशकः कार्यः । अङ्कान्तरसंधिष्विति निमित्तात् कर्मसंयोगे सप्तमी । चो हेतौ ।**

त्यांपैकी हा प्रवेशक अंकांच्या विषयाचा सांधा जोडण्यासाठी उपयोगी पडतो हे पूर्वी सांगितलेल्या अंकांच्या संख्येच्या निर्देशाने 'प्रकरणनाटकविषये' ह्या आर्येत सांगतात. संधींच्या स्थापनेने परिपूर्ण स्वरूपात रचलेल्या प्रारम्भ व शेवट ह्यांनी युक्त अशा अवस्थांचा विस्तार झाल्यासच अंक दहा होतात, कोणाचा संक्षेप झाल्यास सहा अशा प्रकारे समजावे. यापेक्षा कमी अथवा अधिक अंक उचित नाहीत असा याचा अर्थ. परंतु अंकांच्या मध्ये निरनिराळया प्रकारची संधाने सिद्ध करण्यासाठी पाच प्रकारचे प्रवेशक योजावेत. 'अङ्कान्तरसंधिषु' यातील सप्तमी निमित्तद्वारा कर्माशी संयोग दाखविते. 'च' शब्द हेतू दाखवितो.

'पूर्वोपक्षिप्तमङ्कम्' अर्थासाठी 'पूर्वोपक्षिप्तस्याङ्कस्य' अशी षष्ठी अपेक्षित आहे. – 'संध्यवस्थानपरिपूर्णोपनिबद्धे' असे सप्तम्यन्त रूप असून ते '-वैतत्ये' चे विशेषण आहे. 'अङ्का' हा शब्द त्या दोहोंच्या मध्ये न घालता '-वैतत्ये' नंतर घातला असता तर अधिक बरे झाले असते. प्रत्येक अवस्थेच्या उपक्रम व उपसंहार अशा प्रकारच्या वाढीसाठी दोन दोन अंक आवश्यक होतात व पाच अवस्थांचे मिळून दहा अंक होतात असे अभिनवगुप्ताने वर म्हटलेच आहे, त्याचाच हा अनुवाद आहे. – 'कस्यचित्संक्षेपेण षट्' पाच अवस्थांपैकी एकेका अवस्थेची दोन अंकांत विभागणी आवश्यक न झाल्यास अंकांची संख्या नऊ, आठ, सात, सहा व पाच होते असा अर्थ अभिप्रेत आहे. पण तो व्यक्त करण्यास हे विधान अपुरे आहे. – 'अन्यतो' हा मुळातील पाठ 'अतो' चा अपभ्रंश आहे हे उघड आहे. – 'संधानानि' ही 'संधि' ची व्याख्या आहे. यानंतरचा शब्द हस्तलिखितात 'षट् मित्राणि', मुद्रितात 'षट् चित्राणि' असा आहे. यातील 'षट्' असंभाव्य वाटतो. जर मुळातील 'तावन्तः'ची ही व्याख्या असेल तर 'पञ्चप्रभृति दश' असे पाहिजे होते. पण 'तावन्तः प्रवेशकाः'चा अर्थ अभिनवगुप्ताने पाच प्रकारचे प्रवेशक असा केला आहे. म्हणून 'विचित्राणि' असा पाठ सुचविला आहे. चूलिकादी पाच प्रकारांनी निरनिराळ्या प्रकारची संधाने सिद्ध होतात असे म्हणता येण्यासारखे आहे. – 'अङ्कान्तर- इ०' अंकांमध्ये संधान हे प्रवेशकाच्या योजनेचे निमित्त, ते दाखविण्यासाठी सप्तमीचा उपयोग केला आहे. 'निमित्तात्कर्मसंयोगे' हे पाणिनीच्या 'सप्तम्यधिकरणे (२.३.३६)' ह्या सूत्रावरील कात्यायनाचे वार्तिक आहे. 'चो हेतौ' हे पुढील आर्येवरील टीकेतून येथे घेतले आहे. ती टीका पहावी.

ह्या आर्येनंतर बडोदे प्रतीत पुढील आर्या अधिक आढळते –

**अनयोरन्तरविहितः प्रवेशकोऽर्थक्रियां समभिवीक्ष्य ।**
**संक्षेपार्थः संधिष्वर्थानां संविधातव्यः ॥**

ही आर्या निर्णयसागर प्रतीतही आढळते. पण तिच्यावर अभिनवगुप्ताची टीका नाही, व काही हस्तलिखितांतही ती आढळत नाही. त्यामुळे ती मूळ असण्याचा संभव कमी आहे.

अङ्कच्छेदं कृत्वा[1] मासकृतं वर्षसंचितं वापि ।
तत्सर्वं कर्तव्यं वर्षादूर्ध्वं न तु कदाचित् ॥ २६ ॥

अंकाची समाप्ती केल्यावर एका महिन्यात घडलेले किंवा फार तर एका वर्षात साचलेले (जे असेल) ते सारे (प्रवेशकाच्या द्वारे) दाखवावे; परंतु एका वर्षाहून अधिक (कालातील वृत्त) केव्हाही दाखवू नये.

**अपिशब्देन प्रवेशकशब्दस्यावृत्तिः सूच्यते । प्रवेशकशब्दश्च महासामान्यवचनः पञ्चसु वृत्तः, इह तु मध्यमसामान्ये प्रवेशकविष्कम्भकद्वये वर्तते । तदयमर्थः । यस्मान्मासकृतं वर्षसंचितं वा यत् तत्कार्यं सामाजिकानां हृदयगतम्, तस्मात्प्रवेशकविष्कम्भकौ कर्तव्यौ । परिमितं तु यदनुसंधेयं तत्राङ्कमुखम्, अल्पानुसंधेये चूलिका, अल्पतमेऽङ्कावतारः । तत्र केचिद् वनवासादयोध्याप्रवेशान्तं रामानुसंधानमति संधानीयं मा भूदित्याशयेन व्याचक्षते मासेन मासाभ्यां मासैर्वर्षेण वर्षाभ्यां वर्षैरिति । कदाचित्तु वर्षादूर्ध्वम् । ये महाप्रभावाश्चिरातीतमप्यनुसंदधते रामादयस्तेषां बहुतरो हि कालः प्रवेशकैर्वर्णनीयः । ये तु पुरुषप्राया-स्तेषां वर्षादूर्ध्वमनुसंधानं नैवास्ति, तथा च मार्गशीर्षी तैषीं चान्तरेण दीर्घकालयात्रा आवर्षारात्रान्मासाष्टकमुक्तेति संगिरन्ते ।**

'अपि' शब्दाने प्रवेशक शब्दाची पुनरावृत्ती सूचित होते. आणि प्रवेशक शब्द सामान्याचा वाचक म्हणून पाचही अर्थोपक्षेपकांचा निदर्शक, परंतु प्रस्तुत ठिकाणी तो मध्यम सामान्य जे प्रवेशक व विष्कंभक यांचा निदर्शक आहे. तेव्हा पुढीलप्रमाणे अर्थ आहे. ज्या-अर्थी एका महिन्यात घडलेले किंवा एका वर्षात जमा झालेले जे कार्य ते प्रेक्षकांच्या अंतः-करणात प्रवेश करू शकते त्या अर्थी तद्विषयक प्रवेशक व विष्कम्भक रचावेत. परंतु अनु-संधान थोड्या गोष्टींचेच करावयाचे असेल तेथे अङ्कमुखाची योजना करावी, अल्पच अनुसंधान करावयाचे असेल तर चूलिका, अगदीच अल्प असेल तर अङ्कावतार. येथे काही टीकाकार वनवासाच्या प्रारम्भापासून अयोध्यानगरीतील प्रवेशापर्यंत रामाच्या अनुसंधानास अतिशय संधानाची आवश्यकता उत्पन्न होऊ नये अशा आशयाने 'एक महिन्यात, दोन महिन्यांत किंवा पुष्कळ महिन्यांत घडलेले, एका वर्षात, दोन वर्षांत किंवा पुष्कळ वर्षांत साचलेले' असा अर्थ करतात. कधी कधी एका वर्षाहून अधिक (याचा अर्थ असा) - जे

१ का कुर्यात्.

रामप्रभृती अति प्रभावी असून फार काळ लोटलेल्या गोष्टींचेही अनुसंधान करू शकतात त्यांच्या संबंधात फार मोठ्या कालावधीचे प्रवेशकांत वर्णन करावे. परंतु जे सामान्य पुरुष आहेत त्यांच्या बाबतीत एका वर्षाहून अधिक अनुसंधान असूच शकत नाही. तदनुसार मार्गशीर्ष पौर्णिमा व पौष पौर्णिमा यांच्या दरम्यानच्या काळात सुरू होणारी दीर्घकालीन मोहीम वर्षा ऋतूच्या प्राम्भापर्यंत आठ महिन्यांची सांगितली आहे असे ते टीकाकार म्हणतात.

या ठिकाणीही अभिनवभारतीचा प्रारंभीचा भाग गहाळ झाला आहे हे उघड आहे. कमीत कमी आर्येतील प्रारंभीच्या शब्दांचे अवतरण देणारे व तिचे प्रयोजन सांगणारे वाक्य नेहमीप्रमाणे अपेक्षित आहे. – 'अपिशब्देन इ०' अभिनवगुप्ताचे म्हणणे असे की ह्या आर्येतील 'अपि' शब्दामुळे मागच्या आर्येतील प्रवेशक शब्द येथेही अध्याहृत आहे असे समजावे. 'आवृत्ति' म्हणजे अध्याहार. – मुळांत 'आवृत्तिः सूच्यते।' नंतर 'चो हेतौ' असे वाक्य आहे. ते येथे चुकीने पडले आहे. ह्या आर्येत 'च' नाही. म्हणून ते वाक्य मागच्या आर्येवरील टीकेत घातले आहे. – 'इह तु' म्हणजे अङ्कच्छेद केलेला असतो तेव्हा. अंकसमाप्तीनंतर प्रवेशक व विष्कम्भकच योजता येतात, इतर अर्थोपक्षेपक नाही. – 'यत्' च्या जागी हस्तलिखितात 'यद्वत्' व मुद्रितात 'यच्च' असे पाठ आहेत. पण ते बरोबर वाटत नाहीत. 'च' निरर्थक आहे, व 'यद्वत्'ला अनुरूप 'तद्वत्' सारखा शब्द पुढे नाही. म्हणून केवळ 'यत्' असा पाठ स्वीकारला आहे. – 'हृदयगतम्' म्हणजे प्रेक्षकांच्या धारणाशक्तीच्या आवाक्यात असते. अनेक वर्षांत घडलेल्या गोष्टी एका प्रवेशकाद्वारे सूचित झाल्या तर त्यांचा बरोबर मेळ लावणे प्रेक्षकांना कठीण जाईल असा याचा अर्थ. – 'अयोध्याप्रवेशान्तं' ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितात '-प्रवेशान्तरं' व मुद्रित पाठ '-प्रवेशानन्तरं' असा आहे. पण अन्तर किंवा अनन्तर यांचे अर्थ येथे लागू पडण्यासारखे नाहीत. अन्त हेच संभाव्य आहे. – 'अति संधानीयं' हा हस्तलिखितातील पाठ आहे. छापलेला पाठ 'अनुसंधनीयं' आहे. पण अर्थासाठी 'अति' आवश्यक आहे. आणि अनुसंधान अनुसंधनीय होऊ नये म्हणून अशा तऱ्हेचा अर्थ अभिप्रेत असण्याची शक्यता नाही. 'संधानीय' म्हणजे जोडणी करणे आवश्यक असलेले. – 'वर्षादूर्ध्वम्' यानंतर मुळात आणखी एक 'तु' आहे, पण तो चुकीने पडलेला दिसतो. – 'रामादयः' ही मूळातील 'रामादेः' ची दुरुस्ती आहे. षष्ठीचा काही अन्वय लावता येण्यासारखा नाही, आणि 'महाप्रभावाः' ह्या विशेषणासाठी प्रथमान्त विशेष्य आवश्यक आहे. ह्या टीकाकारांचे म्हणणे असे की राम वगैरेंच्या बाबतीत एका प्रवेशकात अनेक वर्षांत घडलेल्या गोष्टींची सूचना करावयास हरकत नाही. कारण त्यांचा प्रभाव फार मोठा होता. सामान्य नायकांच्या बाबतीत मात्र एक वर्षाचा नियम मोडू नये. आर्येतील 'कदाचित्तु इ०' वचनाचा त्यांनी हा असा अर्थ लावला आहे. – 'मार्गशीर्षी इ०' : कौटिलीय अर्थशास्त्रातील (९.१.४०,५२) वचनांचा आधार घेऊन हे विधान केले आहे. राजाची मोहीम जास्तीत जास्त आठ महिने टिकते. यावरून असे अनुमान केले आहे की एक वर्षाहून अधिक काळातील घडामोडींची संगतवार जोडणी करता येण्यासारखी नाही. हे अनुमान अर्थातच बरोबर नाही.

**एतच्चासत् । मासवर्षादीनां स्वीकृतनियतपरिमाणानां द्विवचनबहुवचनान्तत्वे वृत्त्ययोगस्य दर्शितत्वात् ।**

सौर्यके मासजाते च परिमाणं स्वभावतः ।
उपाधिभूतमाश्रित्य संख्याभेदेन वर्तते ॥
वयन्त्विति परिच्छेदः क्रियतेऽपि न गम्यते ।
इष्टभेदादृते तत्र परिमाणमनर्थकम् ॥

इत्यादि बहु च । वर्षादूर्ध्वमिति च निषेधः फल्गुफल एव स्यात् । तस्मादेकवचनान्तेनैव समासः । न च रामायणभारतादिचरितत्यागप्रसङ्गः । कार्यग्रहणं ह्येतदर्थं मुनिना कृतं, यत्र हि यत्ननिष्पाद्यं संचितं तदेव वर्षं गण्यते, वर्षान्तराणि तु तत्र विद्यमानान्यपि अविद्यमानकल्पानि । रामचरिते हि चतुर्दशवर्षाण्यरण्यादिवासो यद्यपि, कार्यवर्षाणि त्रिचतुराणि भवन्ति यत्र मारीचवधसुग्रीवराज्यदानाद्यवान्तरकार्यं संभवति । तस्माद्वर्षादूर्ध्वमित्यनेन कार्यवर्षद्वयादि निषिध्यत इति । एवं वर्षसहस्रायुषोऽपि वर्षशतान्तरालवृत्तचरितव्याख्यानेऽपि न किंचिद् दुष्यति । तेन पञ्चाङ्के नाटके पञ्च कार्यदिनानीति संक्षेपः, दशाङ्के दशेति विस्तरः ।

परंतु, हें मत चूक आहे, कारण ज्यांचे निश्चित परिमाण सर्वमान्य झाले आहे अशा मास, वर्ष इत्यादींचा द्विवचनान्त किंवा बहुवचनान्त रूपात वृत्तीशी संबंध नसतो असे दाखवून दिलेले आहे – 'सूर्याच्या गतीने उत्पन्न झालेल्या मासाचे परिमाण स्वभावतःच निश्चित असते, उपाधीच्या स्वरूपात असणाऱ्या गोष्टींच्या आश्रयाने त्याच्या संख्येत भिन्नता येते. वयं तु असा परिच्छेद केला गेला जातो, पण तो पटत नाही. इष्ट असलेल्या भेदावाचून परिणाम निरर्थक होय' वगैरे आणखी बरेच. शिवाय, 'वर्षादूर्ध्वम्' यात निर्देशिलेल्या निषेधाचे अत्यंत अल्प फल मिळेल. म्हणून एकवचनानेच समास सोडविला पाहिजे. आणि त्यामुळे रामायण, भारत आदींतील चरितांचा त्याग करण्याचा प्रसंग येईल असेही नाही. कारण, कार्यशब्दाचा वापर भरतमुनींने पुढील उद्देशाने केला आहे. ज्यात यत्नाने निष्पन्न होणाऱ्या गोष्टी घडतात त्याच वर्षांची गणना करतात, इतर वर्षे तेथे असली तरी नसल्यासारखीच. कारण रामचरितात जरी चौदा वर्षेपर्यंत अरण्य आदीत निवास आहे, तरी कार्यवर्षे अशी तीनचारच आहेत की ज्यांत मारीचवध, सुग्रीवाला राज्यदान इत्यादी अवान्तरकार्ये संभवतात. म्हणून 'वर्षादूर्ध्वम्' इत्यादी वचनाने दोन कार्यवर्षे आदीचा निषेध केला आहे. याप्रमाणे हजार वर्षांचेही आयुष्य असलेल्या व्यक्तीच्या बाबतीत शंभर वर्षांचा दरम्यानचा काळ असलेल्या चरिताचे दर्शन घडविण्यात काही दोष नाही. म्हणजे अर्थ असा की पाच अंकी नाटकात पाच कार्यदिवस असा संक्षेप आणि दहा अंकी नाटकात दहा असा विस्तार.

'द्विवचन- इ०' दुसऱ्या टीकाकारांनी 'मासेन कृतम्', 'मासाभ्यां कृतम्', 'मासैः कृतम्' इत्यादी विग्रह केले होते, त्यांपैकी द्विवचनाने व बहुवचनाने केलेले विग्रह अग्राह्य होत, कारण त्या स्वरूपात

त्या शब्दांचा वृत्तीशी योग होत नाही. वृत्ति म्हणजे प्रस्तुत ठिकाणी समासात योजना असा अर्थ आहे. – 'दर्शितत्वात्' कोणी दाखवून दिले आहे म्हणजे पुढील अवतरण कोठून घेतले आहे ते सांगता येत नाही. – 'मासजात' याचे मासांचा समूह किंवा प्रत्येक मास असेही अर्थ होऊ शकतील. – 'उपाधिभूतम्' उपाधि म्हणजे अशी गोष्ट की जिच्यामुळे मास दोन किंवा अधिक होतात. त्यावेळेस मास शब्द द्विवचनान्त किंवा बहुवचनान्त समजता येईल असा अर्थ दिसतो. – 'वयं त्विति इ०' हे कशाविषयी आहे ते सांगता येत नाही. – 'इष्टभेदाद्दते' इष्टभेद म्हणजे उपाधीमुळे उत्पन्न झालेला संख्याभेद असा अर्थ असावा. – 'कार्यग्रहणं' वस्तुतः प्रस्तुत आर्येत 'कार्य' शब्द वापरलेलाच नाही. 'मासकृतं वर्षसंचितम्' यानंतर तो अध्याहृत धरावा लागतो. – 'अरण्यादिवासः' यातील 'आदि'ने किष्किन्धा, लङ्का वगैरे समजता येईल. मुद्रिताप्रमाणे 'अरण्यनिवासो' अशा पाठाची आवश्यकता नाही. – 'कार्यवर्षाणि' असा सामासिक शब्द ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितातील 'कार्ये' किंवा मुद्रितातील 'कार्यः' या स्वतंत्र शब्दांचा अन्वय लावता येण्यासारखा नाही. आणि कार्यवर्ष म्हणजे काय हे 'यत्र मारीचवध-' इत्यादी शब्दांत सांगितले आहे. – 'पञ्च कार्यदिनानि' वस्तुतः 'कार्यवर्षाणि' असे अपेक्षित आहे. कारण, प्रवेशकाचे विवेचन आहे. प्रत्येक प्रवेशकात एक कार्यवर्षाचा वृत्तान्त व जितके अंक तितके प्रवेशक ह्या हिशोबाने पाच कार्यवर्षे होतात. पण प्रवेशक ज्या दिवशी घडतो तो कार्यदिन असे समजता येण्यासारखे आहे. तथापि प्रत्यक्ष अंकांत एकेक कार्यदिन असाही अर्थ अभिप्रेत असण्याची शक्यता आहे.

यः कश्चित्कार्यवशाद्गच्छति पुरुषः प्रकृष्टमध्वानम् ।
तत्राप्यङ्कच्छेदः कर्तव्यः पूर्ववत्तज्ज्ञैः ॥ २७॥

जर कोणी मनुष्य कार्याच्या निमित्ताने दूरच्या प्रवासाला जात असेल तर त्या ठिकाणीही तज्ज्ञ कवींनी पूर्वीप्रमाणे अंकाची समाप्ती करावी.

अङ्कच्छेदे निमित्तान्तरमप्याह यः कश्चित्कार्यवशादिति । कार्यवशात्कार्यस्य तत्रायत्तत्वात् यः पुरुषो नायकः सोऽनेकयोजनव्यवहितमध्वानं यदा गच्छति तदा प्रतिदिनं गमनं विश्रान्तिः शय्या इत्येवमादि कथं रङ्गे प्रदर्श्यमिति तदन्तेनाङ्कच्छेदः कार्यः । डिमादिनायकस्य तु दिव्यस्याकाशयानकादिना सर्वं युज्यते । अनायकपुरुषस्त्वविच्छिन्न एवाङ्के निष्क्रामति । ननु 'दिवसावसानकार्यं यद्यङ्के नोपपद्यते' इति, 'आवश्यकाविरोधेन' इत्यादिना यदुक्तं ततस्तिलमात्रेणाप्यधिकं वाच्यमस्य न लभ्यते वाक्यस्य । अत एवैतत् भट्टलोल्लटाद्यैर्न पठितमेव । उपाध्यायास्त्वाहुः । नेदं निमित्तान्तरम् अपि तु पूर्वं तावत्कथितं 'यद्यङ्के नोपपद्यते' इति, तस्यैवोदाहरणमनयैवार्यया दर्शितम्, यथा नायकस्य प्रकृष्टाध्वगमनमिति । पूर्ववदिति तदर्हमिति वतिः । पूर्वलक्षणार्होऽङ्कच्छेदोऽयमिति यावत् । अपिशब्द उदाहरणान्तरमपि सूचयति ।

अंकाची समाप्ती करण्यासाठी दुसरे निमित्त 'यः कश्चित्कार्यवशात्' इत्यादी शब्दांत सांगतात. कार्यवशात् म्हणजे कार्य त्यावर अवलंबून असल्यामुळे जो पुरुष म्हणजे नायक अनेक योजने दूर असलेल्या प्रवासाला जेव्हा जातो तेव्हा दररोजचा प्रवास, विश्रान्ती, शय्या इत्यादी गोष्टी रंगभूमीवर कशा दाखविता येणार म्हणून तेथेच अंकाची समाप्ती करावी. परंतु डिम आदी रूपकप्रकारांच्या नायकांच्या संबंधात आकाशयान वगैरेंच्या मुळे सर्व काही संभवते. जो नायक नाही असा पुरुष अंक संपलेला नसताही निष्क्रमण करू शकतो. यावर आक्षेप असा की 'दिवसावसानकार्यम्' इत्यादी व 'आवश्यकाविरोधेन' इत्यादी वरील आर्यांत जे सांगितले आहे त्यापेक्षा तिळभरसुद्धा अधिक अर्थ ह्या वाक्यातून मिळत नाही. म्हणूनच भट्टलोल्लटप्रभृतींनी ही आर्या गाळली आहे. परंतु आमचे गुरुजी भट्ट तोत म्हणतात की हे दुसरे निमित्त सांगितलेले नसून पूर्वी 'यद्यङ्के नोपपद्यते' यात जे सांगितले आहे त्याचेच उदाहरण ह्या आर्येत दिले आहे, उदाहरणार्थ नायकाचा दूरवरचा प्रवास. 'पूर्ववत्' यात वत् प्रत्यय 'त्याला लायक' अशा अर्थी लावला आहे. पूर्वी केलेल्या लक्षणाला धरून हा अंकच्छेद आहे असा अर्थ. 'अपि' शब्दाने दुसरी उदाहरणे सुद्धा सूचित होतात.

'यदा' नंतर 'गच्छति तदा' हे शब्द मुळात नाहीत. पण अर्थासाठी आवश्यक म्हणून ते घातले आहेत. तसेच पुढे मुळातील 'प्रदर्श्य'च्या जागी 'प्रदर्श्यमिति' असा पाठ स्वीकारला आहे. त्यानेच अर्थसंगती लागते हे उघड आहे. – 'निष्क्रामति' म्हणजे दूरच्या प्रवासाला जाण्यासाठी म्हणून निष्क्रमण करतो. – 'दिवसावसानकार्यं इ०' ही वरील तेविसावी आर्या आणि 'आवश्यकाविरोधेन इ०' ही विसावी. मुळात 'यद्यङ्के नोप-'चा 'केनोप-' असा भ्रष्ट पाठ झाला आहे. – 'तदर्हमिति वतिः' च्या जागी 'तदर्हमिति भवति' असा मुद्रित पाठ आहे. त्याचा काही अर्थ लागण्यासारखा नाही. 'तदर्हम्' हे पाणिनीचे सूत्र (५.१.११७) आहे. त्या सूत्राप्रमाणे एखाद्या गोष्टीला पात्र असल्याचे दाखविण्याकरिता त्या गोष्टीच्या वाचक शब्दाला 'वत्' प्रत्यय लागतो. म्हणजे 'पूर्ववत्' चा अर्थ 'पूर्वीप्रमाणे' एवढाच नसून 'मागे केलेल्या लक्षणाला अनुसरून' असा समजावयाचा आणि म्हणून प्रस्तुत आर्येत अंकच्छेदाचे एखादे नवीन निमित्त सांगितलेले नाही असे भट्ट तोताचे म्हणणे आहे.

**अङ्कान्तरानु[1]सारी संक्षे[2]पार्थमधिकृत्य बिन्दूनाम् ।**
**प्रकरणनाट[3]कविषये प्रवेशकः[4] संविधातव्यः ॥ २८ ॥**

प्रकरण आणि नाटक ह्यांमध्ये (पूर्वीच्या) अंकातील घटनांच्या पश्चात होणाऱ्या (व) बिंदूंच्या संक्षिप्त प्रयोजनासंबंधी असलेल्या प्रवेशकाची योजना करावी.

१ घो -धिकारी. २ घो -पमयाधिकृत्य सन्धीनाम्. ३ नि -विषयप्र-. ४ का -को भवति काव्येषु.

अङ्कार्थसंधानप्रयोजनस्य प्रवेशकस्य स्थानं वाच्यं विषयं चाह अङ्कान्तरानुसारीति । अङ्कमध्ये भवतीति यावत् । अङ्कान्तरं पूर्वाङ्कान्तरमनुसरति तस्य पश्चाद्भवतीत्यर्थः । प्रत्यङ्कान्तं यो बिन्दुः अनुसंधानाभिधायि वाक्यं तस्य यत्संक्षिप्तं प्रयोजनं तदधिकताकरणं विस्तारमुद्दिश्य, इति वाच्यमुक्तम् । प्रकरणे नाटके अवश्यं प्रवेशकः कार्यः । तस्यावश्यमुत्तमप्रकृतिविषये उपदेशाय प्रवृत्तौ परिमितेनोपायेन भूयस्तरावान्तरकार्ये प्रत्युत्पत्तिः । बहूनां चामात्यादीनामपि स्वकार्यनिरूपणाय प्रवेशकः । अन्यत्र रूपके परिमितकार्योपदेशात् न तथा प्रवेशकोपयोग इति वितनिष्यामः ।

अंकांच्या विषयाची जोडणी करणे हे प्रयोजन असणाऱ्या प्रवेशकाचे स्थान आणि त्यात सांगावयाचा विषय हे 'अङ्कान्तरानुसारी' इत्यादी आर्येत सांगतात. दोन अंकांच्या मध्ये प्रवेशक असतो हे तात्पर्य. अङ्कान्तर म्हणजे अगोदरच्या अंकाचे अंतर, त्याला अनुसरतो म्हणजे त्याच्या नंतर होतो तो असा अर्थ. प्रत्येक अंकाच्या शेवटी जो बिन्दु म्हणजे अनुसंधान व्यक्त करणारे वचन त्याचे जे संक्षिप्त प्रयोजन, त्याची वृद्धि, विस्तार, ह्यांच्याविषयी – यात प्रवेशकाचा वाच्य विषय सांगितला आहे. प्रकरण आणि नाटक यांत प्रवेशक अवश्य योजावा. ते (नाटक व प्रकरण) उत्तम प्रकृतीच्या पुरुषांच्या विषयात उपदेश करण्यास प्रवृत्त झाले असता तो प्रवेशक थोडक्या उपायाने खूप मोठ्या अवान्तरकार्याचे ज्ञान अवश्य देतो. आणि अमात्यप्रभृती पुष्कळ व्यक्तींनाही त्यांच्या स्वतःच्या कार्याच्या निरूपणासाठी प्रवेशक उपयोगी पडतात. इतर रूपकप्रकारांमध्ये फक्त परिमित कार्याचाच उपदेश असल्यामुळे प्रवेशकाचा तसा उपयोग नाही हे आम्ही विस्ताराने सांगणार आहोत.

'वाच्यं' हे 'विषयं'चे विशेषण आहे. – 'अङ्कमध्ये इ०' या ठिकाणी वाक्यांची उलटापालट झाली आहे असे दिसते. प्रस्तुत वाक्य पुढील 'अङ्कान्तरं इ०' वाक्यानंतरच उचित दिसेल. – 'वाक्यं' नंतरचे 'तस्य' मुळात नाही. पण आर्येतील 'बिन्दूनाम् संक्षेपार्थमधिकृत्य' या शब्दांची येथे व्याख्या केली आहे. तेव्हा बिन्दु शब्दाचा अर्थ सांगितल्यावर त्या शब्दातील षष्ठीचा निदर्शक 'तस्य' हा शब्द आवश्यक आहे. – 'प्रयोजनं' ही मुळातील, 'अर्थ' ची व्याख्या आहे. 'तदधिकताकरणं विस्तारम् उद्दिश्य' ह्या शब्दांत मुळातील 'अधिकृत्य'ची व्याख्या केली आहे. 'तत्' म्हणजे प्रयोजन. – 'कार्यः' हा शब्दही मुळात नाही. पण आर्येतील 'संविधातव्यः'चा अर्थ व्यक्त करणारा एखादा शब्द आवश्यक आहे. त्याशिवाय वाक्य अपुरे राहाते. – 'तस्यावश्यम्' या दोन शब्दांचा अन्वय 'परिमितेन···प्रत्युत्पत्तिः' याच्याशी लावावयाचा. मधले 'उत्तमप्रकृति···प्रवृत्तौ' हे शब्द नाटक व प्रकरण यांच्या संबंधात वापरले आहेत. या दोन्हीमध्ये उपदेश करण्याची प्रवृत्ती असते. मुद्रितातील 'ऽपरिमितेन' बरोबर नाही. प्रवेशकात परिमितच उपाय असतात. – 'प्रत्युत्पत्तिः' असा स्वतंत्र शब्द आवश्यक आहे. मुळातल्याप्रमाणे 'प्रत्युत्पत्तिबहूनां' असा सामासिक शब्द असंभाव्य आहे. प्रत्युत्पत्ति

म्हणजे ज्ञान, बोध. – 'बहूनां च इ०' या वाक्याचे प्रयोजन असे दिसते की नाटक व प्रकरण यांतील प्रवेशकांमध्ये अमात्यप्रभृती अनेक प्रकारच्या पात्रांचे चरित पहावयास मिळते, त्यापासू-नही बोध होऊ शकतो.

**नोत्तममध्यमपुरुषैराचरितो नाप्युदात्तवचनकृतः ।**
**प्राकृतभाषाचारः प्रयोगमाश्रित्य[1] कर्तव्यः ॥ २९ ॥**

उत्तम व मध्यम प्रकृतीच्या पुरुषांचे प्रवेश नसलेला, तसेच उदात्त अशी वचने सुद्धा नसलेला (व) भाषा आणि आचरण प्राकृत असलेला (असा प्रवेशक) प्रयोगासाठी योजावा.

**अथ विष्कम्भकाद्भेदमस्य दर्शयन् प्रवेशकशब्दोऽतिविशेषवाच्यपि भवतीति दर्शयति नोत्तममध्यमपुरुषैरिति । उत्तमादयोऽपि भवन्ति परिजनास्तन्निवृत्त्यर्थ-मेतत् । उदात्तं संस्कृतं वचनं तस्य निषेधः । अन्ये त्वाहुः उदात्तं स्वात्मकार्य-विश्रान्तं वचनं निषिध्यते । 'आणत्तंमि भट्टिदारिआए' इत्यादिना हि स्वकृत्यं प्रधानोपयोग्येव दर्श्यते, न स्वतन्त्रम् । प्राकृता भाषा आचारश्च व्यवहारः प्राकृत एव । प्रयोगमाश्रित्येति क्वचित्तु प्रयोगवशात्संस्कृतभाषाचारो विष्कम्भकोऽपि कर्तव्य इति दर्शयति ।**

आता विष्कम्भकाहून ह्याची भिन्नता दाखवून प्रवेशक शब्द एका विशिष्ट प्रकाराचा सुद्धा वाचक होतो हे 'नोत्तममध्यमपुरुषैः' ह्या आर्येत दाखवितात. उत्तम आदी पुरुष सुद्धा परिजन असतात त्यांच्या निवारणासाठी हे विधान आहे. उदात्त म्हणजे संस्कृत वचन, त्याचा निषेध केला आहे. पण दुसऱ्या टीकाकारांच्या मते उदात्त म्हणजे आपल्या स्वतःच्याच कार्याविषयी असलेले वचन, त्याचा निषेध केला आहे. 'राजकुमारीने मला आज्ञा केली आहे' इत्यादी चेटीच्या वचनात तिचे स्वतःचे कार्य मुख्यकार्याला उपयोगी असे दाखविले आहे, स्वतंत्र असे नाही. प्राकृत भाषा आणि आचार म्हणजे व्यवहार सुद्धा प्राकृतच. 'प्रयोगमाश्रित्य' याने कधी कधी प्रयोगाच्या निमित्ताने संस्कृत भाषा व आचार असलेल्या विष्कम्भकाची सुद्धा योजना करावी असे दाखविले आहे.

'अतिविशेषवाच्यपि' मुळात 'विशेष' नंतर 'शब्द' शब्दाची पुनरावृत्ती आहे. ती लेखन-दोषामुळे झालेली दिसते. शेवटचा शब्द हस्तलिखितात 'वाच्यं' असा आहे. तो बरोबर नाही. वाचक या अर्थाचे '-वाची' असे पुल्लिंगी रूप आवश्यक आहे. ह्या समासातील 'अति' शब्दाचे काही प्रयोजन दिसत नाही. – 'आणत्त म्हि इ०' हे नागानन्द नाटकाच्या पहिल्या अंकाच्या

१ नि प्रवेशको नाम विज्ञेयः, का प्रयोगमासाद्य कर्तव्यः.

नंतरच्या प्रवेशकातील चेटीचे वचन आहे. – 'न स्वतन्त्रम्' ह्याचे अगोदर मुद्रितात 'तत्र' हा शब्द अधिक आढळतो. तो निरर्थक आहे. – 'प्राकृता' मुळात 'प्राकृती' असे रूप आढळते. पण ते बरोबर नाही. – 'विष्कम्भकोऽपि' वस्तुतः नाट्यशास्त्रात नाटकात विष्कम्भकाची योजना करावी असे म्हटलेले नाही.

कालोत्थानगतिरसौ[1] व्याख्यासंरम्भकार्यविषयाणाम्[2] ।
अर्थाभिधानयुक्तः[3] प्रवेशकः स्यादनेकार्थः ॥ ३० ॥

हा प्रवेशक कालाची उपस्थिती दाखविणारा, व्याख्या, संरंभ, कार्य आणि विषय ह्यांच्या अर्थाच्या निर्देशाने युक्त (व) अनेक प्रयोजने साध्य करणारा असा असावा.

'संक्षेपार्थमधिकृत्य' इति यदुक्तं तदेव विभजति कालोत्थानगतिरसाविति । कालोत्थानस्य गतिरवगमो यतः कालोदयसूचकः कश्चित्प्रवेशकः । यथा, 'अज्ज वसंतमहूसवे सबहुमाणमाहूय' इत्यादि । अर्थाभिधानेति प्रत्येकं संबध्यते, तेन व्याख्यादीनां विषयान्तानां चतुर्णां योऽर्थस्तदभिधाने युक्तस्तदुद्देशेन प्रवृत्त इति पञ्चप्रकारः प्रवेशक इति यावत् । व्याख्यायत इति व्याख्या । तथा हि केनचित्प्रवेशकेन गूढोऽर्थो व्याख्यायत इत्यर्थः । यथा तापसवत्सराजे अमात्यप्रणिधिः 'भामिज्जइ असवासएहि हालाहलस्स पमादसंकिदेहि' इत्यादि । अनेन हि नातिव्यवधानोक्तं पद्मावतीगृहे यद्वासवदत्तास्थापनं तस्य गूढं प्रयोजनं व्याख्यातम् । संरम्भः कार्यविशेषे अभिप्रायः तस्यार्थ उपायान्वेषणादि तदभिधानयुक्तः प्रवेशकः । यथा वृत्तचारे 'गति...उपस्थितमिदं तत्प्रयोजनम्' इत्यादि । अनेन वासवदत्तामपहृत्य उज्जयिनीतो निर्नीषोर्वत्सेशस्य प्रयोजकत्वं प्राप्तानाममात्यानां संरम्भः शालङ्कायनेनोक्तः । कार्यं तु 'यदाधिकारिकम्' इत्यादि, तस्यार्थः पञ्चाङ्गस्यानुष्ठानम् । तद्यथा – कर्मणामारम्भोपायः पुरुषद्रव्यसंपद् देशकालविभागः विनिपातप्रतीकारः कार्यसिद्धिरिति । तथाभूताभिधानयुक्ताश्च प्रवेशका बाहुल्येन तापसवत्सराज-प्रतिभाचाणक्य-मुद्राराक्षसादिषु । विषयस्तु भाविनोऽङ्कावतारस्येतिवृत्तं तस्यार्थो विशेषरूपः तदभिधानेन युक्तः प्रवेशकः । यथा नागानन्दे द्वितीयेऽङ्के चेटिकाद्वयेन मदनावस्थेतिवृत्तस्य विशेषकवर्णनं चन्दनलतागृहादि दर्शितम् । अन्यान्यपि प्रवेशकस्य प्रयोजनानि सन्ति, न त्वेतत्परिगणनमित्याह अनेकार्थ इति ।

१ घो कालार्थान्तर-. २ नि व्यत्यासारम्भ-. ३ नि -पूर्वः.

'संक्षेपार्थमधिकृत्य' असे जे वर म्हटले आहे त्याचीच विभागणी 'कालोत्थानगतिरसौ' इत्यादी शब्दांत करतात. कालाच्या उत्थानाची गति म्हणजे ज्ञान, ज्यामुळे एखादा प्रवेशक कालागमनाचा सूचक होतो. उदाहरणार्थ 'आज वसन्तमहोत्सवाच्या निमित्ताने बहुमानपूर्वक बोलावून' इत्यादी. 'अर्थाभिधान'चा प्रत्येकाशी अन्वय होतो, म्हणून व्याख्येने प्रारम्भ होणाऱ्या व विषयाने शेवट होणाऱ्या चार गोष्टींचा जो अर्थ त्याचे अभिधान करण्यासाठी युक्त म्हणजे त्या उद्देशाने प्रवृत्त झालेला – अशा रीतीने पाच प्रकारचे प्रवेशक होत असा एकूण अर्थ. जिने काही स्पष्ट केले जाते ती व्याख्या. म्हणजे एखाद्या प्रवेशकाने गूढ गोष्ट स्पष्ट केली जाते. उदाहरणार्थ, तापसवत्सराज नाटकात अमात्यप्रणिधि म्हणतो 'हालाहलाचा प्रमाद घडेल अशी शंका असलेले सचिव त्याच्या जवळजवळच फिरतात' इत्यादी. यात अगदी थोडक्याच वेळाने होणारा वासवदत्तेचा पद्मावतीच्या गृहात निक्षेप, त्याच्या गूढ प्रयोजनाची व्याख्या आहे. संरम्भ म्हणजे एखादे विशिष्ट कार्य करण्याचा मानस, त्याचा अर्थ म्हणजे उपायांचा शोध इत्यादी ते सांगणारा प्रवेशक. उदाहरणार्थ, वृत्तचार नाटकात 'गति.... ....ते हे प्रयोजन उपस्थित झाले आहे' इत्यादी. यात वासवदत्तेचे हरण करून उज्जयिनीहून तिला घेऊन जाण्याची इच्छा करणाऱ्या वत्सराजाला प्रयोजक झालेल्या अमात्यांचा अभिप्राय शालङ्कायनाने बोलून दाखविला आहे. कार्य म्हणजे आधिकारिक वगैरे. त्याचा अर्थ म्हणजे पाच अंगांचे अनुष्ठान. ती अंगे अशी – कार्यांच्या आरंभाचे उपाय, पुरुष व द्रव्य या साधनांची संपत्ती, देश व काल यांची समुचित योजना, संकटनिवारण आणि कार्यसिध्दी. तशा स्वरूपाच्या अभिधानाने युक्त असे प्रवेशक तापसवत्सराज, प्रतिभाचाणक्य, मुद्राराक्षक आदी नाटकांत पुष्कळ आहेत. विषय म्हणजे नंतर होणाऱ्या अंकातील वृत्तान्त, त्याचा विशेष स्वरूपाचा अर्थ, त्याच्या अभिधानाने युक्त असा प्रवेशक. उदाहरणार्थ, नागानन्द नाटकातील दुसऱ्या अंकात मदनावस्थारूप घटनेचे दोन चेटींनी चन्दन, लतागृह इत्यादींनी विशेष दाखविणारे वर्णन केले आहे. प्रवेशकाची इतरही प्रयोजने असतात, येथे त्या सर्वांची यादी दिलेली नाही हे 'अनेकार्थः' या शब्दाने सांगतात.

'कालोत्थानस्य गतिरवगमः' यात समास सोडवून 'गति' शब्दाचा अर्थ दिला आहे. म्हणून हस्तलिखितातील 'कालोत्थानगतिः' असा सामासिक शब्द किंवा मुद्रितातील 'कालोदयस्य गतिः' असा पाठ दोन्हीही बरोबर नाहीत. कालोदय असा अर्थ नंतर दिला आहे. – 'अज्ज वसंत-इ०' हे रत्नावली नाटिकेत प्रस्तावनेतील सूत्रधाराचे वचन आहे. नाटिकेच्या प्रयोगाचा काल त्यात निर्दिष्ट आहे. – 'गूढो' नंतर 'अर्थः' शब्द आवश्यक आहे. मुळात तो नाही. – 'तापसवत्सराजे' या नाटकातील चौथ्या अंकाच्या प्रारंभीच्या मिश्रविष्कम्भकातील सिद्धार्थक नावाच्या अमात्यांच्या गुप्तचराचे (प्रणिधीचे) हे शब्द आहेत. या प्राकृत श्लोकातील पाठ भ्रष्ट आहे. पण त्याचा आशय असा आहे की उदयनाने आत्महत्येचा प्रयत्न करू नये यास्तव रुमण्वत आदी सचिव त्याच्या भोवतीभोवती असतात. – 'गूढं प्रयोजनं' म्हणजे वासवदत्तेने आत्महत्या करू नये हे. – 'वृत्तचारे' असे हस्तलिखितात आहे. मुद्रितात 'नृत्तपारे (पाठभेद नृत्तवारे)'

असे आहे. या नाटकाविषयी काही माहिती उपलब्ध नाही. – 'उज्जयिनीतः' ही मुळातील 'उज्जयिनीं' ची केलेली दुरुस्ती आहे. ती आवश्यक आहे हे उघड आहे. वासवदत्तेला पळवून कौशाम्बीला नेले, उज्जयिनीला नाही. – 'प्रयोजक' म्हणजे तसे करण्यास वत्सराजाला प्रवृत्त करणारे. अमात्य म्हणजे यौगन्धरायणप्रभृती. – शालङ्कायन हे प्रद्योताच्या मंत्र्याचे नाव. – 'यदाधिकारिकम्' म्हणजे नाटकांतील प्रधान कथानक. त्याचे वर्णन पुढे १९.३ ह्या श्लोकात केले आहे. – 'कर्मणामारम्भोपायः इ०' हे कौटिलीय अर्थशास्त्रावरून (१.१५.४२) घेतलेले वचन आहे. – 'प्रतिभाचाणक्य' हे नाटक अज्ञात आहे. – विशेषकवर्णनम्' मुद्रितात 'विशेषवर्णनम्' असे आहे. पण विशेषता स्पष्ट करणारे या अर्थी विशेषक शब्द अधिक समुचित वाटतो.

**बह्वाश्रयमपि कार्यं प्रवेशकैः संक्षिपेच्च संधिषु वा[1] ।**
**बहुचूर्णपदैर्[2]युक्तं जनयति खेदं प्रयोगस्य ॥ ३१ ॥**

आणि पुष्कळ घटनांशी संबद्ध असलेले कार्य सुद्धा प्रवेशकांच्या द्वारा किंवा संधीमध्ये संक्षिप्त रूपात दाखवावे; (कारण,) पुष्कळ गद्य वचनांनी युक्त असे नाट्य प्रयोगात कंटाळा उत्पन्न करते.

**नन्वेवंभूतोऽर्थो यः प्रवेशके प्रदर्श्यते समासेन विस्तरेण वेत्याशङ्क्याह बह्वाश्रयमपीति । संधिष्विति अङ्कार्थसंधाननिमित्तं ये प्रवेशकाः पञ्चाप्युक्ताः चूलिकादयस्तैर्वा अङ्काश्रयं बहु वक्तव्यं विततमपि कार्यं संक्षिपेत् यावत्संधानोपयोगि तावत्तत्र ब्रूयात् । यतो बहुभिर्गद्यगतैरसमस्तैः पदैरसंस्कृतप्रायैः खेदो भवति । अनेन प्रवेशकादौ उत्कलिकाप्रायं बहुतरसमाससंकीर्णमभिनयशाखाङ्गत्रोटनकारित्वात् समाससंशयेनार्थानिश्चायकत्वाच्च न कर्तव्यमित्यपि दर्शयति ।**

अशा प्रकारचा अर्थ जो प्रवेशकात दाखविला जातो तो थोडक्यात मांडावयाचा का विस्ताराने या शंकेचे समाधान 'बह्वाश्रयमपि' इत्यादी शब्दांत करतात. 'संधिषु' म्हणजे अंकातील अर्थाचे संधान करण्यासाठी म्हणून जे चूलिका आदी पाचही प्रवेशक सांगितले आहेत त्यांत अंकाच्या आश्रयाने असलेले पुष्कळ सांगण्यासारखे म्हणजे विस्तृत असलेले सुद्धा कार्य संक्षिप्त स्वरूपात दाखवावे, जेवढे संधानासाठी उपयुक्त असेल तेवढेच त्यात सांगावे. कारण गद्यात असलेल्या, समासरहित आणि मुख्यत्वे संस्कृतात नसलेल्या शब्दांनी कंटाळा येतो. याने कठोर अक्षरांनी युक्त आणि पुष्कळ समासांनी व्याप्त अशी रचना शाखारूप आङ्गिक अभिनयात खंड पाडते म्हणून आणि समासाविषयी संशय उत्पन्न झाल्याकारणाने अर्थ अनिश्चित ठेविते म्हणून करू नये हे सुद्धा दाखवितात.

१ नि च. २ नि -पूर्णपद्यवृत्तं.

'विस्तरेण वा' यानंतर 'दर्शयितव्यः' सारखा शब्द अपेक्षित आहे. – 'संधिष्विति' ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितातील 'संधिं डिममिति' हा उघडच भ्रष्ट पाठ आहे. मुद्रितातील 'संधिं चिकीर्षेव इति' हा पाठही संभाव्य नाही. येथे आर्येतील 'संधिषु' हा शब्द उद्धृत केला असणार यात शंका नाही. कारण पुढील शब्दात त्याचा अर्थ दिला आहे. – 'अङ्कार्थसंधान-' यातील 'संधान' ही 'संविधान' ची दुरुस्ती आहे. मुद्रितातील 'संनिवेश' प्रस्तुत संदर्भात अर्थहीन आहे. – 'गद्यगतैरसमस्तैः पदैः' ही आर्येतील 'चूर्णपदैः' ची व्याख्या आहे. चूर्णपदाचे वर्णन चौदाव्या अध्यायात पुढीलप्रमाणे केले आहे –

अनिबद्धपदं छन्दस्तथा चानियताक्षरम् ।
अर्थापेक्ष्यक्षरस्यूतं ज्ञेयं चूर्णपदं बुधैः ॥ १४.४०

समासरहित गद्याचे हे नामाभिधान आहे. – 'उत्कलिकाप्रायम्' हे पुष्कळ समास असलेल्या व कठोर अक्षरे असलेल्या गद्यरचनेचे नाव आहे – 'भवेदुत्कलिकाप्रायं समासाढ्यं दृढाक्षरम्' (छन्दोमंजरी ५). येथे समासांचा स्वतंत्र निर्देश असल्यामुळे ह्या शब्दाने केवळ कठोर अक्षरांचाच निर्देश अभिप्रेत आहे. – 'अभिनयशाखाङ्ग' सर्व प्रकारच्या आङ्गिक अभिनयाला शाखा असे नाव आहे – 'आङ्गिकस्तु भवेच्छाखा' (८.१६). मोठमोठे समास असले म्हणजे आङ्गिक अभिनयात खंड पडण्याचा संभव असतो.

यत्रार्थस्य समाप्तिर्न [1]भवत्यङ्के प्रयोगबाहुल्यात् ।
[2]वृत्तान्तस्वल्पकथैः प्रवेशकैः सोऽभिधातव्यः ॥ ३२ ॥

ज्या वेळेस प्रयोग फार दीर्घ होणार असल्यामुळे अंकामध्ये योजलेल्या कार्याची समाप्ती होत नसेल तेव्हा घडलेल्या गोष्टींचे थोडक्यात निवेदन करणाऱ्या प्रवेशकांच्या द्वारा तो (कार्याचा अवशिष्ट भाग) सांगावा.

'दिवसावसानकार्यं यद्यङ्के नोपपद्यते सर्वम् । अङ्कच्छेदं कृत्वा प्रवेशकैस्तद्विधातव्यम्॥' इति यदुक्तं तत्रानुपपत्तिर्बहुप्रकारा भवतीति दर्शयितुमाह यत्रार्थस्य समाप्तिरिति । यत्प्रत्यक्षप्रयोज्यमपि प्रयोगवशादङ्केऽसमाप्तं भवति तत्प्रवेशकेन कर्तव्यम् । बहुतरत्वं प्रयोगस्य बहुमानास्पदत्वम् । तदयमत्रार्थः । यत्र दिवसकार्याण्यनेकानि तत्र तन्मध्ये यत्सुन्दरप्रयोगमुपदेशोपयोगि च तत्प्रत्यक्षेण दर्शनीयम्, अन्यत्सर्वं प्रवेशकेन । वृत्तान्तार्था तदवशिष्टेनेतिवृत्तनिर्वाहफला अल्पा संक्षिप्ता कथा यस्य प्रवेशकस्य ।

१ का भवेदङ्के. २ नि वृत्तान्तः; का बहुवृत्तान्तोऽल्पकथैः प्रवेशकैः संविधातव्यः.

'एका दिवसात समाप्त होणारे कार्य जर अंकात संपूर्णपणे दाखविता येण्यासारखे नसेल तर अंकाची समाप्ती करून प्रवेशकांच्या द्वारा ते दाखवावे' असे जे वर म्हटले आहे त्यात निर्देशिलेली अनुपपत्ती पुष्कळ प्रकारची असते हे दाखविण्यासाठी 'यत्रार्थस्य समाप्तिः' ही आर्या सांगतात. प्रत्यक्ष दाखविता येण्यासारखी अशी सुद्धा जी गोष्ट प्रयोगाच्या अडचणी-मुळे अंकात अपूर्ण राहाते ती प्रवेशकाने दाखवावी. प्रयोगाचा पुष्कळपणा म्हणजे बहुमान देण्यास योग्यता. तेव्हा या ठिकाणी अर्थ असा. जेव्हा दिवसात होणारी कार्ये अनेक असतात तेव्हा त्यांमध्ये ज्याचा प्रयोग सुंदर होईल व जे उपदेश देण्यास उपयोगी पडेल ते प्रत्यक्ष दाखवावे, इतर सर्व प्रवेशकद्वारा. वृत्तान्त प्रयोजन असलेली म्हणजे त्यात अवशिष्ट असलेल्या अंशाने कथानकाचा निर्वाह साध्य करणारी, अल्प म्हणजे संक्षिप्त अशी कथा ज्या प्रवेशकात आहे असा.

'दिवसावसानकार्यम् इ०' ही वरील तेविसावी आर्या होय. – 'बहुतरत्वं इ०' आर्येतील 'प्रयोगबाहुल्यात्' या शब्दाचे विवरण करणाऱ्या ह्या वाक्याचा अर्थ असा दिसतो की ज्या गोष्टींना महत्त्व असते त्या प्रत्यक्ष दाखविणे उचित असते. परंतु जर अशा गोष्टी पुष्कळ असल्या तर त्या सर्वांचा अंकात समावेश केल्यास प्रयोग लांबलचक होईल. 'बहुमानास्पद' म्हणजे महत्त्वाची असणारी गोष्ट असा अर्थ अभिप्रेत असावा. – 'वृत्तान्तार्था इ०' या वाक्यात आर्येतील 'वृत्तान्तस्वल्पकथैः' चा अर्थ स्पष्ट करून सांगितला आहे. वृत्तान्त हा अर्थ म्हणजे प्रयोजन जिचे ती 'वृत्तान्तार्था' हे कथेचे विशेषण. – 'तदवशिष्टेन' तत् ने प्रवेशक अभिप्रेत असावे. 'अवशिष्टेन' नंतर 'अंशेन' हे विशेष्य अध्याहृत समजावे. अंकात योजना झाल्यानंतर बाकी राहिलेला भाग. – 'निर्वाह' म्हणजे तडीस नेणे, प्रस्तुत ठिकाणी पुढे नेणे, परिपोष करणे इत्यादी.

**युद्धं राज्यभ्रंशो मरणं नगरोपरोधनं चैव ।**
**प्रत्यक्षाणि तु नाङ्के प्रवेशकैः संविधेयानि ।। ३३ ।।**

युद्ध, राज्यापासून पदच्युती, मृत्यू, तसेच नगराला पडलेला वेढा – या गोष्टी अंका-मध्ये प्रत्यक्षपणे दाखवू नयेत, तर प्रवेशकांमध्ये त्यांची योजना करावी.

एवं प्रत्यक्षप्रयोज्ये प्रवेशकोपयोगो दर्शितः, अन्यत्रापि तं दर्शयति युद्धं राज्यभ्रंश इत्यादि । युद्धे शस्त्रसंपातस्य बाहुल्यं, राज्यभ्रंशे पतनमरणादेः, नगरो-परोधे बलस्य यन्त्रसुरुङ्गादिदानस्य ।

इह केचिदाहुः । मरणं द्विविधम्, किंचिदन्यसंबन्धिन्या क्रियया संपाद्यम् यथा चक्रेण दैत्यस्य शिरश्छेदेन, किंचिदन्यसंबन्धिक्रियानैरपेक्ष्येणैव व्याध्यभि-घातादिप्रभवम् । तत्राद्यस्यैव निषेधः क्रियते । एतदर्थमेव कृतग्रहणम् । तद्धि

**अन्यक्रियावाचकम् । न च तद्युद्धेन संगृहीतम्, अयुद्धपूर्वकस्याप्यशङ्कितशिरश्छेदस्य दर्शितत्वादिति । त एवं प्रष्टव्याः । इदं मरणं प्रयोज्यमिदमप्रयोज्यमिति न तावदत्र विषयविभागे निदानमुत्पश्यामः, मृतस्य कथं निष्क्रमणं कथं वावस्थानम् । ततो नाट्योपयोगिसमस्तध्रुवागानादिप्रक्रियाविलोपः सामाजिकानां विरसताप्रतिपत्तिरिति तु सर्वत्र मरणं समानम् । तस्माद्रङ्गे मरणमप्रयोज्यमेव ।**

याप्रमाणे प्रत्यक्ष प्रयोग करावयास योग्य अशा गोष्टींच्या संबंधात प्रवेशकाचा उपयोग दाखविला आहे. आता तो 'युद्धं राज्यभ्रंशः' इत्यादी शब्दांत इतरत्रही दाखवितात. युद्धामध्ये शस्त्रप्रहारांचे प्राचुर्य असते, राज्यभ्रंशात पतन, मरण आदींचे प्राचुर्य असते आणि नगराला दिलेल्या वेढ्यात सैन्याची व यन्त्र, सुरुंग लावणे इत्यादींची विपुलता असते.

यासंबंधात काहींचे म्हणणे असे आहे. मरण दोन प्रकारचे आहे. एक, दुसऱ्याशी संबन्ध असणाऱ्या क्रियेमुळे घडून येणारे, जसे चक्राने दैत्याच्या शिरच्छेदाने होणारे, दुसरे, दुसऱ्याशी संबन्ध असणाऱ्या क्रियेची अपेक्षा नसतानाही व्याधी, मार इत्यादींनी घडून येणारे. त्यांपैकी फक्त पहिल्याच प्रकाराचा निषेध केला आहे. ह्याचसाठी कृत शब्द वापरला आहे. कारण तो शब्द दुसऱ्याने केलेल्या क्रियेचा वाचक आहे. आणि ते मरण युद्धात अन्तर्भूत झाले आहे असे नाही. कारण युद्धपूर्वक नसताही अनपेक्षित असा शिरच्छेद झालेला दिसून येतो. ह्या टीकाकारांना असे विचारावयाला पाहिजे की ह्या मरणाचा प्रयोग करावा, ह्याचा करू नये अशा प्रकारचा भेद करण्यास योग्य कारण आम्हाला काही दिसत नाही, तेव्हा मृत पात्राने निष्क्रमण कसे करावयाचे किंवा रंगभूमीवर कसे राहावयाचे? त्यामुळे नाट्याला उपयोगी अशा ध्रुवागान आदी समस्त प्रक्रियांचा लोप होईल आणि प्रेक्षकांना विरसतेची प्रतीती होईल; म्हणून सर्व प्रकारचे मरण सारखेच. तेव्हा रंगभूमीवर मरण दाखवावयाचे नाहीच.

'-प्रयोज्ये प्रवेशकोपयोगः' ही थोडी दुरुस्ती आहे. हस्तलिखितात '-प्रयोज्यविप्रवेशकोपयोगः' असा भ्रष्ट पाठ आहे. कदाचित मूळ पाठ 'प्रयोज्यविषये इ०' असेल. मुद्रित पाठ '-प्रयोज्यप्रवेशकोपयोगः' असा समासघटित आहे. तो सुगम नाही. – 'दानस्य' नंतर मुळात 'च' असण्याचा संभव आहे. – मोठे सैन्य व नगर काबीज करण्यासाठी यन्त्रे, सुरुंग यांचा उपयोग रंगभूमीवर प्रत्यक्ष दाखविणे कठीण आहे म्हणून नगरोपरोधाचा निषेध.

'शिरश्छेदेन' मुळात 'शिरश्छेदम्' असे आहे. 'शिरश्छेदः' असे चालले असते. पण येथे 'मरणम्' अध्याहृत धरावयाचे असल्यामुळे 'शिरश्छेदेन' असे तृतीयान्त रूप आवश्यक आहे. – 'कृतग्रहणम्' या आर्येत ह्या टीकाकारांना 'कृत' शब्द कोठे आढळला ते समजणे कठीण आहे. – 'अशङ्कितशिरश्छेदस्य' याचा अर्थ ज्याची अगोदर कल्पनाही नव्हती असा एकाएकी झालेला शिरच्छेद असा दिसतो. – 'ततः' म्हणजे मृत्यू झालेले पात्र रंगभूमीवर असल्याकारणाने.

ननु मरणानुभाववर्णनेनेदानीं किं कृत्यम्, युद्धवीररौद्रादावप्येतदनुभाववर्णने किं प्रयोजनम्, तदनुभावापरिज्ञाने प्रवेशकैरपि कथं वर्णनं स्यादिति चेत् मरणेऽपि समः समाधिः । किंच यत्र प्रत्यापत्तिशून्यं मरणं तत्प्रक्रियाविलोपकत्वान्न प्रयोज्यम् । यत्तु क्वचित्प्रत्यापत्तिः यथा जीमूतवाहनस्य तदेव क्षणमात्रानिश्चितचेष्टात्मकं प्रयोज्यमेवेति । सोऽपि मरणानुभावसाक्षात्करणस्य विषयः । यद्विवादिनामपि साटोपपरिक्रमणं शस्त्रग्रहणादिप्रारम्भरूपं तत्प्रयोज्यम्, अपि तु तन्निर्वाहो न प्रदर्शनीयः । एतदेव कारणेन स्फुटीकृतम् । युद्धमेव यन्निर्वाहपर्यन्तं यावन्मरणमेव । यदचिरप्रत्यापत्तिर्न भवति तन्न प्रत्यक्षेण प्रयोज्यम् । प्रवेशकैरिति उपक्षेपपञ्चकमध्यादन्यतमेनोपक्षेपेणेत्यर्थः ।

अन्ये त्वाहुः । व्याधिजमभिघातजं च मरणं रङ्गे प्रयोज्यम्, अपुनर्जनिनिष्क्रान्तिरहिता प्रकृतिर्विधेयेति ।

यावर आक्षेप घेतला की मरणाच्या अनुभावांच्या वर्णनाचा मग काय उपयोग, युद्धवीर, रौद्र आदी रसांमध्ये सुद्धा ह्याच्या अनुभावांच्या वर्णनाचे काय प्रयोजन आणि त्या अनुभावांचे ज्ञान नसता प्रवेशकांमध्ये सुद्धा कसे वर्णन होऊ शकेल ? तर उत्तर असे की मरणामध्ये सुद्धा मनाची एकाग्रता सारखीच असते. शिवाय, ज्या मरणानंतर पुन्हा जिवंत होत नाही असे मरण प्रयोगाच्या प्रक्रियेचा लोप करणारे असल्यामुळे दाखवावयाचे नाही. परंतु ज्या क्वचित प्रसंगी पुन्हा जीवितप्राप्ती होते – उदाहरणार्थ जीमूतवाहनाला – तसलेच मरण, क्षणभर निश्चित चेष्टांनी विरहित अशा स्वरूपाचे अवश्य दाखवावे. तोच मरणाच्या अनुभावांच्या प्रदर्शनाचा विषय होय. भांडण करणारे जेव्हा उद्धतपणे परिक्रमण करतात तेव्हा शस्त्र घेणे इत्यादी प्रारंभीच्या स्वरूपात ते दाखवावे, परंतु त्याचे पर्यवसान मात्र दाखवावयाचे नाही. हीच गोष्ट कारण सांगून स्पष्ट केली आहे. शेवटपर्यंत युद्ध म्हणजेच कोणाचा तरी मृत्यू होईपर्यंत. ज्यात जीवित लवकरच परत येत नाही असे मरण प्रत्यक्ष प्रयोगात दाखवावयाचे नाही. 'प्रवेशकैः' म्हणजे पाच उपक्षेपकांपैकी कोणत्या तरी एका उपक्षेपकाने असा अर्थ.

परंतु दुसरे टीकाकार म्हणतात की व्याधीने किंवा अभिघाताने आलेले मरण रंगभूमीवर दाखवावे, पुनरुज्जीवन व निष्क्रमण यांनी रहित अशी स्वाभाविक स्थिती दाखवावी.

'मरणानुभाव-' मरण हा एक व्यभिचारिभाव मानला असून सातव्या अध्यायात (श्लोक ८६–९० व तत्संबद्ध गद्य) त्याच्या विभावांचे व अनुभावांचे वर्णन आहे. त्याचे अनुभाव म्हणजे अभिनयद्वारा व्यक्त केले जाणारे त्याचे परिणाम, विस्रस्त गात्रे, निश्चेष्ट इन्द्रिये इत्यादी. आक्षेपकाचे म्हणणे असे की मरण जर रंगभूमीवर दाखवावयाचेच नाही तर त्याच्या अनुभावांचे वर्णन का केले आहे? – 'युद्धवीर' दानवीर, धर्मवीर आणि युद्धवीर अशा तीन प्रकारच्या वीररसाचा निर्देश ६.७९ मध्ये केला आहे. – 'एतदनुभाव-' वीर व

रौद्र रसांच्या वर्णनात मरणाच्या अनुभावांचा समावेश आहे असे येथे म्हटले आहे. पण सहाव्या अध्यायातील ह्या रसांच्या वर्णनात तसे आढळत नाही. दोहोत मृत्यूचा संभव आहे म्हणून असे म्हटलेले दिसते. – 'मरणेऽपि समः समाधिः' आक्षेपाला दिलेल्या ह्या उत्तराचा अर्थ स्पष्ट नाही. मरण जर दाखवावयाचे नाही तर मग अभिनयद्वारा व्यक्त करावयाच्या त्याच्या अनुभावांचे वर्णन भरताने का केले आहे ह्या प्रश्नाचे उत्तर प्रस्तुत वाक्यात सापडण्यासारखे नाही. यापुढील विवेचनात ते सापडते. अभिनवगुप्ताने मरणाचे दोन प्रकार मानले आहेत ते असे – एक क्षणिक टिकणारे व दुसरे कायमचे. पहिल्या प्रकारात दैवी अनुग्रहाने जीवित पुन्हा प्राप्त होते. तसले क्षणिक मरण रंगभूमीवर दाखविता येते व त्याचा अभिनय कसा करावा हे दाखविण्यासाठी भरताने त्याच्या अनुभावांचे वर्णन केले आहे असे अभिनवगुप्ताचे आक्षेपाला उत्तर आहे. पण तत्पूर्वी आलेले हे प्रस्तुत वाक्य त्या उत्तराशी संबद्ध आहे असे दिसत नाही. त्याचा सरळ अर्थ असा दिसतो की ज्याप्रमाणे इतर व्यभिचारिभावांच्या अभिव्यक्तीसाठी नटाचे मन समाहित असावे लागते त्याप्रमाणे मरणाच्या अभिनयासाठीही मनःसमाधि आवश्यक आहे. पण हे काही आक्षेपाला उत्तर नाही हे उघड आहे. असा संभव आहे की येथे टीकेतील पुढचामागचा काही भाग गहाळ झाला आहे. – 'जीमूतवाहनस्य' नागानन्द नाटकात ह्याचा मृत्यू झाल्यावर गौरीच्या प्रसादाने त्याला पुन्हा जीवन प्राप्त होते. – 'यद्विवादिनाम्' ही दुरुती आहे. हस्तलिखितात 'यद्वादीनाम्' असे आहे. 'वादिन्' पेक्षा 'विवादिन्' अधिक संभाव्य आहे. मुद्रित पाठ 'यद्वाहिनीनाम्' असा आहे. पण वाहिनी म्हणजे सैन्य येथे अभिप्रेत असण्याचा संभव नाही. – 'शस्त्रग्रहणादि-' ही सुद्धा 'शस्त्रवर्णनादि-' ची दुरुस्ती. विवादाचा प्रारम्भ शस्त्रग्रहणाने अधिक संभवनीय आहे. त्या समयी शस्त्रवर्णनाला फारसे महत्त्व नसते. – 'कारणेन' मुळात 'कारणे' अशी सप्तमी आहे. पण तृतीयेचे रूपच संभाव्य आहे. हे कारण पुढच्या वाक्यात निर्देशिले आहे.

'पुनर्जनि' म्हणजे पुन्हा जिवंत होणे. – 'प्रकृतिः' म्हणजे मरणकालची स्वाभाविक अवस्था असा अर्थ दिसतो.

**अङ्के प्रवेशके च प्रकरणमाश्रित्य नाटके वापि ।**
**न वधः कर्तव्यः स्याद्यो[1]ऽभ्युदयी नायकः ख्यातः ॥ ३४ ॥**
**[2]अपसरणमेव कार्यं ग्रहणं वा संधिरेव वा योज्यः ।**
**[3]काव्यश्लेषैर्बहुभिर्यथारसं नाट्यतत्त्वज्ञैः ॥ ३५ ॥**

प्रकरणाच्या संबंधात किंवा नाटकामध्ये सुद्धा जो अभ्युदययुक्त प्रख्यात नायक असेल त्याचा वध झालेला अंकात तसेच प्रवेशकातही दाखवू नये. नाट्याचे तत्त्व जाणणाऱ्या कवींनी काव्याशी संश्लिष्ट असे विविध प्रकार रसाला अनुरूप अशा रीतीने योजावेत, उदा–

१ नि स्याद्यस्तत्र स. २ नि अवतरण-. ३ नि बहुभिः कार्यविशेषैः प्रवेशकैः सूचयेद्वापि, का तैस्तैः कार्यविशेषैः प्रवेशकैः सूचकैश्चापि.

हरणार्थ त्याचे पलायन झालेलेच दाखवावे किंवा तो बंदिवान झालेला दाखवावा अथवा तहा-चीच योजना करावी.

**अथ सर्वथा यद्विषयं मरणं नाख्येयं तद्दर्शयति अङ्के प्रवेशके चेति। प्रकरणे नाटके वा नायकस्य प्रत्यक्षेण वा वर्णनया वा न मरणं वर्णनीयम् । अङ्क इति प्रत्यक्षेण प्रवेशक इति वर्णनया । ननु प्रत्यक्षेण ये न कस्यचिन्मरणं प्रयोज्य-मिच्छन्ति तन्मते अङ्कग्रहणं किमर्थम्, तत्राहुः वधशब्देन न मरणमुच्यते अपि तु परकृतं घातदानादि । तत्रान्यघातदानाद्यपि प्रत्यक्षेण रङ्गे प्रदर्श्यते, अचिर-प्रत्यापत्तौ समाश्वासे। यस्तु नायकस्तस्य ख्यातस्य न घातदानादि प्रदर्शनीयम्। अन्ये तु ख्यातं नायकं पताकानायकादिकमिच्छन्ति ।**

आता कोणत्याही प्रकारे ज्याच्या संबंधीच्या मृत्यूची गोष्ट करावयाची नाही ते 'अङ्के प्रवेशके च' ह्या आर्येत दाखवितात. प्रकरणामध्ये किंवा नाटकामध्ये नायकाचे प्रत्यक्ष-पणे अगर वर्णन करून मरण दाखवावयाचे नाही. 'अङ्के' म्हणजे प्रत्यक्षपणे, 'प्रवेशके' म्हणजे वर्णनाच्या द्वारे. जे कोणाचेही मरण प्रत्यक्ष प्रयोगाने दाखवू नये अशा मताचे आहेत त्यांच्या दृष्टीने 'अङ्क' शब्दाच्या उपयोगाचे काय प्रयोजन अशी शंका घेतल्यास त्यांचे म्हणणे असे की वध शब्दाने मरण समजावयाचे नाही, तर दुसऱ्याने केलेला वार इत्यादी. त्यामुळे इतर पात्रांना झालेले वार इत्यादी सुद्धा रंगभूमीवर दाखवितात, जेव्हा थोड-क्याच वेळात ते प्रत्युज्जीवित किंवा समाश्वासित होतात तेव्हा. परंतु जो प्रख्यात नायक असतो त्याच्यावर वार, हल्ला वगैरे झालेला दाखवावयाचा नाही. इतर टीकाकार ख्यात नायक म्हणजे पताकेचा नायक इत्यादी असे समजतात.

'नाटके वा' यातील 'वा' मुळात नाही. पण तो आवश्यक वाटतो. मूळ आर्येत तो आहे. – 'घात' म्हणजे शस्त्र वगैरेनें केलेला वार. – अचिर- इ०' याचा अर्थ असा की इतर पात्रांना मार दिलेला जरी दाखवावयाचा असला तरी ते जीवित असलेले व मूर्च्छित झाल्यास त्यातून शुद्धीवर आलेले असे दाखविले पाहिजेत. – 'अन्ये तु' हे टीकाकार 'प्रख्यात' व 'ख्यात' यांत फरक करतात असे दिसते. मुख्य नायक प्रख्यात असावा असे म्हटले आहे, तेव्हा ख्यात नायक म्हणजे प्रासंगिक कथानकाचा नायक असे त्यांचे म्हणणे.

**अपसरणमिति पलायनम् । यथोक्तम् 'अशक्ये सर्वमुत्सृज्यापगच्छेद्, दृष्टा हि जीवतः पुनरावृत्तिः' इति। ग्रहणं वा कार्यं सनिबन्धनबन्धनमिति, यथा वासवदत्तावृत्तसारे वत्सराजस्य । संधिरिति संधानम् । यथोक्तम् –**

**'प्रवृत्तचक्रेणाक्रान्तो राज्ञा बलवतावलः ।**
**संधिनोपनमेत् ' इति ।**

**अपसरणबन्धनसंधीनां विषयविभागसूचनायाह – प्रधानरसानुसारेण यत्काव्यं यः काव्यार्थस्तस्य श्लेषा बन्धनाद्युपपत्तयः तैरुपलक्षितमपसरणादि कार्यमिति यावत्। कार्ये श्लेषैरिति केषांचित्पाठः।**

अपसरण म्हणजे पलायन. म्हटलेच आहे – 'अशक्य झाल्यास सर्व सोडून देऊन निघून जावे; कारण जो जिवंत राहातो तो पुन्हा परत येतो असे दिसून येते.' किंवा 'ग्रहण' करावे म्हणजे पकडून बन्धन, उदाहरणार्थ वासवदत्तावृत्तसार नाटकात वत्सराजाचे. संधि म्हणजे तह करणे. म्हटलेच आहे – सैन्याची जमवाजमव करून चाल करणाऱ्या बलवान राजाने ज्याच्यावर आक्रमण केले आहे अशा दुर्बल राजाने तह करून शरण जावे.' अपसरण, बन्धन आणि संधी यांचे भिन्न भिन्न प्रसंग सुचविण्यासाठी सांगतात – मुख्य रसाच्या अनुरोधाने जे काव्य म्हणजे काव्याचा जो अर्थ त्याचे श्लेष म्हणजे बन्धन आदी उपपत्ती त्यांनी उपलक्षित झालेले असे अपसरण आदी दाखवातेत असा एकूण अर्थ. काहींचा 'कार्ये श्लेषैः' असा पाठ आहे.

'अशक्ये इ०' तसेच नंतरचे 'प्रवृत्तचक्रेण इ०' ही वचने कौटिलीय अर्थशास्त्रातून (९.७.३५-३६ व ७.३.२२) उद्धृत केली आहेत. स्वतःवर आक्रमण झाल्यास दुर्बल राजाने प्रसंगानुरूप कसे वागावे हे त्यांत सांगितले आहे. – 'वासवदत्तावृत्तसारे' मागे वृत्तसार नाटकाचा निर्देश केला आहे, तेच हे असावे. येथे मुद्रित पाठ '-नृत्तधारे (पारे?)' असा आहे. – '-सूचनायाह' यानंतर 'काव्यश्लेषैरिति' हा शब्द अपेक्षित आहे. तो गहाळ झालेला दिसतो. – 'यः काव्यार्थः' मुळात 'यत्काव्यार्थः' आहे, ते बरोबर नाही. – 'उपलक्षितम्' श्लेषैः मधील तृतीया उपलक्षणार्थी आहे असा अर्थ. – 'कार्ये श्लेषैः' मुद्रितात 'कार्यविशेषैः' असे आहे.

**न महाजनपरिवारं कर्तव्यं नाटकं प्रकरणं वा।**
**ये[1] तत्र कार्यपुरुषाश्चत्वारः पञ्च वा ते स्युः॥ ३६॥**

नाटक किंवा प्रकरण पुष्कळ मनुष्यांचा घोळका असलेले असे करू नये. त्यात कार्याशी संबद्ध अशी माणसे असतील ते चार अथवा पांच असावेत.

**अथ यद्यदप्रयोज्यं प्रत्यक्षेण तस्य सामान्यद्वारकं संग्रहं दर्शयितुमाह न महाजनपरिवारमिति। महाजनः संख्यया तेन परिवारः परिवारणं यत्र वस्तुनि तद्युक्तं नाटकं प्रकरणम्। वाग्रहणादन्यदपि न कार्यम्। एतदुक्तं भवति। बहुतरपुरुषसाध्यं यत्किंचित्--तद्यथा समुद्रे सेतुबन्धनमित्यादि-तत्सर्वं प्रत्यक्षेण न**

१ नि येनात्र

प्रदर्शनीयम् । तथा महतो जनस्य पितापुत्रश्वश्रूस्नुषागुरुशिष्यादेः परितो वरणं व्रीडातङ्कादियोगेन यत्र जायते वैरस्यं वा, महाजनस्य सभ्यस्य च यत्र परिवरणं चित्तसंकोचः, तत्सर्वं परिचुम्बनाद्यपि न प्रत्यक्षप्रयोज्यम् । यदि च प्रत्यक्षप्रयोज्यं तत्र पञ्च कार्यपुरुषाः यदि वा चत्वारः प्रकरीपताकादिरूपाः तेषां च परिवारस्वभावास्तावन्त एवेति यदि प्रकर्षस्तदा दशाष्टौ वा रङ्गे प्रविष्टा भवन्ति । ततोऽधिकेषु त्वभिनयचतुष्टयं न सम्यग्विभावनीयं स्यात्, देवयात्रापरिदृश्यमानजनसमाजवत् ।

आता जे जे प्रत्यक्ष प्रयोगात अयोग्य त्याचा सर्वसामान्य रूपात निर्देश करण्यासाठी 'न महाजनपरिवारम्' इत्यादी सांगतात. महाजन म्हणजे संख्येने पुष्कळ लोक, त्यांनी केलेला परिवार म्हणजे गर्दी ज्यात आहे असे कथानक त्याने युक्त असे नाटक किंवा प्रकरण. 'वा' शब्दाचा उपयोग दुसरे सुद्धा करू नये हे दाखवितो. म्हणजे अर्थ असा. पुष्कळ पुरुषांच्या साह्याने जे काही साध्य होण्यासारखे असेल – उदाहरणार्थ, समुद्रात सेतुबंधन इत्यादी – ते सारे प्रत्यक्ष दाखवू नये. त्याचप्रमाणे पिता, पुत्र, सासू, सून, गुरू, शिष्य आदी पुष्कळ लोक ज्याचा लज्जा, मनस्ताप आदीच्या योगाने सर्व प्रकारे परिहार करतात किंवा ज्याने त्यांना विरसता उत्पन्न होते ते आणि महाजन म्हणजे सभ्य मनुष्याचा ज्यामुळे परिवरण म्हणजे चित्तसंकोच होईल असे परिचुंबन आदी सर्व प्रत्यक्ष प्रयोगास अयोग्य. आणि जे प्रत्यक्ष दाखवावयाचे त्यात पाच कार्याला उपयोगी पुरुष किंवा चारच – प्रकरी, पताका आदीच्या स्वरूपाचे – आणि त्यांच्या परिवाराचे स्वरूप असलेले आणखी तितकेच, याप्रमाणे अधिकात अधिक दहा किंवा आठ पात्रे रंगभूमीवर प्रवेश केलेले असतात. परंतु त्यापेक्षा अधिक पात्रे असल्यास चार प्रकारचा अभिनय चांगल्या प्रकारे पहाता येणे शक्य होणार नाही, देवतांच्या यात्रेत दृष्टीस पडणाऱ्या जनसमुदायाप्रमाणे.

'यत्र वस्तुनि' ह्या शब्दांनंतर मुळात 'तन्नाटकमिति' हे शब्द अधिक आहेत. ते चुकीने पडले आहेत. पुढील 'तद्युक्तं' मधील तत् ने 'वस्तु' चा बोध होतो, नाटकाचा संभाव्य नाही. – 'महतो जनस्य इ०' मूळ आर्येतील शब्दांचे आणखी दोन प्रकारे अर्थ लावले आहेत. – 'पितापुत्र- इ०' बाविसाव्या अध्यायात पुढील श्लोक आहे –

**पितापुत्रस्नुषाश्वश्रूदृश्यं यस्मात्तु नाटकम् ।**
**तस्मादेतानि सर्वाणि वर्जनीयानि यत्नतः ॥ २२.२९९**

'एतानि' म्हणजे चुंबन, आलिंगन इत्यादी. – 'वरणं' म्हणजे वर्जन, परिहार. – 'प्रकरीपताकादिरूपाः' यावरून कार्यपुरुष म्हणजे गौण पात्रे असा अर्थ केलेला दिसतो. – 'तेषां परिवार- इ०' याला मूळ आर्येत काही आधार नाही. – 'अभिनयचतुष्टयम्' आङ्गिक, वाचिक, सात्त्विक आणि आहार्य असा चार प्रकारचा अभिनय.

**काव्यं[1] गोपुच्छाग्रं कर्तव्यं कार्य[2]बन्धमासाद्य ।**
**ये चोदात्ता भावास्ते सर्वे पृष्ठतः कार्याः ॥ ३७॥**

कार्याच्या रचनेच्या अनुरोधाने काव्य गाईच्या शेपटीच्या टोकासारखे करावे; आणि जे उदात्त भाव असतील ते सर्व शेवटी दाखवावेत.

**एवमङ्कप्रवेशकस्वरूपं वितत्याभिहितम्, अधुना तत्समुदायस्य नाटकस्य यादृग्रूपं तद्दर्शयति काव्यं गोपुच्छाग्रमिति । क्रमसूक्ष्माङ्गमिति केचित् । अन्ये तु यथा गोपुच्छे केचिद्वाला ह्रस्वाः केचिद्दीर्घा एवं कानिचित्कार्याणि मुखसंधौ परिसमाप्तानि, कानिचित्प्रतिमुखपर्यन्तानि, कानिचिदवमर्शावसानानि, पराणि निर्वहणपर्यवसायीनि । तद्यथा रत्नावल्यां प्रमोदोत्सवो मुखसंधावेव निष्ठितः, यावद् बाभ्रव्यवृत्तान्तो मुखोपक्षिप्तो निर्वहणे निष्ठां प्राप्तः । साररूपाश्च पदार्थाः पर्यन्ते कर्तव्याः ।**

याप्रमाणे अंक व प्रवेशक यांचे स्वरूप विस्तृतपणे सांगितले आहे. आता त्यांनीं मिळून बनलेल्या नाटकाचे स्वरूप कसे ते 'काव्यं गोपुच्छाग्रं' या शब्दांत सांगतात. 'क्रमाने सूक्ष्म होत जाणारे अवयव असलेले' असे काहींचे मत आहे. परंतु इतरांच्या मते ज्याप्रमाणे गाईच्या शेपटीत काही केस आखूड, काही लांब असतात, त्याप्रमाणे काही कार्ये मुखसंधीत समाप्त होतात, काही प्रतिमुखसंधीत समाप्त होतात, काहींचा अवमर्शसंधीत शेवट होतो, तर इतरांचा शेवट निर्वहणसंधीत होतो. उदाहरणार्थ, रत्नावलीत आनंदोत्सव मुखसंधीतच समाप्त होतो, तर मुखसंधीत निर्दिष्ट झालेल्या बाभ्रव्याच्या वृत्तान्ताचा शेवट निर्वहणसंधीत होतो. आणि सारस्वरूप असलेल्या गोष्टींची योजना शेवटी करावी.

'अङ्कप्रवेशकस्वरूपं' मुळात 'अङ्के' असा स्वतंत्र शब्द आहे. तो बरोबर नाही. – '-सूक्ष्माङ्गम्' नाटकाची अंगे क्रमाने सूक्ष्म होतात म्हणजे काय समजावयाचे ते स्पष्ट नाही. – 'निष्ठितः' या शब्दानंतर मुळात 'इत्यादि' शब्द अधिक आहे, तो निरर्थक असल्यामुळे गाळला आहे. – 'साररूपाः पदार्थाः' ही आर्येतील 'उदात्ता भावाः' ची व्याख्या आहे. सार म्हणजे नाटकाचे सार.

**सर्वेषां काव्यानां नानारसभावयुक्तियुक्तानाम् ।**
**निर्वहणे कर्तव्यो नित्यं हि रसोऽद्भुतस्तज्ज्ञैः ॥ ३८॥**

तज्ज्ञ कवींनी विविध रस व भाव यांच्या योजनेने युक्त असलेल्या सर्व काव्यांच्या निर्वहणसंधीमध्ये नेहमी अद्भुतरसाची योजना करावी.

१ नि कार्य. २ नि काव्य-.

अत्र हेतुमाह सर्वेषां काव्यानामिति । नाटकादीनां निर्वहणेऽद्भुतो रसः कर्तव्यः। एवं हि तानि काव्यानि रसभावानां युक्त्या परस्परसंबद्धानि युक्तानि भवन्ति, नान्यथा । एकवाक्यतां च विना कः प्रबन्धार्थः । तथा च शृङ्गारवीर-रौद्रैः स्त्रीरत्नपृथिवीलाभशत्रुक्षयाः करुणादिभिस्तन्निवृत्तिरिति यथाक्रमेण लोकोत्तरासंभाव्यमनोरथप्राप्तौ भवितव्यमद्भुतेन । साधारणलाभो हि यदि फलत्वेन कल्प्यतेऽवश्यं क्रियायाः किंचिदस्त्येव फलमात्रमिति किं तत्रोपायव्युत्पादनायत्नेनेति अद्भुतावसानत्वमकार्यकरम् । तेन व्युत्पाद्यजनस्यैवं बुद्धिर्जायते 'अहो दुष्करमप्युपायक्रमेण सिध्यतीति उपायेन वर्तितव्यम्' इति ।

ह्याचे कारण 'सर्वेषां काव्यानाम्' इत्यादी शब्दांत सांगतात. नाटक आदींच्या निर्वहणसंधीमध्ये अद्भुत रसाची योजना करावी. कारण त्याचमुळे ती काव्ये रस आणि भाव यांच्या योजनेने युक्त म्हणजे सुसंबद्ध होतात, एरव्ही नाही. आणि सुसूत्रता नसेल तर प्रबंधाचे काय प्रयोजन? त्यामुळे शृङ्गार, वीर आणि रौद्र यांच्या द्वारा अनुक्रमे सुंदर स्त्रीचा लाभ, पृथ्वीचा लाभ, आणि शत्रूंचा नाश, आणि करुण आदींच्या द्वारा त्यांचा लोप असे क्रमशः असता लोकोत्तर व असंभाव्य अशा मनोरथाच्या प्राप्तीसाठी अद्भुत असणे आवश्यक आहे. कारण, जर सामान्य लाभाचीच कल्पना केली तर क्रियेचे काही थोडेसे फल अवश्य मिळतेच तेव्हा तसे असताना उपायांचा बोध देण्याचा प्रयत्न करण्याचे काय कारण म्हणून अद्भुताने होणाऱ्या शेवटाची योजना कार्यसिद्धिकर नसते. त्यामुळे ज्यांना बोध करावयाचा त्यांच्या मनात येते की दुःसाध्य अशी गोष्टही उपायांच्या योजनेमुळे सिद्ध होते, तेव्हा उपायांचा अवलंब केला पाहिजे.

'युक्तानि' शब्दाची व्याख्या 'परस्परसंबद्धानि' ही आहे. तेव्हा तो शब्द व्याख्येच्या अगोदर वाचणे उचित होईल. – 'यथाक्रमेण' यातील क्रम निर्देशिलेल्या रसांचा नसून कथानकातील घटनांचा आहे असे समजले पाहिजे. – 'भवितव्यमद्भुतेन' येथे केलेला युक्तिवाद असा. विविध रसांचा आविर्भाव करणाऱ्या कथानकात शेवटी अलौकिक असे फल प्राप्त झालेले दाखवावयाचे असेल तर त्यासाठी अद्भुताची योजना आवश्यक आहे. त्यानेच इतर रसांच्या आविर्भावात एकसूत्रता उत्पन्न होते. – 'साधारणलाभो' मुळात 'असाधारणलाभो' आहे. पण ह्या संबंध वाक्याचा आशय लक्षात घेता सामान्य लाभच त्यात अभिप्रेत आहे असे दिसते. नाटकाच्या शेवटी लोकोत्तर फलाची प्राप्ती झालेली दाखविण्यास अद्भुत आवश्यक आहे असे अगोदरच्या वाक्यात सांगितले आहे. प्रस्तुत वाक्यात असे म्हणावयाचे आहे की शेवटी प्राप्त होणारे फल जर सामान्य स्वरूपाचे असेल तर त्यासाठी अद्भुताची योजना निरर्थक होईल. – 'क्रियायाः' ही क्रिया म्हणजे नेहमीची सामान्य क्रिया, जिच्यामुळे साधारण फल सहजगत्या मिळते. – 'उपायव्युत्पादनायत्नेन' व्युत्पादना म्हणजे प्रेक्षकांना बोध देण्याचे कार्य. हा बोध उपायांसंबंधी म्हणजे काय करावे, कसे वागावे यासंबंधी असतो. '-यत्नेन' हा मुद्रणदोष असावा. – 'अकार्य-

करम्' ही मूळातील 'अकार्यम्' ची दुरुस्ती आहे. अद्‌भुताच्या योजनेने कार्यसिद्धी होत नाही, कारण ती क्रियेनेच झालेली असते. – 'तेन व्युत्पाद्य- इ०' हे वाक्य मागील वाक्याच्या अगोदर असते तर अधिक बरे झाले असते.

**नाटकलक्षणमेतन्मया समासेन कीर्तितं विधिवत् ।**
**प्रकरणमतःपरमहं लक्षणयुक्त्या प्रवक्ष्यामि ॥ ३९ ॥**

नाटकाचे हे लक्षण मी नियमांना अनुसरून थोडक्यात सांगितले आहे. आता यानंतर मी लक्षणाच्या साहाय्याने प्रकरणाविषयी सांगणार आहे.

**पूर्वोक्तमुपसंहरति वक्तव्यान्तरं चाक्षिपति नाटकलक्षणमेतदित्यादि । क्वचिल्लक्ष्यं प्रसिद्धम्, इह तु लक्षणबलेन तस्यैव यत्नप्रसाध्यत्वमिति दर्शयति । लक्षणयुक्त्या लक्षणद्वारेण युक्त्या हृदयानुप्रवेशनया हेतुभूतया संपाद्ययेत्यर्थः ।**

अगोदरच्या विवेचनाचा उपसंहार व दुसऱ्या वक्तव्याचा उपक्रम 'नाटकलक्षणमेतत्' इत्यादी आर्येत करतात. क्वचित लक्ष्य प्रसिद्ध असते. परंतु प्रस्तुत विषयात लक्षणाच्या साहाय्यानेच त्याची प्रयत्नपूर्वक सिद्धी करावी लागते हे दाखवितात. 'लक्षणयुक्त्या' म्हणजे लक्षणाच्या द्वारा युक्तीने म्हणजे हेतुस्वरूप व साध्य करावयाच्या अंतःकरणातील प्रवेशाने असा अर्थ.

'लक्ष्य' म्हणजे ज्याचे लक्षण करावयाचे तो पदार्थ. – 'युक्त्या' मुळात 'युक्तिः' आहे. परंतु पुढील तृतीयान्त शब्द ह्या शब्दाची व्याख्या करण्यासाठी योजिले आहेत, तेव्हा हा शब्द ही तृतीयेतच असला पाहिजे. 'हेतुभूतया' आणि 'संपाद्यया' ही 'हृदयानुप्रवेशनया' ची विशेषणे होत. युक्तिचा अर्थ हृदयात अनुप्रवेश असा केला आहे. हेतुभूत हे याचे विशेषण समर्पक वाटत नाही. अशी शक्यता आहे की मूळ पाठ 'लक्षणद्वारेण युक्त्या हृदयानुप्रवेशनया, हेतुभूतेन संपाद्ययेत्यर्थः' असा होता. हेतुभूत हे लक्षणाचे वर्णन समुचित होईल.

**यत्र कविरात्मशक्त्या वस्तु शरीरं च नायकं[1] चैव ।**
**औत्पत्तिकं प्रकुरुते प्रकरणमिति तद्बुधैर्ज्ञेयम् ॥ ४० ॥**

जेव्हा कवी आपल्या प्रतिभेने कथानक, त्याची मांडणी तसेच नायक यांची स्वतंत्र अशा स्वरूपाची निर्मिती करतो तेव्हा ते प्रकरण होय असे सुज्ञ माणसांनी जाणावे.

१ नि नाटकं.

**तत्र प्रकरणस्य सभेदस्य लक्षणं नामनिर्वचनं चाह यत्र कविरात्मशक्त्येति। वस्त्विति साध्यं फलम्, शरीरमिति तदुपायं वस्त्वधिकं काव्याभिधेयम्, आत्मशक्त्या प्रकुरुते यत्काव्येन तत्प्रकरणमिति बुधैर्ज्ञेयमिति संबन्धः।**

त्यात भिन्न प्रकार असलेल्या प्रकरणाचे लक्षण व नावाची व्युत्पत्ती 'यत्र कविरात्मशक्त्या' ह्या आर्येत सांगतात. वस्तु म्हणजे साध्य करावयाचे फल, शरीर म्हणजे त्याचा उपाय, वस्तूहून अधिक, ज्याला काव्य असे नांव आहे ते, – स्वतःच्या शक्तीने ज्या काव्याने उत्पन्न करतो ते प्रकरण असे सुज्ञ माणसांनी समजावे असा अन्वय.

'लक्षणं' मुळात 'सलक्षणं' आहे. पण ज्या अर्थी पुढे 'च' वापरला आहे त्या अर्थी 'लक्षणं' असाच मूळचा पाठ असणार हे उघड आहे. – 'वस्त्वधिकं' मुद्रित पाठ 'वस्त्वादिकं' असा आहे. पुढील अध्यायाच्या पहिल्या श्लोकात इतिवृत्त म्हणजे कथानक हे नाट्याचे शरीर असे म्हटले आहे. तदनुरोधाने शरीर म्हणजे (फल ह्या अर्थी) वस्तु अधिक इतिवृत्ताचे इतर अंश असे येथे म्हटलेले असावे. – 'येन प्रकुरुते तत्प्रकरणम्' ही प्रकरण शब्दाची व्युत्पत्ती.

**यदनार्षमथाहार्यं[1] काव्यं प्रकरोत्यभूतगुणयुक्तम्।
उत्पन्नबीजवस्तु प्रकरणमिति तदपि विज्ञेयम्॥४१॥**

जे काव्य ऋषींच्या ग्रंथावर आधारित नसून (दुसरीकडून) घेतलेले असते (व) कवी ज्याची पूर्वी त्यात नसलेल्या गुणांनी युक्त अशी रचना करतो ते (काव्य) सुद्धा, त्यातील बीज व कथानक नवीन उत्पन्न झालेले असल्यामुळे, प्रकरणच होय असे जाणावे.

**यत्र समुत्पाद्यं न भवति तत्र योऽनुत्पाद्योंऽशः स कुत्रस्थो ग्राह्य इति दर्शयितुमाह यदनार्षमित्यादि। अनार्षमिति पुराणादिव्यतिरिक्तबृहत्कथाद्युपनिबद्धं मूलदेवचरितादि। आहार्यमिति पूर्वकविकाव्याद्वाहरणीयं समुद्रदत्तचेष्टितादि। ननु तत्रांशे कविकृतत्वाभावात्कथं प्रकरणवाचोयुक्तिरित्याह–उत्पन्ने पूर्वसिद्धे बीजं वस्तु च यत्र तादृशमपि तत्, यदि अवस्तुभूतैः बृहत्कथादौ काव्यान्तरे वाप्रसिद्धैर्गुणैर्युक्तं प्रकरोति, तदिति तस्माद्धेतोरेतदपि प्रकरणम्। तेन बृहत्कथादिसिद्धस्य मूलदेवादेरधिकावापं कविशक्तिर्यदा विधत्ते तदा प्रकरणम्। एवं पूर्वकविसमुत्प्रेक्षितसमुद्रदत्तचेष्टितादिवर्णनेऽपि अधिकावापं विदधत्कविः प्रकरणं कुर्यादिति तात्पर्यम्।**

१ नि यदनर्थमपाहार्यं, कां यदनायकहार्यकार्यं, घो यदनार्षनायकहार्य-

जेथे कथानक स्वतंत्रपणे निर्मिलेले नसते तेथे जो न निर्मिलेला भाग तो कोठून घ्यावयाचा ते 'यदनार्षम्' इत्यादी आर्येत दाखवितात. अनार्ष म्हणजे पुराणादिव्यतिरिक्त अशा बृहत्कथादी ग्रंथात सांगितलेले मूलदेवाचे चरित इत्यादी. आहार्य म्हणजे अगोदरच्चा कवींच्या काव्यातून घेता येण्यासारखे समुद्रदत्ताचे चेष्टित इत्यादी. त्या अंशामध्ये कवीच्या स्वतंत्र निर्मितीचा अभाव असता त्याला प्रकरण कसे म्हणता येईल या शंकेचे समाधान करतात – उत्पन्न म्हणजे अगोदरच तयार असलेले बीज आणि वस्तु ज्यात आहे अशा तऱ्हेचे असेल तरी ते जर मूळ वस्तूत नसलेल्या म्हणजे बृहत्कथा वगैरेत किंवा दुसऱ्या काव्यात प्रसिद्ध नसलेल्या गुणांनी युक्त असे केले तर तत् म्हणजे त्या कारणासाठी हे सुद्धा प्रकरणच. तेव्हा बृहत्कथादीत तयार असलेल्या मूलदेव वगैरेच्या चरितात कविशक्ति अधिक भर घालते तेव्हा प्रकरण होते. त्याचप्रमाणे पूर्वीच्या कवींनी कल्पिलेल्या समुद्रदत्ताचे चेष्टित आदीच्या वर्णनात सुद्धा अधिक भर घालून कवीने प्रकरण करावे असा तात्पर्यार्थ.

'स कुत्रस्थो' मुळात 'स' ऐवजी 'न' आहे. तो उघडच चूक आहे. – 'ननु तत्रांशे' मुळात 'ननु' नंतर 'च' अधिक आहे. परंतु तो निरर्थक असल्याकारणाने गाळला आहे. – 'पूर्वसिद्धे' ही 'उत्पन्ने' ची व्याख्या आहे. हे दोन्ही शब्द नपुंसकलिंगी प्रथमेच्या द्विवचनात आहेत. – 'यदि अवस्तुभूतैः' ही मुळातील 'यदिति वस्तुभूतैः' ची दुरुस्ती आहे. आर्येतील 'अभूतगुणयुक्तम्' ची व्याख्या येथे असल्यामुळे नञर्थवाचक 'अ-' आवश्यक आहे हे उघड आहे. – 'आवाप' म्हणजे भर.

**यन्नाटके मयोक्तं वस्तु शरीरं च[1] वृत्तिभेदाश्च ।**
**तत्प्रकरणेऽपि योज्यं[2] सलक्षणं सर्वसंधिषु तु ॥४२॥**

नाटकाच्या संबंधात कथानक व त्याची मांडणी आणि निरनिराळ्या वृत्तींची योजना ह्या ज्या गोष्टी मी सांगितल्या आहेत त्या प्रकरणातही त्यांच्या वैशिष्ट्यांसह सर्व संधींमध्ये योजाव्यात.

**नन्वस्येतिवृत्तस्य कथं योजनेत्याशङ्क्य पूर्वोक्तमेवातिदेशद्वारेण स्मारयितुमाह यन्नाटके मयोक्तमिति । 'नानाविभूतियुक्तमृद्धिविलासादिभिः' इत्यादिनायकफलवत्त्वमुक्तम् तद्वस्तु, शरीरमिति 'अङ्कप्रवेशकाढ्यम्', वृत्तिभेदाश्च 'नानारसभावचेष्टितैर्बहुधा सुखदुःखोत्पत्तिकृतम्' इति, सलक्षणमित्यङ्कप्रवेशकयोर्लक्षणयुक्तमिति । केचित्तु शरीरग्रहणेन गतार्थं तस्माल्लक्षणमित्यङ्कपरिमाणम् अङ्कान्तर-**

१ का रसाश्रयोपेतम्. २ नि कार्यं केवलमुत्पाद्यवस्तु स्यात्.

संधानहेतुषु च प्रवेशकेषु यत्प्रयोज्यमुक्तं 'दिवसावसानकार्यं यद्यङ्के नोपपद्यते' इत्यादि तत्सर्वं प्रकरणेऽपि योज्यमित्याहुः ।

ह्या प्रकरणाच्या कथानकाची योजना कशी करावी अशी शंका घेऊन पूर्वी सांगितलेल्याचीच अतिदेशद्वारा आठवण करून देण्यासाठी 'यन्नाटके मयोक्तम्' ही आर्या सांगतात. 'नानाप्रकारच्या विभूतींनी व ऋद्धि, विलास आदींनी युक्त' इत्यादी वचनांत नायकाच्या फलप्राप्तीचा निर्देश आहे तोच वस्तु, शरीर म्हणजे 'अङ्क व प्रवेशक यांनी समृद्ध असलेले' ते, आणि वृत्तिभेद म्हणजे 'विविध प्रकारच्या रस व भाव यांच्याशी संलग्न चेष्टितांनी पुष्कळ प्रकारे सुख व दुःख उत्पन्न करणारे' याने निर्दिष्ट झालेले, सलक्षण म्हणजे अंक व प्रवेशक यांच्या लक्षणांनी युक्त असलेले. परंतु काही टीकाकारांचे म्हणणे आहे की शरीर शब्दाच्या अर्थातच याचा अन्तर्भाव झालेला आहे, तेव्हा लक्षण म्हणजे अंकाचे परिमाण आणि अंकामध्ये संधान करणाऱ्या प्रवेशकांमध्ये योजावयास 'दिवसाच्या अखेरीस होणारे कार्य जर अंकामध्ये समाविष्ट होत नसेल' इत्यादीमध्ये सांगितलेले सर्व काही प्रकरणामध्ये सुद्धा योजावे.

'नानाविभूति- इ०' व 'अङ्कप्रवेशकाढ्यम्' वर अकराव्या आर्येत आहेत, 'नानारस- इ०' बाराव्या आर्येत. – 'तद्वस्तु' वस्तु म्हणजे नायकाला प्राप्त होणारे फल असा अर्थ मागे सुद्धा केला आहे. – 'अङ्कपरिमाणम्' म्हणजे अंकाच्या प्रयोगाला लागणारा काल. अंकांची संख्या असा अर्थ करता येणार नाही. कारण संख्या सांगतानाच प्रकरणाचा सुद्धा निर्देश केला आहे (पंचविसावी आर्या). त्यासाठी अतिदेश आवश्यक नाही. – 'दिवसावसान- इ०' ही वरील तेविसावी आर्या.

**विप्रवणिक्सचिवानां पुरोहितामात्यसार्थवाहानाम् ।**
**चरितं यन्नैकविधं[1] ज्ञेयं तत्प्रकरणं नाम ॥ ४३ ॥**

**नोदात्तनायककृतं न दिव्यचरितं न राजसंभोगम्[2] ।**
**बाह्यजनसंप्रयुक्तं तज्ज्ञेयं[3] प्रकरणं तज्ज्ञैः ॥ ४४ ॥**

ब्राह्मण, वणिक, सचिव, पुरोहित, अमात्य व सार्थवाह यांचे चे अनेक प्रकारचे चरित ते प्रकरण ह्या नावाने ओळखावे. ज्यात उदात्त नायकाची योजना नाही, ज्यात देवांचे चरित नाही, ज्यात राजाचा संभोग नाही आणि जे बाह्य जनांनी प्रयुक्त केलेले असते ते प्रकरण होय असे तज्ज्ञांनी जाणावे.

१ **नि** यन्नैक-, **का** यदनेक-. २ **नि** -संभोगः. ३ **नि** ज्ञेयं तत्प्रकरणं नाम.

अतिदेशायातमतिप्रसङ्गं वारयत्यार्याद्वयेन विप्रवणिगित्यादिना । सचिवो मन्त्री, अमात्योऽधिकृतः, सार्थवाहस्तावत्पण्यानामाहर्ता तद्देशक्रयविक्रयकृतो वणिजोऽन्य एव । नैकविधमित्यनेकरसयुक्तमित्यर्थः। 'नैकरसान्तरविहितः' इति तदतिदेशमात्रमिति सूचितम् ।

प्रख्यातोदात्तेति प्रसक्तं निषेधति नोदात्तेति । तन्निषेधे चार्थान्नाटके वैपरित्यमायातम् । नाटके च देवो नायकत्वेन निषिद्ध इति तत्प्रकरणे कर्तव्यत्वेनापद्यत इत्याह न दिव्यचरितामिति । तथा 'दिव्याश्रयम्' इति यदतिदेशाद् देवानां प्रयोज्यत्वं प्रसक्तं तदप्यनेन निषिद्धम् । नाटके देवानामिव इहापि राज्ञः प्रवेशे शङ्क्यमाने निराकरोति न राजसंभोग इति । यदि वा औत्पत्तिकत्वेऽपि न राजोचितसंभोगोत्प्रेक्षा विप्रादिषु करणीयेत्यनेन शिक्षयति । अत एव राजानियम उचितोऽन्तपुरजनः कञ्चुकिप्रभृतिः तद्व्यतिरिक्तो बाह्यजनोऽत्र चेटदासादिः प्रवेशकादौ कार्य इत्यर्थः ।

अतिदेशामुळे होणाऱ्या अतिप्रसंगाचे 'विप्रवणिक्' इत्यादी दोन आर्यांत निवारण करतात. सचिव म्हणजे मन्त्री, अमात्य म्हणजे अधिकारी, तर सार्थवाह म्हणजे बाहेरच्या देशांतून माल आणणारा, देशातच खरेदीविक्री करणाऱ्या वणिजापेक्षा निराळा. नैकविध म्हणजे अनेक रसांनी युक्त असा अर्थ. 'नैकरसान्तरविहितः' याचा हा केवळ अतिदेश आहे असे सूचित होते.

'प्रख्यातोदात्त' याची अतिदेशाने होणारी प्राप्ती 'नोदात्त' इत्यादि वचनाने निषिद्ध ठरविली आहे. त्याचा निषेध केल्याने अर्थातच नाटकापासून विपरीतता सिद्ध होते. आणि नाटकात नायक म्हणून देव निषिद्ध आहे तेव्हा प्रकरणात त्याची योजना करण्याचा प्रसंग येईल म्हणून 'न दिव्यचरितम्' असे म्हटले आहे. त्याचप्रमाणे 'दिव्याश्रयम्' याच्या अतिदेशामुळे प्राप्त होणारी जी देवांची योजना तिचा सुद्धा ह्याने निषेध झाला आहे. ज्याप्रमाणे नाटकात देवांचा प्रवेश त्याप्रमाणे येथे राजाचा प्रवेश संभाव्य अशी शंका उत्पन्न झाल्यास तिचे निराकरण 'न राजसंभोगम्' या शब्दांत करतात. अथवा ह्या वचनाने काल्पनिक असले तरी कथानकात विप्र आदींच्या बाबतीत राजालाच उचित अशा संभोगाची कल्पना करावयाची नाही असा नियम शिकवितात. म्हणूनच राजाच्या नियमाला उचित असे कञ्चुकिप्रभृती अन्तःपुरातील सेवक त्यांहून व्यतिरिक्त असे जे बाहेरचे सेवक, चेट, दास वगैरे त्यांची ह्या प्रकरणात प्रवेशक वगैरेमध्ये योजना करावी असा अर्थ.

'नैकरसान्तरविहितः' हे वचन वरील सतराव्या आर्येत आले आहे.

'नाटके वैपरीत्यम्' म्हणजे नाटकाविषयी जे सांगितले आहे त्याच्या उलट प्रकरणात समजावयाचे. याची काही उदाहरणे पुढील वाक्यांत दिली आहेत; त्याचबरोबर या नियमाचे काही अपवादही सांगितले आहेत. – 'प्रवेशे शङ्क्यमाने' मुद्रितात 'शङ्कमाने' आहे. पण कर्मणि धातुसाधित विशेषण आवश्यक आहे हे उघड आहे. हस्तलिखितात 'प्रवेशोऽङ्कमानो' असा भ्रष्ट पाठ आहे. – 'राजनियम उचितः' पहिला शब्द सप्तमी एकवचनात आहे. त्यातील नियम शब्द विशेष समर्पक नाही. प्रासाद अथवा परिवार या अर्थाचा शब्द अधिक समुचित झाला असता.

**दासविटश्रेष्ठियुतं वेशस्त्र्युपचारकारणोपेतम्[1] ।**
**मन्दकुलस्त्रीचरितं काव्यं कार्यं प्रकरणे[2] तु ॥४५॥**

परंतु, प्रकरणात दास, विट, श्रेष्ठी यांनी युक्त, वेश्यांच्या उपचारांच्या हेतूंनी युक्त (व) कुल स्त्रियांचे थोडेसेच चरित असलेले असे काव्य रचावे.

एतदेव दर्शयति दासविटश्रेष्ठियुतमिति । कञ्चुकिस्थाने दासः, विदूषकस्थाने विटः, अमात्यस्थाने श्रेष्ठीत्यर्थः । वेश्यावाटो वेशः तत्र या स्त्री तस्या य उपचारो वैशिके वक्ष्यते स कारणं यस्य शृङ्गारस्य तेनोपेतम् । कुलस्त्रीविषयं चेष्टितं मन्दं यत्रेति । उपाध्यायास्तु मन्दकुलानां स्त्रीणां चरितं यत्रेत्याहुः । तेन कुलाङ्गनापि तत्र मन्दकुलेवेति दर्शितं भवति । एतदेवाभिमन्यमानेन पुष्पदूषितके अशोकदत्तादिशब्दाकर्णनेन समुद्रदत्तस्य शङ्का योपनिबद्धा सा न दोषाय । निर्वहणान्तोपयोगिनी हि नन्दयन्तीनिर्वासनं तस्याश्च गृहान्तरावस्थानम् । इदमेव मुखसंधौ मूलं परपुरुषसंभावनामूलत्वात्। एवमनभ्युपगमे तु श्वशुरेण वध्वा असंनिहिते पुत्रे निर्वासनं शबरसेनापतिगृहेऽवस्थानमित्युत्तमप्रकृतीनामनुपपन्नमेव । तस्मात्स्ववर्गापेक्षयेदमुत्तमत्वम्। अद्यतने राजोचितमुत्तमप्रकृतित्वं वणिङ्मात्रे समारोप्य तद्दूषणं यत्कृतं न तेन ब्रह्मयशःस्वामियशः खण्डितम्, अपि तु स्वयश एव। ये हि परयशो मिथ्या कलङ्कयितुमुद्यतास्तेषां स्वयश एवैति अयशोमात्रावशेषताम् । न हि नायकशब्दमात्रादेव दुर्योधनवदेव शङ्काद्यनुचितम् । प्रकरणे हि तादृश एव नायकः, केवलमन्यवणिगपेक्षया स उत्तमोऽस्तु । व्युत्पाद्यश्च तत्रैवंविध एवेत्यलमवान्तरेण ।

हेच 'दासविटश्रेष्ठियुतम्' या आर्येत दाखवितात. कञ्चुकीच्या स्थानी दास, विदूषकाच्या जागी विट, अमात्याच्या जागी श्रेष्ठी असा अर्थ. वेश म्हणजे वेश्यांचा मोहल्ला,

१ नि -करणो-. २ नि प्रयोगे तु.

तेथे जी स्त्री तिचा उपचार, जो वैशिक प्रकरणात सांगितला जाणार आहे, तो ज्या शृङ्गाराचे कारण त्याने युक्त. कुलस्त्रियासंबंधीचे चेष्टित ज्यात थोडे आहे असे. परंतु आमच्या गुरुजींच्या म्हणण्याप्रमाणे सामान्य कुलांतील स्त्रियांचे चरित ज्यात आहे असे. म्हणून त्यात कुलस्त्री सुद्धा कमी दर्जाच्या कुलातीलच दाखविली जाते. हेच मत स्वीकारून पुष्पदूषितक प्रकरणात अशोकदत्त आदींचे शब्द ऐकल्यामुळे समुद्रदत्ताच्या मनात जो संशय दाखविला आहे तो दोषास्पद नाही. कारण नन्दयन्तीचे निर्वासन व तिचा दुसऱ्या गृहात वास ही निर्वहणसंधीच्या शेवटी उपयुक्त होतात. हेच मुखसंधीतील मूळ, कारण परपुरुषाविषयीचा संशय हेच त्याचे मूळ आहे. असा अर्थ जर स्वीकारला नाही जर पुत्र उपस्थित नसताना सासऱ्याने सुनेला घराबाहेर घालवून देणे व शबरसेनापतीच्या घरी तिचे राहाणे ह्या गोष्टी उत्तम प्रकृतीच्या व्यक्तींच्या बाबतीत उपपन्न नाहीत खास. म्हणून हे उत्तमत्व त्यांच्या स्वतःच्या वर्गाच्याच मानाने. राजाला उचित अशा उत्तम प्रकृतीचा आजच्या केवळ वणिक असलेल्या नायका-वर आरोप करून त्याला जे दोषास्पद ठरविले आहे त्याने ब्रह्मयशःस्वामीच्या यशाचा अपकर्ष होत नसून स्वतःचेच यश खंडित होते. कारण जे दुसऱ्यांचे यश खोटेच कलंकित करावयास उद्युक्त होतात त्यांचे स्वतःचेच यश केवळ अकीर्तीरूपाने शिल्लक राहाते. आणि केवळ नायक शब्द लावला आहे म्हणून त्याला—दुर्योधनाप्रमाणेच—संशय वगैरे येणे अनुचित आहे असे मुळीच नाही. कारण प्रकरणात तसाच नायक असतो, केवळ इतर वणिजांच्या मानाने तो उत्तम असतो आणि त्यापासून बोध घेणाराही त्याच प्रकारचा असतो. हे विषयांतर आता पुरे.

'उपचार' म्हणजे चालचलणूक, वागण्याची तऱ्हा. – 'वैशिके' हे तेविसाव्या अध्यायाचे नाव आहे. – 'मन्दकुला' म्हणजे उच्चकुलातील नाही अशी. – 'पुष्पदूषितक' हे प्रकरण सध्या उपलब्ध नाही. 'निर्वहणान्तोपयोगिनी' हे नपुंसकलिंगी प्रथमेचे द्विवचन आहे आणि 'निर्वासनं अवस्थानं च' या दोहोंच्या वर्णनात्मक आहे. याचसाठी मुळातील 'गृहान्तरावस्था' च्या जागी 'गृहान्तरावस्थानम्' हा पाठ स्वीकारला पाहिजे. पुढेही अवस्थान असेच रूप वापरले आहे. – 'राजोचितमुत्तमप्रकृतित्वम्' ही दुरुस्ती आहे. 'समारोप्य' ला आवश्यक असलेले हे कर्म. मूळ पाठ 'राजोचितानामुत्तमप्रकृतीनाम्' असा आहे. त्यातील षष्ठीचा मुळीच अन्वय लावता येण्यासारखा नाही. – 'यद्दूषणम्' ह्या टीकाकाराने पुष्पदूषितक प्रकरणात असा दोष दाखविला होता की त्याचा नायक उत्तम प्रकृतीचा असूनही त्याने आपल्या पत्नीच्या चारित्र्या-विषयी संशय घेतला; हे त्याच्या उत्तम प्रकृतीशी विसंगत आहे. – 'ब्रह्मयशःस्वामिन्' हे त्या प्रकरणकर्त्याचे नांव. – 'परयशो मिथ्या' मुळात 'मिथ्यायशो मिथ्या' असा पाठ आहे. तो उघडच भ्रष्ट आहे. पुढील 'स्वयशः' लक्षात घेता या ठिकाणी 'परयशः' असण्याचाच संभव स्पष्ट होतो. – 'स्वयश एवैति अयशोमात्रावशेषताम्' ही सुद्धा दुरुस्ती आहे. मुळात 'एवेति यशोमा-मात्रावशेषता' असे आहे. त्यातील 'इति' निरर्थक आहे आणि शेवटच्या प्रथमेचा काहीच अन्वय लागण्यासारखा नाही. तसेच यश केवळ यशरूपाने शिल्लक राहाते असे म्हटले असण्याची शक्यता नाही. मागच्याच वाक्यात ते खण्डित होते असे म्हटले आहे. – 'दुर्योधनवदेव'

वेणीसंहार नाटकाच्या दुसऱ्या अंकात दुर्योधन आपल्या पत्नीच्या चारित्र्याविषयी साशंक होतो. ते जसे त्याच्या बाबतीत अनुचित नाही, तसे ते पुष्पदूषितकाच्या नायकाच्या बाबतीतही नाही असा भावार्थ. पुष्पदूषितक प्रकरणाच्या कथानकावर कोणा टीकाकाराने आक्षेप घेतला होता, त्या संबंधात अभिनवगुप्ताने त्याच्यावर कडक टीका करून कथानक निर्दोष असल्याचे प्रतिपादन केले आहे. त्या टीकाकाराचीही काही माहिती नाही. – 'एवंविधः' म्हणजे अगदी उत्तम प्रकृतीचा नसलेला.

**सचिवश्रेष्ठिब्राह्मणपुरोहितामात्यसार्थवाहानाम् ।**
**गृहवार्ता यत्र भवेन्न तत्र वेश्याङ्गना कार्या ॥ ४६ ॥**
**यदि वेशयुवतियुक्तं न कुलस्त्रीसंगमोऽपि[1] तत्र स्यात् ।**
**अथ कुलजनप्रयुक्तं न वेशयुवतिर्भवेत्तत्र ॥ ४७ ॥**

ज्यामध्ये सचिव, श्रेष्ठी, ब्राह्मण, पुरोहित, अमात्य आणि सार्थवाह यांच्या घरांतील घडामोडी असतील त्यात वेश्येची योजना करू नये. जर (ते काव्य) वेश्येने युक्त असेल तर त्यात कुलस्त्रीचा समावेशही असू नये, आणि जर त्यात कुलस्त्रीची योजना केलेली असेल तर त्यात वेश्येचा समावेश असू नये.

**अथास्य सप्तविधस्यापि प्रकरणस्य प्रत्येकं भेदत्रयं दर्शयितुमार्यात्रयं पठति सचिवेत्यादि । सचिवादीनां संबन्धिनी यत्र गार्हस्थ्योचिता वार्ता पुरुषार्थसाधकमितिवृत्तं, न तत्र वेश्याङ्गना नायिकात्वेन निबन्धनीया । विटादीनां तु नायकत्वेन कृतानां गार्हस्थ्यचिन्तायां सापि निबन्धनीयेत्युक्तं भवति । यदि गृहस्थचिन्तावर्णनं न भवति श्रेष्ठिसार्थवाहादीनां च विप्रादिवदविरुद्धो वेश्यायोग इति सापि प्रदर्शनीयेति लब्धमर्थात् । तत्र न तु कुलस्त्रीसंगमः कर्तव्यः । तदाह यदि वा वेशयुवतीति अथ कुलजनप्रयुक्तमिति । एवं श्रेष्ठिसचिवादिविषयं शुद्धं भेदद्वयमुक्तम् ।**

आता ह्या सात प्रकारच्या प्रकरणाचे प्रत्येकी तीन भेद आहेत हे दाखविण्यासाठी 'सचिव-' इत्यादी तीन आर्या सांगतात. ज्यामध्ये सचिवप्रभृतींच्या विषयीची गृहस्थधर्माला अनुरूप अशी गोष्ट म्हणजे पुरुषार्थ साध्य करणारे कथानक असेल त्यात वेश्येची नायिका म्हणून योजना करू नये. परंतु विट आदींची नायक म्हणून योजना केली असल्यास गृहस्थधर्माचा विचार अभिप्रेत असला तर वेश्येची सुद्धा योजना करावी असा अर्थ होतो. जर गृहस्थधर्माचे वर्णन नसेल तर ब्राह्मण आदींच्या प्रमाणे

१ नि -संगमर्हति ततः, का -संगमो भवेत्तत्र.

श्रेष्ठी, सार्थवाह आदींचाही वेश्येशी समागम निषिद्ध नसल्यामुळे तिचीही योजना करावी असे अर्थात प्राप्त होते. परंतु त्या ठिकाणी कुलस्त्रीचा समावेश करू नये. हेच 'यदि वेशयुवति' इत्यादी व 'अथ कुलजनप्रयुक्तम्' इत्यादी ह्या वचनांत सांगितले आहे. याप्रमाणे श्रेष्ठी, सचिव आदींच्या संबंधात प्रकरणाचे दोन शुद्ध भेद सांगितले आहेत.

'सप्तविधस्य' वस्तुतः सात प्रकारच्या प्रकरणांचा आतापर्यंत कोठेच उल्लेख नाही. चाळिसाव्या आर्येचा उपक्षेप करताना तीत भेदांचा निर्देश आहे असे म्हटले आहे (प्रकरणस्य सभेदस्य लक्षणम्). परंतु प्रत्यक्ष आर्येत त्यांच्या निर्देश नाही, इतकेच नव्हे तर तिच्यावरील टीकेतही तो नाही. असा संभव दिसतो की त्रेचाळिसाव्या आर्येत निर्देशिलेले विप्र आदी नायकांच्या अनुरोधाने हे भेद कल्पिले आहेत. तथापि त्या ठिकाणी सहाच प्रकारच्या नायकांचा निर्देश आहे व प्रस्तुत आर्येतही त्या सहाच जणांचा उल्लेख केला आहे. येथील टीकेवरून असे दिसते की सातव्या प्रकारचा नायक विट हा मानला आहे. आणि ह्या सात प्रकारच्या नायकांमुळे प्रकरणाचे सात प्रकार होतात असे अभिनवगुप्ताचे मत दिसते. – 'विप्रादिवदविरुद्धः' याचा अर्थ असा दिसतो की विप्र आदींना वेश्यागमन निषिद्ध आहे, तसे ते श्रेष्ठी, सार्थवाह वगैरेंना नाही. विप्रादींना ते निषिद्ध नाही त्याप्रमाणेच श्रेष्ठीप्रभृतींनाही नाही असा अर्थ असंभवनीय आहे.

**यदि वा कारणयुक्त्या[1] वेशकुलस्त्रीकृतोपचारः[2] स्यात् ।**
**अविकृतभाषाचारं तत्र तु पाठ्यं प्रयोक्तव्यम् ॥ ४८ ॥**

अथवा जर कारणपरत्वे वेश्या व कुलस्त्री यांची योजना केली असेल तर त्या ठिकाणी शुद्ध भाषेचा उपयोग केलेल्या पाठ्याची योजना करावी.

**विटादिविषयस्तु संकीर्ण एव वेश्याकुलजाभ्यां भवति । तदाह यदि वा कारणयुक्त्येति । विटे वेशस्त्री प्रधानत्वात्पूर्वमुक्ता । कुलस्त्री तु तत्रापि पितृपिलामहाद्यनुरोधादिति कारणशब्देनोक्तम् । अविकृता भाषा कुलस्त्रियाः शौरसेनी, वेश्यायाः संस्कृता, आचारः कुलस्त्रियां विनयप्रधानः अन्यस्यां तद्विपरीतः । तथा च देवीचन्द्रगुप्ते वसन्तसेनामुद्दिश्य माधवस्योक्तिः –**

**आनन्दाश्रु सितेतरोत्पलरुचोराबध्नता नेत्रयोः**
**प्रत्यङ्गेषु वरानने पुलकिषु स्वेदं समातन्वता ।**
**कुर्वाणेन नितम्बयोरुपचयं संपूर्णयोरप्यसौ**
**केनाप्यस्पृशताप्यधोनिवसनग्रन्थिस्तवोच्छ्वासितः ॥ इति ।**

**अत्र हि व्युत्पाद्यस्तथाविध एव तादृश्येव च वृत्तान्ते । एवमेत एकविंशतिः प्रकरणे भेदाः ।**

१ नि प्रकरणयुक्त्या. २ का -स्त्रीसंगमो न स्यात्, घो -स्त्रीसंगमोऽथ वा स्यात्.

विट आदींच्या विषयीचे प्रकरण मात्र वेश्या व कुलस्त्री यांच्यामुळे फक्त संमिश्रच होते. ते 'यदि वा कारणयुक्त्या' या शब्दांत सांगतात. विटाच्या संबंधात वेश्या प्रधान असल्या-मुळे तिचा प्रथम निर्देश केला आहे. त्या ठिकाणी सुद्धा कुलस्त्री पिता, पितामह इत्यादींच्या अनुरोधाने असते हे कारण ह्या शब्दाने सांगितले आहे. विकृत नसलेली भाषा म्हणजे कुल-स्त्रीची शौरसेनी, वेश्येची संस्कृत. अविकृत आचार कुलस्त्रीचा विनयप्रधान, वेश्येचा त्याउलट. उदाहरणार्थ, देवीचन्द्रगुप्त नाटकात माधवाची वसन्तसेनेला उद्देशून पुढील उक्ती – 'हे सुमुखि, नीलकमलांचे सौंदर्य असलेल्या तुझ्या नेत्रांत आनंदाश्रू आणणाऱ्या, पुलकित झालेल्या तुझ्या प्रत्येक अवयवात स्वेद उत्पन्न करणाऱ्या, परिपूर्ण असलेल्या नितंबातही वृद्धि करणाऱ्या कोणी तरी ही तुझ्या अधोवस्त्राची गाठ स्पर्श न करताही सोडली आहे.' या ठिकाणी बोध घेणारा त्याच प्रकारचा आणि बोध तसल्याच वृत्तान्तापासून होतो. याप्रमाणे प्रकरणाचे हे एकवीस भेद होत.

'अविकृत' म्हणजे स्वाभाविक असा अर्थ केलेला दिसतो. – 'देवीचन्द्रगुप्त' ह्या निर्देशात काहीतरी गोंधळ असावासे वाटते. ह्या नावावरून हे स्पष्ट होते की ह्या रूपकाचा नायक चन्द्र-गुप्त म्हणजे एक राजा असणार. तेव्हा हा रूपकप्रकार नाटक होय, प्रकरण नव्हे. विशेषतः विट नायक असलेल्या प्रकरणाचा विचार चालू असता ह्या नाटकातील उदाहरण अनुचितच ठरेल. पुढील वाक्यात माधव व वसन्तसेना ही ह्या रूपकातील दोन पात्रांची नावे दिली आहेत. ती विट व वेश्या यांची असण्याची शक्यता आहे. तसे असल्यास हे उदाहरण एका प्रकरणातून घेतले आहे असे म्हणता येईल. पण त्याचे नाव देवीचन्द्रगुप्त असणे शक्य नाही. त्या नाटकात विट व वेश्या यांची योजना असण्याचाही संभव फारसा नाही. तेव्हा हे नाव येथे चुकीने पडले आहेसे दिसते. – 'केनापि' यात अनुरागाचा अथवा प्रेमाचा निर्देश आहे. – 'वृत्तान्ते' मुळात 'वृत्ताङ्के' आहे. त्या-पासून काही अर्थबोध होत नाही. – 'एकविंशतिः' ही संख्या कशी काय सिद्ध होते ते स्पष्ट नाही. विट धरून सात प्रकारचे नायक असलेले सात प्रकार मान्य केले तरी त्या प्रत्येकाचे तीन तीन प्रकार होतात असे जे प्रारंभी विधान केले आहे त्याला पुढील विवेचनात पुष्टी मिळत नाही. श्रेष्ठी, सचिव आदी नायक असलेल्या सहा प्रकारांचे दोन शुद्ध भेद होतात – एक कुलस्त्री नायिका असलेले व दुसरे वेश्या नायिका असलेले – असे म्हटले आहे. म्हणजे हे बारा प्रकार मानता येतील. विट नायक असल्यास फक्त संकीर्ण म्हणजे एकच प्रकार संभवतो असे स्पष्ट म्हटले आहे. म्हणजे एकूण तेराच भेद संभवतात, एकवीस नाही. नाट्यदर्पणात नायक, फल आणि वस्तु हे तीन एकेकटे, दोनदोन किंवा तिन्ही काल्पनिक असता सात भेद व नंतर कुलजा, वेश्या किंवा दोन्ही यांच्या त्या सात भेदांतील संभाव्य योजनेमुळे एकवीस प्रकार होत असल्याचे म्हटले आहे. अभिनवभारतीत ते अभिप्रेत नाहीत.

**मध्यमपुरुषैर्नित्यं योज्यो विष्कम्भकोऽत्र तत्त्वज्ञैः ।**

**संस्कृतवचनानुगतः [1]संक्षेपार्थः प्रवेशकवत् ॥ ४९ ॥**

१ नि संक्षिप्तार्थः.

**शुद्धः संकीर्णो वा द्विविधो विष्कम्भकोऽपि कर्तव्यः[1] ।**
**मध्यमपात्रः[2] शुद्धः संकीर्णो नीचमध्यकृतः ॥ ५० ॥**

**अङ्कान्तरालविहितः प्रवेशकार्थक्रियां[3] समभिवीक्ष्य ।**
**[4]संक्षेपात्संधीनामर्थानां चैव कर्तव्यः ॥ ५१ ॥**

(नाट्याचे) तत्त्व जाणणाऱ्यांनी ह्यामध्ये प्रवेशकाप्रमाणे संक्षेप करण्याचे प्रयोजन असलेला विष्कम्भक नेहमी मध्यम प्रकृतीच्या पात्रांच्या द्वारा व संस्कृत वचनांनी युक्त असा योजावा. विष्कम्भक सुद्धा शुद्ध अथवा संकीर्ण असा दोन प्रकारचा करावा. मध्यम पात्रे असलेला तो शुद्ध आणि मध्यम व नीच पात्रांनी केलेला तो संकीर्ण. प्रवेशकाने साध्य असलेले प्रयोजन नीट लक्षात घेऊन संधी आणि कार्ये यांचा संक्षेप करून अंकांच्या मध्ये योजना केलेला (असा विष्कम्भक) रचावा.

**प्रकरणे नाटकापेक्षया प्रायशः उपयोगिनोऽपि मध्यमा एव संभवन्तीति तत्र विष्कम्भकस्य बाहुल्येन संभावनमित्याशयेन प्रकरणे विष्कम्भकं लक्षयति मध्यमपुरुषैरिति । विष्कम्भयत्युपस्तम्भयतीति विष्कम्भकः । संस्कृतेन वचनेनानुगतश्च । संकीर्णोऽप्ययस्त्येवेति । प्रवेशकेन यार्थक्रिया कर्तव्या तामेव कर्तव्यत्वेनाभिसंधाय विष्कम्भकः कार्यः । तामेवार्थक्रियां स्पष्टयति संक्षेपात्संधीनामर्थानां चेति । संधीनां यः संक्षेपो युद्धराज्यभ्रंशादीनां चार्थानां यः संक्षेपस्तमभिसंधाय अङ्कस्याङ्कयोर्वान्तराले मध्ये विष्कम्भको योज्यः ।**

प्रकरणात नाटकाच्या मानाने बहुतकरून मध्यम पात्रेच उपयोगी असण्याचा संभव असतो म्हणून त्यात विष्कम्भकाची पुष्कळ प्रमाणात संभाव्यता असते हे लक्षात घेऊन 'मध्यमपुरुषैः' इत्यादी वचनात प्रकरणातील विष्कम्भकाचे लक्षण सांगतात. विष्कम्भयति म्हणजे आधार देतो तो विष्कम्भक. आणि संस्कृत भाषेने युक्त असलेला. हा संमिश्र स्वरूपाचाही असतो. प्रवेशकाने जी प्रयोजनसिद्धी करावयाची असते तीच करावयाची अशा उद्देशाने विष्कम्भकाची रचना करावी. तीच प्रयोजनसिद्धी 'संक्षेपात्संधीनामर्थानां च' इत्यादी शब्दांत स्पष्ट करून सांगतात. संधींचा जो संक्षेप आणि युद्ध, राज्यभ्रंश इत्यादी घटनांचा जो संक्षेप तो लक्षात घेऊन अंकाच्या किंवा दोन अंकांच्या 'अन्तराले' म्हणजे मध्ये विष्कम्भकाची योजना करावी.

१ **नि** विज्ञेयः. २ **नि** -पात्रैः. ३ **ब** प्रवेशकोऽर्थ-. ४ **का** संक्षेपार्थः संधिष्वर्थानां संविधातव्यः.

'नाटकापेक्षया' मुळात 'नायकापेक्षया' असे आहे. पण प्रकरणात नायकाच्या मानानें मध्यम पात्रे अधिक उपयोगी ह्या विधानाला काही अर्थ नाही. 'नाटकाशी तुलना करता' असाच अर्थ अभिप्रेत असणार. – 'वचनेनानुगतश्च' मुळात '-गतं च' आहे. पण नपुंसकलिंगी वचन अनुपपन्न आहे. – 'यार्थक्रिया कर्तव्या तामेव' ही दुरुस्ती आहे. मुळातील 'वार्थक्रियाकर्तव्यतामेव' हा पाठ भ्रष्ट आहे. ५१ व्या आर्येतील 'प्रवेशकार्थक्रियां' ह्या शब्दाची ही फोड आहे. आर्येतील शब्दाचा हाच पाठ अभिनवगुप्ताला मान्य आहे, बडोदे प्रतीतील 'प्रवेशकोऽर्थक्रियां' हा नाही यात शंका नाही. आणि तेच बरोबर आहे. कारण येथे विष्कंभकाचे लक्षण आहे, प्रवेशकाचे नाही. – 'अङ्कस्य मध्ये' याचा अर्थ पुढे प्रस्तावना व पहिला अंक यांच्या मध्ये असा केलेला दिसतो.

**ननु कोहलेन मुखाङ्कस्य चायमन्तराले विहितः –**

**मध्यमपुरुषनियोज्यो नाटकमुखसंधिमात्रसंचारः ।**
**विष्कम्भको हि कार्यो नाटकयोगे प्रवेशकवत् ॥ इति ।**

**तत्कथमुक्तमङ्कान्तरानुसारीति । उपलक्षणार्थमेतदित्यदोषः । तथा हि बीजं बिन्दुश्च प्रथममुपक्षिप्येते । तत्र च पृथग्जनस्यालब्धनिवेशत्वात् सचिवादिगोचरत्वाच्च तदुपक्षेपे विष्कम्भकस्यैवावसर इति यदुच्यते तदङ्कान्तरेष्वपि मन्त्रगुप्ततायां तुल्यमिति तत्राप्यनिवारितो विष्कम्भकप्रवेशः । पृथग्जनोऽपि वा यत्र मन्त्रचिन्तायामनुप्रवेश्यते तत्र प्रवेशकोऽपि प्रथमोपक्षेपे नायोग्य इति युक्तं सामान्येनाङ्कान्तरानुसारीति । अङ्कस्य मध्य इत्यनेन प्रस्तावनाङ्कयोर्मध्यवर्तिताप्युक्तैव । प्रवेशकविष्कम्भकविषये लिङ्गवचनयोरतन्त्रत्वात् स्त्रीणामप्यनुप्रवेशः संख्याधिक्यस्य च ।**

यावर आक्षेप – कोहलाने ह्या विष्कम्भकाची योजना मुखसंधिविषयक अंकामध्ये करावयास सांगितले आहे – 'मध्यम प्रकृतीच्या पात्रांची योजना असलेला आणि नाटकाच्या मुखसंधीमध्येच फक्त वापर असलेला विष्कम्भक नाटकाच्या संबंधात प्रवेशकाप्रमाणे रचावा.' मग 'अङ्काच्या नंतर येणारा' असे कसे म्हटले आहे? आक्षेपाला उत्तर असे की हे उदाहरणादाखल असल्यामुळे त्यात काहीं दोष नाही. हे स्पष्ट करावयाचे म्हणजे असे – 'बीज आणि बिन्दु यांचा प्रथम उपन्यास होतो. आणि त्यांमध्ये सामान्य माणसांना स्थान नसल्यामुळे आणि सचिव वगैरेंच्या कार्यक्षेत्रात ते येत असल्यामुळे त्यांच्या उपन्यासास विष्कम्भकालाच अवकाश आहे' असे जे समर्थन केले जाते ते इतर अंकांमध्येही सल्लामसलतीच्या गुप्ततेसाठी तितकेच लागू पडते म्हणून त्या ठिकाणीही विष्कम्भकाची योजना अस्वीकार्य मानता येणार नाही. आणि ज्या ठिकाणी सामान्य माणसांचा सुद्धा सल्लामसलतीत समावेश केला जातो त्या ठिकाणी प्रथम उपन्यासासाठी प्रवेशक सुद्धा अनुचित नाही. म्हणून सामान्यपणे 'अंकाच्या नंतर येणारा' हे वचन योग्यच आहे. 'अंकाच्या मध्ये' याचा

प्रस्तावना व अंक यांच्यामध्ये असा सुद्धा अर्थ होतो. प्रवेशक आणि विष्कम्भक यांच्या संबंधात लिंग व वचन उद्दिष्ट नसल्यामुळे स्त्रीपात्रांचीही योजना संभवते व संख्येने अधिक पात्रांचीही.

'चायमन्तराले' मुद्रित पाठ 'चायमन्तरे' आहे. तो समर्पक वाटत नाही. – 'अङ्कान्तरानुसारीति' वर २८ व्या आर्येत ह्या शब्दात प्रवेशकाचे वर्णन केले आहे. पण विष्कम्भक प्रवेशकासारखाच असतो असे म्हटले असल्यामुळे हे वर्णन विष्कम्भकाला सुद्धा लागू होते. म्हणून हा आक्षेप घेतला आहे. – 'पृथग्जन' म्हणजे दास, दासी आदी कनिष्ठ दर्जाची पात्रे. – 'इति यदुच्यते' विष्कम्भकाची योजना मुखसंधीतच करावी ह्या कोहलाच्या मताचे समर्थन 'बीजं बिन्दुश्च ... ... अवसरः' ह्या वाक्यांत उद्धृत केले आहे. अभिनवगुप्ताचे म्हणणे असे की नंतरच्या संधींमध्ये सुद्धा सचिवादी मध्यम पात्रांच्या द्वाराच दरम्यानच्या घडामोडींचा निर्देश आवश्यक ठरला तर प्रवेशकाच्या ऐवजी विष्कम्भकाची योजना करण्यास काही हरकत नाही. कोहलाचे 'मुखसंधि-' हे शब्द उपलक्षणार्थ आहेत. – 'नायोग्यः' ही मुळातील 'न योग्यः' ची दुरुस्ती आहे. 'न योग्यः' ने वाक्याचा सुसंगत अर्थ लागत नाही. अभिनवगुप्ताचे असे स्पष्ट मत दिसते की अगदी प्रारंभी सुद्धा, प्रस्तावनेनंतर ताबडतोब प्रवेशकाची योजना करणे सुद्धा गैर नाही. – 'लिङ्गवचनयोरतन्त्रत्वात्' प्रस्तुत ठिकाणी व वर २९ व्या आर्येत 'पुरुषैः' असे म्हटले आहे. त्यातील लिङ्ग व वचन शब्दशः अभिप्रेत नाहीत.

**अनयोश्च बन्धयोगादन्यो भेदः प्रयोक्तृभिः कार्यः ।**
**प्रख्यातस्त्वितरो वा [1]नाटकयोगे प्रकरणे वा ॥ ५२ ॥**

(रूपकाच्या) ह्या दोन प्रकारांच्या रचनेपासून दुसरा भिन्न प्रकार प्रयोग करणारांनी करावा – नाटकाच्या योगाने अथवा प्रकरणाच्या योगाने (अनुक्रमे) प्रख्यात (नायक आदी) असलेला अथवा तसा नसलेला.

ह्या आर्येवर अभिनवगुप्ताची टीका नाही. यावरून ती त्याच्यानंतर नाट्यशास्त्रात प्रक्षिप्त झाली असावी. ह्या आर्येचा अर्थ असा दिसतो की प्रख्यात नायक असलेल्या नाटकासारखा, परंतु काही अंशी त्याहून भिन्न असलेला एक दुसरा रूपकप्रकार संभवतो आणि त्याचप्रमाणे प्रख्यांत नायक नसलेल्या प्रकरणासारखा, पण त्याहून थोडा भिन्न असा आणखी एक प्रकार संभवतो. हे दोन प्रकार म्हणजे नाटिका व प्रकरणिका होत अशी शक्यता आहे. काही टीकाकारांनी हे दोन भेद मान्य केले होते असे अभिनवगुप्ताने पुढे म्हटले आहे. त्यांचे मत ह्या आर्येत प्रतिबिम्बित झालेले दिसते.

१ नि नाटीसंज्ञाश्रिते काव्ये.

प्रकरणनाटकभेदादुत्पाद्यं[1] वस्तु नायकं नृपतिम् ।
अन्तःपुरसंगीतककन्यामधिकृत्य कर्तव्या ॥ ५३ ॥

स्त्रीप्राया चतुरङ्का ललिताभिनयात्मिका सुविहिताङ्गी ।
बहुनृत्तगीतपाठ्या[2] रतिसंभोगात्मिका चैव ॥ ५४ ॥

राजोपचारयुक्ता[3] प्रसादनक्रोधदम्भसंयुक्ता ।
नायकदेवीदूतीसपरिजना[4] नाटिका ज्ञेया ॥ ५५ ॥

प्रकरण आणि नाटक यांच्याहून भिन्न अशी नाटिका काल्पनिक कथानक, राजा नायक व अंतःपुरातील संगीतज्ञ कन्या यांच्या संबंधी रचावी. प्रायः स्त्रीपात्रेच असलेली, चार अंक असलेली, ललित अभिनयच प्राणभूत असलेली, उत्कृष्टपणे रचलेली अंगे असलेली, नृत्य, गीत व पाठ्य पुष्कळ असलेली, तसेच रति अणि उपभोग हेच जीवित असलेली, राजव्यवहाराने युक्त असलेली, प्रसादन, क्रोध व दंभ यांचे दर्शन घडविणारी (आणि) नायक, राणी, दूती व परिजन यांनी युक्त असलेली ती नाटिका असे समजावे.

**एवं सकलपुरुषार्थविषया व्युत्पत्तिर्नाटकेन प्रधानस्य राजप्रायस्य क्रियते, प्रकरणेन च मध्यमप्रायस्यापूर्वकुतूहलवतः । तत्रापि चैकविंशकस्याभिधानाच्चित्र-व्युत्पत्तिः । तत्र रूपकलक्षणसंकीर्णतया बहवो भेदाः सन्तीत्युक्तं सामान्यलक्षणे । तत्र प्रधानभूतयोः सर्वरूपकप्रसरणकारिणोर्नाटकप्रकरणयोर्लक्षणसांकर्ये दर्शिते सर्वरूपकाणां दर्शनं तद्भवतीत्यभिप्रायेण तदेव दर्शनीयम् । उद्देशक्रमानुसारेण तु तल्लक्षणविस्तरणे पुनस्तल्लक्षणपरामर्शे च गौरवमित्यभिप्रायेणार्यात्रयं पठति प्रकरणनाटकभेदादित्यादि ।**

याप्रमाणे सर्व पुरुषार्थांसंबंधीचा बोध नाटकाच्या द्वारा मुख्य असे जे राजे त्यांना मुख्यत्वे केला जातो आणि प्रकरणाच्या द्वारा मुख्यत्वेकरून अपूर्व गोष्टींविषयी कुतूहल असणाऱ्या मध्यमवर्गीयांना केला जातो. त्यातही एकवीस प्रकार सांगितले असल्यामुळे विविध प्रकारे बोध होतो. त्या संबंधात रूपकांच्या लक्षणांच्या मिश्रणामुळे पुष्कळ भिन्न प्रकार होतात हे सामान्य लक्षणाच्या विवेचनात सांगितले आहे. त्यांपैकी इतर सर्व रूपकांचा विस्तार करणारे व प्रधानभूत असलेले जे नाटक व प्रकरण यांच्या लक्षणांचे मिश्रण दाखविले म्हणजे सर्व रूपकांचे त्याने दर्शन होईल अशा आशयाने तेच दाखविणे योग्य होय. परंतु,

१ इयमार्या **नि**-पुस्तके नोपलभ्यते. २ **नि** बहुगीतनृत्यवाद्यरति-. ३ **का** कामोपचार-. ४ **नि** नायकदूती चापि देवीसंबन्धी.

उद्देशक्रमानुसार त्यांच्या लक्षणांचा विस्तार करण्यात व पुन्हा त्या लक्षणांचे विवेचन करण्यात सुदीर्घता उत्पन्न होईल हे मनात आणून 'प्रकरणनाटकभेदात्' इत्यादी तीन आर्या सांगतात.

'रूपकलक्षणसंकीर्णतया' हस्तलिखितात 'रूपकलक्षणसंधीनां संपूर्णतया' असा पाठ आहे. तो अर्थबोधास साहाय्यक नाही. मुद्रितातील '-लक्षणस्य सकीर्णतया' पेक्षा समासघटित पाठ अधिक चांगला. – 'उक्तं सामान्यलक्षणे' वर चौथ्या आर्येवरील टीकेत प्रत्येक रूपकाचे दहा प्रकार संभवतात, कारण प्रत्येकात वीथी, भाण वगैरे असतात, अशा प्रकारचे एक मत उद्धृत केले आहे. त्याचा प्रस्तुत ठिकाणी निर्देश केलेला दिसतो. – 'तल्लक्षणविस्तरणे' मुद्रित पाठ '-विस्तरणं' आहे. परंतु सप्तमी आवश्यक आहे हे उघड आहे. हस्तलिखितातील '-विस्मरणं' लेखनदोष होय. तत् म्हणजे रूपकलक्षणांच्या संकराने उत्पन्न झालेले नवीन रूपकप्रकार. – 'गौरव' म्हणजे ग्रंथाचा विस्तार.

**प्रकरणनाटकाभ्यां भेदात् लक्षणान्यत्वान्नाटिका ज्ञेयेति दूरेण संबन्धः । उत्पाद्यं वस्तु चरितं नायकं च नृपतिमन्तःपुरकन्यां संगीतशालाकन्यां वाधिकृत्य प्राप्यत्वेनाभिसंधाय कर्तव्या । स्त्रियः प्रायेण बाहुल्येन यत्र । चत्वारोऽङ्का यस्याः । कस्याश्चिदवस्थायाः सरसेऽवस्थान्तरे समावापः कार्य इति यावत् । ललिताभिनयात्मिकेति कैशिकीसंबद्धेत्यर्थः । सुष्ठु पूर्णतया विहितानि चत्वार्यपि कैशिक्यङ्गानि यत्र । अङ्गगात्रकण्ठेभ्य इत्यत्र स्वाङ्गविशेषणाभावात् ङीषः प्रयोगः । एतदपि न मुनित्रयमतमित्यनादृत्यमिति त्वन्ये । रतिपुरःसरः संभोगो राज्यप्राप्त्यादिलक्षण आत्मा प्रधानभूतं फलं यस्याम् । अत एवाह राजगतैरुपचारैर्व्यवहारैर्युक्ता । अन्यां चेदुद्दिश्य तत्र व्यवहारः तत्पूर्वनायिकागतैः क्रोधप्रसादनवञ्चनैरवश्यं भाव्यमिति दर्शयति प्रसादनेति । आर्यानुरोधात्क्रोधस्य पश्चात्पाठः । ननु यस्याः क्रोधो भवति सा न काचिदुक्तेत्याशङ्क्याह नायकेति । नायकस्य येयं देव्याद्या नायिका तथाभिलषितनायिकान्तरविषये दूतीकृतं सपरिजनं परिजनसमृद्धिर्यस्याम् । एतदुभयप्रधानं सर्वं तत्रेत्यर्थः । अन्यत्संध्यङ्गादि सर्वं पूर्ववदेव ।**

प्रकरण व नाटक यांच्याहून भिन्नता असल्याकारणाने म्हणजे निराळे लक्षण असल्याकारणाने–याचा अन्वय दूरच्या 'नाटिका असे समजावे' ह्या शब्दांशी होतो. कविकल्पित वस्तु म्हणजे चरित आणि राजा नायक (ह्यांच्या संबंधी) तसेच अंतःपुरातील कन्या किंवा संगीतशालेतील कन्या हिच्या संबंधी असलेली म्हणजे हिची प्राप्ती हे उद्दिष्ट असलेली अशी नाटिका रचावी. स्त्रिया पुष्कळ प्रमाणात जिच्यात आहेत अशी. जिच्यात चार अंक आहेत अशी. कोणत्या तरी अवस्थेचा दुसऱ्या सरस अवस्थेत समावेश करावा असा याचा अर्थ. ललित अभिनय प्राणभूत असलेली म्हणजे कैशिकी वृत्तीने युक्त असा अर्थ. सुष्ठु म्हणजे पूर्णपणे योजना केली आहे कैशिकी वृत्तीच्या चारही अंगांची जिच्यात अशी. 'अङ्गगात्र-

कण्ठेभ्यः' यातील स्वतःच्या अंगाचे विशेषण नसल्यामुळे ङीष्-प्रत्ययाचा उपयोग केला आहे. परंतु दुसरे असे म्हणतात की हे तिन्ही मुनींचे मत नसल्यामुळे ते विचारात घेऊ नये. रति ज्यात प्रथम स्थानी आहे असा राज्यप्राप्ती वगैरेच्या स्वरूपाचा संभोग, तो आत्मा म्हणजे मुख्य फल आहे जिच्यात अशी. म्हणूनच म्हणतात राजाच्या ठायी असलेल्या उपचारांनी म्हणजे व्यवहारांनी युक्त अशी. जर त्यात दुसऱ्या स्त्रीला उद्देशून व्यवहार असेल तर अगोदरच्या नायिकेच्या संबंधात क्रोध, प्रसादन आणि वंचना या गोष्टी अवश्य असणार हे 'प्रसादन' इत्यादी शब्दाने दाखवितात. आर्यावृत्ताच्या अनुरोधाने समासात क्रोध शब्द नंतर वापरला आहे. जिला क्रोध येईल तिचा काही निर्देश केला नाही कसा अशी शंका घेऊन 'नायक' इत्यादी शब्दात तिचे निराकरण करतात. नायकाची जी ही देवी इत्यादी प्रकारची नायिका आणि जिचा अभिलाष केला आहे त्या दुसऱ्या नायिकेच्या संबंधात दूतींनी केलेले सपरिजन म्हणजे परिजनांची समृद्धी जिच्यात आहे अशी. त्या नाटिकेत सर्व काही ह्या दोन गोष्टी मुख्य असलेले असे असते असा याचा अर्थ. इतर सर्व संधींची अंगे इत्यादी पूर्वीप्रमाणेच.

'दूरेण संबन्धः' वस्तुतः ५३ व्या आर्येत वाक्य पूर्ण झाले आहे. तेव्हा त्यातील एका शब्दाचा ५५ व्या आर्येतील शब्दाशी संबंध सामान्यपणे जोडता येण्यासारखा नाही. – 'चरितं मुळात या शब्दानंतर 'च' अधिक आहे. पण चरित शब्द आर्येतील वस्तु शब्दाचा अर्थ सांगण्यासाठी वापरला आहे. वस्तूहून निराळे असे चरित मानण्यास आर्येत आधार नाही. म्हणून 'च' गाळला आहे. – 'सरसेऽवस्थान्तरे समावापः' ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'सरसेऽवस्थासमाचापः' असे आहे. मुद्रित पाठ 'सरसोऽवस्थासमावापः' याप्रमाणे आहे. समावाप म्हणजे भर घालणे, समावेश करणे. पाच अवस्थांची चार अंकांत सोय कशी करावयाची याचे येथे असे समाधान केले आहे की एका अवस्थेचा दुसऱ्या अवस्थेत समावेश केला जातो. ही दुसरी अवस्था निर्दिष्ट करण्यासाठी 'अवस्थान्तर' शब्द आवश्यक आहे हे उघड आहे. आणि तो शब्द सप्तम्यन्त ठेवावयाचा असल्यामुळे सरस शब्दही सप्तम्यन्तच पाहिजे. सरस हे अवस्थेचे विशेषण मानता येईल, समावापाचे नाही. – 'कैशिक्यङ्गानि' नर्म, नर्मस्फुञ्ज, नर्मस्फोट व नर्मगर्भ ह्या कैशिकीवृत्तीच्या चार अंगांचे वर्णन २०.५६-६१ येथे केले आहे. – 'अङ्गगात्र- इ०' 'स्वाङ्गाच्चोपसर्जनादसंयोगोपधात्' ह्या पाणिनीच्या सूत्राप्रमाणे (४.१.५४) प्राण्यंगवाचक शब्द बहुव्रीहीचे उत्तरपद असले तर विकल्पाने ङीष् प्रत्यय लागतो. 'अङ्गगात्रकण्ठेभ्य इति वक्तव्यम्' हे ४.१.५४ वर वार्त्तिक आहे. म्हणजे बहुव्रीहि समासाच्या शेवटी अङ्ग, गात्र, कण्ठ हे शब्द असल्यास स्त्रीलिंगात ङीष् म्हणजे ई प्रत्यय विकल्पाने लागतो जसे ललिताङ्गी, चारुगात्री इत्यादी. अभिनवगुप्ताचे म्हणणे असे दिसते की 'सुविहिताङ्गी' यातील अङ्गे प्राण्यङ्गे नसल्यामुळे ङीष् प्रत्यय अवश्य म्हणून लावला आहे. – 'ङीषः प्रयोगः' मुद्रित पाठ 'ङीष् प्रयोगः' असा आहे. कदाचित मूळचा पाठ 'ङीष् प्रत्ययः' असा असावा. – 'मुनित्रय' म्हणजे पाणिनि, कात्यायन आणि पतञ्जलि. पाणिनीच्या वरील सूत्रावर कात्यायनाने एका वार्त्तिकात आक्षेप घेऊन असे म्हटले आहे की त्यातील उपसर्जन शब्द निरर्थक आहे – 'उपसर्जनग्रहणमनर्थकं बहुव्रीह्यधिकारात्'. पतञ्जलीने पूर्वपद स्वाङ्गवाचक नसेल तर शेवटी स्वाङ्गवाचक शब्दाने होणाऱ्या बहुव्रीहीस हे

सूत्र लागू केले आहे. – 'आर्यानुरोधात्' वास्तवात क्रोध अगोदर व प्रसादन त्यानंतर अशी स्थिती असते. पण आर्येत प्रसादन शब्द अगोदर व क्रोध शब्द नंतर आहे. आर्यावृत्ताच्या रचनेसाठी तसे केले आहे. – 'देव्याद्या' म्हणजे महादेवी, देवी, स्वामिनी इत्यादी चोविसाव्या अध्यायात वर्णिलेल्या प्रकारची. – 'परिजनसमृद्धिः' ही मुळातील 'सपरिजन' ची व्याख्या आहे. पुष्कळ परिजन असा त्याचा अर्थ. – 'एतदुभय-' म्हणजे देवी आदी नायिका आणि अभिलषित नायिका. – 'पूर्ववदेव' म्हणजे नाटक व प्रकरणाप्रमाणे.

**तत्रैका नाटिका तावद्व्याख्याता भवति । षड्विधेयं नाटिकेति संग्रहानुसारिणो भट्टलोल्लटाद्याः । श्रीशङ्कुकस्त्वयुक्तमेतदित्यभिधाय अष्टधेति व्याचष्टे । तथा हि देवी कन्या च ख्याताख्याताभेदेन चतुर्धा, कन्या त्वन्तःपुरसंगीतकभेदेन द्विधेति । घण्टकादयस्त्वाहुः नायको नृपतिरेतावन्मात्रं नाटकादुपजीवितं न तु प्रख्यातत्वमपि, तद्भेदद्वयादन्येऽष्टाविति षोडश भेदाः । नायको नृपतिरिति ये प्रथमां पठन्ति तैस्तत्रेत्यध्याहार्यम्, एकवाक्यतायां तूभयस्य कार्यत्वम् । अन्ये प्रथममार्यार्धं पृथगेव वाक्यं योजयन्ति – प्रकरणभेदात्प्रकरणलक्षणांशादुत्पाद्यं वस्तु नाटकलक्षणांशाच्च नृपतिर्नायकः स्थिते यत्रेत्यभिप्रायेण नाटिकैवंभूतेति । अन्ये तु प्रकरणनाटकभेदात् नाटिका भिद्यते, नाटकशब्देनाभिनेयं रूपकमात्रम्, तस्य सौकुमार्यप्रदर्शनाय स्त्रीत्वेन निर्देशः, इति प्रकरणिकापि सार्थवाहादिनायकयोगेन कैशिकीप्रधाना लभ्यत इत्याहुः ।**

यात एका नाटिकेचे स्वरूप स्पष्ट केले आहे. संग्रहकाराचा अनुवाद करणारे भट्टलोल्लट प्रभृती टीकाकार ही नाटिका सहा प्रकारची आहे असे मानतात. परंतु श्रीशंङ्कुक हे अयोग्य आहे असे म्हणून ती आठ प्रकारची आहे अशी व्याख्या करतात. ते असे – देवी आणि कन्या यांच्या प्रसिद्ध व अप्रसिद्ध या भेदांमुळे चार प्रकार होतात, परंतु कन्या अंतःपुर व संगीतशाला यांतील भेदामुळे आणखी दोन प्रकारची. पण घण्टकप्रभृती टीकाकार म्हणतात की राजा नायक एवढेच केवळ नाटकापासून उसने आलेले आहे, त्याचे प्रख्यातत्व सुद्धा नाही; ह्या दोन भेदांमुळे आणखी आठ प्रकार, याप्रमाणे एकंदर सोळा प्रकार होतात. जे 'नायकः नृपतिः' असा प्रथमान्त पाठ स्वीकारतात त्यांना 'तत्र' म्हणजे त्या नाटिकेत असे अध्याहृत धरावे लागते, परंतु जर एकवाक्यता मानली तर दोन्ही गोष्टींचे कार्यत्व अध्याहृत धरावे लागते. दुसरे कोणी आर्येच्या पूर्वार्धाचा स्वतंत्र वाक्य मानूनच अन्वय लावतात – 'प्रकरणभेदात्' म्हणजे प्रकरणाच्या लक्षणाच्या एका अंशातून काल्पनिक कथानक आणि नाटकाच्या लक्षणाच्या एका अंशातून राजा नायक जिच्यात आहे अशा आशयाने नाटिका अशा प्रकारची असते. इतर टीकाकार तर असे म्हणतात की प्रकरण व नाटक यांच्या भेदापासून नाटिका भिन्न होते या विधानात नाटक शब्दाने केवळ अभिनयास योग्य

असे रूपक समजावयाचे, त्याची सुकुमारता दाखविण्यासाठी नाटिका असा स्त्रीलिंगी निर्देश आहे, म्हणून सार्थवाह वगैरे नायक असलेली व कैशिकीवृत्ति मुख्य असलेली अशी प्रकरणिका सुद्धा निष्पन्न होते.

'एका नाटिका' मुळात 'एका नायिका' असे आहे. पण पुढील विवेचन नाटिकांच्या भेदांसंबंधी आहे. ते जरी मुख्यतः नायिकांच्या भेदांवर आधारित असले तरी अंततः नाटिकांचेच भेद अभिप्रेत आहेत. आणि ह्या तीन आर्यांत मिळून नाटिकेची व्याख्या केली आहे, तिच्यातील नायिकेची नाही. म्हणून ही दुरुस्ती आवश्यक वाटते. – 'षड्विधेयं' ही मुळातील 'षट्पदेयं' ची दुरुस्ती आहे. 'षट्पदा नाटिका' यापासून काही अर्थबोध होत नाही. 'संग्रह' नाट्यशास्त्रातील विषयांचे व्याख्यात्मक विवरण करणारा 'संग्रह' नावाचा ग्रंथ कोणीतरी प्राचीनकाळी लिहिला असावा. तो अर्थातच सध्या उपलब्ध नाही. – भट्टलोल्लट व श्रीशङ्कुक यांचे निर्देश मागे आले आहेत. – 'अष्टधा' दोन प्रकारच्या देवी व चार प्रकारच्या कन्या होत. एकाच नाटिकेत देवी आणि कन्या दोघीही असल्यामुळे नाटिकेचे आठ प्रकार संभवतात असा हा हिशोब आहे. भट्टलोल्लटाचा सहाचा हिशोब दोघींची एकाच नाटिकेत उपस्थिती गृहीत न धरता केलेला दिसतो. – 'नाटकादुपजीवितं' ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'नाटकादावुपजीवितं' असे आहे व मुद्रितपाठ 'नाटकादावुपजीवितः' असा आहे. पण अमुक गोष्ट घेतली असा अर्थ अभिप्रेत असल्यामुळे तो शब्द पंचमी विभक्तीत आवश्यक आहे. शिवाय या ठिकाणी 'आदि' निरर्थक आहे. – 'तैस्तत्रेत्यध्याहार्यम्' ही व पुढे 'कार्यत्वम्' अशा दुरुस्त्या केल्या आहेत. हस्तलिखितात 'तत्रेत्यध्याहृत्य' व 'कार्या' असे पाठ आहेत, तर मुद्रित पाठ 'तैर्यत्रेत्यध्याहृत्य' व 'कार्यम्' असे आहेत. या ठिकाणी असलेल्या 'तु' ने असे निदर्शित होते की 'एकवाक्यतायाम्' पासून नवीन वाक्य सुरू होते. तेव्हा अगोदरच्या वाक्याच्या पूर्णतेसाठी 'अध्याहार्यम्' सारखे रूप आवश्यक आहे. 'उभयस्य' म्हणजे वस्तु व नायक या दोहोंचे. 'कार्यत्वम्' नंतर 'अध्याहार्यम्' समजावयाचे. एकूण अर्थ असा की आर्येचा पूर्वार्ध स्वतंत्र मानला तर 'तत्र' म्हणजे नाटिकेत असतात हे अध्याहृत धरावे लागते. पण दोन्ही अर्धांची एकवाक्यता मानावयाची असेल तर उत्तरार्धात असलेला 'कर्तव्य' शब्द पूर्वार्धात अध्याहृत धरावा लागतो – 'वस्तु कर्तव्यम्, नायकः कर्तव्यः' अशा प्रकारे. कर्तव्याच्या समानार्थी कार्य शब्द वापरून त्याचे भाववाचक नाम केले आहे. नुसते 'कार्यम्' म्हटल्याने अर्थ स्पष्ट होत नाही. – 'स्थिते यत्रेत्यभिप्रायेण नाटिकैवंभूता' या शब्दांची योजना सुगम नाही. मुळातील 'अभिप्राये'च्या जागी 'अभिप्रायेण' असा पाठ अधिक योग्य म्हणून स्वीकारला आहे. बाकीचे मुद्रितातल्याप्रमाणे आहे. हस्तलिखितात 'स्थितेत्यत्रे-' असे आहे. 'स्थिते' ह्या शब्दाचा नीट अन्वय लागत नाही. 'घेतले आहेत' अशा अर्थाचा शब्द अपेक्षित होता. पुढील आर्येवरील टीकेत प्रारंभीच्या वाक्यात 'तथा स्थिते तत्रेत्यभिप्रायेण' असे शब्द आहेत. अशी शक्यता आहे की यातील शब्द प्रस्तुत जागी चुकीने पुन्हा लिहिले गेले आहेत. येथे ते अर्थबोधास बाध आणतात. – 'नाटिकैवंभूता' ही सुद्धा नंतर आलेल्या 'नाटिकैवमुक्ता' ची द्विरुक्ती असावी. – 'नाटकशब्देन' नाटिका शब्दाचे पुल्लिंगी रूप जे नाटक त्याचा हा निर्देश आहे. – 'तस्य' ही मुळातील 'तस्या' ची दुरुस्ती आहे. 'तस्य' म्हणजे त्या नाटकाचा. – 'प्रकरणिका' नाटिका शब्दाचाच व्यापक अर्थ करून तिच्या निर्देशाने प्रकरणिकेचाही बोध होतो असे ह्या टीकाकारांचे म्हणणे आहे.

नाटिकेच्या वर्णनपर ह्या आर्या मूळ भरतकृत नसाव्यात असा ग्रह होतो. त्याला जर हा रूपकप्रकार अभिप्रेत असता तर त्याने त्याचा प्रारंभीच उद्देशक्रमात समावेश केला असता. डॉ. घोष ह्या आर्या प्रक्षिप्त मानतात ते बरोबर वाटते. तथापि हा प्रक्षेप अभिनवगुप्ताच्या फार अगोदर झाला असला पाहिजे. त्याच्यावर संग्रहकार, भट्टलोल्लट, श्रीशंकुक, घण्टक आदींनी त्यापूर्वीच टीका लिहिली असल्याचा निर्देश आहे.

यानंतर बडोदे प्रतीत पुढील श्लोक अधिक आढळतो –

**अन्तर्भावगता ह्येषा भावयोरुभयोर्यतः ।**
**अत एव दशैतानि रूपाण्युदितानि वै ॥**

हा श्लोक उघडच प्रक्षिप्त आहे. दहाच रूपकप्रकार असता ह्या निराळ्या प्रकाराच्या विवरणाचे समर्थन करण्याचा त्यात प्रयत्न केला आहे.

**प्रकरणनाटकलक्षणमुक्तं[1] विप्रा मया समासेन ।**
**वक्ष्याम्यतःपरमहं लक्षणयुक्त्या समवकारम् ॥ ५६ ॥**

हे विप्रांनो, प्रकरण आणि नाटक ह्यांचे लक्षण मी थोडक्यात सांगितले आहे. आता यानंतर मी समवकाराचे लक्षणाच्या साहाय्याने वर्णन करणार आहे.

यद्यपि च नाटिकैवमुक्ता तथापि प्रकरणनाटकलक्षणे एव तथा स्थिते तत्रेत्य-भिप्रायेणोपसंहरति प्रकरणनाटकलक्षणमिति । अन्यदासूत्रयति वक्ष्याम्यतःपर-मिति । ननूद्देशक्रमत्यागे किं फलम् । इदम् । उद्देशस्तावदत्र न परिगणनार्थ इत्युक्तम्, तेन नास्य प्राधान्यम्। नाटिकया च विच्छिन्नोऽसावुद्देशक्रमः । यथा च नाटकप्रकरणयोर्व्युत्पाद्यभूयस्त्वं तथा समवकारेऽपि, तत्र त्रिवर्गोपायप्रदर्शनात्। केवलं तत्तद्देवताभक्तानां तच्चरितपुरःसरतया तस्य तस्योपायस्यादरणीयत्वं भवती-त्यनेनाभिप्रायेण दिव्योऽत्र नायकत्वेन निबध्यते । तदीयं च न भूयस्तरं वितत-वृत्तमनुक्रियया प्रदर्श्यते, येन तन्मध्यपतितानां भवति निर्वेदादीनामभावे प्रयोग-स्यारञ्जकत्वं नाटकगताङ्कैकदेशवत्। नाटकादौ तु भूयस्तरं चरितमनेकाङ्करञ्जकव-र्गेण विना न रञ्जकमेवेति नाटकादौ दिव्यनायकनिषेध उक्तः । तत्र हि राजप्रभृतयो बहुतरफलानुसंधिनि महति फले बहुसंप्रयाससाध्ये व्युत्पाद्यन्ते । न तथेह किन्तु त्रिवर्गोपायमात्रम्। अन्यरूपकाणां तु त्रिवर्गोपायत्वं नास्ति एकाङ्कत्वात् । डिमस्तु चतुरङ्कोऽपि पश्चान्निर्दिष्ट इत्यत्र तल्लक्षणे कारणं वक्ष्यामः । तस्मात् त्रिवर्गव्युत्पाद-कत्वादनेकाङ्कत्वाच्च तादृशरूपकानन्तरमेवाभिधानं युक्तमित्यलं बहुना ।

१ नि -नाटकनाटीलक्षणमुक्तं मया.

जरी नाटिकेचे याप्रमाणे वर्णन केले आहे तरी तिच्यात प्रकरण आणि नाटक यांचीच लक्षणे तशा रूपात विद्यमान आहेत ह्या आशय विचारात घेऊन 'प्रकरणनाटकलक्षणम्' इत्यादी शब्दांत समारोप करतात. आणि 'वक्ष्याम्यतःपरम्' इत्यादी शब्दांत दुसऱ्या गोष्टीचा उपन्यास करतात. येथे आक्षेप असा की उद्देशात निर्दिष्ट झालेल्या क्रमाचा त्याग करण्यापासून काय फलप्राप्ती होते? पुढीलप्रमाणे असे याचे उत्तर. उद्देश ह्या गणना करण्याच्या हेतूने निर्दिष्ट केला नाही हे मागे सांगितले आहे; म्हणून त्याला प्राधान्य नाही. आणि नाटिकेने उद्देशातील क्रमाचा भंग केलेलाच आहे. आणि ज्याप्रमाणे नाटक व प्रकरण यांच्यापासून बोध घेणारे संख्येने पुष्कळ असतात, त्याप्रमाणे समवकारापासून सुद्धा. कारण त्यात धर्म, अर्थ व काम ह्या तिहींच्या साधनांचे दर्शन होते. फक्त इतकेच की त्या त्या विशिष्ट देवतांच्या भक्तांना त्याच देवतांच्या चरिताला प्राधान्य असल्यामुळे त्या त्या विशिष्ट साधनाबद्दल आदर वाटत असतो ह्या अभिप्राय लक्षात घेऊन ह्या समवकारात नायक म्हणून देवतांची योजना केलेली असते. तथापि त्यांचे फार मोठे, विस्तृत असे चरित अनुकरणाने दाखविले जात नाही की ज्यायोगे त्यात समाविष्ट झालेल्या पात्रांना निर्वेद आदी विकारांचा अभाव असल्याकारणाने प्रयोगात रंजकता उत्पन्न होणार नाही, नाटकातील एखाद्या अंकाच्या काही भागात ती ज्याप्रमाणे उत्पन्न होत नाही त्याप्रमाणे. परंतु नाटक आदींमध्ये फार मोठे चरित अनेक प्रकारच्या रंजन करणाऱ्या गोष्टी असल्यावाचून रंजक होत नाही म्हणून नाटक वगैरेमध्ये दिव्य नायकाचा निषेध केला आहे. कारण त्यात राजेप्रभृती लोकांना फार मोठ्या फलाशी संलग्न व पुष्कळ प्रयासाने साध्य अशा मोठ्या फलाच्या बाबतीत बोध दिला जातो. तसे ह्या समवकारात नाही, त्यात केवळ त्रिवर्गसिद्धीचे उपाय दाखविले जातात. पण इतर रूपकप्रकारांत हे त्रिवर्गाचे उपाय दाखविले जात नाहीत. कारण त्यांत अंक एकच असतो. परंतु डिमात चार अंक असूनही त्याचा मागाहून निर्देश केला याचे कारण आम्ही त्याच्या लक्षणाची व्याख्या करताना सांगू. म्हणून त्रिवर्गाविषयी बोध देणारा व अनेक अंक असलेला म्हणून हे विशेष असलेल्या रूपकप्रकारांनंतरच समवकाराचे वर्णन योग्य होय. हे इतके पुरे, अधिक काही आवश्यक नाही.

'-लक्षणे...स्थिते' ही नपुंसकलिंगी प्रथमेची द्विवचनाची रूपे आहेत. 'तथा' म्हणजे नाटिकेच्या रूपात. – 'उद्देशक्रम-' हा क्रम आर्या २ व ३ यांत आहे. तेथे प्रकरणानंतर अङ्क, व्यायोग, भाण, समवकार असा क्रम आहे. – 'इदम्' हस्तलिखितातील हे वचन मुद्रितात नाही. आक्षेपाच्या समाधानासाठी ते असणे चांगले. – 'तेन नास्य प्राधान्यम्' ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'तेनास्या प्राधान्यम्' व मुद्रितात 'तेनास्य प्राधान्यात्' असे पाठ आहेत. ते दोन्ही अशुद्ध आहेत. 'अस्य' म्हणजे ह्या उद्देशक्रमाचे. – 'निबध्यते' मुद्रितातील 'निषिध्यते' हा पाठ विरुद्ध अर्थ दाखवीत असल्यामुळे चूक आहे. – 'न भूयस्तरं' ह्याच्या अगोदर हस्त-

लिखितात 'भूयस्तरं च' याची व मुद्रितात 'भूयस्तरं' ची चुकीने पुनरावृत्ती झाली आहे. – 'तन्मध्यपतितानाम्' म्हणजे समवकारात योजिलेल्या दिव्य पात्रांना. – 'नाटकगताङ्कैकदेशवत्' ह्या उपमेवरून असे सूचित होते की नाटकात निर्वेदादी व्यभिचारिभावांचे क्वचित ज्या ठिकाणी दर्शन होत नाही तेथे रंजकता उत्पन्न होत नाही. समवकारात त्या विकारांच्या आविष्कारास अवकाश नसतो, म्हणून त्यातही एखाद्या देवाचे लांबलचक चरित्र दाखवू नये असे तात्पर्य. – 'अन्यरूपकाणाम्' हस्तलिखितात 'प्रख्याततनायकानाम्' असा पाठ आहे. तो अर्थात असंभाव्य आहे. 'अप्रख्यात-' अशी दुरुस्तीही चालण्यासारखी नाही. प्रकरण अप्रख्याततनायक असले तरी ते एकांकी नसते.

**देवासुरबीजकृतः प्रख्यातोदात्तनायकश्चैव ।**
**त्र्यङ्कस्तथा त्रिकपटस्त्रिविद्रवः स्यात्त्रिशृङ्गारः ॥५७॥**

**द्वादशनायकबहुलो ह्यष्टादशनाडिकाप्रमाणश्च ।**
**वक्ष्याम्यस्याङ्कविधिं यावत्यो नाडिका यत्र ॥५८॥**

(समवकार) देव आणि असुर ह्यांच्या कृत्यांवर आधारित, तसेच प्रख्यात व उदात्त नायक असलेला, त्याचप्रमाणे तीन अंक, तीन प्रकारचे कपट, तीन प्रकारचे विद्रव व तीन प्रकारचा शृंगार असलेला, बारा नायकांनी गजबजलेला आणि अठरा घटका प्रयोग चालणारा असा असावा. ह्याच्या अंकांची रचना आणि कोणत्या अंकात किती घटका ते मी आता सांगतो.

**देवासुरस्य यद्बीजं फलसंपादनोपायस्तेन कृतो विरचितः । देवासुरा अपि चाप्रख्याता बृहत्कथादौ श्रूयन्ते स्वयं वा केनचिदूह्यन्त इति तन्निरासार्थं प्रख्यात-पदम् । यद्यपि देवाः पुरुषापेक्षयोद्धतास्तथापि स्वापेक्षया गाम्भीर्यप्रधानतयोदात्ता उच्यन्ते भगवत्त्रिपुररिपुप्रभृतयः, प्रशान्ता ब्रह्मादयः, उद्धता नृसिंहादयः । अत्र तावतैव समापन्नं त्र्यङ्क इत्युक्तम् । अर्थत्रयं च कपटविद्रवशृङ्गाराः प्रत्येकं त्रिविधाः । तत्र प्रत्यङ्कं विद्रवादयस्त्रयः । तथा हि कपट उपायांशे विद्रवो व्यापत्तिसंभावनांशे शृङ्गारः फलांशे । एवं द्वितीयेऽङ्के तृतीये च । द्वादशनायक-बहुल इति प्रत्यङ्कमिति केचित् । अन्ये तु प्रत्यङ्कं नायकप्रतिनायकौ तत्सहायौ चेति चतुर आहुः, समुदायापेक्षया हि द्वादशेति ।**

देव व असुर यांचे जे बीज म्हणजे फल प्राप्त करून घेण्याचा उपाय त्याने केलेला म्हणजे त्याची रचना असलेला असा समवकार. बृहत्कथा वगैरे ग्रंथांत देव आणि असुर सुद्धा अप्रख्यात असे आढळतात किंवा कोणी कवी स्वतः अप्रख्यात देवासुरांची कल्पना करतो, त्यांचे निरसन करण्याकरिता प्रख्यात शब्द वापरला आहे. जरी पुरुषांपेक्षा देव उद्धत अस-

तात तरी त्यांच्या आपसातील तुलनेने भगवान त्रिपुरारिप्रभृती काही देव मुख्यतः गंभीर प्रकृतीचे असल्यामुळे उदात्त होत, ब्रह्मदेवप्रभृती प्रशान्त होत आणि नृसिंह आदी उद्धत होत. यात तेवढ्यानेच प्राप्त झाल्यामुळे तीन अंक असलेला असे म्हटले आहे. तीन गोष्टी, कपट, विद्रव आणि शृंगार, प्रत्येकी तीन प्रकारच्या. त्यांपैकी प्रत्येक अंकात विद्रव वगैरे तिन्ही गोष्टी असतात. याचे स्पष्टीकरण असे की उपायस्वरूप भागात कपट, विनाशाचा संभव असलेल्या भागात विद्रव आणि फलात्मक भागात शृंगार. तसेच दुसऱ्या अंकात आणि तिसऱ्या अंकात. बारा नायकांनी समृद्ध हे वर्णन प्रत्येक अंकाचे असे काहींचे मत आहे. परंतु दुसरे असे म्हणतात की प्रत्येक अंकात नायक व प्रतिनायक आणि त्यांचे एकेक साहाय्यक मिळून चार असतात; त्यांच्या तीन अंकांतील समुदायाला अनुलक्षून बारा असे म्हटले आहे.

'देवा उद्धताः' देव धीरोद्धत असतात असे पुढे नाट्यशास्त्र, २४.१८ मध्ये म्हटले आहे. – 'अत्र तावतैव समापन्नम्' मुळातील या ठिकाणचा पाठ भ्रष्ट असून तो दुरुस्त करता येण्यासारखाही नाही. हस्तलिखितात 'अत्र यस्य तावत्येव समापन्नम्' व मुद्रितात 'अत्र यत्र तावत्येव समापन्नम्' असे आहे. यातील 'तावती' असा स्त्रीलिंगी शब्द असंभाव्य आहे. आणि 'यस्य' किंवा 'यत्र' दोन्ही असंबद्ध आहेत. प्रस्तुत ठिकाणी 'अत्र' म्हणजे या समवकारात उदात्त देवच असावेत हे आर्येत अभिप्रेत आहे अशा आशयाचे वाक्य अपेक्षित आहे. ते लुप्त होऊन त्यातील फक्त 'अत्र' शब्द शिल्लक उरला आहे अशी शक्यता आहे. इतर शब्दांचा अर्थ स्पष्ट नाही. – 'चतुर आहुः' मुळात 'चतुराहुः' असे आहे. द्विवार संधि केला असे त्याचे स्पष्टीकरण करता येण्यासारखे आहे. 'चत्वार इत्याहुः' हे अधिक योग्य झाले असते.

**अङ्कस्तु सप्रहसनः सविद्रवः सकपटः सवीथीकः[१] ।**
**द्वादशनाडीविहितः प्रथमः कार्यः क्रियोपेतः ॥ ५९ ॥**

**कार्यस्तथा द्वितीयः समाश्रितो नाडिकाश्चतस्रस्तु ।**
**[२]वस्तुसमापनविहितो द्विनाडिकः स्यात्तृतीय[३]स्तु ॥ ६० ॥**

पहिला अंक प्रहसन, विद्रव, कपट आणि वीथी यांनी युक्त, (विविध) क्रियांनी संपन्न व बारा घटकांच्या प्रयोगासाठी रचलेला असा करावा; त्याचप्रमाणे चार घटकांचा अवधी असलेला असा दुसरा अंक करावा; आणि दोन घटका असलेला तिसरा अंक कथानकाची समाप्ती करणारा असावा.

१ **का** सवीथ्यङ्कः. २ **का** वस्तुप्रमाण-. ३ **नि** -यश्च.

सप्रहसन इति वचनात् प्रथमेऽङ्के कामशृङ्गारः प्रयोज्य इत्याह, तत्रैव हास्यस्यागमनात् । स्त्रियोपेत इति कामशृङ्गारात्मकं द्वादशघटिकामध्यसंपाद्यैः कपटविद्रवप्रहसनलक्षणैरुपायैः प्राप्तं प्रथमाङ्के निबध्नीयादिति तात्पर्यम् । द्वितीये त्वङ्के घटिकाचतुष्टयगामिभिः कपटादिभिरुपायैः । तृतीये त्वङ्के सर्वं वस्तु समाप्यते द्विघटिकान्तरसंपाद्यैरुपायैः । यद्यपि प्रत्यङ्कं वस्तुपरिसमाप्तिरस्ति तथापि तृतीये वस्तुसमाप्तिग्रहणेनेदमाह – बीजे तावदङ्कत्रयार्थ उपक्षेप्तव्यः, तदनन्तरमङ्कद्वयेऽवान्तरवाक्यार्थसमाप्तिरन्योन्यविश्लिष्टैव विधेया, तृतीये त्वङ्केऽवान्तरवाक्यार्थस्तृतीयस्ताभ्यां प्रतिसंबद्धः । एवं महावाक्यार्थनिर्वाहहेतुसंबद्धतैव सर्वस्य जायते । एवं हि सानुसंधाना विततदृशोऽपि त्रिवर्गसिद्ध्युपायव्युत्पत्त्यनुगृहीता भवन्ति, निरनुसंधाना अपि तावत्तावत्परिसमाप्त्या तावत्युपाये निजहृदयसंवादबलादिति ।

'सप्रहसनः' ह्या वचनाने पहिल्या अंकात कामशृंगाराची योजना करावी असे सांगतात, कारण त्याच प्रसंगी हास्याचे आगमन होते. स्त्रीने युक्त याचे तात्पर्य असे की पहिल्या अंकात कामशृंगारात्मक आणि बारा घटकांमध्ये निष्पन्न होणाऱ्या कपट, विद्रव आणि हास्य या स्वरूपाच्या उपायांनी युक्त अशी रचना करावी. दुसऱ्या अंकात चार घटकांमध्ये होणाऱ्या कपट आदी उपायांनी युक्त अशी रचना करावी. परंतु तिसऱ्या अंकात दोन घटकांमध्ये होणाऱ्या उपायांनीं सर्व कथानकाची समाप्ती केली जाते. जरी प्रत्येक अंकात वस्तूची परिसमाप्ती होते, तरी तिसऱ्या अंकात वस्तूची समाप्ती होते असे म्हणण्याचा उद्देश असा – बीजामध्ये तिन्ही अंकांच्या विषयाचा उपन्यास करावा, त्यानंतर दोन अंकांत अवांतर वाक्यांच्या अर्थाची समाप्ती परस्पराहून स्वतंत्र अशीच करावी, परंतु तिसऱ्या अंकात तिसऱ्या अवांतर वाक्याचा अर्थ त्या दोहोंशी संबद्ध असा करावा. याप्रमाणे सर्व काही महावाक्याच्या विषयाचा निर्वाह करणाऱ्या कारणांशी संबद्ध होते. आणि याप्रमाणे जे अनुसंधान बाळगणारे व विशाल दृष्टीचे असतात त्यांच्यावर सुद्धा त्रिवर्गसिद्धीच्या उपायांविषयी बोधाचा अनुग्रह होतो आणि ज्यांना अनुसंधान राहात नाही त्यांच्यावर सुद्धा जितके जितके समाप्त होते त्याने तितक्या तितक्या उपायांविषयी त्यांच्या हृदयसंवादाच्या बळावर बोधाचा अनुग्रह होतो.

'स्त्रियोपेतः' मूळ आर्येतील 'क्रियोपेतः' ऐवजी अभिनवगुप्ताचा 'स्त्रियोपेतः' असा पाठ आहे. 'स्त्रिया उपेतः' यावरून एकाच स्त्रीच्या उपस्थितीचा बोध होतो. नायक बारा असता अधिक स्त्रियांची उपस्थिती संभाव्य वाटते. – 'प्राप्तं' मुळात 'प्राप्ते' आहे. पण ते बरोबर नाहीं. 'निबध्नीयात्' ह्या क्रियापदाचे 'प्राप्तम्' हे कर्म आवश्यक आहे. – 'कपटादिभिरुपायैः' यानंतर 'प्राप्तं निबध्नीयात्' हे अध्याहृत समजावे. – 'अङ्कद्वये' म्हणजे पहिल्या व दुसऱ्या अंकात. – 'अन्योन्यविश्लिष्टा' मुद्रित पाठ 'अन्योन्यविशिष्टा' मुद्रणदोष असण्याचा संभव आहे. विश्लिष्ट म्हणजे सुटा झालेला, असंबद्ध. पहिल्या व दुसऱ्या अंकातील विषय परस्पराशी संबद्ध नसावेत, स्वतंत्र असावेत

असा अर्थ आहे. – 'ताभ्याम्' म्हणजे पहिल्या दोन अंकांतील विषयांशी. – 'सानुसंधानाः' प्रेक्षकांपैकी काही पुढीलमागील संबंध लक्षात ठेवून सर्व समवकाराचा साकल्याने रसग्रहण करण्यास समर्थ असतात. त्यांना सानुसंधान व विततदृश् ही विशेषणे लावली आहेत. ज्यांना असे सामर्थ्य नसते ते निरनुसंधान. – 'भवन्ति' मुद्रितात 'भवति' आहे. पण बहुवचन आवश्यक आहे. – 'निरनुसंधाना अपि' मुद्रित पाठ 'निरनुसंधानापि' आहे. तो बरोबर नाही. पुल्लिंगी प्रथमेचे बहुवचन आवश्यक आहे.

यानंतर पुढील दोन आर्या बडोदे प्रतीत अधिक आहेत –

**नाडीसंज्ञा ज्ञेया मानं कालस्य यन्मुहूर्तार्धम् ।**
**तन्नाडिकाप्रमाणं यथोक्तमङ्केषु संयोज्यम् ॥**
**या नाडिकेति संज्ञा कालविभागे क्रियाभिसंपन्ना ।**
**कार्या च सा प्रयत्नाद्यथाक्रमेणैव शास्त्रोक्ता ॥**

या दोन्ही आर्या अभिनवगुप्ताला अवगत नाहीत. त्यानंतरच्या कालात त्या प्रक्षिप्त झाल्या असाव्यात. दुसरी आर्या सर्वथा अनावश्यक आहे आणि ती फक्त थोड्याच हस्तलिखितांत आढळते. पहिली बहुतेक हस्तलिखितांत आहे. परंतु तिचीही आवश्यकता नाही. नाडिका म्हणजे मुहूर्ताचा अर्धा भाग एवढेच कालमान सांगण्याचे काही विशेष प्रयोजन नाही.

**अङ्कोऽङ्कस्त्वन्यार्थः कर्तव्यः काव्यबन्धमासाद्य ।**
**अर्थं हि समवकारे ह्यप्रतिसंबद्धमिच्छन्ति ॥ ६१ ॥**[1]

परंतु, काव्याच्या रचनेच्या अनुरोधाने प्रत्येक अंक भिन्न भिन्न प्रयोजनाने युक्त असा करावा. कारण, समवकारात कार्य दृढ संबद्ध नसावे असे मानतात.

**अत एव संबद्धोऽवकीर्णश्च यत्रार्थः स समवकारः, तदाह अङ्कोऽङ्क इति । तुर्व्यतिरेके । अङ्कत्रयसंबन्धो भवति, न त्वङ्कोऽङ्कः परस्परमित्यर्थः । काव्यबन्धमिति सर्वं वस्तु काव्यबन्धे श्लिष्टमित्यर्थः । अन्यथा हि समवकार एकं कार्यमिति केयं भणितिः । एतदेव निर्वचनेनाह अर्थं हि समवकार इति । समवकार इत्यस्मिन् शब्देऽर्थं वाच्यमप्रतिसंबद्धमिति नातिसंबद्धं किंचित्संबद्धं वस्त्विच्छन्ति संशब्दबलादवशब्दबलाच्च । प्रतिशब्देनातिशय उक्तः स निषिद्धः ।**

म्हणूनच ज्यात विषय संबद्ध आणि सुटा असा असतो तो समवकार, ते 'अङ्कोऽङ्कः' यात सांगतात. 'तु' फरक दाखवितो. तीन अंकांचा संबंध असतो, परंतु प्रत्येक अंकाचा दुसऱ्या अंकाशी परस्पर संबंध नसतो असा अर्थ. काव्यबन्ध म्हणजे सर्व कथानक काव्य-

१ ब -संबन्ध-, नि -संधान-.

बन्धात संश्लिष्ट होते असा अर्थ. नाही तर समवकारात एक कार्य असते या उक्तीचा काय अर्थ ? हेच व्युत्पत्तिद्वारा 'अर्थं हि समवकारे' ह्या शब्दांत सांगतात. समवकार ह्या शब्दामध्ये अर्थ म्हणजे सांगावयाचा असलेला विषय अप्रतिसंबद्ध म्हणजे फार दृढ संबद्ध नसलेल्या, थोडासा संबंध असलेल्या अशा कथानकाच्या रूपात असावा असे इच्छितात, ते 'सम्' शब्दाच्या अर्थामुळे आणि 'अव' शब्दाच्या अर्थामुळे. 'प्रति' शब्दाचा अतिशय असा अर्थ होतो, त्याचा निषेध केला आहे.

'संबद्धोऽवकीर्णश्च' यावरून सम् + अव + कृ या धातुपासून समवकार शब्दाची व्युत्पत्ती सिद्ध केली आहे हे स्पष्ट होते. – 'व्यतिरेक' म्हणजे भिन्नता. – 'काव्यबन्धे श्लिष्टम्' मुद्रित पाठ 'काव्यबन्धोपश्लिष्टम्' आहे. अर्थात् फरक पडत नाही. – 'भणितिः' मुळात 'फणितिः' असे आहे. पण तो शब्द अभिप्रेत असण्याची शक्यता फार कमी आहे. 'समवकारे एकं कार्यम्' असे विधान नाट्यशास्त्रात कोठे केले असल्याचे दिसत नाही. – 'संशब्द- इ०' सम् आणि अव ह्या दोन उपसर्गांचा अर्थ एकत्र विचारात घेतला तर 'अतिशय नसलेला, थोडा' असा अर्थ निष्पन्न होतो. 'अ + प्रति' चा असा अर्थ होतो हे दाखविले आहे.

**युद्धजलसंभवो वा वाय्वग्निगजेन्द्रसंभ्रमकृतो वा ।[1]**
**नगरोपरोधजो वा विज्ञेयो विद्रवस्त्रिविधः ॥ ६२ ॥**

युद्ध व पूर यांमुळे उडालेला हाहाःकार अथवा वारा, आग, हत्ती यांच्यामुळे झालेला संभ्रम किंवा नगराला वेढा पडल्यामुळे आलेले संकट – असा तीन प्रकारचा विद्रव जाणावा.

**त्रिविद्रव इत्युक्तं तत्रयं वक्तव्यम् । चेतनकृतमन्यकृतमुभयकृतं वा यदनर्थात्मकं वस्तु, यतो विद्रवन्ति जनाः स विद्रव इति त्रिविधः । तत्राचेतनकृतमुदाहर्तुं जलवाय्वादिग्रहणम् । चेतनकृते गजेन्द्र उदाहरणम् । द्वयकृते नगरोपरोधः, तस्य युद्धाग्निदानादिसंपाद्यत्वात् ।**

समवकारात तीन विद्रव असतात असे म्हटले आहे, ते तीन सांगितले पाहिजेत. सचेतन प्राण्याने केलेली, अचेतन पदार्थाने झालेली किंवा दोहोंच्यामुळे घडून आलेली अनर्थरूप गोष्ट, जिच्यापासून लोक भयग्रस्त होऊन पळून जातात तो विद्रव याप्रमाणे तीन प्रकारचा. त्यांपैकी अचेतनाने केलेल्याचे उदाहरण देण्यासाठी जल, वायु आदींचा निर्देश केला आहे. सचेतनाने केलेल्याचे गजेन्द्र हे उदाहरण. दोहोंनी केलेल्याचे नगराला वेढा हे उदाहरण, कारण त्यात युद्धाच्या अनुषंगाने आगी लावणे इत्यादी गोष्टी केल्या जातात.

१ नि -जलेन्द्रसंभवो वापि.

अभिनवगुप्ताने मानलेले तीन प्रकार नाट्यशास्त्रकाराला अभिप्रेत असतील असे निश्चितपणे म्हणता येणार नाही. असा संभव आहे की त्याचे प्रकार आर्येतील तीन सामासिक शब्दांत अभिव्यक्त झाले आहेत.

वस्तुगतक्रमविहितो[1] दैववशाद्वा परप्रयुक्तो वा ।
सुखदुःखोत्पत्तिकृतस्त्रिविधः कपटोऽत्र[2] विज्ञेयः ॥ ६३ ॥

वस्तूच्या ठिकाणी असलेल्या विशेषामुळें उत्पन्न झालेले, किंवा दैवयोगाने प्राप्त झालेले अथवा दुसऱ्याने केलेले, असे तीन प्रकारचे कपट – सुख अथवा दुःख उत्पन्न करणारे – या समवकारात असते असे जाणावे.

**कपटो वञ्चना तस्याश्रयणमङ्गीकरणं त्रिधा । तत्र वञ्चकबुद्ध्यैव कदाचित्केवलया कपटो भवति । स हि वस्तुगतक्रमविहितः, वस्तु फलं तत्प्राप्तौ वस्तुगतः फलसाधकः कर्ता तस्य यः क्रम उपायचिन्तनादिः तेन विहितः । यत्रानपराद्ध एव वञ्चकेन वञ्च्यते स एवमुक्तः। यत्र तु वञ्चनीयोऽपि सापराधः स परप्रयुक्तः कपटः । तदपराधे तु वञ्चकस्य वञ्चनेच्छा नास्तीति नायं भेदः संभवति, वञ्चनेच्छाभावे वञ्चनायाः संपत्त्ययोगात् । यत्र तु द्वयोरपि न कश्चिदभिसंधिदोषः काकतालीयेन तुल्यफलाभिसंधानवतोरप्येक उपचयेनापरस्त्वपचयेन युज्यते, तत्र वञ्चना सा दैवकृता वञ्चना । स च कस्यचित्सुखमन्यस्य दुःखमुत्पादयतीति तदाह सुखदुःखोत्पत्तीति ।**

कपट म्हणजे फसवणूक, त्याचा आश्रय म्हणजे स्वीकार तीन प्रकारचा. त्यांपैकी कधीकधी केवळ फसवणाऱ्याच्या बुद्धीमुळेच कपट होते. हे कपट वस्तुगतक्रमविहित होय – वस्तु म्हणजे फल, त्याच्या प्राप्तीसाठी वस्तुगत म्हणजे फल साध्य करणारा कर्ता, त्याचा जो उपायचिंतनादी क्रम, त्याने केलेले कपट. ज्यात निरपराधी अशाच मनुष्याची फसवणूक केली जाते त्या कपटाचा हा निर्देश आहे. परंतु ज्यात फसवणूक होणाराच अपराधी असतो ते कपट दुसऱ्याने केलेले. त्याचा अपराध असल्यामुळे वंचकाची फसवण्याची इच्छा नसते म्हणून हा प्रकार होतो असे नाही, कारण फसवण्याची इच्छा असल्याशिवाय फसवणूक सिद्धच होणार नाही. परंतु जिच्यात उभयतांच्याही इच्छेच्या स्वरूपाचा काही दोष नसतो व उभयतांचा समान फल प्राप्त करण्याचा उद्देश असतानाही काकतालीय न्यायाने एकाला समृद्धी प्राप्त होते व दुसऱ्याचा ह्रास होतो ती फसवणूक दैवाने केलेली फसवणूक होय. आणि हे कपट एकाला सुख व दुसऱ्याला दुःख उत्पन्न करते हे 'सुखदुःखोत्पत्ति' या शब्दात सांगतात.

१ नि यस्तु गति-. २ नि कपटाश्रयो ज्ञेयः.

'वञ्चकबुद्ध्यैव' मुद्रितात 'वञ्चना, बुद्ध्यैव' असे आहे. ते अर्थात बरोबर नाही. – 'वस्तुगतः' च्या ऐवजी फक्त 'गतः' मूळ असण्याचा संभव आहे. – 'तदपराधे इ०' या वाक्यात दुसऱ्या कोण्या टीकाकाराचे मत अग्राह्य ठरविले आहे. त्याचे असे मत होते की एकाचा अपराध असल्यामुळे दुसऱ्याने केलेली त्याची फसवणूक ही फसवणूक करण्याच्या उद्देशाने केलेली नसते तर अपराधाबद्दल शासन करण्याच्या हेतूने. अभिनवगुप्ताने म्हटले आहे की फसवणुकीचा उद्देश नसेल तर ती फसवणूकच होणार नाही. – 'अभिसंधि' म्हणजे बेत, इरादा. – 'स च' ही मुळातील 'न च' ची केलेली दुरुस्ती आहे. 'न' ने अभिप्रेत अर्थाच्या उलट अर्थ होतो. 'स' हे 'कपटः' बद्दल वापरले आहे. शेवटी असलेले 'तदाह सुखदुःखोत्पत्तीति' हे शब्द फक्त हस्तलिखितात आहेत, मुद्रितात नाहीत. ते आवश्यक वाटतात. त्यामुळे आर्येतील हे वचन स्पष्टपणे तिन्ही प्रकारच्या कपटाला लागू केलेले दिसून येते, केवळ दैवकृत कपटालाच नाही.

**त्रिविधश्चात्र विधिज्ञैः पृथक्पृथक्कार्ययोगविहितार्थः ।**
**[1]शृङ्गारः कर्तव्यो धर्मे चार्थे च कामे च ॥ ६४ ॥**

आणि (नाट्याचे) नियम जाणणारांनी धर्म, अर्थ आणि काम यांच्याशी संबद्ध निरनिराळी कार्यांची प्रयोजने साध्य करणारा असा तीन प्रकारचा शृंगार दाखवावा.

**धर्मे अर्थे कामे इति सप्तम्या कार्यत्वं कारणत्वं चोच्यते । तेन धर्मो यत्र हेतुर्वा साध्यो वा नायिकालाभे स धर्मशृङ्गारः । एवमर्थकामयोर्वाच्यम् ।**

'धर्मे', 'अर्थे' आणि 'कामे' या शब्दांतील सप्तमीने कार्य आणि कारण ह्या दोन्ही गोष्टींचा बोध होतो. म्हणून ज्यात नायिकेच्या प्राप्तीला धर्म कारणीभूत होतो अथवा ज्यात नायिकेच्या प्राप्तीमुळे धर्म सिद्ध होतो तो धर्मशृङ्गार. याचप्रमाणे अर्थ व काम यांच्या संबंधात समजावे.

'एवम्' म्हणजे अर्थामुळे स्त्रीची प्राप्ती व स्त्रीमुळे अर्थप्राप्ती, तसेच कामामुळे स्त्रीलाभ व स्त्रीमुळे कामोद्दीपन.

**[2]यस्मिन् धर्मप्रापकमात्महितं भवति साधनं बहुधा ।**
**[3]व्रतनियमतपोयुक्तो ज्ञयाऽसौ धर्मशृङ्गारः ॥ ६५ ॥**

ज्यामध्ये धर्माची प्राप्ती करून देणारे व आत्म्याचे हित साधणारे अनेक प्रकारचे साधन असते व जो व्रत, नियम व तप यांनी युक्त असतो तो धर्मशृङ्गार जाणावा.

१ **का** त्रिविधाकृतिशृङ्गारो ज्ञेयो धर्मार्थकामकृतः.

२ **नि** यत्र तु धर्मसमापक-, **का** यत्र तु धर्मे प्रार्थित-. ३ **का** प्रतिनियमतपोयुक्तः.

**यत्र शृङ्गार इति तद्विषयः प्रमदा व्यपदिश्यते व्रतादियुक्त्या प्राप्यः, यत्र च प्राप्ते धर्मप्रार्थनारूपमात्महितं यज्ञादि पत्नीसंयोगकृतं सिध्यतीति संबन्धः।**

ज्यात शृङ्गार – म्हणजे त्याचा विषय असलेली प्रमदा निर्दिष्ट होते – व्रत आदी उपायांनी प्राप्त होतो आणि ज्यात तो प्राप्त झाल्यावर धर्मसाधनरूप यज्ञ आदी स्वतःस हितकर अशा गोष्टी पत्नीच्या साहचर्यामुळे सिद्ध होतात तो धर्मशृङ्गार असा अन्वय.

'इति तद्विषयः प्रमदा व्यपदिश्यते' हे शब्द कंसात आहेत असे समजावे. – 'धर्मप्रार्थना' यातील 'प्रार्थना' शब्द विशेष समर्पक नाही. साधन ह्या अर्थाचा शब्द अपेक्षित आहे.

**अर्थस्येच्छायोगाद्बहुधा चैवार्थतोऽर्थशृङ्गारः।**
**स्त्रीसंप्रयोगविषयेष्वर्थार्था[1] वा रतिर्यत्र ॥ ६६ ॥**

अर्थाची पुष्कळ प्रकारची इच्छा असते तेव्हा अर्थासाठी होणारा तो अर्थशृङ्गार, किंवा स्त्रीच्या मीलनाच्या संबंधात अर्थाच्या प्राप्तीच्या उद्देशाने केलेली रती (म्हणजे अर्थशृङ्गार).

**अनेकधेति राज्यभूमिगोसुवर्णादिभेदेनेत्यर्थः। रतिर्बहुमानोऽर्थार्थमिति योषितां पुरुषाणां च। ननु च देवेषु कथमर्थार्थत्वम्। गन्धर्वयक्षादिषु संभवत्येवेति केचित्। यदर्थनीयं तदर्थः, देवेष्वपि चैतत्संभवतीत्यन्ये। उपाध्यायास्त्वाहुः तत्र नायकनायिकयोरनुप्राप्तिरप्यन्यगतैव, यथा भगवतो भवानीपतेर्गिरिराजपुत्रीसंगमनमिन्द्रादीनां तारकाक्रान्तनिजराज्यसमुन्मोचनाय भवतीति।**

'अनेकधा' म्हणजे राज्य, भूमी, गाई, सोने इत्यादी प्रकारांनी असा अर्थ. रति म्हणजे बहुमान अर्थासाठी म्हणजे स्त्रियांचा आणि पुरुषांचा. येथे आक्षेप असा की देवांना अर्थाची इच्छा कशी असणार? गंधर्व, यक्ष आदींमध्ये तशी इच्छा संभवतेच असे काहींचे म्हणणे आहे. दुसरे म्हणतात की जे इच्छिण्यासारखे असते तो अर्थ आणि ही गोष्ट देवांच्या बाबतीतही संभवते. परंतु आमच्या गुरुजींचे म्हणणे असे की नायक व नायिका यांच्या समागमाने होणारी अर्थप्राप्ती इतरांनाच होते; उदाहरणार्थ, भगवान शंकराचा पर्वतराज हिमालयाच्या कन्येशी झालेला समागम इन्द्र आदींच्या तारकासुराने पादाक्रांत केलेल्या राज्यांच्या विमोचनाला कारणीभूत होतो.

१ नि -ष्वयथार्थमपीष्यते हि रतिः (का -ऽभिरतिः).

'अनेकधेति' मूळ आर्येत 'बहुधा' शब्द आहे, 'अनेकधा' नाही. आणि 'अनेकधा' शब्द आर्येत बसण्यासारखाही नाही. टीकेत तो चुकीने आलेला दिसतो. – 'अर्थार्थमिति' आर्येतील 'अर्थार्था' च्या जागी अभिनवगुप्ताचा 'अर्थार्थं' असा पाठ होता असे दिसते. दोन्ही पाठ चालण्यासारखे आहेत. – 'यदर्थनीयं तदर्थः' यात 'सोऽर्थः' असे पाहिजे. – 'एतत्' म्हणजे एखादी गोष्ट साध्य करण्याची इच्छा. ह्या टीकाकारांचे म्हणणे असे की केवळ गन्धर्व आदींनाच इच्छा होते असे नाही, तर सर्वंच देवांना होऊ शकते. – 'उपाध्यायाः' भट्ट तोत. – 'नायकनायिकयोः' मुळात 'नायकयोः' असा पाठ आहे. पण तो असंभाव्य वाटल्यामुळे 'नायकनायिकयोः' अशी दुरुस्ती सुचविली आहे. – 'अनुप्राप्तिः' हा शब्द सुद्धा समर्पक वाटत नाही. 'अर्थप्राप्तिः' अपेक्षित आहे, पण त्याच्या पूर्वी 'समागमाने सिद्ध होणारी' अशा अर्थाचे वचन अर्थ स्पष्ट करण्यास साहाय्यक झाले असते. – 'भगवतः इ०' कालिदासाच्या कुमारसंभवात ह्या कथेचा विस्तार आहे हे सर्वश्रुत आहे.

**कन्याविलोभनकृतं[1] प्राप्तौ स्त्रीपुंसयोस्तु रम्यं वा ।**
**निभृतं सावेगं वा यः[2] स भवेत्कामशृङ्गारः ॥ ६७॥**

कन्येच्या विलोभनाने सिद्ध झालेला किंवा स्त्री व पुरुष यांच्या मीलनाने होणारा रम्य (असा शृंगार) – मग गुप्तपणे असो की आवेगाने असो – तो कामशृंगार होय.

**कन्यायां विलोभो नायकस्य तस्याश्च तस्मिन्निति परस्परानुरागकृत इत्यर्थः। स्त्रीपुंसयोरुद्यानस्थानादि प्राप्तौ निभृत इति प्रच्छादनपूर्वकम्, यदि वासावेवास्मीति प्रकटं कृत्वा यः शृङ्गारः स कामप्रयुक्त एव । स्त्री पुनरत्र परस्त्री विवक्षिता, यथा शक्रस्याहल्या ।**

कन्येच्याबद्दल आकर्षण नायकाला आणि तिला त्याच्याबद्दल याप्रमाणे परस्परावरील प्रेमाने उत्पन्न झालेला असा अर्थ. स्त्री आणि पुरुष उद्यान आदीसारख्या ठिकाणी आले असता त्यांचा निभृत म्हणजे गुप्तपणे चाललेला किंवा मीच तो आहे असे प्रकट करून होणारा जो शृङ्गार तो कामानेच प्रेरित झालेला शृङ्गार होय. यासंबंधात स्त्री मात्र परस्त्री विवक्षित आहे, जशी इन्द्राची अहल्या.

मूळ आर्येतील 'विलोभनकृतं' हा पाठ बरोबर वाटत नाही. '-कृतः' असे अपेक्षित आहे. अभिनवगुप्ताच्या टीकेवरून त्याचा असा पुल्लिंगीच पाठ असावा असे दिसते. तसेच, 'प्राप्तौ' शब्दाचा अन्वय लावणे कठीण आहे. अभिनवगुप्ताने 'रम्यं' ची व्याख्या 'उद्यानस्थानादि' या शब्दात केली असून त्याचा 'प्राप्तौ' शी कर्म म्हणून संबंध जोडला आहे. पण त्यासाठी '(रम्यं) प्राप्तयोः (स्त्रीपुंसयोः)' असे रूप अपेक्षित आहे. – 'यदि वासौ' ही मुळातील

१ **का** -भनं वा प्राप्तं. २ **का** जानीयात्कामशृङ्गारम्, **ब** यस्य भवेत्कामशृङ्गारः, **नि** यस्य भवेद्वा कामशृङ्गारः.

'यदि चासौ' ची दुरुस्ती आहे. आर्येतील 'वा' चा अनुवादच अपेक्षित आहे, 'च' चा नाही.– 'यः स' आर्येत हाच पाठ अभिनवगुप्ताला अभिप्रेत आहे हे उघड आहे. बडोदे प्रतीतील 'यस्य' ह्या पाठाचा अन्वय लागण्यासारखा नाही.

**नन्वेवं शृङ्गारयोगे कथं कैशिकीहीनता । कैशिक्यां वृत्तौ हीनानीति तत्र समासः, तेन नर्माद्यङ्गचतुष्कतदुपरञ्जकगीतनृत्यवाद्याद्यभावात् कैशिकी हीनात्र भवति । उपाध्यायास्त्वाहुः न कामसद्भावमात्रादेव कैशिकीसंभवः, रौद्रप्रकृतीनां तदभावात् । विलासप्रधानं यद्रूपं सा कैशिकी । न च चरिते तद्रूपानुप्रवेशेऽपि तद्व्यवहारः । प्राधान्यकृतो ह्यसावित्युक्तम् । तेन तत्र विषये भारत्यादिवृत्त्यन्तराभिधानमेव युक्तमिति ।**

येथे आक्षेप असा की याप्रमाणे शृङ्गाराची योजना असताना समवकारात कैशिकीचा अभाव कसा समजत येईल ? याला उत्तर असे की त्या ठिकाणी 'कैशिकी वृत्तीमध्ये कमी' असा समास समजावा, त्यायोगे नर्म आदी तिची चार अंगे व तिला रोचक करणाऱ्या गीत, नृत्य, वाद्य आदींचा अभाव असल्यामुळे कैशिकी ह्या रूपकात न्यून होते. परंतु आमचे गुरुजी म्हणतात की केवळ कामाचे अस्तित्व असल्यानेच कैशिकी वृत्ति संभवते असे नाही, कारण रौद्र प्रकृतीच्या मनुष्यांत तिचा अभाव असतो. विलासाला प्रधान्य असलेले जे रूप ते कैशिकी. आणि चरितात त्या रूपाचा प्रवेश झाला तरी त्या शब्दाचा व्यवहार होत नाही. कारण प्राधान्य असेल तरच तो व्यवहार होतो असे म्हटले आहे. म्हणून त्या विषयासंबंधात भारती आदी इतर वृत्तींचा निर्देश करणेच योग्य होय.

'कैशिकीहीनता' मागे नवव्या आर्येत नाटक व प्रकरण खेरीज करून इतर आठ रूपके 'कैशिकीवृत्तिहीनानि' असावीत असे म्हटले आहे, त्याला अनुलक्षून हा निर्देश आहे. – 'हीनानीति' मुद्रित पाठ 'हीनामिति' बरोबर नाही हे वरील निर्देशावरून उघड आहे. – 'कैशिकी हीनात्र भवति' यातील 'कैशिकी' ही मुळातील 'कैशिक्या' ची दुरुस्ती आहे. 'हीना' ह्या स्त्रीलिंगी विशेषणाला 'कैशिकी' असे प्रथमान्त विशेष्य आवश्यक आहे. आणि त्याने अर्थही व्यवस्थित लागतो. – 'उपाध्यायास्त्वाहुः' अगोदर मांडलेले मत दुसऱ्या कोणाचे असे म्हटलेले नाही. यावरून अभिनवगुप्ताला ते अमान्य नाही असे म्हणता येण्यासारखे आहे. आणि याबाबतीत त्याला आपल्या गुरूचे मत सर्वस्वी ग्राह्य वाटत नव्हते असाही तर्क करता येईल. – 'तदभावात्' यातील 'तत्' म्हणजे कैशिकी वृत्ती. – 'रूपम्' हा शब्द घटना, प्रसंग या अर्थी वापरलेला दिसतो. –'न च चरिते इ०' मुळात 'चरितं' आहे, पण त्यातील प्रथमेचा योग्य अन्वय लावणे कठीण आहे. येथे युक्तिवाद असा आहे की एखाद्या चरितात कधी विलासाचा प्रसंग घडला तरी त्या सबंध चरिताला कैशिकी वृत्तीने युक्त असे म्हणणे योग्य होणार नाही. कारण त्यात त्या प्रसंगाला प्राधान्य नसून इतर गोष्टींना प्राधान्य असते. वृत्तीचा निर्देश चरितातील प्रधान गोष्टीच्या अनुरोधानेच करणे योग्य होय. समवकारात शृङ्गार असला तरी त्याला प्राधान्य नाही. म्हणून त्याला कैशिकीवृत्तिहीन म्हणण्यास हरकत नाही.

**उष्णिग्गायत्र्याद्यान्यन्यानि[1] च यानि बन्धकुटिलानि ।**
**वृत्तानि[2] समवकारे कविभिस्तानि[3] प्रयोज्यानि ॥ ६८॥**

उष्णिक्, गायत्री आदी आणि दुसरे जे विषमरचनेचे छंद आहेत त्यांची कवींनीं समवकारामध्ये योजना करावी.

**उष्णिक् सप्तभिर्गायत्री षड्भिः । बन्धकुटिलानि विषमार्धसमानि तान्यत्र समवकारे सम्यग्योज्यानीति । नैव योज्यानीत्युद्भटः पठति । स्रग्धरादीन्येव प्रयोज्यानि नाल्पाक्षराणीति स व्याचष्टे ।**

उष्णिक् सात अक्षरांचा पाद असलेला छंद आणि गायत्री सहा अक्षरांचा. बन्धकुटिल म्हणजे विषम आणि अर्धसम छंद, ते ह्या समवकारामध्ये योग्य रीतीने योजावेत. उद्भटाचा 'नैव योज्यानि' असा पाठ आहे. स्रग्धरा आदी छंदांचीच योजना करावी, कमी अक्षरे असलेल्या छंदांची नाही अशी त्याने व्याख्या केली आहे.

'उष्णिक्सप्तभिः इ०' प्रत्येक छंदात चार पाद असतात या नियमास अनुसरून येथे प्रत्येक पादातील अक्षरसंख्येचा निर्देश केला आहे. नाट्यशास्त्र, १४.४२ व ४७ यांत हे स्पष्टपणे सांगितले आहे. – 'विषमार्धसमानि' विषम म्हणजे चारही पाद सारखे नसलेला छंद आणि अर्धसम म्हणजे पहिला व तिसरा आणि दुसरा व चौथा असे सारखे पाद असलेला छंद असे १४.४३ वरील टीकेत अभिनवगुप्तानें म्हटले आहे. – 'उद्भटः' हा एक प्राचीन टीकाकार.

**एवं कार्यस्तज्ज्ञैर्नानारससंश्रयः[4] समवकारः ।**
**वक्ष्याम्यतःपरमहं लक्षणमीहामृगस्यापि ॥ ६९ ॥**

याप्रमाणे तज्ज्ञ कवींनी विविध रसांच्या आधाराने समवकाराची रचना करावी. आता यानंतर मी ईहामृगाचेही लक्षण सांगतो.

**एवं श्रद्धालवो देवताभक्ताः तद्देवयात्रादावनेन प्रयोगेणानुगृह्यन्ते, निरनुसंधानहृदया स्त्रीबालमूर्खाश्च विद्रवादिना हृतहृदयाः क्रियन्त इत्युक्तः समवकारः ।**

१ **नि** -त्री वा वृत्तानि, **का** -त्री वा यानि तथान्यानि, **घो** -त्र्याद्यादन्यानि. २ **नि** तान्यत्र. ३ **नि** -भिः सम्यक्, **का** -भिर्नैव.

४ **नि** सुखदुःखसमाश्रयः.

याप्रमाणे जे श्रद्धाळू आणि देवभक्त असतात त्यांच्यावर त्या देवाची जत्रा वगैरे सारख्या प्रसंगी याच्या प्रयोगाने अनुग्रह होतो आणि ज्यांची बुद्धी अनुसंधान राखण्यास असमर्थ असते त्यांचे तसेच स्त्री, बाल व मूर्ख यांचे विद्रव आदी गोष्टींनी मनोरंजन केले जाते म्हणून समवकाराचे वर्णन केले आहे.

'निरनुसंधान' शब्द वर ६० व्या आर्येवरील टीकेत आला आहे.

**दिव्यपुरुषाश्रयकृतो दिव्यस्त्रीकारणोपगतयुद्धः ।**
**सुविहितवस्तुनिबद्धो विप्रत्ययकारकश्चैव ॥ ७० ॥**

**उद्धतपुरुषप्रायः स्त्रीरोषग्रथितकाव्यबन्धश्च ।**
**संक्षोभविद्रवकृतः संफेटकृतस्तथा चैव ॥ ७१ ॥**

**स्त्रीभेदनापहरणावमर्दनप्राप्तवस्तुशृङ्गारः ।**
**ईहामृगस्तु कार्यः सुसमाहितकाव्यबन्धश्च ॥ ७२ ॥**

दिव्य पुरुषांच्या आधाराने रचलेला, दिव्य स्त्रीच्या निमित्ताने युद्धाचे प्रसंग असलेला, उत्कृष्ट मांडणी असलेल्या कथानकाने युक्त, तसेच विशेष प्रत्ययकारी असलेला, बहुतांशी उद्धत पुरुषपात्रे असलेला, स्त्रीच्या रोषाविषयी काव्यरचना असलेला, क्षोभ, विद्रव, त्याचप्रमाणे संफेट यांनी युक्त असलेला, स्त्रीच्या निमित्ताने भेदन, अपहरण व अवमर्दन यांच्या द्वारा कथानकात शृंगाराची प्राप्ती दाखविणारा आणि काव्यरचना अगदी व्यवस्थित केली असलेला असा ईहामृग निर्माण करावा.

**अथेहामृगमाह दिव्येति । दिव्यानां पुरुषाणामाश्रयणं नायकतया, तेन कृतः । दिव्यस्त्रीनिमित्तमुपगतं युद्धं यत्र । दिव्यानुप्रवेशात्समवकारवत् असंबद्धार्थता मा प्रसांक्षीदित्याह सुविहितेन संश्लिष्टेन वस्तुना निबद्धः । विगतानि प्रत्ययकारणानि विश्वासहेतवो यत्र । मध्ये च तत्रादिव्यानामपि प्रवेशो भवतीति दर्शयति उद्धतपुरुषेति । स्त्रीनिमित्तको रोषः । संक्षोभ आवेगः । स्त्रीनिमित्तं यानि भेदनापहरणावमर्दनानि – यथायोगं स्त्रीविषयाणि अन्यविषयाणि – तैः प्राप्तं वस्तु अधिष्ठानं प्रमदालक्षणं यस्य तादृशः शृङ्गारः यस्मिन् । अवमर्दनं दण्डः । सुसमाहितः काव्यबन्ध इत्यनेन वीथ्यङ्गान्यत्र योज्यानीति दर्शयति ।**

१ नि चतुरङ्गविभूषितश्चैव.

आता 'दिव्य' इत्यादी शब्दांत ईहामृगाचे वर्णन करतात. दिव्य पुरुषांचा आधार नायक म्हणून, त्याने रचलेला. दिव्य स्त्रीच्या निमित्ताने ज्यात युद्धाचा प्रसंग येतो असा. दिव्य पात्रांचा समावेश असल्यामुळे समवकाराप्रमाणे विषयामध्ये तुटकपणाचा प्रसंग येऊ नये म्हणून म्हणतात 'सुविहितेन' म्हणजे सुसंहत अशा कथानकाने सुघटित केलेला. ज्यात प्रत्ययकारण म्हणजे विश्वसनीयता विद्यमान नाही असा. आणि त्यात मध्ये दिव्य नसलेल्यांचाही समावेश होतो हे 'उद्धतपुरुष' या शब्दाने दाखवितात. स्त्रीच्या निमित्ताने रोष. संक्षोभ म्हणजे आवेग. स्त्रीच्या निमित्ताने जे भेदन, अपहरण आणि अवमर्दन — औचित्यानुसार स्त्रीच्या संबंधात किंवा इतरांच्या संबंधात — त्यांच्यामुळे प्राप्त झालेली वस्तु म्हणजे प्रमदारूपी अधिष्ठान असलेला शृंगार ज्यात आहे असा. अवमर्दन म्हणजे शासन. उत्कृष्ट रचनेच्या काव्यबन्धाच्या निर्देशाने वीथीच्या अंगांची यात योजना करावी असे दाखवितात.

'असंबद्धार्थता' समवकारात तीन अंकांतील विषयांचा परस्पराशी संबंध नसतो हे वर ६१ व्या आर्येत सांगितले आहे. – 'विगतानि इ०' आर्येतील 'विप्रत्यय' शब्दाचा अभिनवगुप्ताने विश्वासाचा अभाव असा अर्थ केला आहे. यावरून जर असा निष्कर्ष निघत असेल की ईहा-मृगाच्या कथानकातील घटना विश्वसनीय स्वरूपाच्या नसतात तर तो एकदम पटण्यासारखा नाही. विशेषतः ईहामृगाचे वर्णन 'सुविहितवस्तुनिबद्धः' आणि 'सुसमाहितकाव्यबन्धः' या शब्दांत केलेले असल्यामुळे तो अविश्वसनीय कसा होऊ शकेल? त्यामुळे उलट त्याचे कथानक अधिक विश्वासार्ह होण्याचाच जास्त संभव आहे. अभिनवगुप्ताच्या या व्याख्येचा असाही अर्थ शक्य आहे की ईहामृगातील पात्रांचा परस्परावरील विश्वास नाहीसा झालेला असतो. पण असा अर्थही विशेष पटण्यासारखा नाही. – 'तत्रादिव्यानामपि' ही दुरुस्ती आहे. मुळात 'तत्र दिव्यानामपि' असे आहे. पण दिव्य पात्रे नायक असल्याचे वर म्हटले असताना त्यांच्याच समावेशाचा पुन्हा निर्देश अस्वाभाविक होईल. आणि 'अपि' ने दिव्यांहून इतर पात्रांचाच समावेश सूचित होतो. 'स्त्रीनिमित्तको रोषः' स्त्रीचा रोष असा अर्थ करावयाचा नाही हे दाखविण्यासाठी ही व्याख्या. – 'यथायोगम्' उदाहरणार्थ अपहरण स्त्रीचे, अवमर्दन व भेदन हे त्याला विरोध करणारांचे. – 'वीथ्यङ्गानि' वीथीच्या तेरा अंगांचे वर्णन ह्या अध्यायाच्या शेवटी केले आहे.

'संफेट' म्हणजे 'रोषग्रथितवाक्य' असे पुढे १९.८४ मध्ये सांगितले आहे.

**यद्व्यायोगे कार्यं ये पुरुषा वृत्तयो रसाश्चैव ।**
**ईहामृगेऽपि ते[१] स्युः केवलममरस्त्रिया[२] योगः ॥ ७३ ॥**

व्यायोगात ज्या प्रकारचे कार्य, ज्या प्रकारचे पुरुष, ज्या प्रकारच्या वृत्ती आणि ज्या प्रकारचे रस असतात त्या सर्व गोष्टी ईहामृगात सुद्धा तशाच असाव्यात. फक्त त्यात दिव्य स्त्रीची योजना असावी.

१ **नि** तत्स्यात्. २ **नि** -मत्र स्त्रिया योगः, **का** -ममरस्त्रियो ह्यस्मिन्.

अङ्कपरिमाणं नायकसंख्यां वृत्तिरसविभागं च व्यायोगातिदेशेनाह यद्व्यायोग इति । कार्यशब्देनाङ्क उच्यते, तेनैक एवाङ्कः । नायकास्तु द्वादश, समवकारातिदेशेन व्यायोगे तल्लाभात् । अत्र तु समवकारातिदेशेन सर्वसंपत्तेर्गौरवं स्यात् ।

'यद्व्यायोगे' या शब्दांत व्यायोगाच्या अतिदेशाने ईहामृगाच्या अंकांचे परिमाण, नायकांची संख्या आणि वृत्ती व रस यांची योजना ह्या गोष्टी सांगतात. 'कार्य' शब्दाचा अंक असा अर्थ आहे, म्हणून यात एकच अंक. परंतु नायक बारा असतात, कारण व्यायोगात समवकाराचा अतिदेश केल्यामुळे ती संख्या प्राप्त होते. जर ह्या ठिकाणीच समवकाराचा अतिदेश केला असता तर सर्व गोष्टी सिद्ध होऊन अधिक भार झाला असता.

'व्यायोगे तल्लाभात्' व्यायोगात समवकाराचा अतिदेश पुढे ८३ व्या आर्येत आहे. – 'सर्वसंपत्तेर्गौरवं स्यात्' याचा अर्थ असा दिसतो की समवकारातील त्रिकपट इत्यादी गोष्टी सुद्धा ईहामृगात प्राप्त झाल्या असत्या व त्यायोगे अभिप्रेत अर्थापेक्षा अधिक अर्थ निष्पन्न झाला असता.

यत्र तु वधेप्सितानां वधो ह्युदग्रो[1] भवेद्धि पुरुषाणाम् ।
किंचिद्व्याजं कृत्वा तेषां युद्धं शमयितव्यम् ॥ ७४ ॥

परंतु, ज्या ठिकाणी वध्य ठरलेल्या पुरुषांचा घोर वध होण्याचा संभव असेल त्या ठिकाणी काही तरी निमित्त काढून त्यांचे युद्ध थांबविण्यात यावे.

ननु युद्धमवमर्दनं चेत्युक्तं तत्रास्य प्रत्यक्षप्रयोज्यता मा भूदिति दर्शयति यत्र त्विति । वधेप्सितानां वध्यानाम् । भवेदिति संभाव्यत इत्यर्थः । तत्रेति येषामिति चाध्याहार्यम् । व्याजमिति पलायनादि । ईहा चेष्टा मृगस्येव स्त्रीमात्रार्था यत्र स ईहामृगः ।

यात युद्ध व अवमर्दन असतात असे म्हटले आहे, तेव्हा यांचा प्रत्यक्ष प्रयोग केला जाऊ नये हे 'यत्र तु' इत्यादी शब्दांत दाखवितात. 'वधेप्सितानाम्' म्हणजे वध्य असलेल्यांचा. 'भवेत्' म्हणजे संभव असेल असा अर्थ. 'तत्र' आणि 'येषाम' हे दोन शब्द अध्याहृत धरावयाचे. व्याज म्हणजे पलायन वगैरे. ईहा म्हणजे चेष्टा मृगाप्रमाणे केवळ स्त्रीसाठी ज्यात आहे तो ईहामृग.

'चाध्याहार्यम्' ही दुरुस्ती आहे. मुळातील 'चार्थमाहार्यम्' अर्थहीन व म्हणून भ्रष्ट पाठ आहे हे उघड आहे.

१ घो -ऽप्युदग्रो.

ईहामृगस्य लक्षणमुक्तं विप्राः समासयोगेन ।
डिमलक्षणं तु भूयो लक्षणयुक्त्या प्रवक्ष्यामि ॥ ७५ ॥

प्रख्यातवस्तुविषयः प्रख्यातोदात्तनायकश्चैव ।
[१]षड्रसलक्षणयुक्तश्चतुरङ्को वै डिमः कार्यः ॥ ७६ ॥

शृङ्गारहास्यवर्जं[२] शेषैः सर्वैः रसैः समायुक्तः ।
दीप्तरसकाव्ययोनिर्नानाभावोपसंपन्नः ॥ ७७ ॥

[३]निर्घातोल्कापातैरुपरागेणेन्दुसूर्ययोर्युक्तः ।
युद्धनियुद्धा[४]धर्षणसंफेटकृतश्च कर्तव्यः ॥ ७८ ॥

मायेन्द्रजालबहुलो [५]बहुपुस्तोत्थानयोगयुक्तश्च ।
[६]देवभुजगेन्द्रराक्षसयक्षपिशाचावकीर्णश्च ॥ ७९ ॥

षोडशनायकबहुलः सात्त्वत्यारभटिवृत्तिसंपन्नः ।
कार्यो डिमः प्रयत्नान्ना[७]नाश्रयभावसंपन्नः ॥ ८० ॥

हे विप्रहो, ईहामृगाचे लक्षण मी थोडक्यात सांगितले. आता यापुढे लक्षणाच्या साहाय्याने डिमाचे वर्णन करणार आहे. प्रसिद्ध कथानकाचा विषय असलेला, तसेच प्रसिद्ध असे उदात्त नायक असलेला, सहा रसांच्या आविष्काराने युक्त व चार अंक असलेला असा डिम रचावा. शृंगार व हास्य हे दोन खेरीज करून इतर सर्व रसांनी युक्त असलेला, आवेशयुक्त रसांचे काव्य असलेला, विविध प्रकारच्या भावांनी संपन्न असलेला, भूकंप, उल्कापात, आणि चंद्र व सूर्य यांची ग्रहणे यांनी युक्त, युद्ध, द्वन्द्वयुद्ध, आह्वान, संफेट यांनी युक्त असा करावा. तसेच माया, इंद्रजाल या गोष्टी मोठ्या प्रमाणात असलेला, पुष्कळ प्रकारच्या कृत्रिम वस्तूंच्या निर्मितीने युक्त असलेला, देव, नागराज, राक्षस, यक्ष, पिशाच्च हे समाविष्ट असलेला, एकूण सोळा नायक असलेला, सात्त्वती आणि आरभटी या वृत्तींनी संपन्न असलेला आणि विविध प्रसंगांतून उद्भवणाऱ्या भावांनी संपन्न असा डिम प्रयत्नपूर्वक रचावा.

१ **नि** षट्त्रिंशल्लक्षणयुक्. २ **ब का** -वर्जः. ३ **का** निर्घातचन्द्रसूर्योपरागसोल्कावपात-संयुक्तः. ४ **नि** -नियुध्दप्रहरण-. ५ **नि** बहुपुरुषो-. ६ **का** देवासुरराक्षसभूतयक्षनागाश्च पुरुषाः स्युः. ७ **का** तज्ज्ञैर्नानाश्रयविशेषेण (घो -विशेषैः).

अथ डिममाह प्रख्यातवस्तुविषय इति । नाटकतुल्यं सर्वमन्यत्, केवलं संधीनां रसानां चासमग्रता । शृङ्गारहास्यवर्जं षड्रसत्वे पर्यायेण शान्तस्य प्रयोगः स्यादित्याह दीप्तरसेति । काव्ययोनिः काव्यवस्तु । देवादयो बाहुल्ये-नात्र । सात्त्वत्यारभटीति जातिरप्राणिनामिति केचित् । सात्त्वत्यारभटीवृत्ति-संपन्नं वृत्तिद्वयं यत्र । वृत्तिसमूहे वा वृत्तिशब्दः । सात्त्वत्यारभटीलक्षणव्या-वृत्त्या संपन्नः । डिमो डिम्बो विद्रव इति पर्यायाः, तद्योगादयं डिमः । अन्ये तु डयन्त इति डियः उद्धतनायकाः, तेषां मानं वृत्तिर्यत्रेति । इको ह्रस्वोऽङ्यो गालवस्येति ह्रस्वः । नानाश्रयभावसंपन्न इत्यनेन सर्वभावयुक्तत्वादितिवृत्तवैचि-त्र्यमाह ।

आता 'प्रख्यातवस्तुविषयः' इत्यादीत डिमाचे वर्णन करतात. नाटकाप्रमाणेच इतर सर्व, केवळ संधि आणि रस हे सर्वच्या सर्व नसतात. शृंगार आणि हास्य खेरीज करून सहा रसांच्या योजनेचा निर्देश असल्याने कदाचित् पर्यायाने शान्त रसाचा प्रयोग होईल म्हणून 'दीप्तरस' असे म्हटले आहे. काव्ययोनि म्हणजे काव्याचे कथानक. यात देव आदी मोठ्या संख्येने असतात. सात्त्वत्यारभटी यात 'जातिरप्राणिनाम्' या सूत्रातील नियम लावला आहे असे काहींचे मत आहे. सात्त्वती आणि आरभटी वृत्तींनीं संपन्न अशा दोन वृत्ती ज्यात आहेत असा. अथवा वृत्ति शब्द वृत्तींच्या समूहाचा वाचक समजावा. सात्त्वती आणि आरभटी यांच्या लक्षणाचा निरास करून संपन्न झालेला. डिम, डिम्ब आणि विद्रव हे तिन्ही शब्द (दंगल ह्या) एकाच अर्थाचे आहेत. त्याच्या संयोगामुळे रूपकाचे नाव डिम. इतरांच्या मते 'डयन्ते' म्हणजे उड्या मारतात ते 'डी' म्हणजे उद्धत पुरुष; त्यांचे मान म्हणजे अस्तित्व ज्यात आहे तो डिम. 'इको ह्रस्वोऽङ्यो गालवस्य' ह्या सूत्राप्रमाणे ह्रस्व झाले आहे. 'नाना-श्रयभावसंपन्नः' याने सर्व भावांनी युक्त असल्यामुळे कथानकाचे वैचित्र्य निदर्शित करतात.

'चासमग्रता' यानंतर मुळात आणखी एक 'च' आहे. त्याचे काहीच प्रयोजन नसल्यामुळे तो गाळला आहे. डिमात संधि समग्र नसतात, कारण पुढे १९.४२ मध्ये म्हटल्याप्रमाणे त्यात अवमर्शसंधीचा अभाव असतो. – 'शान्तस्य प्रयोगः स्यात्' सहाव्या रसाध्यायावरील टीकेच्या शेवटी अभिनवगुप्ताने शान्तरसाचे अस्तित्व सिद्ध करण्यासाठी डिमाच्या येथील वर्णनाचा उपयोग केला आहे. प्रस्तुत ठिकाणी षड्रसात शान्तरसाच्या अन्तर्भावाची संभावना निर्दिष्ट केली आहे. – 'दीप्तरस' म्हणजे रौद्र आणि वीर. – 'देवादयः' म्हणजे ७९व्या आर्येतील देव, भुजगेन्द्र, राक्षस इत्यादी. – 'जातिरप्राणिनाम्' हे पाणिनीचे सूत्र (२.४.६) आहे. त्या सूत्राप्रमाणे जाति-वाचक शब्दांचा द्वन्द्वसमास नपुंसकलिंगी एकवचनात होतो, जसे द्रुमशैलम्. येथे अशा मताचा निर्देश दिसतो की 'सात्त्वत्यारभटी' हा अशा तऱ्हेचा द्वन्द्व आहे. ह्रस्व 'टि' ची उपपत्ती लावण्याचा येथे अशा मताचा हा प्रयत्न असावा. पण सात्त्वती व आरभटी हे जातिवाचक शब्द नाहीत. – 'सात्त्वत्यारभटीवृत्तिसंपन्नं वृत्तिद्वयं' याचा असा अर्थ होतो की ह्या दोन वृत्तींनी संपन्न

झालेल्या इतर दोन वृत्ती; म्हणजे डिमात भारती व कैशिकी या वृत्तींनाही अवकाश आहे असा निष्कर्ष निघतो. पण तो संभाव्य वाटत नाही. 'सात्त्वत्यारभटीवृत्तिद्वयसंपन्नं' असे वचन अपेक्षित आहे. – लक्षणव्यावृत्त्या संपन्नः' या दुसऱ्या व्याख्येत तर सात्त्वती व आरभटी यांच्या लक्षणाची डिमात व्यावृत्ति म्हणजे अनुपस्थितीच निर्दिष्ट केलेली दिसते. येथे टीकेत काही गोंधळ झालेला नसेल तर ही व्याख्या आर्येतील वचनाचा विपर्यास करणारी ठरेल. टीकेतील शब्दांतून त्या वचनाचा पोषक असा अर्थ निघू शकेलसे वाटत नाही. – 'तेषां मानं' मुद्रित पाठ 'तेषामात्मनाम्' आहे, तो अर्थहीन आहे. डिमतील 'म' हा मा ह्या धातूपासून आला आहे असे म्हणावयाचे आहे. – 'इको ह्रस्वो इ०' हे पाणिनीचे सूत्र (६.३.६१) आहे. तदनुसार समासातील पहिले पद ईकारान्त असता ई विकल्पाने ह्रस्व होतो, फक्त तो ई प्रत्ययस्वरूप नसावा. 'डी' ह्या प्रथम पदातील ई प्रत्ययरूप नाही, म्हणून डी + म पासून डीम असे रूप अपेक्षित असता डिम झाले. असे हे स्पष्टीकरण आहे.

**नाटकादनन्तरं डिमलक्षणं यद्यप्युचितं तथापि तद्गतप्रवेशकादिसंभवनिराकरणार्थं तत्प्रकरणादपकृष्यास्याभिधानम् । तेन दिनचतुष्टयवृत्तमेवात्र प्रयोज्यम् । अङ्कावतार एव चात्र भवति । चूलिकाङ्कमुखयोस्त्वत्रापि युद्धादिवर्णने समुपयोगोऽस्त्येव । ततश्च वस्तुतः प्रवेशकाद्यनिषिद्धमेव । प्रवेशकस्य ह्यसंभव एव रसस्येतिवृत्तवशाद्वा अङ्केष्वन्योन्यासंबन्धात्, यथा समवकारे बह्वङ्केऽपि । तस्मात्प्रकरणादपकर्षोऽस्य तस्यावसराभावात् । तत्र हि नाटकानन्तरमस्याभिधाने प्रकरणस्य तत्स्पर्धित्वमुक्तं भवेत् । तदनन्तराभिधाने नाटिकादिभेदः कथं ख्याप्यः । नाटिकायां च स्त्रीप्रधानत्वात् शृङ्गारसमवकाराभिधानमेव ततः परं न्याय्यम् । तत्प्रसङ्गेन च दिव्यपुरुषसंबन्धादीहामृग उक्तः । तदनन्तरं च दिव्यपुरुषाधिकारेण न रूपकाणीति पूर्वमनेकरसयुक्तत्वेन वितततेतिवृत्तत्वादयमभिधातुं युक्तमित्यलं बहुना ।**

नाटकाच्या नंतर डिमाचे लक्षण देणे जरी उचित होते तरी त्यातील प्रवेशक आदींच्या संभवाचे निराकरण करण्यासाठी प्रकरणापासून दूर ठेवून त्याचा निर्देश केला आहे. म्हणून यात चार दिवसांच्या घडामोडींचीच योजना करावयाची असते. आणि यात अङ्कावताराचाच उपयोग होतो. परंतु युद्ध आदीच्या वर्णनात चूलिका व अङ्कमुख यांचा सुद्धा यात उपयोग होतोच. आणि म्हणून खरोखर पहाता प्रवेशक आदींचा निषेध असा केलेलाच नाही. कारण प्रवेशकाचा यात संभवच नसतो, रसामुळे किंवा कथानकाच्या अनुरोधाने यातील अंकांमध्ये परस्पराशी संबंध नसतो म्हणून, ज्याप्रमाणे समवकारात पुष्कळ अंक असले तरी त्यांचा परस्पराशी संबंध नसतो त्याप्रमाणे. म्हणून प्रकरणापासून याला दूर ठेवले आहे, कारण यात त्या प्रवेशकाला अवकाशच नाही. असे असता नाटकानंतर जर याचे वर्णन केले असते तर प्रकरणाची याच्याशी स्पर्धा असलेली निर्दिष्ट झाली

असती. प्रकरणानंतर याचे वर्णन केले असते तर नाटिका आदींचा भेद कसा सांगता आला असता ? आणि नाटिकेत स्त्रियांचे प्राधान्य असल्यामुळे त्यानंतर शृंगाराचा समावेश असलेल्या समवकाराचेच वर्णन न्यायाला धरून झाले. आणि त्या प्रसंगाने दिव्य पुरुषांचा संबंध असल्याकारणाने ईहामृगाचे वर्णन केले आहे. आणि त्यानंतर दिव्य पुरुष प्रधान असलेली रूपके नाहीत, म्हणून अनेक रसांनी युक्त असल्यामुळे व विस्तृत असे कथानक असल्यामुळे प्रथम या डिमाचे वर्णन करणे उचित होय. तेव्हा आता हा विस्तार पुरे.

या परिच्छेदात डिमाचा क्रम अगोदर अपेक्षित असता इतक्या उशिरा का लावला आहे याचे विवेचन केले आहे. – 'नाटकादनन्तरं' कारण यात बहुतेक गोष्टी नाटकातल्याप्रमाणेच असतात असे वर म्हटले आहे. – 'तत्' याने डिमलक्षणाचा निर्देश होतो असे समजणे शक्य आहे. तथापि पुढे 'अस्य' असल्यामुळे ह्या शब्दाची आवश्यकता नाही. – 'अपकृष्य' म्हणजे दुसऱ्या काही गोष्टींचे मध्यंतरी विवेचन केल्यावर. – 'प्रवेशकस्य ह्यसंभव एव' येथे युक्तिवाद असा केला आहे की जे संभाव्य असेल त्याचाच निषेध करणे उचित होय; जे संभाव्यच नसेल त्याचा निषेध करण्याचे प्रयोजन नाही. डिमात प्रवेशकाचा संभवच नाही, म्हणून त्याचा प्रत्यक्ष निषेध केला नाही. –'रसस्येतिवृत्तवशाद्वा' हा हस्तलिखितातील पाठ आहे. मुद्रितात 'सरसेतिवृत्तवशाद्वा' असे आहे. दोन्ही पाठ समाधानकारक नाहीत. 'वा' मुळे दोन गोष्टींचा निर्देश अपेक्षित आहे. रस आणि इतिवृत्त ह्या त्या दोन गोष्टी. त्यामुळे 'सरस' असे इतिवृत्ताचे विशेषण करणे बरोबर दिसत नाही. तसेच 'रसस्य' ह्या पाठात रसाचा स्वतंत्र निर्देश असला तरी त्यातील षष्ठीचा अन्वय नीट लागत नाही. कदाचित त्यानंतर 'वशात्' अध्याहृत धरता येईल. – 'अङ्केषु' च्या पूर्वी मुळात 'यथा' आहे. पण नंतर आलेल्या 'यथा' शब्दाची येथे चुकीने पुनरावृत्ती झालीसे दिसते. – 'प्रकरणापदकर्षो' ही मुळातील 'प्रकरणोत्कर्षो' ची दुरुस्ती आहे. 'प्रकरणादुत्कर्षः' असा पाठ संभवनीय आहे. पण परिच्छेदाच्या प्रारंभी 'प्रकरणादपकृष्य' हे शब्द असल्यामुळे सुचविलेली दुरुस्ती अधिक संभाव्य वाटते. – 'तस्यावसराभावात्' मुळात 'अवसरभावात्' आहे. पण 'तस्य' ने प्रवेशकाचाच निर्देश अभिप्रेत असण्याचा संभव असल्यामुळे अवसराच्या अभावाचाच उल्लेख उचित होईल. – 'नाटकानन्तरं' मुळातील 'नाटकान्तरं' हा पाठ बरोबर नाही. –'तत्स्पर्धित्वम्' मुळात ह्या शब्दाच्या पूर्वी 'न' अधिक आहे. पण तो चुकीने आलेला दिसतो. नाटकानंतर डिमाचे विवरण करावयाचे ठरविले असते तर प्रकरणाला अन्याय होऊन त्या दोहोत स्पर्धा उत्पन्न झाली असती असे येथे म्हणावयाचे आहे. – 'शृङ्गारसमवकारा-' मुद्रित पाठ 'त्रिशृङ्गार-' आहे. त्याने समासाचा विग्रह सुलभ होतो. तथापि हस्तलिखितातील समासही विग्रहास कठीण नाही. – 'दिव्यपुरुषाधिकारेण न' यातील 'न' मुळात नाही. पण तो आवश्यक वाटतो. इतर रूपकप्रकारांत दिव्य पुरुषांचा अधिकार असतो म्हणजे त्यांना प्राधान्य असते अशा अर्थाच्या विधानाची शक्यता नाही.

**डिमलक्षणमित्युक्तं मया समासेन लक्षणानुगतम् ।**
**व्यायोगस्य तु लक्षणमतःपरं संप्रवक्ष्यामि ॥८१॥**

व्यायोगस्तु विधिज्ञैः कार्यः प्रख्यातनायकशरीरः ।
अल्पस्त्रीजनयुक्तस्त्वेकाहकृतस्तथा चैव ॥ ८२ ॥

बहवश्च तत्र पुरुषा [1]व्यायच्छन्ते यथा समवकारे ।
न च तत्प्रमाणयुक्तः कार्यस्त्वेकाङ्क एवायम् ॥ ८३ ॥

न च दिव्यनायककृतः कार्यो राजर्षिनायकनिबद्धः ।
युद्धनियुद्धाधर्षण[2]संघर्षकृतश्च कर्तव्यः ॥ ८४ ॥

एवंविधस्तु कार्यो व्यायोगो दीप्तकाव्यरसयोनिः ।
वक्ष्याम्यतःपरमहं लक्षणमुत्सृष्टिकाङ्कस्य ॥ ८५ ॥

याप्रमाणे मी डिमाचे वर्णन लक्षणांनी युक्त असे केले आहे. आता यानंतर मी व्यायोगाचे लक्षण सांगतो. (नाट्याचे) नियम जाणणाऱ्यांनी प्रसिद्ध नायक व कथानक असलेला, थोड्याच स्त्रिया असलेला, तसेच एका दिवसातील वृत्तान्त असलेला, अशा प्रकारे व्यायोगाची रचना करावी. समवकाराप्रमाणेच त्यात पुष्कळ पुरुषांचे चेष्टित असते; परंतु त्याचा विस्तार समवकाराइतका नसतो. फक्त एकच अंक असलेला असा हा व्यायोग करावा. त्यात दिव्य नायक नसावेत, तर राजर्षी नायक असलेला असा व्यायोग करावा आणि युद्ध, द्वन्द्वयुद्ध, आह्वान, संघर्ष यांनी युक्त असलेला असा करावा. अशा प्रकारे आवेशयुक्त रसांचे काव्य असलेल्या व्यायोगाची रचना करावी. आता यानंतर मी उत्सृष्टि-काङ्काचे लक्षण सांगतो.

व्यायोगस्तु डिमस्यैव शेषभूतो दिव्यनायकाभावात्, केवलमत्रोदात्तस्य राजादेः न नायकता अपि त्वमात्यसेनापतिप्रभृतेर्दीप्तरसस्य । अत एवाह प्रख्यातनायकेति । उदात्तग्रहणमपाकर्तव्यमित्यर्थः । यथा समवकार इति द्वादशेत्यर्थः । तावदङ्कपरिमाणशङ्कामतिदेशात् प्रत्यासत्त्या प्रसक्तां वारयितुमाह एकाङ्क एवेति । एवकारेणैकाहचरितविषयत्वान्न्यायप्राप्तमेवात्रैकाङ्कत्वमित्याह । ननु प्रख्यातनायकशब्देन किमत्र गृहीतमित्यतिप्रसङ्गं शमयति न चेति । चो भिन्नक्रमः । दिव्यैर्देवैः नृपैः ऋषिभिश्च नायकैर्न निबद्धोऽयं भवतीत्यर्थः । ननु कस्मादयं व्यायोग इत्याह युद्धनियुद्धेति । व्यायामे युद्धप्राये नियुज्यन्ते पुरुषा यत्रेति व्यायोग इत्यर्थः । नियुद्धं बाहुयुद्धम् । संघर्षः शौर्यविद्याकुल-

१ नि कविभिः कार्या यथा. २ का -संघर्षश्चापि.

**रूपादिकृता स्पर्धा । दीप्तं काव्यमोजोगुणयुक्तम्, दीप्तरसा वीररौद्राद्याः तदुभयं योनिः कारणमस्य ।**

व्यायोग तर दिव्यनायकांचा अभाव असल्यामुळे डिमाच्याच अवशेषासारखा आहे, केवळ यात राजाप्रभृती उदात्त पात्रे नायक नसतात, तर दीप्त रस असलेले अमात्य, सेनापती वगैरे नायक असतात. म्हणूनच 'प्रख्यातनायक' असे म्हटले आहे. 'उदात्त' शब्दाचा समावेश करावयाचा नाही असा याचा अर्थ. 'समवकाराप्रमाणे' म्हणजे बारा असा अर्थ. ह्या अतिदेशामुळे जवळच असलेली तितकीच अंकांची संख्या सुद्धा प्राप्त होईल अशी शंका दूर करण्याकरिता 'एकाङ्क एव' असे म्हणतात. 'एव' शब्दाच्या उपयोगाने एका दिवसाचे वृत्तच व्यायोगाचा विषय असल्यामुळे एक अंक असणे न्यायानेच प्राप्त होते असे दाखवितात. 'प्रख्यातनायक' ह्या शब्दाने काय समजावयाचे याचे उत्तर म्हणून 'न च' इत्यादी शब्दांत अतिप्रसंगाचे निराकरण करतात. 'च' ने भिन्न क्रम दाखविला आहे. दिव्य म्हणजे देव, तसेच राजे आणि ऋषी अशा नायकांनी न रचलेला असा अर्थ. याला व्यायोग का म्हणतात ते 'युद्धनियुद्ध' इत्यादी शब्दांत सांगतात. युद्धप्राय अशा व्यायामात पुरुषांची ज्यात योजना केली जाते तो व्यायोग असा अर्थ. नियुद्ध म्हणजे बाहुयुद्ध. संघर्ष म्हणजे शौर्य, विद्या, कुल, रूप इत्यादिसंबंधात स्पर्धा. दीप्त काव्य म्हणजे ओजस गुणाने युक्त काव्य, दीप्त रस म्हणजे वीर, रौद्र आदी; ते दोन्ही योनि म्हणजे कारण आहेत ज्याचे असा.

'राजादेर्न नायकता' यातील 'न' मुळात नाही. पण तो आवश्यक आहे. कारण व्यायोगात राजा नायक नाही असे अभिनवगुप्ताने पुढे स्पष्ट म्हटले आहे. शिवाय येथे 'न' असल्याशिवाय पुढील 'अपि तु' ची संगती लागत नाही. — 'उदात्तग्रहणम् इ०' नाटकाच्या वर्णनात 'प्रख्यातोदात्तनायकः' असे वचन आहे. त्यातील 'उदात्त' शब्द प्रस्तुत संबंधात वगळून फक्त 'प्रख्यातनायक-' असे म्हटले आहे. त्यावरून राजा वगैरे उदात्त नायक यात अभिप्रेत नाहीत, फक्त प्रख्यात अभिप्रेत आहेत असा निष्कर्ष निघतो. — 'तावदङ्क-' म्हणजे तीन अंक. — 'अतिप्रसङ्गम्' म्हणजे अभिप्रेत असलेल्या व्यक्तीपेक्षा अधिक व्यापक समावेशाचा प्रसंग. — ८४ व्या आर्येतील पूर्वार्धाचा अर्थ लावताना अभिनवगुप्ताने 'न' चा संबंध 'राजर्षिनायकनिबद्धः' शी सुद्धा जोडला आहे. पण तो नाट्यशास्त्रकाराला अभिप्रेत असेलसे निश्चितपणे म्हणता येणार नाही. 'कार्यः' वरून असेच वाटते की राजर्षि नायक असावेत असा त्याचा आशय आहे. आणि टीकेत निर्दिष्ट झाले आहे त्याप्रमाणे राजे व ऋषी असे दोन भिन्न प्रकारचे नायक समजण्याचे काहीच कारण दिसत नाही. — 'न निबद्धो' हस्तलिखितातील 'न निषिद्धो' हे चुकीने आलेले दिसते. — 'नियुज्यन्ते' मुद्रित पाठ 'नियुध्यन्ते' असा आहे. तो संभवनीय नाही. 'व्यायोग' ह्या शब्दाची व्युत्पत्ती व्या+युज् पासून साधली असून 'व्या' चे मूळ 'व्यायाम' मध्ये शोधले आहे आणि 'योग' चा अर्थ विशद करण्यासाठी 'नियुज्यन्ते यत्र' हे शब्द वापरले आहेत. तेथे 'नियुध्यन्ते' वापरले असण्याची शक्यता नाही. — 'दीप्तरसा'

मुळात 'दीप्तरसाद्या' असे आहे. पण त्यातील 'आद्य' निरर्थक आहे. पुढील शब्दातून तो येथे चुकीने पुनरुक्त झाला आहे.

येथील पहिली ८१ वी आर्या नाट्यशास्त्राच्या काही हस्तलिखितांत आढळत नाही. म्हणून बडोदे प्रतीत ती कंसात घातली आहे. ती प्रक्षिप्त असण्याचा बराच संभव आहे. तथापि हे लक्षात ठेवले पाहिजे की अशा तऱ्हेने एका विषयाचा समारोप व दुसऱ्याचा उपन्यास करावयाचा ही नाट्यशास्त्रकाराची पद्धती प्रायः सर्वत्र निदर्शनास येते.

**प्रख्यातवस्तुविषयस्त्वप्रख्यातः कदाचिदेव स्यात् ।**
**दिव्यपुरुषैर्वियुक्तः शेषैर्युक्तो भवेत्पुंभिः ॥ ८६ ॥**

**करुणरसप्रायकृतो निवृत्तयुद्धोद्धतप्रहारश्च ।**
**स्त्रीपरिदेवितबहुलो[1] निर्वेदितभाषितश्चैव ॥ ८७ ॥**

**नानाव्याकुलचेष्टः सात्त्वत्यारभटिकैशिकीहीनः ।**
**[2]कार्यः काव्यविधिज्ञैः सततं ह्युत्सृष्टिकाङ्कस्तु ॥ ८८ ॥**

उत्सृष्टिकाङ्क प्रसिद्ध असे कथानक असलेला अथवा क्वचित प्रसिद्ध नसलेले सुद्धा कथानक असलेला असावा; तो दिव्यपुरुषविरहित व इतर प्रकारच्या पुरुषांनी युक्त असावा. काव्याचे नियम जाणणारांनी उत्सृष्टिकाङ्क नेहमी बहुतांशी करुण रसाने युक्त, युद्ध, उद्धत प्रहार यांनी विरहित, स्त्रियांच्या विलापांनी भरलेला व निर्वेदपूर्ण वचनांनी युक्त, विविध प्रकारच्या व्याकुल चेष्टांनी युक्त आणि सात्त्वती, आरभटी व कैशिकी ह्या वृत्तींनी विरहित असा करावा.

**रौद्राद्यनन्तरं 'रौद्रस्य चैव यत्कर्म स ज्ञेयः करुणः' इत्युक्तत्वात्तत्प्रधानमुत्सृष्टिकाङ्कमेतदनन्तरमाह प्रख्यातवस्तुविषय इति । प्रख्याते भारतादियुद्धे विषये निमित्ते सति यत्करुणबहुलं चेष्टितं वर्ण्यते तत्ख्यातं स्त्रीपर्ववृत्तान्तवत् मा भूदित्यप्रख्यातग्रहणेनोक्तम् । तेनोभयोपादानस्य परस्परविरुद्धार्थत्वादकिंचित्करत्वं नाशङ्कनीयम् । निवृत्तयुद्धा उद्धतप्रहाराः पुरुषा यस्मिन् । परिदेवितं दैवोपालम्भात्मनिन्दारूपमनुशोचनं यत्र । निर्वेदितानि येषु निर्वेदो जायते तादृशि भाषितानि यत्र । व्याकुला चेष्टा भूमिनिपातविवर्तिताद्याः । सात्त्वत्यारभटिकैशिकीहीन इति समाहारद्वन्द्वगर्भद्वन्द्वान्तरगर्भस्तृतीयासमासः । उत्क्रमणीया सृष्टिर्जीवितं प्राणा यासां ता उत्सृष्टिकाः शोचन्त्यः स्त्रियः ताभि-**

१ का -परिदेवन- २ का कर्तव्योऽभ्युदयान्तस्तज्ज्ञैरुत्स-

**रङ्कित इति तथोक्तः । वृत्तिभिरुत्सृष्टत्वादित्यन्ये, तदा द्वित्वं चाद्य....म्। उद्देशे त्वेकदेशेनायमङ्क इति निर्दिष्टो वृत्तानुरोधात् । इह च करुणरसबाहुल्याद्देवैर्वियोगः । रौद्रबीभत्सभयानकसंबधने दिव्ययोगे भवत्यपि, न तु करुणयोगः ।**

'आणि रौद्राचे जे कर्म तो करुण रस असे समजावे' असे मागे म्हटले असल्यामुळे रौद्रादीच्या नंतर करुणरसप्रधान उत्सृष्टिकाङ्काचे ह्या व्यायोगानंतर 'प्रख्यातवस्तुविषयः' इत्यादी शब्दांत वर्णन करतात. प्रख्यात असे भारतादी युद्ध विषय म्हणजे निमित्त झाले असता जे करुणरसपूर्ण चेष्टित वर्णिले जाते ते स्त्रीपर्वातील वृत्तान्तासारखे ख्यात होऊ नये हे 'अप्रख्यात' शब्दाच्या उपयोगाने दाखविले आहे. म्हणून दोन्ही शब्दांचा उपयोग ते परस्परविरुद्ध अर्थाचे असल्यामुळे निरुपयोगी आहे अशी शंका घेण्याचे कारण नाही. युद्धापासून निवृत्त झालेले, उद्धत प्रहार करणारे पुरुष ज्यात आहे असा. परिदेवित म्हणजे दैवाला दोष, स्वतःची निन्दा या स्वरूपाचा विलाप. निर्वेदित म्हणजे ज्यांमध्ये निर्वेद उत्पन्न होतो अशा तऱ्हेची वचने ज्यात आहेत असा. व्याकुल चेष्टा म्हणजे जमिनीवर पडणे, लोळणे इत्यादी. 'सात्त्वत्यारभटिकैशिकीहीनः' यात प्रथम समाहारद्वन्द्व असून त्याच्यासह दुसरा द्वन्द्व आहे व शेवटी तृतीयातत्पुरुष समास आहे. सृष्टि म्हणजे जीवित अर्थात प्राण ते उत्क्रमणीय म्हणजे बाहेर जाण्याच्या बेतात आहेत ज्यांच्या त्या उत्सृष्टिका म्हणजे शोक करणाऱ्या स्त्रिया, त्यांनी चिह्नित झालेला म्हणून उत्सृष्टिकाङ्क हे नाव प्राप्त झालेला. दुसऱ्यांच्या मते वृत्तींनी उत्सृष्ट म्हणजे टाकलेला म्हणून हे नाव पडले आहे. तेव्हा द्वित्व .... पण उद्देशात एका भागावरून वृत्ताच्या सोयीसाठी याचा अङ्क असा निर्देश केला आहे. आणि यात करुणरसाचे बाहुल्य असल्यामुळे देवांचा समावेश नाही. रौद्र, बीभत्स व भयानक ह्या रसांचा संबन्ध देव समाविष्ट असतानाही होतो, परंतु करुणरसाचा नाही.

'रौद्रस्य चैव इ०' हा सहाव्या रसाध्यायातील (६.४०) करुणरसाच्या उत्पत्तीसंबंधीचा निर्देश आहे. रौद्र रसाच्या आविर्भावानंतर त्यातील वध वगैरेमुळे करुणरसाला अवकाश प्राप्त होतो. – 'यत्करुणबहुलं' हस्तलिखितात 'यत्'च्या जागी 'तत्' आहे आणि मुद्रितात 'यत्तत्'. – 'मा भूत्' येथे काही तरी अंश गहाळ झाला असावा असे वाटते. आहेत या शब्दांतून असा अर्थ निष्पन्न होऊ शकतो की स्त्रीपर्वातील वृत्तान्त जसा ख्यात म्हणजे प्रसिद्ध आहे तशी प्रसिद्धी उत्सृष्टिकाङ्कातील करुण चेष्टिताला नसावी. पण मूळ आर्येत तशी प्रसिद्धी नसली तरी चालेल असा अर्थ अभिप्रेत आहे. आणि तिच्यात परस्परविरोध आहे अशी शंका उत्पन्न होण्यासारखी नाही. – 'येषु निर्वेदो जायते' मुद्रित पाठ 'येषु श्रुतेषु निर्वेदो जायते' असा आहे. पण तो बरोबर वाटत नाही. 'निर्वेदित' शब्द व्याकरणाच्या 'तदस्य संजातं इ०' नियमानुसार 'इतच्' प्रत्यय लागून बनला आहे असे येथे दाखविले आहे. आणि निर्वेद होतो तो शोक करणारालाच, विलाप ऐकणाराला नाही. – 'सात्त्वत्यारभटि इ०' ह्या समासाचा विग्रह पुढीलप्रमाणे केला आहे –'सात्त्वत्यारभटि' हा समाहारद्वन्द्व. म्हणून नपुंसकलिंगी एकवचन 'जातिरप्राणिनाम्' ह्या सूत्राप्रमाणे. ह्रस्व

'-टि' ची उपपत्ती लावण्यासाठी हा खटाटोप. पुढे हा शब्द व कैशिकी मिळून दुसरा द्वन्द्व होतो आणि शेवटी 'हीन' लागताना तृतीयातत्पुरुष समास होतो. – 'तदा द्वित्वं चाद्य...म्' असा खंडित पाठ हस्तलिखितात आहे. त्याने काही अर्थबोध होत नाही. मुद्रित पाठ 'द्वित्वं च त्रित्वम्' आहे. तोही अर्थबोधास उपयुक्त ठरत नाही. – 'उद्देशे त्वेकदेशेन' ही दुरुस्ती आहे. उद्देश म्हणजे वर दुसऱ्या व तिसऱ्या आर्येत केलेला दहा रूपकांचा नामनिर्देश. त्या ठिकाणी उत्सृष्टिकाङ्क शब्द न वापरता केवळ 'अङ्क' असा त्याचा उल्लेख केला आहे. तो त्या संपूर्ण नावाच्या एका अंशाच्या अनुरोधाने केला आहे असे येथे म्हणावयाचे आहे. तेव्हा 'उद्देशे तु एकदेशेन' असा पाठ आवश्यक आहे. हस्तलिखितात त्याचे 'उद्देशत्वैकदेशेन' असे भ्रष्ट रूप झाले. मुद्रित पाठ 'उद्देशस्यैकदेशेन' अर्थहीन आहे. – 'देवैः' मुळात 'देवदेवैः' आहे. त्यात देव शब्दाची चुकीने पुनरावृत्ती झाली आहे.

**यद्दिव्यनायककृतं काव्यं संग्रामबन्धवधयुक्तम् ।**
**तद्भारते तु वर्षे कर्तव्यं काव्यबन्धेषु ॥ ८९ ॥**

**कस्माद्भारतमिष्टं[1] वर्षेष्वन्येषु देवविहितेषु[2] ।**
**हृद्या सर्वा भूमिः शुभगन्धा काञ्चनी यस्मात् ॥ ९० ॥**

**उपवनगमनक्रीडाविहारनारीरतिप्रमोदाः स्युः ।**
**तेषु हि वर्षेषु सदा न तत्र दुःखं न वा शोकः ॥ ९१ ॥**

**ये तेषामधिवासाः पुराणवादेषु पर्वताः[3] प्रोक्ताः ।**
**संभोगस्तेषु भवेत्कर्मारम्भो भवेदस्मिन् ॥ ९२ ॥**

परंतु, ज्या काव्याचे नायक दिव्य असून ज्यात युद्ध, बंधन व वध ह्या गोष्टी असतात त्याची रचना करताना ते भारतवर्षात घडते असे दाखवावे. भारतवर्षच यासाठी का इष्ट मानायचे? कारण, देवांसाठी म्हणून ठरवून दिलेल्या दुसऱ्या वर्षांमध्ये सर्व भूमी मनाला आल्हाद देणारी, शुभ गंध असलेली आणि सुवर्णमय अशी आहे; त्या वर्षांमध्ये उद्यानात जाणे, क्रीडा, विहार, स्त्रीबरोबर रती व आनंद या गोष्टी नेहमी असून तेथे दुःख किंवा शोक यांचे अस्तित्व नसते. पुराणांतील वर्णनांत त्या देवांचे वास असणारे म्हणून जे पर्वत सांगितले आहेत त्यांवर त्यांचा उपभोग चालू असतो, ह्या भारतवर्षात त्यांच्या कर्माचा आरंभ असावा.

१ का तस्मात्. २ का नित्यकालं हि. का ३ पर्वता गदिताः.

नन्वेवं देवानां युद्धाद्यप्यनुचितमित्याशङ्क्य प्रसङ्गात्समवकारादौ देशविशेषोपयोगं दर्शयति दिव्यनायककृतमिति । तेषां भारतवर्षावतीर्णानां युद्धादिकं प्रदर्शयेदित्यर्थः । अत्र त्वज्ञः पृच्छति कस्माद्भारतमिष्टमिति । अत्र प्रयोगे प्रतिवक्ति वर्षेष्वन्येष्विति । देशत्वेन भोगभूमित्वेन विहितेष्वपीत्यर्थः । उपवनं गत्वा क्रीडा जलक्रीडादिकाः । विहरणमुपवन एव संचरणम् । नार्या सह रतिः संभोगः । प्रमोदो दिव्यपानादिकृतम् । नन्वेदमिलावृतकुरुप्रभृतिषु वर्षेषु मा तेषां देवानां वृत्तं व्याख्यायि, तथापि स्वनिवासेषु व्यावर्ण्यतामित्यत आह ये तेषामपि वासा इति । वसन्ति तेष्विति वासाः । पर्वता इति कैलासादयः । संभोग इति सा हि तेषां भूमिः भोगस्थानम् । अस्मिन्निति भारतवर्षे कर्मारम्भः । आरम्भग्रहणेनेदमाह न तेषां दुःखं पूर्णं कदाचिद्भवति । दुःखपूर्णतायां देवत्वस्यैव विघातान्नवस्थानप्राप्त्या स्वरूपलोप इति युक्तमुक्तम् । करुणरसबाहुल्यादुत्सृष्टिकाङ्के दिव्यैर्वियोग एव तेषां सुखबाहुल्यात्, तत्संनिधाने अन्यस्यापि शोकावसरपराकृतेरिति । गाढदुःखाभिभूता एवंभूतप्रयोगदर्शने सति 'दुःखी दुःखाधिकान् पश्येत्' इति नीत्या प्रतनूभूतदुःखभाराः सुखेन विनेया भवन्ति, यथोक्तं प्राक् 'स्थैर्यं दुःखार्दितस्य च' इति ।

असे असेल तर देवांच्या संबंधात युद्ध वगैरे गोष्टी सुद्धा अनुचित होत अशी शंका उपस्थित करून प्रसंगवशात समवकार आदी प्रकारांत विशिष्ट देशाचा करावयाचा उपयोग 'दिव्यनायककृतम्' इत्यादी शब्दांत दाखवितात. भारतवर्षात ते अवतीर्ण झाले म्हणजे त्यांचे युद्ध वगैरे दाखवावे असा याचा अर्थ. येथे अज्ञ मनुष्य विचारतो की कोणत्या कारणामुळे भारतवर्षच इष्ट आहे? यासंबंधात प्रयोगाच्या दृष्टीने 'वर्षेष्वन्येषु' इत्यादी शब्दांत उत्तर देतात. देश म्हणून म्हणजे भोगभूमी म्हणून नियोजित झालेल्या वर्षांमध्ये सुद्धा असा अर्थ. उपवनात जाऊन क्रीडा म्हणजे जलक्रीडा वगैरे. विहरण म्हणजे उपवनातच फिरणे. स्त्रीबरोबर रति म्हणजे संभोग. प्रमोद दिव्य पान वगैरेमुळे होणारा. येथे आक्षेप असा की इलावृत, कुरु इत्यादी वर्षांमध्ये देवांचे वृत्त याप्रमाणे वर्णन करू नये हे ठीक आहे, परंतु त्यांच्या स्वतःच्या निवासस्थानीं त्याचे वर्णन करता येईल. त्याचे समाधान 'ये तेषामपि वासाः' या शब्दांत करतात. त्यांत राहातात म्हणून ते त्यांचे वास. पर्वत म्हणजे कैलासप्रभृती. संभोग म्हणजे ही भूमी त्यांचे भोगस्थान होय. ह्या म्हणजे भारतवर्षात त्यांच्या कर्माचा प्रारंभ होतो. 'आरम्भ' शब्द वापरून असे दाखवितात की त्यांचे दुःख कधीही पूर्ण होत नाही. त्यांना पूर्णपणे दुःख झाल्यास देवपणाचाच नाश होऊन नवीन स्थिती प्राप्त झाल्याने त्यांच्या स्वरूपाचा लोप होईल म्हणून योग्य तेच सांगितले आहे. उत्सृष्टिकाङ्कामध्ये करुणरसाचे प्राधान्य असल्याकारणाने देवांची अनुपस्थितीच असते, कारण त्यांच्यात सुखाचे प्राबल्य असते, आणि ते उपस्थित असता इतरांच्याही शोकाला अवसर प्राप्त होत नाही. अशा प्रकारच्या प्रयोगाचे दर्शन झाले असता गाढ दुःखाने पीडित झालेले प्रेक्षक 'दुःखी

मनुष्याने आपल्याहून अधिक दुःखी मनुष्यांना बघावे' ह्या न्यायाने दुःखाचा भार हलका झाल्यामुळे सहजगत्या बोध घेण्यास योग्य होतात. 'दुःखाने त्रासलेल्याला स्थैर्य प्राप्त होते' असे पूर्वी सांगितलेलेच आहे.

'युद्धाद्यपि' ही मुळातील 'युद्धान्यपि' ची दुरुस्ती आहे. 'अनुचितम्' शी 'युद्धानि समानाधिकरण असणे शक्य नाही. –'त्वज्ञः' असे मुळातील 'राज्ञः' च्या जागी सुचविले आहे. राजाचा येथे काही संबंध नाही. आणि षष्ठीचे रूपही संभवनीय वाटत नाही. 'पृच्छति' ला 'अज्ञः' सारखे कर्तृपद आवश्यक आहे. 'प्राज्ञः' पेक्षा 'अज्ञः' अधिक संभाव्य आहे. – 'प्रयोगे प्रतिवक्ति' यातील 'प्रयोगे' शब्द विशेष समर्पक वाटत नाही. – 'देशत्वेन इ०' यावरून हे स्पष्ट आहे की अभिनवगुप्ताचा आर्येतील पाठ 'देशविहितेषु असा होता, 'देवविहितेषु' असा नाही. — 'ये तेषामपि वासाः' असाच अभिनवगुप्ताचा आर्येतील पाठ होता हे उघड आहे. त्याने 'वास' शब्दाचा अर्थ दिला आहे, 'अधिवास' शब्दाचा नाही. आणि त्याचाच पाठ अधिक समुचित वाटतो. 'अपि' शब्दाने मागील आर्यांत निर्दिष्ट झालेल्या पृथ्वीवरील वर्षांहून भिन्न अशा स्थानाच्या निर्देशाचे आवश्यक सूचन केले जाते. –'अस्मिन्निति' मुळात 'तस्मिन्निति' आहे. ते बरोबर नाही. – 'विघातान्नवस्थानप्राप्त्या' असा हस्तलिखितात पाठ आहे. मुद्रितात 'विघातानव-' असे आहे. 'विघातात्' असे पंचमीचे रूप आवश्यक आहे. पण 'नवस्थान' हे समर्पक वाटत नाही. स्थिती या अर्थी 'स्थान' शब्द वापरलेला असावा. मुद्रितातील 'अनवस्थान' संभाव्य नाही. – 'उत्सृष्टिकाङ्के' ही मुळातील 'उत्सृष्टिकाङ्कैः' ची दुरुस्ती आहे. सप्तमीचे एकवचनच अपेक्षित आहे, तृतीयेचे बहुवचन नाही. पुढील 'दिव्यैः' मधील विभक्तीचा ह्या शब्दावर परिणाम झालेला दिसतो. –'दुःखी दुःखाधिकान् पश्येत्' आपल्यापेक्षा अधिक दुःख असलेला मनुष्य पाहिल्यावर स्वतःचे दुःख सहन करणे शक्य होऊन त्याचा भार हलका होतो असा अनुभव आहे. –'स्थैर्यं दुःखार्दितस्य' पहिल्या अध्यायाच्या शेवटी नाट्याची महती गाताना त्याच्या दर्शनाने होणाऱ्या विविध प्रकारच्या लाभाचा निर्देश केला आहे, त्यात हा एक लाभ सांगितला आहे (१.१११).

**प्रहसनमपि विज्ञेयं द्विविधं शुद्धं तथा च संकीर्णम् ।**
**वक्ष्यामि[1] तयोर्युक्त्या पृथक्पृथग्लक्षणविशेषम्[2] ॥ ९३ ॥**
**भगवत्तापसविप्रैरन्यैरपि हास्यवादसंबद्धम् ।**
**कापुरुषसंप्रयुक्तं[3] परिहासाभाषणप्रायम् ॥ ९४ ॥**
**अविकृतभाषाचारं विशेषभावोपपन्नचरितपदम् ।**
**नियतगतिवस्तुविषयं शुद्धं ज्ञेयं प्रहसनं तु ॥ ९५ ॥**
**वेश्याचेटनपुंसकविटधूर्ता बन्धकी च यत्र स्युः ।**
**अनिभृतवेषपरिच्छदचेष्टितकरणैस्तु[4] संकीर्णम् ॥ ९६ ॥**

१ का तस्य व्याख्यास्येऽहं. २ का -विशेषान्. ३ का नीचजन-. ४ का– करणात्तु.

प्रहसन सुद्धा शुद्ध व संकीर्ण असे दोन प्रकारचे आहे असे समजावे. त्यांची निरनिराळी विशेष लक्षणे योग्य प्रकारे सांगतो. साधु, तपस्वी, ब्राह्मण तसेच इतर ही मनुष्यांच्या हास्यास्पद वादाशी संबद्ध, हीन पुरुषांनी योजलेले, मुख्यतः परिहासरूप संवाद असलेले, भाषा व आचार विकृत नसलेले, विशेष भावांनी संपन्न असे चरित असलेले आणि ज्यातील कथानकाची गती ठरलेली असते ते प्रहसन शुद्ध होय असे समजावे. परंतु, ज्यात वेश्या, चेट, नपुंसक, विट, धूर्त आणि छिनाल स्त्री असतात ते प्रहसन अविनीत वेष, रूप आणि चेष्टा यांच्यामुळे संकीर्ण होते.

**उत्सृष्टिकाङ्कप्रयोग एवं रञ्जनप्रधानेन करुणेन युक्तं रूपकमभिधाय रञ्जनाप्रधानं हास्यप्रायं प्रहसनं लक्षयति विभागमुखेन प्रहसनमपि विज्ञेयमिति । द्विविधमिति विभागः शुद्धं संकीर्णं चापीति । अपिशब्दोऽतिक्रमः । तथेति सामान्यलक्षणम् । तदयमर्थः द्विविधमपि तथा प्रहसनरूपं हास्यरसप्रधानमित्यर्थः । लक्षणविशेषं विशेषलक्षणम् । भगवत्तापसविप्रा यतिवानप्रस्थगृहस्थाः । अन्ये शाक्यादयः, तैरुपलक्षितम् । हास्यप्रधानवचनसंबद्धम् । शीलनादिना कुत्सितैः पुरुषैरत एव प्रहस्यमानै सामर्थ्यात्तैरेव भगवदादिभिर्युक्तम् । तथापि च भाषाचारौ यत्र न विकृतावसत्याश्लीलरूपौ । तथा विशेषेण भावैर्व्यभिचारिभिरुपपन्नानि पदानि कथाखण्डानि यस्मिन् । नियतगति एकप्रचारं यद्वस्तु तद्विषयः प्रहसनीयलक्षणः यत्र तच्छुद्धं प्रहसनम् । अत्र निर्वचनं यतः परिहासप्रधानान्याभाषणान्यत्र बाहुल्येन भवन्ति तेन यत्रैकस्यैव कस्यचिच्चरितं दुष्टत्वात्प्राधान्येन प्रहस्यते तच्छुद्धमित्यर्थः । यत्र तु वेश्यादिभिर्योगोऽत्युल्बणं चाकल्पादि तदेकद्वारेणानेकवेश्यादिचरितेन हसनीयेन संकीर्णत्वात् संकीर्णम् । अन्ये त्वाहुः येषां स्वभावत एव चरितं शिष्टमध्ये सभ्येतरतमत्वेन प्रहसनार्हं तदविशुद्धत्वात्संकीर्णम्, तद्योगाच्च रूपकम् । ये तु स्वभावतो न गर्हिता भगवत्तापसादिचेष्टाविशेषास्तेषां प्राकृतपुरुषसंक्रान्तिदौरात्म्योदितावद्यसंबन्धदूष्यमाणतया प्रहसनीयतां यातास्ते स्वभावशुद्धाः, तद्योगाद्रूपकं शुद्धमिति ।**

याप्रमाणे उत्सृष्टिकाङ्काच्या प्रयोगाच्या संबंधात रञ्जनप्रधान अशा करुण रसाने युक्त असलेल्या रूपकाचे वर्णन केल्यावर मुख्यतः हास्यरस असलेल्या रञ्जनाप्रधान प्रहसनाचे लक्षण 'प्रहसनमपि विज्ञेयम' इत्यादी शब्दांत भेदांच्या निर्देशाच्या द्वारे करतात. द्विविध म्हणजे शुद्ध आणि संकीर्ण असे विभाग असलेले सुद्धा. 'अपि' शब्द क्रमबाह्य होय. तथा म्हणजे सामान्य लक्षण. म्हणून अर्थ असा—दोन्हीही प्रकार तसे प्रहसनाच्या रूपाचे म्हणजे हास्यरसप्रधान असतात हा तात्पर्यार्थ. लक्षणविशेष म्हणजे विशेष लक्षण. 'भगवत्तापसविप्राः' म्हणजे अनुक्रमे संन्यासी, वानप्रस्थ आणि गृहस्थ. दुसरे म्हणजे बौद्ध

इत्यादी, त्यांनी उपलक्षित झालेले असे. हास्यप्रधान अशा वचनांशी संबद्ध असलेले. आचार विचार आदींत हीन असलेल्या व म्हणूनच हास्यास्पद असलेल्या पुरुषांनी — संदर्भाच्या सामर्थ्यामुळे त्याच संन्यासी आदींनी युक्त असे. आणि तरीही ज्यात भाषा व आचार विकृत म्हणजे असत्य व अश्लील स्वरूपाचे नाहीत असे. तसेच विशेषेकरून व्यभिचारिभावांनी युक्त अशी पदे म्हणजे कथेचे अंश ज्यात आहेत असे. नियतगति म्हणजे एकाच स्वरूपाचा प्रचार असलेले जे कथानक त्याचा हास्यकारक स्वरूपाचा विषय ज्यात असतो ते शुद्ध प्रहसन. ह्या बाबतीत व्युत्पत्ती अशी—ज्याअर्थी यात परिहासप्रधान वक्तव्ये प्राचुर्याने असतात त्याअर्थी जेथे मुख्यत्वेकरून एकाच्याच कोणाच्या तरी चरिताला ते दूषित असल्यामुळे लोक हसतात ते शुद्ध प्रहसन होय असा अर्थ. परंतु जेथे वेश्या आदींचा संबंध असतो व जे अति भडक व उच्छृङ्खल वगैरे असते ते एका प्रसंगात अनेक वेश्या आदींची हास्यकर चरिते संमिश्रित झाल्यामुळे संकीर्ण प्रहसन. परंतु इतर टीकाकार म्हणतात की ज्यांचे चरित स्वभावतःच अतिशय असभ्य असल्यामुळे शिष्ट लोकांत हास्यास्पद होते ते त्यांचे चरित अविशुद्ध म्हणून संकीर्ण, आणि त्याच्या संयोगाने रूपक संकीर्ण. परंतु स्वभावतः निन्द्य नाहीत अशा ज्या संन्यासी, तापस आदींच्या विशिष्ट चेष्टा त्यांच्या सामान्य मनुष्यात होणाऱ्या संक्रमणाच्या दुष्प्रवृत्तीने उत्पन्न झालेल्या निंद्य संबंधाच्या दूषणीयतेमुळे हास्यकारक होतात त्या चेष्टा स्वभावतः शुद्ध आणि त्यांच्या संयोगाने रूपक शुद्ध.

'उत्सृष्टिकाङ्कप्रयोगे' यातील 'प्रयोग' शब्दाची काही आवश्यकता दिसत नाही. बडोदे प्रतीत '-प्रयोगः' असा पाठ स्वीकारला असून ह्या शब्दाचा समावेश अगोदरच्या वाक्याच्या अंती 'स्थैर्ये दुःखार्दितस्य च इत्युत्सृष्टिकाङ्कप्रयोगः' याप्रमाणे केला आहे. तसा पाठ संभवनीय दिसत नाही. — 'रञ्जनप्रधानेन' जे रस पुरुषार्थाला साहाय्यक नाहीत ते रञ्जनप्रधान अशी कल्पना आहे आणि तदनुसार पुढे करुण, हास्य व भयानक यांना रञ्जकरस म्हटले आहे. — 'रञ्जना' आणि 'रञ्जन' यांत फरक नाही. — 'अपिशब्दोऽतिक्रमः' ह्या वचनाचा अर्थ स्पष्ट नाही. पुढील विवरणावरून असे दिसते की 'अपि' शब्दाचे आर्येत 'प्रहसनम्' नंतर जे स्थान आहे ते बदलून 'द्विविधम्' नंतर तो शब्द समजावयाचा. 'आर्येतील शब्दांचा क्रम ओलांडून' असा 'अतिक्रमः' शब्दाचा अर्थ असावा. — 'तथा प्रहसनरूपम्' तथा म्हणजे सामान्यलक्षण असे म्हटले असल्यामुळे आर्येतील 'प्रहसनम्' शब्दात लक्षण दिले असून त्याचा हास्यरसप्रधान असा अर्थ आहे अशी अभिनवगुप्तकृत व्याख्या आहे हे उघड आहे. आर्येत प्रहसनाचे लक्षण नसून त्याच्या दोन प्रकारांचेच सामान्य लक्षण दिले आहे असे त्याचे म्हणणे दिसते. — 'संबद्धम्' मुळात 'संबन्ध' असे रूप असून तो शब्द पुढील 'शीलनादिना' शी समासाने जोडला आहे. ते बरोबर नाही. — 'शीलन' म्हणजे मनन, विचार, तसेच आचार, कृती इत्यादी. — 'पदानि कथाखण्डानि' आर्येतील 'चरित' शब्दाची व्याख्येत आवृत्ती अपेक्षित आहे. मूळ पाठ 'चरितपदानि' असा असावा. 'कथाखण्डानि' च्या जागी हस्तलिखितात 'कथाद्यन्ता' असा पाठ आहे. आदि आणि

अन्त ह्यांचाच निर्देश समुचित ठरणार नाही. – 'दुष्टत्वात्' म्हणजे दोषयुक्त असल्यामुळे. – 'अकल्प' म्हणजे नियंत्रण नसलेले, उच्छृंखल. अभिनवगुप्ताच्या मते दोन प्रकारांतील फरक असा की शुद्ध प्रहसनात फक्त एकाचेच हास्यास्पद चरित प्रदर्शित होते तर संकीर्ण प्रहसनात अनेक हास्यकारक पात्रे असतात; शिवाय शुद्ध प्रकारात पात्राच्या दोषयुक्त चरिताने हास्य उत्पन्न होते, तर संकीर्णात पात्रांच्या अनिर्बंध वागणुकीमुळे ते उत्पन्न होते. अर्थात शुद्धात भगवत्तापसविप्र अशा तऱ्हेचे पात्र आणि संकीर्णात वेश्या, विट अशी पात्रे हा मुळातील भेद आहेच. – 'सभ्येतर' म्हणजे असभ्य. – 'तेषाम्' म्हणजे त्या चेष्टाविशेषांचा. – '-दौरात्म्योदितावद्यसंबन्ध-' यातील '-तावद्य-' च्या जागी मुद्रित पाठ '-तामन्य-' असा आहे, पण तो बरोबर नाही. 'अवद्य' म्हणजे गर्हणीय, निंद्य. या टीकाकारांना असे म्हणावयाचे आहे की संन्यासी प्रभृतींचे जे स्वाभाविक चेष्टित असते ते एखाद्या सामान्य मनुष्याच्या ठिकाणी संक्रांत झालेले दिसून आले तर ते उपहास करण्याच्या दुष्ट हेतूने केलेले असल्यामुळे पात्र आणि त्याचे चेष्टित यांत निंद्य असा संबंध प्रस्थापित होतो व तो संबंध दूषणीय असल्यामुळे त्याचे चेष्टित हास्यकारक होते. म्हणजे ह्या टीकाकारांच्या मते चेष्टित मूलतः शुद्ध असेल तर त्याचे विडंबन करणारे प्रहसन शुद्ध व चेष्टित जर मूलतःच असभ्य असेल तर त्याचे दर्शन घडविणारे प्रहसन संकीर्ण. – 'याताः शुद्धाः' ही 'चेष्टाविशेषाः' ची विशेषणे.

बडोदे प्रतीत ९३ व्या आर्येचा पूर्वार्ध व उत्तरार्ध यांच्या मध्ये पुढील आर्या छापली आहे–

**अङ्कस्य लक्षणमिदं व्याख्यातमशेषयोगमात्रगतम् ॥**
**प्रहसनमतःपरमहं सलक्षणं संप्रवक्ष्यामि ।**

काही थोड्याच हस्तलिखितांत उपलब्ध झाल्यामुळे प्रक्षिप्त म्हणून ती कंसात छापली आहे ते ठीक आहे. पण दुसऱ्या आर्येची त्यासाठी विभागणी का केली आहे ते समजत नाही.

**लोकोपचारयुक्ता या वार्ता यश्च दम्भसंयोगः ।**
**स[1] प्रहसने प्रयोज्यो धूर्तप्रविवादसंपन्नः ॥ ९७ ॥**

**वीथ्यङ्गैः[2] संयुक्तं कर्तव्यं प्रहसनं यथायोगम् ।**
**भाणस्यापि तु लक्षणमतःपरं संप्रवक्ष्यामि ॥ ९८ ॥**

लोकांमध्ये प्रसिद्ध असलेल्या आचाराने युक्त असलेली जी गोष्ट असेल आणि धूर्त लोकांच्या संभाषणातून निष्पन्न होणारे ढोंगाचे जे दर्शन असेल त्यांची प्रहसनात योजना करावी. उपयोग करता येईल त्याप्रमाणे वीथीच्या अंगांनी युक्त अशी प्रहसनाची रचना करावी. आता यानंतर मी भाणाचे सुद्धा लक्षण सांगतो.

१ नि तत्प्रहसनेषु योज्यं धूर्तोक्तविवादसंयुक्तम्, का तत्प्रहसने प्रयोज्यं धूर्तविट-विवादसंपन्नम्. २ का उद्घात्यकादिभिरिदं वीथ्यङ्गैर्मिश्रितं भवेन्मिश्रम्.

**उभयसाधारणीमपि कवेः शिक्षामाह लोकोपचारेति । वार्ता प्रसिद्धिः यदि सा लोकव्यवहारसिद्धा भवति यथा शाक्यानां स्त्रीसंपर्कः प्रहसनीयो भवति, न चौर्यम् । एवं दम्भोऽपि प्रसिद्ध एवोपहसनीयः । अत्राधिकरणं स्वयमेवाह धूर्तप्रविवादेति । धूर्ताः कृत्रिमतापसादयो विटादयश्च, तद्विषये यः प्रकृष्टो विवादो विरुद्धतयावभासस्तेन फलभूतेन संपाद्यतया यदुक्तं प्रहस्यमानम् । तथाभूतचरितावलोकनेन हि असंस्कृतामिति व्युत्पाद्यो न भूयस्तान्वञ्चकानुपसर्पतीति । वीथ्यङ्गैरिति वक्ष्यमाणैः । यथायोगमिति तेषां संप्रयोगे संख्यायाः क्रमस्य तु न कश्चिन्नियम इति दर्शयति । प्रहसनस्याङ्कनियमानभिधानात् शुद्धमेकाङ्कं संकीर्णं त्वनेकाङ्कं वेश्यादिचरितसंख्याबलादिति केचित् । अन्ये त्वेकाङ्कप्रकरणमध्यपातित्वादेकाङ्कमिति मन्यन्ते प्रथमसंख्यातिक्रमे भेदाभावपरित्यागे च प्रमाणाभावात् ।**

दोन्ही प्रकारांना समान असे नियम कवींसाठी 'लोकोपचार' इत्यादी शब्दांत सांगतात. वार्ता म्हणजे प्रसिद्धी, जर ती लोकांच्या व्यवहाराला धरून असेल तर; उदाहरणार्थ, बौद्धांच्या बाबतीत स्त्रीसंपर्क हास्यास्पद होय, चोरी नाही. याचप्रमाणे ढोंग सुद्धा प्रसिद्ध असेल तरच हास्यास्पद होते. याच्या संबंधात आश्रय कोठे असतो ते स्वतःच 'धूर्तप्रविवाद' या शब्दात सांगतात. धूर्त म्हणजे ढोंगी तपस्वी वगैरे आणि विट वगैरे, त्यांच्याविषयी जो प्रकृष्ट विवाद म्हणजे विरुद्ध स्वरूपात आभास, तो फलरूपाने संपादित करण्यासाठी जे हास्यकर वचन ते. कारण तशा प्रकारच्या चरिताच्या अवलोकनाने व्युत्पाद्य प्रेक्षक 'हे सुसंस्कृत नाही' असे जाणून पुन्हा त्या ढोंग्यांच्या जवळ जात नाही. 'वीथ्यङ्गैः' म्हणजे पुढे सांगितली जाणारी त्यांनी. 'यथायोगम्' म्हणजे त्यांच्या उपयोगात संख्या व क्रम यांचा काही नियम पाळावयाचा नाही हे दाखवितात. प्रहसनाच्या संबंधात अंकांच्या संख्येविषयी नियम सांगितला नसल्यामुळे काहींच्या मते शुद्ध प्रहसन एकांकी आणि संकीर्ण अनेकांकी, कारण त्यात वेश्या आदींच्या चरितांची संख्या अधिक असते. पण इतरांचे मत असे आहे की एकांकी रूपकांच्या मध्ये याचा समावेश असल्यामुळे हे एकांकीच होय; कारण पहिली संख्या ओलांडण्यास आणि भिन्नतेच्या अभावाचा त्याग करण्यास काही प्रमाण नाही.

'लोकव्यवहारसिद्धा' यावरून असे दिसते की हास्यास्पद गोष्टी कोणत्या याबद्दलचे काही संकेत ठरलेले असतात. एखाद्याच्या स्वभावसिद्ध वागणुकीशी विसंगत अशी गोष्ट त्याने केली तर ते हास्यास्पद ठरते. बौद्ध भिक्खूंच्या बाबतीत स्त्रीसंपर्क हास्यास्पद होय असा सर्वमान्य संकेत होता ही गोष्ट सहज समजण्यासारखी आहे. – 'एवं दम्भोऽपि' ही मुळातील 'एव भावि' ह्या भ्रष्ट पाठाची केलेली दुरुस्ती आहे. दुरुस्त पाठच आवश्यक आहे व त्याचेच भ्रष्ट रूप हस्तलिखितात उत्पन्न झाले आहे हे उघड आहे. – 'अत्र' म्हणजे ह्या दंभाच्या बाबतीत. – **'अधिकरणम्'** म्हणजे दंभ ज्यांच्या ठिकाणी आढळतो अशी पात्रे. – 'कृत्रिम- इ०' शुद्ध प्रहसनात

आणि 'विटादयः' संकीर्ण प्रहसनात. – 'विरुद्धतया इ०' आर्येतील 'प्रविवादसंपन्नः' याचा अर्थ लावला आहे तो असा – ज्या वचनांनी (वाद) पात्रांच्या संबंधात अतिशय (प्र) विरुद्ध अथवा विसंगत (वि) असा आभास उत्पन्न होईल अशा हास्यकारक वचनांनी युक्त. हे 'दंभसंयोगः' चे वर्णन आहे. – 'असंस्कृतमिति' ही मुळातील 'संस्कृतमिति' ची सुचविलेली दुरुस्ती आहे. व्युत्पाद्य म्हणजे ज्याला बोध करावयाचा असा प्रेक्षक, त्याला जर रंगभूमीवरील दृश्य असंस्कृत वाटले तरच तो प्रत्यक्षात तसल्या धूर्त माणसांपासून दूर राहील. ते दृश्य संस्कृत वाटल्यास त्याच्यावर उलटाच परिणाम होण्याचा संभव आहे. – 'एकाङ्कप्रकरण-' यातील प्रकरण शब्द सर्वसामान्य रूपकासाठी वापरला आहे. – 'प्रथमसंख्यातिक्रमे' मुळात 'प्रथमसंख्ययातिक्रमे' असे आहे. पण ते बरोबर नाही. प्रथम संख्या म्हणजे एक ही संख्या, तिचे अतिक्रमण अभिप्रेत आहे, तिच्याकडून होणारे नाही. – 'भेदाभावपरित्यागे' शुद्ध व संकीर्ण प्रहसनात अंकांच्या संख्येच्या बाबतीत भिन्नतेचा अभाव नाट्यशास्त्रावरून गृहीत धरावा लागतो. त्याचा त्याग करून निरनिराळ्या अंकसंख्या मानण्यास काही आधार नाही, असा हा युक्तिवाद आहे.

**आत्मानुभूतशंसी परसंश्रयवर्णनाविशेषस्तु ।**
**[1]विविधाश्रयो हि भाणो विज्ञेयस्त्वेकहार्यश्च ॥ ९९ ॥**

**परवचनमात्मसंस्थं प्रतिवचनैरुत्तरोत्तरग्रथितैः ।**
**आकाशपुरुषकथितैरङ्गविकारै[2]रभिनयेत्तत् ॥ १०० ॥**

**धूर्तविटसंप्रयोज्यो नानावस्थान्तरात्मकश्चैव ।**
**एकाङ्को बहुचेष्टः सततं कार्यो बुधैर्भाणः ॥ १०१ ॥**

स्वतःचा अनुभव कथन करणारा व दुसऱ्यांसंबंधी विशेष वर्णन करणारा विविध चेष्टितांसंबंधीचा एकाच पात्राच्या द्वारा केला जाणारा तो भाण होय असे समजावे. दुसऱ्याची वचने स्वतः उच्चारून आकाशभाषिताच्या साहाय्याने प्रश्न व त्यांची उत्तरे यांच्या ग्रथनाच्या द्वारा, तसेच अंगविक्षेपाच्या द्वारा त्याचा अभिनय करावा. विद्वान कवींनी नेहमी धूर्त व विट यांची योजना असलेला, तसेच विविध अवस्थांनी परिपूर्ण असलेला, एका अंकात रचलेला व पुष्कळ चेष्टितांनी युक्त असा भाण निर्माण करावा.

**अथ हास्यरसोचितविटधूर्ताद्यनुप्रवेशेन समानयोगक्षेमं भाणं लक्षयितुमाह आत्मानुभूतशंसीति । एकेन पात्रेण हरणीयः सामाजिकहृदयं प्रापयितव्योऽर्थो यत्र स भाणः । एकमुखेनैव भाण्यन्ते उक्तिमन्तः क्रियन्ते अप्रविष्टा अपि पात्रविशेषा यत्रेति भाणः । तत्र स प्रविष्टः पात्रविशेषः आत्मानुभूतं वा**

१ नि द्विविधाश्रयो. २ नि ब -रभिनयैश्चैव.

शंसति परगतं वा वर्णयति। तत्र च प्रयोगप्रयुक्तिमाह परवचनामिति । परसंबन्धि वचनं स्वयमङ्गविकारैरभिनयेत् । ननु तत्परवचनमनुक्तं कथमभिनयेत् । आह आकाशे शून्ये यानि पुरुषकथितानि दृष्टानि यत्र शून्ये तेन वर्ण्यन्ते वा कंचित्पश्यत्याकर्णयति च, तत्र च तद्वचनं स एवानुवदन् सामाजिकान् बोधयति । यथा 'भो वाडव, अरे किं ब्रवीषि' इत्यादौ न केवलं परवचनमभिनयेत किन्तु प्रतिवचनैः स्वोक्तैः सह । अत एवोत्तरोत्तरग्रथितैः योजनाभिरुपलक्षितैः। ननु योऽसावेकोऽत्र प्रविशति स क इत्याह धूर्तविटेति । नानाप्रकारावस्थाविशेषात् लोकोपयोगिव्यवहारात्मक आत्मा वाच्यं यस्य अत एव बहुचेष्टः । सततं कार्य इति सकलसामान्यपृथग्जनोपयोग्यस्तु लोकव्यवहारो वेश्याविटादिवृत्तान्तात्मा निरूप्यत इति बाहुल्येन पृथग्जनव्युत्पत्तियोनि रूपकमिदम्, राजपुत्रादीनामपि शम्भलीवृत्तान्तो ज्ञेय एवावञ्चनार्थमिति स प्रयोज्य इत्यर्थः ।

आता हास्यरसाला योग्य असे विट, धूर्त आदी समाविष्ट असल्याकारणाने समान योगक्षेम असलेल्या भाणाचे लक्षण 'आत्मानुभूतशंसी' इत्यादी शब्दांत करतात. एका पात्राने हरणीय म्हणजे प्रेक्षकांच्या हृदयाप्रत पोचवावयाची गोष्ट ज्यात असते तो भाण. एकाच्याच मुखाने रंगभूमीवर प्रवेश न केलेली सुद्धा काही पात्रे 'भाण्यन्ते' म्हणजे बोलावयास लावली जातात म्हणून त्याला भाण म्हणतात. त्यात ते प्रवेश केलेले पात्र स्वतःच्या अनुभवाचे कथन करते अथवा दुसऱ्याविषयी वर्णन करते. तत्संबंधी प्रयोगाची योजना 'परवचनम्' इत्यादी शब्दांत सांगतात. दुसऱ्याच्या संबंधीचे वचन स्वतः अंगविक्षेपांनी अभिनीत करावे. ते दुसऱ्याचे वचन त्याने बोललेले नसता अभिनीत कसे करावयाचे या आक्षेपाचे समाधान करतात–'आकाशे' म्हणजे शून्य स्थानी जी मनुष्यांची भाषणे दृष्टोत्पत्तीस येतात अथवा शून्य स्थानी तो वर्णन करतो आणि कोणाला तरी पहातो आणि ऐकतो तेथे ते दुसऱ्याचे वचन तोच पुन्हा उच्चारून प्रेक्षकांना ऐकवितो. उदाहरणार्थ, 'हे वाडवा, अरे तू काय म्हणतोस?' इत्यादीमध्ये केवळ दुसऱ्यांच्याच वचनाचा अभिनय करावा असे नाही तर आपल्या स्वतःच्याही उक्तींसह. म्हणूनच उत्तरोत्तर ग्रथित केलेल्या, योजनांनी उपलक्षित झालेल्या प्रतिवचनांनी असे म्हटले आहे. जो एकटा येथे प्रवेश करतो तो कोण या प्रश्नाचे उत्तर 'धूर्तविट' यात देतात. विविध प्रकारच्या विशिष्ट अवस्थांमुळे लोकोपयोगी व्यवहाराच्या स्वरूपाचा आत्मा म्हणजे कथन करावयाची गोष्ट ज्यात आहे असा भाण, म्हणूनच पुष्कळ चेष्टिते असलेला. 'सततं कार्यः' म्हणजे वेश्या, विट आदींच्या वृत्तान्ताच्या स्वरूपाचा सर्व सामान्य लोकांना उपयोगी असा लोकव्यवहार यात दाखविला जातो, यावरून हे रूपक मुख्यतः सामान्य माणसांना बोध देण्यास उपयुक्त होते, आणि राजपुत्र आदींना सुद्धा फसवणूक होऊ नये म्हणून कुट्टिनीच्या वृत्तान्ताचे ज्ञान आवश्यक आहे म्हणून ह्या भाणाचा प्रयोग करावा असा अर्थ.

'योगक्षेम' हा शब्द येथे स्वरूप या अर्थी वापरलेला दिसतो. – 'परसंबन्धि वचनं' ही मुळातील 'परसन्धिवचनं' ची दुरुस्ती आहे. प्रस्तुत ठिकाणी 'सन्धि' शब्दाने अर्थबोध होण्यासारखा नाही. – 'कंचित्पश्यत्याकर्णयति च' यातील 'कंचित्' ही मुळातील 'कश्चित्' ची दुरुस्ती आहे. रंगभूमीवरील पात्राचा 'कश्चित्' म्हणजे कोणीतरी असा निर्देश केला असण्याचा संभव नाही. – 'उत्तरोत्तर' म्हणजे उक्ति-प्रत्युक्ति असा अर्थ येथे अभिप्रेत आहे. – '-व्यवहारात्मक आत्मा' मुळात '-व्यवहारात्मकात्मा' असे आहे. पण आर्येतील 'आत्मन्' शब्दाचा टीकेत 'वाच्य' असा अर्थ केला आहे. तेव्हा 'आत्मा' शब्द समासाच्या बाहेर स्वतंत्र असणे आवश्यक आहे. – '-पृथग्जनोप-' मुळात '-पृथग्गतोप-' आहे. पण 'पृथग्गत' येथे अर्थहीन आहे. आणि पुढे 'पृथग्जन' हाच शब्द वापरला आहे. 'सामान्य' शब्द असताना 'पृथक्' आवश्यक नाही हे खरे आहे. तथापि अर्थ-स्पष्टतेसाठी समानार्थी दोन शब्दांचा उपयोग अस्वाभाविक मानता येणार नाही. – 'शम्भली' म्हणजे कुंटीण. – 'स प्रयोज्यः' मुद्रितात 'संप्रयोज्यः' आहे. तो पाठ मूळ नाही.

**इदमिह मीमांस्यम् । य एते उत्सृष्टिकाङ्कादयो रूपकभेदाः ते तावदेकरसा एव । यद्यपि नाटकादयोऽप्येवमेव तथापि सर्वरसयोग्यतायामपि नाटके प्रकरणे च धर्मार्थादिवीर एव प्रधानं परमार्थतः, सर्वेषु नायकभेदेषु वीरत्वानुगमदर्शनात् । समवकारे तु यद्यपि शृङ्गारादित्वमुक्तं तथापि वीर एव प्रधानं रौद्रो वा । डिमव्यायोगयोरप्येवम् । ईहामृगेऽपि रौद्रप्राधान्यमेव । नाटिकायां तु शृङ्गार एव प्रधानम् । एवं तावद् वीररौद्रशृङ्गारा यथास्वं पुमर्थत्रयप्राणभूतत्वेन वर्तमाना एतेषु प्रयोगेषु । शान्तबीभत्सरसौ तु चरमपुमर्थोपयोगात्, तत्र च सर्वस्य नाधिकारः अपि कस्यचिदपाश्चिमजन्मनोऽधिकारात्, नाटके यद्यपि तत्फलप्रधानतया प्राधान्यमवलम्बेयाताम्, तथापि नासौ प्रचुरप्रयोग इति तयोः पुरुषार्थप्रवरप्राणितयोरपि वीरादिरसान्तराध्यावापेनावस्थापनम् । एवं तावत्पुमर्थरसविषयो रूपकरसविषय एव परमार्थतः, तथापि त्वितिवृत्तवैतत्याद्रसान्तरप्रयोगोऽपि तदङ्गतया तत्र भवति । एवं तत्प्रधानचेष्टायोगाद्वृत्तिवैचित्र्यमत्रोचितमेव ।**

येथे पुढील विचार केला पाहिजे. हे जे उत्सृष्टिकाङ्क आदी रूपकाचे प्रकार आहेत त्यांच्यात एकाच रसाचा आविष्कार असतो. जरी नाटक आदींमध्ये सुद्धा अशीच स्थिती असते, तथापि नाटक आणि प्रकरण सर्व रसांच्या आविष्कारास योग्य असतानाही त्यांत धर्मार्थ आदी स्वरूपाचा वीररसच खरोखर मुख्य असतो, कारण सर्व प्रकारच्या नायकांत वीरत्व विद्यमान असलेले दिसून येते. समवकारामध्ये जरी शृंगार आदींचा निर्देश केला आहे तरी त्यात वीररसच मुख्य असतो किंवा रौद्र. हीच गोष्ट डिम आणि व्यायोग यांची. ईहामृगात सुद्धा रौद्रालाच प्राधान्य असते. नाटिकेत तर शृङ्गाररस प्रधान असतो. याप्रमाणे ह्या रूपकांच्या प्रयोगात वीर, रौद्र आणि शृङ्गार आपापल्या रूपकात तीन पुरुषार्थांचे प्राणभूत झालेले असतात. परंतु शान्त आणि बीभत्सरस शेवटच्या पुरुषार्थाला उपयोगी

असल्यामुळे—आणि त्याचा सर्वांनाच अधिकार नसतो, कारण क्वचित एखाद्या नंतर जन्म नसलेल्यासच त्याचा अधिकार असतो—जरी नाटकात त्यांचे फल मुख्य असल्यामुळे प्राधान्य प्राप्त करू शकतील, तरी त्याचा प्रयोग मोठ्या प्रमाणात होत नाही म्हणून सर्वश्रेष्ठ पुरुषार्थांचे प्राणभूत असले तरी त्या दोन रसांची वीर आदी इतर रसांत अन्तर्भाव करून स्थापना केली जाते. याप्रमाणे पुरुषार्थांच्या रसांचा विषय म्हणजे खरोखर रूपकांच्याच रसांचा विषय होय, तरीही कथानकाच्या विस्तृतपणामुळे इतर रसांचा सुद्धा प्रयोग त्यांत त्यांचे अंगभूत म्हणून होतो. याप्रमाणे त्यांना ज्यात प्राधान्य आहे अशा चेष्टांच्या योजनेमुळे वृत्तींची विविधता या रूपकांत उचितच होय.

या ठिकाणी अभिनवगुप्ताने निरनिराळ्या रसांचे विविध रूपकप्रकारांत स्थान काय याचा प्रथम विचार केला आहे. त्यात रसांचा चार पुरुषार्थांशी असलेला संबंध दिग्दर्शित केला आहे. तदनुषंगाने नाटक, प्रकरण, समवकार, डिम, व्यायोग, ईहामृग आणि नाटिका यांतच पुरुषार्थांशी संबद्ध रस असतात असा विचार प्रकट केला आहे. – 'उत्सृष्टिकाङ्कादयो' मुळात 'उत्सृष्टिकादयो' आहे. तो लेखनदोष आहे. – 'तथापि' मुळातील 'तथाहि' ची ही दुरुस्ती आहे. 'तथाहि' निरर्थक आहे. – 'धर्मार्थादिवीरः' रसाध्यायात ६.७९ मध्ये धर्मवीर, दानवीर आणि युद्धवीर अशा तीन प्रकारच्या वीररसाचा निर्देश आहे. येथे धर्मार्थवीर म्हणजे धर्मवीर असे अभिप्रेत दिसते. त्या अध्यायातील पंधराव्या श्लोकावरील टीकेत वीररस धर्मप्रधान आहे असे म्हटले आहे; रौद्ररस अर्थप्रधान आणि शृङ्गारस कामप्रधान – याप्रमाणे ह्या तीन रसांचा तीन पुरुषार्थांशी संबंध जोडला आहे. – 'चरमसमर्थ' म्हणजे मोक्ष. 'अपश्चिमजन्मन्' म्हणजे ज्याला पुढील जन्म येणार नसतो, वर्तमान जन्मानंतर जो मुक्त होणार असतो असा मनुष्य. – 'तत्फल-' शान्तबीभत्सांचे फल मोक्ष. – 'असौ' म्हणजेही मोक्ष. – '-रसान्तराध्यावापेनावस्थापनम्' हा मुद्रितानुसारी पाठ आहे. हस्तलिखितातील पाठ '-रसान्तराध्यायाये अर्थे नावस्थापनम्' असा आहे. तो दुरुस्त होण्यासारखा वाटत नाही. पण येथील अभिप्रेत अर्थ स्पष्ट आहे. – 'पुमर्थरसविषयो' मुद्रितात 'पुमर्थविषयो' एवढेच आहे. पण रस शब्द आवश्यक आहे. पुरुषार्थांचे विवेचन स्वतंत्रपणे केलेले नसून ते रसांच्या अनुषंगाने केले आहे. – 'तदङ्गतया' म्हणजे मुख्य रसाचे अंगभूत म्हणून. – 'तत्प्रधान-' यातील 'तत्' म्हणजे मुख्य तसेच गौण रस. त्या सर्वांना प्राधान्य देणाऱ्या विविध प्रकारच्या चेष्टांमुळे निरनिराळ्या वृत्ती अस्तित्वात येणे स्वाभाविक आहे.

उत्सृष्टिकाङ्कप्रहसनभाणास्तु करुणहास्यविस्मयप्रधानत्वाद् रञ्जकरसप्रधानाः । तत एव तत्र स्त्रीबालमूर्खादिरधिकारी । न च विततमत्रेतिवृत्तमिति वृत्तिवैचित्र्यमपि नास्ति । तथाहि उत्सृष्टिकाङ्के वृत्तित्रयं तावद्वचसा निषिद्धम् । भारती चात्र कथं वृत्तिः । चेष्टा हि करुणेऽप्रधानं तदुपकरणं तु परिदेवितात्मिका भारती । तस्मात्फलसंवित्त्याख्या वृत्तिः, वाक्चेष्टयोः फलानुभव इति यस्या लक्षणं, साभ्युपगन्तव्या । अवश्यं चैतत् । अन्यथा मूर्छामरणादौ वाक्-

चेष्टयोरभावे निर्वृत्तिकतैव स्यात् । किं च यदि तावत्पुमर्थकामोद्देशेन कैशिक्याभिधीयते धर्ममर्थं चोद्दिश्य वृत्तिद्वयं वक्तव्यम् । तस्माच्चेष्टात्मिका न्यायवृत्तिरन्यायवृत्तिर्वाग्रूपा तत्फलरूपा फलसंवित्तिरिति वृत्तित्रयमेव युक्तमिति भट्टोद्भटो मन्यते । यदाह –

आद्ये वाक्चेष्टाभ्यां पुरुषार्थचतुष्टयेन चाष्टविधे ।
षोडशधा फलवृत्तिस्तदूद्वयतो नैकधा तु रसभेदात् ॥ इति ।

परंतु उत्सृष्टिकाङ्क, प्रहसन व भाण यांच्यात अनुक्रमे करुण, हास्य व विस्मय यांना प्राधान्य असल्यामुळे त्यांच्यात रंजन करणारे रस प्रधान असतात. म्हणूनच स्त्री, बाल, मूर्ख इत्यादींना त्यांत गोडी वाटते. आणि त्यांत कथानक विस्तृत असत नाही म्हणून वृत्तींची विविधता सुद्धा नसते. तदनुसार उत्सृष्टिकाङ्कामध्ये तीन वृत्तींचा साक्षात निषेधच केला आहे. आणि यात भारती वृत्ती तरी कशी आहे? कारण करुणात चेष्टिताला प्राधान्य नसते, आणि विलापाच्या स्वरूपाची भारती वृत्ती त्याचे साधन म्हणून असते. यावरून फलसंवित्ति नावाची वृत्ती, जिचे लक्षण फलाची अनुभूति असे आहे ती स्वीकारली पाहिजे. आणि हे आवश्यक आहे. एरव्ही मूर्छा, मरण इत्यादीमध्ये वाणी आणि चेष्टित यांचा अभाव असल्यामुळे वृत्तिहीनता निष्पन्न होईल. शिवाय जर काम ह्या पुरुषार्थाच्या उद्देशाने कैशिकी वृत्ती निर्दिष्ट केली जाते तर धर्म व अर्थ ह्यांच्यासाठीही दोन वृत्ती निर्दिष्ट करणे आवश्यक आहे. म्हणून चेष्टिताच्या स्वरूपाची न्यायवृत्ति, वाणीच्या स्वरूपाची अन्यायवृत्ति आणि त्यांच्या फलाच्या स्वरूपाची फलसंवित्ति ह्या तीन वृत्तीच योग्य होत असे भट्ट उद्भटाचे मत आहे. त्याने म्हटले आहे –

वाणी आणि चेष्टित यांच्या द्वारा पहिल्या दोन वृत्ती, चार पुरुषार्थांच्या संयोगाने त्या आठ प्रकारच्या होतात. त्या दोहोंच्यामुळे फलवृत्ती सोळा प्रकारची होते आणि रसांच्या भेदांमुळे ती अनेक प्रकारची होते.

या परिच्छेदात मागे सांगितलेल्या नाटकादी रूपकप्रकारांहून उत्सृष्टिकाङ्क, प्रहसन व भाण यांची भिन्नता स्पष्ट केली आहे. आणि तदनुषंगाने भट्ट उद्भटाचे वृत्तींसंबंधीचे भिन्न मत उद्धृत केले आहे. – 'रञ्जकरसप्रधानाः' म्हणजे यांच्यातील रस पुरुषार्थ साध्य करणारे नसून केवल मनोरंजन करणारे असतात. हा नाटक वगैरे व हे तीन प्रकार यांच्यातील एक फरक. – 'वृत्तिवैचित्र्यमपि नास्ति' हा त्या दोहोंमधील दुसरा फरक. मुळात 'वृत्तवैचित्र्यम्' असा पाठ आहे. पण तो चूक आहे हे पुढील वाक्यांवरून स्पष्ट आहे. – 'भारती चात्र इ०' हा प्रश्न भट्ट उद्भटाने उपस्थित केलेला असून पुढील वाक्यात त्याने त्याचे उत्तर दिले आहे. – करुणेऽप्रधानं' हस्तलिखितात अवग्रह नाही. पण तो आवश्यक आहे. या ठिकाणी उद्भटाने असा युक्तिवाद केला

आहे की करुणात चेष्टिताला प्राधान्य नसते म्हणजे त्याच्या आधाराने असलेली वृत्ती नसते आणि भारती वृत्ती – जी शब्दाधिष्ठित असते – ती केवळ साधनभूत असते. म्हणजे सामान्यतः स्वीकृत झालेल्या वृत्तींपैकी कोणतीही वृत्ती करुणात नसते. पण वृत्तिरहित काव्य असूच शकणार नाही. म्हणून ह्या ठिकाणी एका नवीनच फलसंवित्ति नावाच्या वृत्तीचे अस्तित्व मान्य करणे आवश्यक आहे. शब्दांच्या किंवा चेष्टिताच्या योजनेने जो फलस्वरूप परिणाम होतो त्याची अनु-भूती असे ह्या फलसंवित्ति वृत्तीचे स्वरूप आहे. मूर्छा व मरण या अवस्थांत वाक् व चेष्टा यांवर आधारलेल्या वृत्ती असंभाव्य असल्यामुळे तेथे एका निराळ्याच वृत्तीचे अस्तित्व मानले पाहिजे. नाही तर तेथे काव्य वृत्तिहीन होईल. – 'धर्ममर्थं चोद्दिश्य' म्हणजे प्रत्येक पुरुषार्थासाठी एकेक वृत्ती अशी अपेक्षा येथे व्यक्त केली आहे. कामासाठी वृत्ती आहे, पण धर्म व अर्थ यांसाठी नाही म्हणून नेहमीच्या चार वृत्ती अशास्त्रीय अत एव अग्राह्य ठरविल्या आहेत. – 'चेष्टात्मिका इ०' चेष्टित आणि शब्द यांवर आधारलेल्या दोन मूलभूत वृत्तींना उद्भटाने अनुक्रमे न्यायवृत्ति व अन्यायवृत्ति अशी नावे दिली आहेत. या नावांची उपपत्ती स्पष्ट नाही. चेष्टितावर आधारित हीच खरी न्यायतः प्राप्त वृत्ती, दुसरी तशी नाही असा अर्थ संभाव्य आहे. 'षोडशधा फलवृत्तिस्तद्द्वयतः' वस्तुतः चार चेष्टावृत्ती, चार वाग्वृत्ती आणि त्यांपैकी प्रत्येकीची एकेक फलवृत्ती मिळून आठ फलवृत्ती असे एकंदर सोळा प्रकार होतात. केवळ फलवृत्तीचे सोळा प्रकार संभाव्य दिसत नाहीत.

**तदत्र केचिदाहुः । सात्त्वत्यां यद्यपि कैशिकी शक्यान्तर्भावा तथापि रञ्जकत्वातिशयात्पृथगुपात्ता । स्वरवन्मुखजाभिनयश्च न चान्यायवृत्तौ, पुमर्थचतुष्कयोगोपपत्तिविप्रतिषेधात् । फलवृत्तौ च वृत्तिसामान्यलक्षणं व्यापाररूपत्वं यदि नास्ति तत्कथं वृत्तित्वम् । अस्ति चेत्, वाक्चेष्टातिरिक्तो मानसो व्यापारो न कश्चित् लोकसिद्ध इति सूक्ष्मो वाक्चेष्टागत एवोपेत्यः । ततश्च मूर्छादावपि प्राणात्मकायीयव्यापारसंभव एव लयतालगानादि प्रवर्तते । संवेदनमपि च मूर्छादौ नास्तीति शक्यं वक्तुमिति फलवृत्तिरपि तत्र कथम् । तस्मात्तत्र सात्त्वत्येव वृत्तिः । यदि बाहुल्यापेक्षया वृत्तिमयं काव्यमिति व्यवहारो रूपकसमुदायापेक्षया खण्डस्यावृत्तिकत्वेऽपि समुदितस्य रूपकस्य वृत्तिमयत्वम् । यच्छकलीगर्भमतानुसारिणो मूर्छादावात्मसंवित्तिलक्षणां पञ्चमीं वृत्तिं सकलकार्यनिवृत्त्यनुमेयां मूर्छादिनाकर्मित्वानुभवेन च फलेनावच्छिन्नामात्मव्यापाररूपां मन्यन्ते न च परिस्पन्द एवैको व्यापार इति मनसिकृत्य, तन्मतं भावानां बाह्यग्रहणस्वभावत्वमुपपादयद्भिर्भट्टलोल्लटप्रभृतिभिः पराकृतमिति न फलवृत्तिर्वा काचिदिति चतस्र एव वृत्तय इति ।**

यासंबंधात काहींचे म्हणजे असे. सात्त्वतीमध्ये जरी कैशिकीचा अन्तर्भाव शक्य आहे तरीही तिच्यात रंजकतेची विपुलता असल्यामुळे ती स्वतंत्र मानली आहे. आणि स्वरांनी युक्त अशा मुखाने होणाऱ्या अभिनयाचा अन्यायवृत्तीमध्ये अन्तर्भाव शक्य नाही,

कारण त्याच्या चार पुरुषार्थांशी संयोगाच्या उपपन्नतेचा निषेध केला आहे. आणि वृत्तींचे सामान्य लक्षण जो व्यापार तोच जर फलवृत्तीमध्ये नाही तर ती वृत्ती कशी होईल? जर तीत व्यापार आहे असे म्हटले तर वाणी आणि चेष्टित यांहून स्वतंत्र असा काही मानस व्यापार लोकांमध्ये प्रसिद्ध नाही म्हणून तो वाणी आणि चेष्टित यांमध्येच सूक्ष्म स्वरूपात विद्यमान असलेला व्यापार आहे हे स्वीकारावे लागेल. आणि त्यामुळे मूर्छा इत्यादीमध्ये सुद्धा प्राणात्मक शारीरिक व्यापाराचा संभव असतो तेव्हाच लय, ताल, गान आदी प्रवृत्त होतात. आणि मूर्छा आदीमध्ये संवेदना सुद्धा नसते असे म्हणणे शक्य असल्यामुळे तेथे फलवृत्ती सुद्धा कशी असेल? म्हणून त्या प्रसंगी सात्त्वतीच वृत्ती. जर विपुल प्रमाणात वृत्तींच्या विद्यमानतेमुळे काव्य वृत्तिमय असा व्यवहार होतो तर संपूर्ण रूपकाच्या दृष्टीने एखादा अंश वृत्तिरहित असला तरी सर्व रूपक मिळून वृत्तिमय काव्य असे ठरते. शकलीगर्भाच्या मताचे अनुयायी हालचाल हाच फक्त एकच व्यापार नाही असा विचार करून मूर्छा आदीमध्ये आत्मसंवित्तीच्या स्वरूपाची पाचवी वृत्ती – सर्व क्रियांच्या निवृत्तीमुळे जिचे अस्तित्व अनुमानाने ज्ञात होते आणि मूर्छा वगैरेमुळे जी अकर्तृत्वाच्या अनुभवस्वरूप फलाने संलक्षित होते अशी – आत्म्याच्या व्यापाराच्या स्वरूपाची मानतात; ते त्यांचे मत भट्ट लोल्लट प्रभृतींनी बाह्य स्वरूपात उपलब्धी होणे हा भावांचा स्वभाव असल्याचे प्रतिपादन करून खोडून काढले आहे. म्हणून फलवृत्ती नावाची कोणतीही वृत्ती नाही. तेव्हा चारच वृत्ती होत.

या परिच्छेदात इतर टीकाकारांनी केलेले उद्भटाच्या मताचे खंडन व वृत्तिविषयक पारंपरिक मताचा पुरस्कार उद्धृत केला आहे. 'सात्त्वत्यां इ०' या वाक्यातील विधानाचे प्रयोजन वृत्ती पुरुषार्थांशी निगडित नाहीत, व्यापाराशी संबद्ध आहेत असे दाखविणे हे होय. भारती, आरभटी आणि सात्त्वती यांत अनुक्रमे वाक्, देह आणि मन यांचे व्यापार प्रधानतया असतात. कैशिकीला तसा स्वतंत्र व्यापार नसल्यामुळे तिचा सात्त्वतीत अन्तर्भाव करणे शक्य होते. तसे केले असते म्हणजे तीन प्रकारच्या व्यापारांच्या अनुरोधाने तीनच वृत्ती प्रस्थापित झाल्या असत्या व वृत्तींचा पुरुषार्थांशी काही संबंध नाही हे स्पष्ट झाले असते. उद्भटाने काम पुरुषार्थासाठी कैशिकी तशा धर्म व अर्थ यांसाठी कोणत्या वृत्ती असे विचारले आहे त्याला हे उत्तर. – 'अन्यायवृत्तौ' यानंतर 'शक्यान्तर्भावः' हे पद अध्याहृत धरल्यास थोडा अर्थबोध होऊ शकतो. हस्तलिखितातील '-भिनयश्च' आणि '-वृत्तौ' हेच पाठ स्वीकारणे योग्य. मुद्रितातील '-भिनयतश्च' हा पाठ आणि '-वृत्तित्वं' अशी दुरुस्ती दोन्हीही अर्थबोधास साहाय्यक नाहीत. उद्भटाने वाग्रूप वृत्तीला अन्यायवृत्ति म्हटले आहे. त्याला अनुलक्षून येथे असे विधान केलेले दिसते की केवळ स्वरांनी युक्त असा मुखाने केलेला अभिनय वाग्रूप नसल्यामुळे त्याचा अन्यायवृत्तीत समावेश होणार नाही. असा संभव आहे की मूळ पाठ 'न न्यायवृत्तौ न चान्यायवृत्तौ' असा होता. याने दुसऱ्या 'च' ची उपपत्ती लागते. स्वर आणि अभिनय म्हणजे वाक् आणि चेष्टा एकत्र असल्यामुळे या प्रसंगी न्यायवृत्ती व अन्यायवृत्ती दोन्ही लागू होत नाहीत आणि त्यामुळे हे वर्गीकरण बरोबर नाही अशा तऱ्हेचा अर्थ अभिप्रेत असण्याची शक्यता आहे. 'स्वरवत्' यात शब्द समा-

विष्ट आहेत की नाही हे स्पष्ट नाही. – 'पुमर्थचतुष्क- इ०' अभिनय पुरुषार्थाला उपयुक्त नाहीत म्हणून त्यांचा वृत्तीत अन्तर्भाव नाही, यावरून उद्भटाच्या मते वृत्ती पुरुषार्थांशी संबद्ध आहेत असे येथे गृहीत धरलेले दिसते. – 'मूर्छादौ' मुळात 'मरणमूर्छादौ' आहे. पण मरणाचा निर्देश प्रस्तुत वाक्यात असंभाव्य आहे. त्यात प्राणात्मक व्यापाराचा उल्लेख आहे. 'प्राणात्मकायीय-' हा मुद्रितातील पाठ आहे. हस्तलिखितात 'प्राणात्मकायाय-' आहे. 'कायीय' म्हणजे शारीरिक. –'लयतालगानादि प्रवर्तते' हे कसे शक्य आहे ते स्पष्ट नाही. कदाचित मूर्छावस्थेत या गोष्टींचा आत्म्यावर परिणाम होतो व मूर्छेतून मुक्त झाल्यावर त्या प्रकट होतात अशा तऱ्हेची कल्पना असण्याची शक्यता आहे. – 'वृत्तिमयत्वम्' मुळात 'वृत्तिमयत्वात्' आहे. पण त्या हेतुनिदर्शक पदाचा कोठे अन्वय लागण्यासारखा नाही. – 'शकलीगर्भ' संपादक श्री कवींनी शाकलेय म्हणजे उद्भट अशी टीप दिली आहे. – 'मूर्छादिनाकर्मित्वानुभवेन' ही सुद्धा सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'मूर्छादिनाकर्मिणानुभवेन' असा पाठ आहे, तो भ्रष्ट आहे. मुद्रितात 'मूर्छाकर्मानुभावेन' असे आहे. पण त्याने अर्थबोध होण्यास मदत होत नाही. मूर्छेमुळे आत्म्याला स्वतःच्या अकर्मित्वाचा म्हणजे अकर्तृत्वाचा अनुभव येतो, आणि असे हे फल प्राप्त होते तोच आत्म्याचा व्यापार आणि त्यालाच आत्मसंवित्ति वृत्ती म्हणावे असे ह्या अनुयायांचे म्हणणे आहे. – 'बाह्यग्रहण- इ०' आत्म्याचा व्यापार आत असतो. तो बाहेर प्रकट झाल्याशिवाय त्याची कल्पना प्रेक्षकांना कशी येणार व तेथे आत्मसंवित्ति नावाची वृत्ती आहे हे त्यांना कसे कळणार असा हा युक्तिवाद आहे.

**वयं तु ब्रूमः । कोऽयमस्थानसंत्रासः । यत्किंचिदिह नाट्ये समस्ति तच्चेद्वृत्तिष्वन्तर्भाव्यं तदा भवेदेतत् । न चैतत् । रङ्गो हि नाम का वृत्तिः । मृदङ्गपणववंशाद्या का वृत्तिरपि हि भवेत् । तस्माद् व्यापारः पुमर्थसाधको वृत्तिः । स च सर्वत्रैव वर्ण्यते इत्यतो वृत्तयः काव्यस्य मातृका इति न किंचिद्व्यापारशून्यं वर्णनीयमस्ति, मदमूर्च्छादिवर्णनायामपि मनोव्यापारस्य सात्त्वत्याख्यस्य संभवात्। करुणादावपि च मनोदेहव्यापारासंभवेऽपि बाहुल्येन वाग्व्यापारसंभवाद् भारती वृत्तिरुच्यते । वृत्त्यन्तरनिषेधस्तु तदङ्गानामपरिपूर्णत्वात् । न च कायवाङ्मनसव्यापारं तद्वैचित्र्यं वान्तरेणान्यः कश्चिद् व्यापारः संभवतीत्यसकृदुक्तम् । तस्मात् करुणप्रधाने भारती वृत्तिः परिदेवितबाहुल्यात् । यत्तु 'शृङ्गारहास्यकरुणैरिह कैशिकी स्यात्' इति कोहलेनोक्तं तन्मुनिमतविरोधादुपेक्ष्यमेव । तस्य तु यत्र यत्रानुल्बणा चित्तवृत्तिः सा सा कैशिकीत्याशयः । एवं प्रहसनभाणयोरपि वाग्व्यापारप्राधान्यादेव भारती वृत्तिः । मूर्छादौ तु व्यापाराभावे वृत्त्यभाव एव । न हि सर्वं नाट्यं वृत्तिब्रह्मतया समर्थनीयमित्यलमतिप्रसक्त्या ।**

आम्ही तर म्हणतो की काय हा भलत्याच बाबतीत मनस्ताप. जे जे काही नाट्यामध्ये समाविष्ट आहे त्या सर्वांचा वृत्तींमध्ये अन्तर्भाव करावयाचा असेल तरच हे होऊ शकेल.

पण तशी गोष्ट नाही. रंगभूमी म्हणजे कोणती वृत्ती म्हणता येईल? मृदङ्ग, पणव, वंश इत्यादींनी कोणती वृत्ती होऊ शकेल? म्हणून पुरुषार्थसाधक व्यापार म्हणजेच वृत्ती. आणि त्या व्यापाराचे सर्वत्र वर्णन केले जाते यास्तव वृत्तींना काव्याचे उद्गमस्थान मानले आहे; म्हणून व्यापारशून्य अशी कोणतीही गोष्ट वर्णन करण्यासारखी नसते, कारण मद, मूर्छा आदींच्या वर्णनातही सात्त्वती नावाच्या मनोव्यापाराचा संभव असतो. करुण आदी रसांमध्ये सुद्धा मन आणि शरीर यांचा व्यापार संभवत नसला तरी वाग्व्यापार प्रचुर प्रमाणात संभवत असल्यामुळे भारती वृत्ती असते असे म्हणतात. इतर वृत्तींचा निषेध केला आहे तो त्यांची अंगे परिपूर्ण नसतात म्हणून. आणि देह, वाणी आणि मन यांचा व्यापार अथवा त्याची विविधता यांच्याशिवाय दुसरा कोणताही व्यापार संभवत नाही हे अनेक वेळा सांगितले आहे. म्हणून करुणप्रधान रूपकात भारती वृत्ती असते, कारण त्यात विलाप मोठ्या प्रमाणात असतात. 'शृङ्गार, हास्य आणि करुण यांच्या योगाने कैशिकी वृत्ती होते' असे जे कोहलाने म्हटले आहे ते भरतमुनींच्या मताच्या विरुद्ध आहे म्हणून त्याची उपेक्षाच केली पाहिजे. जेथे जेथे भडक चित्तवृत्ती नाही तेथे तेथे कैशिकी वृत्ती असा त्याचा आशय आहे. याचप्रमाणे प्रहसन आणि भाण यांमध्ये सुद्धा वाग्व्यापाराला प्राधान्य असल्यामुळेच भारती वृत्ती असते. मूर्छा आदींमध्ये तर व्यापाराचाच अभाव असल्यामुळे वृत्तींचा अभाव असतो. कारण सर्वच नाट्य वृत्तिब्रह्ममय आहे असे समर्थन करणे आवश्यक नाही. तेव्हा हा अतिप्रसंग आता पुरे.

'मुनिमतविरोधात्' विसाव्या अध्यायात भरतमुनीने **'हास्यशृङ्गारबहुला कैशिकी परिचक्षिता'** (२०. ७३) असे म्हटले आहे. त्यात करुणाचा समावेश नाही.

बडोदे प्रतीत यानंतर पुढील आर्या कंसात दिली आहे –

**भाणस्यापि हि निखिलं लक्षणमुक्तं तथागमानुगतम् ।**
**वीथ्याः संप्रति निखिलं कथयामि यथाक्रमं विप्राः ॥**

**सर्वरसलक्षणाढ्या युक्ता ह्यङ्गैस्तथा[1] त्रयोदशभिः ।**
**वीथी स्यादेकाङ्का तथैकहार्या[2] द्विहार्या वा ॥ १०२ ॥**

सर्व रसांच्या लक्षणांनी समृद्ध, तसेच तेरा अंगांनी युक्त आणि एक अंक असलेली तसेच एका पात्राने अभिनीत करावयाची किंवा दोन पात्रांनी अभिनीत करावयाची अशा प्रकारची वीथीची रचना असावी.

१ ब ह्यङ्गैस्त्रयोदशभिः. २ का द्विपात्रहार्या तथैकहार्या वा.

**अथ सर्वान्ते सर्वरसमयत्वादविततस्वभावत्वाच्च संक्षेपेण शक्यव्युत्पत्तिदायिनीत्वेन प्रधानभूतत्वात् तदङ्गानां च नाटकादिभाणान्तसमस्तरूपकोपजीव्यत्वाद् वीथीं लक्षयति । एकहार्येत्याकाशपुरुषभाषितैरित्यर्थः । द्विहार्येति उक्तिप्रत्युक्तिवैचित्र्येणेत्यर्थः ।**

आता सर्वांच्या शेवटी सगळ्या रसांनी पूर्ण असल्यामुळे आणि विस्तृत स्वरूपाची नसल्यामुळे थोडक्यात बोध देण्यास समर्थ म्हणून तिला प्राधान्य आल्याकारणाने आणि तिची अंगे नाटकापासून भाणापर्यंतच्या सर्व रूपकप्रकारांत उपयोगी असल्याकारणाने वीथीचे लक्षण सांगतात. एकहार्या म्हणजे आकाशपुरुषभाषितांनी सिद्ध केलेली असा अर्थ. द्विहार्या म्हणजे उक्ती व प्रयुक्ती यांच्या वैचित्र्याने सिद्ध झालेली असा अर्थ.

'नाटकादि-' ही मुळातील 'नाटिकादि-' ची दुरुस्ती आहे. वीथ्यङ्गांचा उपयोग नाटक व प्रकरण यांत होत नाही असा जो ह्या पाठाचा अर्थ होतो तो अस्वीकार्य आहे. अनेक वीथ्यङ्गांची उदाहरणे अभिनवगुप्ताने वेणीसंहार नाटकातील दिली आहेत. आणि 'समस्तरूपक' या शब्दाने 'नाटकादि-' असाच पाठ बरोबर ठरतो. – 'एकहार्येत्या-' ही सुद्धा मुळातील 'एकहार्यैरित्या-' ची दुरुस्ती आहे. आर्येत 'एकहार्या' असा प्रथमा एकवचनी पाठ आहे आणि तोच बरोबर आहे. तेव्हा तृतीया बहुवचनात तो शब्द उद्धृत केला असल्याची शक्यता नाही. पुढील '-भाषितैः' मुळे हा लेखनदोष उत्पन्न झालेला दिसतो.

बडोदे प्रतीत आर्येच्या दुसऱ्या चरणात 'तथा' शब्द नाही. पण त्यामुळे त्या चरणात पंधराच मात्रा उरतात आणि आर्येचा पूर्वार्ध उत्तरार्धासारखा होतो. असा वृत्तदोष असंभाव्य आहे. आणि काही हस्तलिखितांत 'तथा' शब्द आढळतोच. प्रस्तुत आर्येनंतर बडोदे प्रतीत एका आर्येचे पुढील दोन चरण अधिक आढळतात – '**अधमोत्तममध्याभियुक्ता स्यात्प्रकृतिभिस्तिसृभिः**।' यापैकी दुसऱ्या चरणात पंधरा मात्रा आहेत, त्यावरून हा कोणत्या तरी आर्येचा उत्तरार्ध ठरतो. तिचा पूर्वार्ध कोठे आढळत नसल्यामुळे हा उत्तरार्ध अधांतरी असल्यासारखा दिसतो. शिवाय वीथ्यङ्गांच्या विवरणाच्या शेवटी अभिनवगुप्ताने तीन प्रकृतींच्या योजनेसंबंधात कोहलाचे मत उद्धृत केले आहे. तेथे आर्येच्या ह्या उत्तरार्धातील शब्दच अनुष्टुभ् छंदात परिवर्तित झालेले आढळतात. यावरून असे अनुमान निघते की कोहलानंतर हा आर्यार्ध नाट्यशास्त्रात प्रक्षिप्त झाला असावा. आश्चर्याची गोष्ट अशी की संपादकांनी हा उत्तरार्ध पूर्वार्ध मानून पुढील आर्येचा पूर्वार्ध तो उत्तरार्ध करून आर्या बनविली आहे. आणि अशी प्रक्रिया पुढे चालू ठेवली आहे. त्यामुळे एके ठिकाणी आर्येचा उत्तरार्ध व अनुष्टुभ् छंदाचे दोन चरण मिळून एक श्लोक आणि दुसऱ्या ठिकाणी अनुष्टुभाचे दोन चरण व आर्येचा पूर्वार्ध मिळून एक श्लोक असे झालेले दिसून येतात. हे सर्व विलक्षण वाटते.

**उद्घात्यकावलगितावस्पन्दितनाल्यसत्प्रलापाश्च ।**
**वाक्केल्यथ प्रपञ्चो मृदवाधिबले छलं त्रिगतम् ॥ १०३ ॥**

**व्याहारो गण्डश्च त्रयोदशाङ्गान्युदाहृतान्यस्याः ।**
**अथ वीथी संप्रोक्ता लक्षणमेषां प्रवक्ष्यामि ॥१०४॥**

उद्घात्यक, अवलगित, अवस्पन्दित, नाली, असत्प्रलाप, वाक्केली, प्रपञ्च, मृदव, अधिबल, छल, त्रिगत, व्याहार आणि गण्ड ही ह्या वीथीची तेरा अंगे सांगितली आहेत. वीथीचे वर्णन केले आहे. आता ह्या अंगांचे लक्षण सांगतो.

**अङ्गान्युद्दिशति–**

**उद्घात्यकावलगितावस्पन्दितनाल्यसत्प्रलापाश्च ।**
**वाक्केल्यथ प्रपञ्चो मृदवाधिबले छलं त्रिगतम् ॥**
**व्याहारो गण्डश्च त्रयोदशाङ्गान्युदाहृतानि । इति ।**

**इत्युदाहरणमात्रमेतदिति यावत् ।**

अंगांचा निर्देश करतात – उद्घात्यक, अवलगित, अवस्पन्दित, नाली, असत्प्रलाप, वाक्केली, प्रपञ्च, मृदव, अधिबल, छल, त्रिगत, व्याहार आणि गण्ड ही तेरा अंगे सांगितली आहेत. 'उदाहृतानि' म्हणजे ही केवळ उदाहरणे म्हणून सांगितली आहेत.

'उदाहरणमात्रमेतत्' याचा असा अर्थ होतो की वीथीची याहूनही अधिक अंगे असू शकतात. पण तसे इतरत्र कोठे सूचन नाही. पुढील आर्येवरील टीकेत 'उदाहृत' म्हणजे प्रतिवचन असा अर्थ केला आहे. 'उदाहरण' शब्दाचा येथे तोच अर्थ अभिप्रेत असण्याचा संभव आहे.

काशी प्रतीत आणि तदनुसार डॉ. घोष यांच्या आवृत्तीत वीथ्यंगांची ही नावे अनुष्टुभ् छंदातील श्लोकांत दिली आहेत.

**पदानि त्वगतार्थानि यन्नराः[1] पुनरादरात् ।**
**योजयन्ति पदैरन्यैस्तदुद्घात्यकमुच्यते ॥१०५॥**

ज्यात अर्थ स्पष्ट नसलेल्या शब्दांचा मनुष्य आदराने दुसऱ्या शब्दांशी संबंध जोडतात त्याला उद्घात्यक असे म्हणतात.

**एतानि क्रमेण लक्षयति पदानि त्वगतार्थानीति ।**

१ ब ये नराः, का यैर्नराः.

नन्वेषामुक्तिवैचित्र्यरूपत्वं चेल्लक्षणालङ्कारादिभ्यः को भेदः, इतिवृत्तोपकरणरूपत्वे तु संध्यङ्गेभ्यः कथमन्यता । रसोपकरणतायां वृत्त्यङ्गेष्वन्तर्भावः । न चैतद्व्यतिरिक्तमेषां सामान्यलक्षणमस्ति । तत्र केचिदुक्तलक्षणादिविशेषरूपत्वमेवैषां प्रतिपन्नाः । विवेचकास्तु तद्व्यतिरिक्तान्येवैतानीत्याहुः । तथाहि प्रश्नप्रतिवचनयोरन्याभिप्रायरूपेण योगेन यद्वैचित्र्यं तद्वीथ्यङ्गम् । अत एवोदाहृतानीत्येषां सामान्यलक्षणम् । उदाहृतानि प्रतिवचनानीत्यर्थः । तानि च सर्वाणि प्रतिवचनशून्यस्य काव्यस्याभावात् तेन विचित्राणीति लभ्यन्ते । अत एव वीथी पङ्क्तिरन्योत्तरासहिष्णुत्वाद् विचित्रोक्तिप्रत्युक्तिगर्भत्वात् । लक्षणालङ्कारादीनां तु नोक्तिनियतं रूपमिति विशेषः ।

तत्र यदा विवाक्षितमुत्तरं दातुं शक्तोऽयं स्यादिति, यन्मम मनसि वर्तते तदेव वक्ति न वेत्येवमादिना निमित्तेन यदा प्रष्टैव प्रतिवचनगतं वैचित्र्यमभिसंधाय पृच्छति प्रतिवक्त्रुचितमभिधत्ते तदा तदुत्तरमुद्घात्यकम् । प्रश्नात्मके उद्घाते साध्विति यत्, तत्राज्ञातार्थे कः । पदान्यर्थगतानि प्रश्नरूपाण्यादरात्कृतानि पर्यायैः पदान्तरैरुत्तररूपैः नराः सुधियो योजयन्ति तदुत्तरपदसमूहात्मकमुद्घात्यकम् । यथा पाण्डवानन्दे –

का भूषा बलिनां क्षमा परिभवः को यः सकुल्यैः कृतः
किं दुःखं परसंश्रयो जगति कः श्लाघ्यो य आश्रीयते ।
को मृत्युर्व्यसनं शुचं जहति के यैर्निर्जिताः शत्रवः
कैर्विज्ञातमिदं विराटनगरच्छन्नस्थितैः पाण्डवैः ॥

'पदानि त्वगतार्थानि' इत्यादीत ह्या अंगांची क्रमाने लक्षणे सांगतात.

येथे आक्षेप – उक्तीचे वैचित्र्य हेच जर ह्या अंगांचे स्वरूप असेल तर लक्षण, अलंकार इत्यादींहून यांची भिन्नता कोणती? इतिवृत्ताचे साधन असे यांचे स्वरूप असेल तर संध्यङ्गांहून यांची भिन्नता कशी? रसांचे साधन म्हणून असतील तर त्यांचा वृत्त्यङ्गांत समावेश होईल. आणि ह्याव्यतिरिक्त यांचे सामान्यलक्षण असे काही नाही. या संबंधात काही टीकाकार ही अंगे निर्दिष्ट केलेल्या लक्षण आदींचीच विशेष रूपे होत असे मान्य करतात. परंतु जे विवेचक आहेत ते ही त्यांहून निराळीच आहेत असे म्हणतात. याचे स्पष्टीकरण असे – प्रश्न आणि उत्तर यांचा निराळ्याच अभिप्रायाने संयोग झाला असता जे वैचित्र्य येते ते वीथीचे अंग. म्हणूनच 'उदाहृतानि' हे यांचे सामान्य लक्षण. उदाहृत म्हणजे प्रतिवचन असा अर्थ. आणि प्रतिवचनरहित काव्य नसल्याकारणाने ती सर्व अंगे

त्या प्रतिवचनामुळे वैचित्र्ययुक्त अशी बनतात. म्हणूनच वीथी म्हणजे पंक्ती होय, कारण तिच्यात दुसरे उत्तर सहन केले जात नाही आणि वैचित्र्ययुक्त उक्ती व प्रत्युक्ती तिच्यात अन्तर्भूत असतात. परंतु लक्षण, अलंकार आदींच्या बाबतीत असे उक्तींनी निश्चित केलेले रूप नसते हा फरक.

त्यांपैकी जेव्हा 'विवक्षित उत्तर देण्यास हा समर्थ असेल काय?' 'माझ्या मनात जे आहे तेच उत्तर हा देईल की नाही?' इत्यादी कारणांमुळे प्रश्न विचारणाराच प्रतिवचना-तील वैचित्र्य लक्षात घेऊन विचारतो आणि उत्तर देणाऱ्याला उचित असे शब्द बोलतो तेव्हा ते त्याचे उत्तर म्हणजे उद्घात्यक होय. प्रश्न असा अर्थ असलेल्या उद्घात शब्दाला साधु ह्या अर्थाचा यत् प्रत्यय आणि नंतर अज्ञात ह्या अर्थी क प्रत्यय लावला आहे. अर्थयुक्त पदे म्हणजे प्रश्नस्वरूप शब्द आदराने वापरले असता दुसऱ्या उत्तराच्या स्वरूपाचे शब्द नर म्हणजे हुशार मनुष्य योजतात तेव्हा तो उत्तररूप शब्दांचा समूह म्हणजे उद्घात्यक. उदाहरणार्थ, पाण्डवानन्द नाटकात—'बलिष्ठ मनुष्यांचे भूषण कोणते? क्षमा. परिभव कोणता? जो आपल्याच कुलातील माणसांनी केलेला असतो तो. दुःख कोणते? दुसऱ्याचा आश्रय घेणे. जगात श्लाघनीय कोण? ज्याचा इतर आश्रय घेतात तो. मृत्यू कोणता? व्यसन. शोकापासून कोण मुक्त होतात? ज्यांनी शत्रु जिंकले आहेत ते. हे सर्व कोणाला समजले आहे? विराटाच्या नगरीत गुप्तपणे राहिलेल्या पांडवांना.'

'लक्षणालङ्कारादिभ्यः' काव्याची छत्तीस लक्षणे आणि चार अलंकार ह्यांचे वर्णन नाट्यशास्त्राच्या सोळाव्या अध्यायात आहे. –'कथमन्यता' मुळात 'कथमन्यतो' आहे. पण 'अन्यतः' चा काही अर्थ लागण्यासारखा नाही. –'प्रश्नप्रतिवचनयोः इ०' म्हणजे वीथ्यङ्गाचे व्यवच्छेदक लक्षण प्रश्न आणि त्याचे उत्तर यातील वैचित्र्य; हे वैचित्र्य त्यांच्या अनपेक्षितपणामुळे उत्पन्न होते. – 'उदाहृतानि प्रतिवचनानी-त्यर्थः' या ठिकाणी 'उदाहृत' शब्दाचा प्रतिवचन असा अर्थ केला आहे. –'तानि' यात वीथ्यङ्गांचा निर्देश आहे. – 'तेन' म्हणजे प्रतिवचनाने. – 'अन्योत्तर' म्हणजे नेहमीचे साधे सरळ उत्तर.

'प्रतिवचनगतं' मुद्रितात 'प्रतिवचनं' एवढेच आहे. पण 'वैचित्र्यम्' चे विशेषण म्हणून हस्तलिखितातील पाठ आवश्यक आहे. –'प्रतिवक्त्रुचितम्' मुळात 'प्रतिवक्तोचितम्' असे आहे. पण प्रतिवक्ता असे प्रथमान्त रूप संभाव्य नाही. वाक्यात 'प्रष्टा' हा कर्ता अगोदरच निर्दिष्ट झाला आहे. आणि प्रतिवक्तृ आणि उचित यांचा समास येथे आवश्यक आहे. – 'साध्विति यत्' पा-णिनीच्या 'तत्र साधुः' (४.४.९८) ह्या सूत्राप्रमाणे 'यत्' म्हणजे य प्रत्यय लागून 'उद्घाते साधुः' या अर्थी उद्घात्यः असे रूप बनले. – 'अज्ञातार्थे कः' पाणिनीच्या 'अज्ञाते' (५.३.७३) ह्या सूत्राप्र-माणे 'क' प्रत्यय लागून 'अज्ञातः उद्घात्यः उद्घात्यकः' असे रूप बनले आहे. मुळात 'कन्' आहे. पण अज्ञातार्थी प्रत्यय 'क' आहे, 'कन्' नाही. – 'अर्थगतानि' यावरून असे दिसते की अभिनवगुप्ताने आर्येत 'पदानि तु गतार्थानि' असा पाठ स्वीकारला होता. नाट्यशास्त्राच्या काही हस्तलिखितांत तसा पाठ आढळतो. तो पाठ मूळ असणे असंभाव्य नाही. काही शब्द स्वतंत्रपणे अर्थपूर्ण असले तरी

चमत्कृती उत्पन्न करण्यासाठी त्यांच्याबरोबर इतर आणखी शब्दांची योजना केली म्हणजे ते उद्घात्यक असा अर्थ होऊ शकेल. अभिनवगुप्ताने अर्थातच गतार्थ पद म्हणजे प्रश्न आणि पदान्तर म्हणजे प्रतिवचन असे अर्थ केले आहेत. 'अगतार्थानि' या पाठाने असा अर्थ होतो की काही शब्दांचा अर्थ स्पष्ट नसल्यामुळे जेव्हा वक्ता किंवा इतर कोणी दुसरे शब्द जोडून काही एक अर्थ सिद्ध करतात तेव्हा ते उद्घात्यक होय.

मूळ आर्येत पुढे 'ये नराः' असा पाठ बहुतेक हस्तलिखितांत आहे. पण 'ये' ला अनुरूप असे संबंधदर्शक सर्वनाम मुख्य वाक्यात उपयोग करण्यासारखे नाही. म्हणून 'यत्' पाठ स्वीकारला आहे. उद्घात्यक, अवलगित आणि अवस्पन्दित ह्या तिहींच्या व्याख्या अनुष्टुभ् छंदात आहेत. बाकीचा सर्व अध्याय आर्या वृत्तात आहे. वीथीची पहिली दोन अंगे आमुखाची म्हणजे प्रस्तावनेचीही अंगे आहेत असे पुढे २०.३३ मध्ये म्हटले आहे. इतर आमुखांगांची तेथे दिलेली लक्षणे अनुष्टुभ् छंदातच आहेत. तेव्हा ही दोन अंगे मूळ आमुखाची असून तेथील त्यांच्या व्याख्या येथे तशाच उद्धृत केल्या आहेत असे दिसते.

'को यः' आणि '-नगरच्छन्न-' हे हस्तलिखितातील पाठ आहेत. मुद्रितात 'कोऽयं' आणि '-नगरेच्छन्न-' असे पाठ आहेत.

**यत्रान्यस्मिन्समावेश्य कार्यमन्यत्प्रसाध्यते[1] ।**
**तच्चावलगितं नाम विज्ञेयं नाट्ययोक्तृभिः ॥ १०६ ॥**

ज्यात एका कार्यात समावेश करून दुसरे कार्य सिद्ध केले जाते ते अवलगित होय असे नाट्याची योजना करणारांनी जाणावे.

**यत्रान्यस्मिन्निति । यत्रोत्तरे दीयमाने अन्यानुसंधानपूर्वकेऽप्यन्यत्कार्यं सिध्यति तदन्यकार्यावलगनादवलगितम् । यथा 'अवि सुहाअदि दे लोअणाणां' इति विदूषकेण पृष्टे 'सुखयतीति किमुच्यते, कृच्छ्रेणोरुयुगम्' इत्याद्युत्तरं वसन्तकप्रत्यायनोद्देशेन प्रवृत्तमपि सागरिकागतमास्थाबन्धजीवितं मुख्यं शृङ्गाराख्यं कार्यं साधयतीति ।**

'यत्रान्यस्मिन्' इत्यादी. जेथे एका गोष्टीचे अनुसंधान करून उत्तर दिले जात असतानाही दुसरी गोष्ट सिद्ध होते तेथे ते दुसरे कार्य चिकटल्यामुळे अवलगित असे म्हणतात. उदाहरणार्थ, रत्नावलीच्या दुसऱ्या अंकात 'याने तुझ्या नेत्रांना सुख होते काय?' असे विदूषकाने विचारले असता राजाचे 'सुख होते म्हणून काय सांगावयाचे? कष्टाने

१ का प्रशस्यते.

ऊरुयुगल' इत्यादी उत्तराचे वचन वसन्तकाची खात्री पटविण्याच्या उद्देशाने उच्चारलेले असले तरी सागरिकाविषयीचे प्रेम प्राणभूत असलेले जे मुख्य शृंगाररूपी कार्य ते साध्य करते.

'तदन्य-' मुद्रितात 'तदान्य-' आहे. – 'कृच्छ्रेणोरुयुगं इ०' संपूर्ण श्लोक असा –

**कृच्छ्रादूरुयुगं व्यतीत्य सुचिरं भ्रान्त्वा नितम्बस्थले**
**मध्येऽस्यास्त्रिवलीतरङ्गविषमे निष्पन्दतामागता ।**
**मद्दृष्टिस्तृषितेव संप्रति शनैरारुह्य तुङ्गौ स्तनौ**
**साकाङ्क्षं मुहुरीक्षते जललवप्रस्यन्दिनी लोचने ॥ (रत्नावली, २.१०).**

**[1]आक्षिप्तेऽर्थे तु कस्मिंश्चिच्छुभाशुभसमुत्थिते ।**
**कौशलादुच्यतेऽन्योऽर्थस्तदवस्पन्दितं भवेत् ॥ १०७ ॥**

कोणता तरी शुभसूचक किंवा अशुभसूचक अर्थ निर्दिष्ट झाला असता खुबीने त्याचा दुसरा अर्थ सांगितला जातो तेव्हा ते अवस्पन्दित होते.

**आक्षिप्ते त्विति । शुभाशुभं दैवं तेनाबुद्धिपूर्वकं कुत्रचिदर्थे आक्षिप्तेऽपि कौशलात्तत्प्रच्छादनेच्छया यत्रोत्तरेऽन्योऽर्थ उच्यते तदवस्पन्दितम्, चक्षुःस्पन्दनादिवदन्तर्गतसूचनीयसंभवात् । यथा –**

**सत्पक्षा मधुरगिरः प्रसाधिताशा मदोद्धतारम्भाः ।**
**निपतन्ति धार्तराष्ट्राः कालवशान्मेदिनीपृष्ठे ॥ (वेणीसंहार, १.६).**

**अत्र दैववशादयमर्थ आयातः – सत्पक्षे अमधुरा गीर्येषां ते, तथा प्रकर्षेण साधिताः आधिसहिताः यैर्दिशः कृताः धृतराष्ट्रात्मजाः पतन्तीति । तत्रोत्तरं 'प्रतिहतममङ्गलम्' । पुनः सूत्रधारः 'ननु शरत्समयवर्णनया हंसान् धार्तराष्ट्रा इति व्यपदिशामि' इत्यादि अवस्पन्दितमेव सूचयति 'न खलु न जाने, किन्त्वमङ्गलत्वादाशङ्कितमेव मे हृदयम्' इति ।**

'आक्षिप्ते तु' इत्यादी. शुभ आणि अशुभ म्हणजे दैव. त्याने बुद्धिपुरःसर नसलेला असा कोणता तरी अर्थ निघत असताही कौशल्याने तो गुप्त ठेवण्याच्या इच्छेने उत्तरात जेथे दुसरा अर्थ सांगितला जातो ते अवस्पन्दित, नेत्रस्फुरणाप्रमाणे आतील गोष्टीच्या सूचनेचा त्यात संभव असतो म्हणून. उदाहरणार्थ, वेणीसंहाराच्या प्रस्तावनेत 'चांगले

१ **का** आक्षिप्य कंचिदर्थं तु शुभाशुभसमुत्थितम् । यत्सृजेद्बुद्धिवैशद्यात् .

पंख असलेले, गोड आवाज असलेले, दिशा सुशोभित करणारे आणि मदामुळे उद्धत अशी क्रीडा करणारे हंस ऋतुमानानुसार पृथ्वीतलावर अवतीर्ण होतात' हे सूत्रधाराचे वचन. यात दैवयोगाने पुढील अर्थ निघतो—सज्जनांच्या पक्षासंबंधी ज्यांची वाणी कटु असते, तसेच प्रकर्षाने साधित म्हणजे आधिसहित अशा दिशा ज्यांनी केल्या आहेत ते धृतराष्ट्राचे पुत्र जमिनींवर पडतात. त्यावर पारिपार्श्वकाचे उत्तर 'अमंगल दूर होवो' असे आहे. तेव्हा सूत्रधार पुन्हा 'मी तर शरदृतूच्या वर्णनात हंसांचा धार्तराष्ट्र म्हणून निर्देश केला आहे' इत्यादी शब्दांत अवस्पन्दितच सूचित करतो. तेव्हा पारिपार्श्वक म्हणतो 'ते मला माहीत नाही असे नाही. तथापि अमंगलाच्या सूचनामुळे हृदय भीतिग्रस्त होतेच.'

'आक्षिप्ते त्विति' आर्येतील 'ऽर्थे' लेखनदोषामुळे उद्धृत झाले नाही. – 'उत्तरेऽन्योऽर्थः' मुद्रितात 'उत्तरो' आहे. पण सप्तमी आवश्यक आहे. अभिनवगुप्ताने वीथ्यङ्गे मुख्यतः प्रश्नोत्तर स्वरूपाची मानली आहेत आणि त्यापैकी जे उत्तर किंवा प्रतिवचन ते वीथ्यङ्ग असे त्याने म्हटले आहे. – सूचित अर्थासाठी 'सत्पक्षामधुरगिरः' असा एक समास मानला आहे. – 'तत्रोत्तरं इ०' म्हणजे पारिपार्श्वकाचे हे उद्गार आक्षिप्त अर्थ लक्षात आणून दिलेल्या उत्तराच्या स्वरूपाचे आहेत. – 'हंसान्' हस्तलिखितात 'हंसानि' आहे. ते अर्थात बरोबर नाही. मुद्रितात 'हंसानभस्तलं' असे आहे. तेही बरोबर नाही. अवतरणात नभस्तल अनावश्यक आहे आणि द्वितीयेत त्याचा निर्देश असंभाव्य आहे. – 'न खलु न जाने इ०' पारिपार्श्वकाचे हे वचन सुद्धा उद्धृत करण्याचे काही प्रयोजन आहे असे दिसत नाही. – वेणीसंहाराच्या सध्या उपलब्ध असलेल्या प्रतींत व अभिनवगुप्ताने दिलेल्या अवतरणात थोडी पाठभिन्नता आढळते.

**हास्येनोपगतार्था[1] प्रहेलिका नालिकेति विज्ञेया ।**
**एकद्विप्रतिवचना वाक्केली स्यात्प्रयोगेऽस्मिन् ॥ १०८॥**

हास्य उत्पन्न करणारा अर्थ असलेली जी कूट उक्ती ती नालिका असे समजावे. या नाट्याच्या प्रयोगात दोन प्रश्नांचे एक प्रतिवचन असलेली ती वाक्केली होय.

**हास्येनोपगतार्थेति । प्रहेलिका परवितारणकारि यदुत्तरं अत एव हास्ययुक्ता सा नालिका प्रणालिकाव्याजेत्यर्थः । प्रकर्षेण हेलिका नर्मादिक्रीडारूपं यस्याः सा प्रहेलिका । यथा, सुसंगता – जस्स किदे तुमं आअदा सो एत्थ एव्व चिट्ठदि । सागरिका – सहि, कस्स किदे । सुसंगता – (सहासम्) अइ अण्णसंकिदे, णं चित्तफलअस्स । अनया भङ्ग्या आच्छादितं च गर्भगतं चास्य वस्त्विति ।**

१ ब -तार्थप्रहेलिका.

एकद्विप्रतिवचनेति । एकं द्वयोः प्रतिवचनमस्याम् । द्विग्रहणमनेकोपलक्षणम् । तदमुना सर्वप्रश्नोत्तरवर्गः स्वकृतः । यथा –

नदीनां मेघविगमे का शोभा प्रतिभासते ।
बाह्यान्तरा विजेतव्याः के नाम कृतिनोऽरयः ॥

'हास्येनोपगतार्था' इत्यादी. प्रहेलिका म्हणजे दुसऱ्याला फसविणारे असे उत्तर म्हणूनच हास्ययुक्त, तीच नालिका, प्रणालिकेच्या रूपात असा अर्थ. प्रकर्षाने हेलिका थट्टामस्करीच्या स्वरूपाची जिच्यात असते ती प्रहेलिका. उदाहरणार्थ, रत्नावलीच्या दुसऱ्या अंकात सुसंगता म्हणते 'ज्याच्यासाठी तू आलीस तो येथेच आहे.' सागरिका विचारते 'मी कोणासाठी आले आहे?' त्यावर सुसंगता हसून उत्तर देते, 'अग भलती शंका घेणारी, ह्या चित्रफलकासाठी.' ह्या उक्तिवैचित्र्यामुळे गोष्ट झाकलेली आणि आतल्या आत राहाते.

'एकद्विप्रतिवचना' इत्यादी. दोन प्रश्नांचे एकच उत्तर जिच्यात असते ती वाक्केली. दोन हा शब्द अनेकाचे उपलक्षण आहे. म्हणून ह्याने सर्व प्रश्नोत्तरांचा समूह निदर्शित होतो. उदाहरणार्थ, 'मेघ निघून गेल्यावर नद्यांत कोणती शोभा भासमान होते? कृतकृत्य मनुष्याने बाह्य आणि आभ्यन्तर अशा कोणावर विजय मिळविला पाहिजे? उत्तर रयः म्हणजे वेग आणि ऽरयः म्हणजे शत्रू.'

'वितारण' हा शब्द 'प्रतारण' या अर्थी वापरला आहे, पण किंचित सौम्य अर्थाने. – 'प्रणालिकाव्याजा' प्रणालिका म्हणजे पन्हळ, तिची प्रस्तुत संदर्भात समर्पकता स्पष्ट नाही. – 'आच्छादितं च गर्भगतं च' ह्या दोहोंच्या अर्थात विशेष फरक नाही.

शेवटच्या 'ऽरयः' मध्ये दोन्ही प्रश्नांचे उत्तर आहे.

प्रस्तुत आर्या निर्णयसागर प्रतीत अशीच व काशी प्रतीत किंचित फरकाने आढळते. पण बडोदे प्रतीत तिच्या दोन अर्ध्या भागांच्या मध्ये पुढील १०९ वी आर्या घातलेली दिसून येते. अभिनवगुप्ताच्या टीकेत बडोदे प्रतीचाच क्रम अनुसरलेला आढळतो. आणि तो क्रम वीथ्यङ्गांच्या उद्देशात दिलेल्या अनुक्रमानुसार आहे हे खरे आहे. पण तो क्रम स्वीकारणे अशक्य आहे. प्रस्तुत आर्येचा पूर्वार्ध व पुढील आर्येचा उत्तरार्ध दोन्हींत बारा अधिक अठरा मात्रा असल्यामुळे त्यांची मिळून एक आर्या बनणे शक्य नाही. तसेच पुढील आर्येचा उत्तरार्ध व प्रस्तुत आर्येचा उत्तरार्ध मिळूनही एक आर्या होणे शक्य नाही. आणि नाट्यशास्त्रकाराने चुकीच्या आर्या रचल्या होत्या असे मानणे अशक्य आहे. उद्देशातील अनुक्रमाच्या अनुरोधाने कोणीतरी मागाहून ही उलटापालट केलेली आहे हे उघड आहे. अभिनवगुप्ताच्या अगोदर ही उलटापालट झाली असण्याची शक्यता आहे. पण वृत्तभंग झालेल्या आर्या त्याला स्वीकार्य झाल्या असतील हे असंभाव्य वाटते. असे अधिक शक्य आहे की त्याच्या टीकेची प्रत

करणाऱ्या कोणा लेखकाने उद्देशातील अनुक्रम लक्षात घेऊन ह्या आर्येवरील त्याची टीका अलग करून उत्तरार्धावरील टीका १०९ व्या आर्येवरील टीकेनंतर घातली आहे. प्रस्तुत आर्या नाट्यशास्त्राच्या अनेक हस्तलिखितांत अशाच स्वरूपात आढळते. तेव्हा ती तशीच स्वीकारून तिच्या दोन भागांवरील अभिनवगुप्ताची टीका एकत्र आणली आहे. बडोदे प्रतीत आर्या निश्चित करताना वृत्ताकडे मुळीच लक्ष दिले नाही. दोन ठिकाणी तर आर्या व अनुष्टुभ् एकत्र आणून श्लोक बनविले आहेत.

**मूर्खजनसंनिकर्षे हितमपि यत्र प्रभाषते विद्वान् ।**
**न च गृह्यतेऽस्य वचनं विज्ञेयोऽसत्प्रलापोऽसौ ॥ १०९ ॥**

ज्यामध्ये विद्वान मनुष्य मूर्ख लोकांच्या समोर हितकर असे वचन बोलतो आणि त्याच्या त्या वचनाचा अर्थ समजला जात नाही तेव्हा तो असत्प्रलाप होय असे समजावे.

**मूर्खजनसंनिकर्ष इति । यदुत्तरं मूर्खं प्रति वस्तुतो हितमपि शब्दच्छलाद्यथा प्रियं, तादृशं च मूर्खैः प्रियांशेन गृह्यते न तु हितांशेन । तथाभूतभङ्गीभूतद्वयाश्रयणं च विद्वत्त्वात्करोति । एवं हि तात्कालिकः कोपोऽपि रक्षितो भवति प्रियाभिधायित्वात्, कालान्तरसंभाव्यश्च यथार्थाभिधायित्वात् । यथा व्यसनिना राजपुत्रेण मन्त्रिपुत्रेण किं सुखमिति पृष्टेनोत्तरं दीयते –**

**सर्वथा योऽक्षविजयी सुरासेवनतत्परः ।**
**तस्यार्थानां सुखानां च समृद्धिः करगामिनी ॥ इति ।**

**असतोऽसाधुभूतस्य वस्तुनः प्रलपनमस्मिन्नित्यसत्प्रलापः ।**

'मूर्खजनसंनिकर्षे' इत्यादी. जे उत्तर मूर्खाला उद्देशून वास्तविक हितकर असले तरी शब्दश्लेषामुळे प्रीतिकर असल्यासारखे वाटते, आणि ते तसले उत्तर मूर्ख लोक त्यातील रुचकर अंशाने घेतात, हितकर अंशाने नाही ते उत्तर असत्प्रलाप. तशा तऱ्हेच्या द्व्यर्थी शब्दरचनेचा आश्रय विद्वत्तेमुळे घेतो. कारण त्यामुळे रुचकर बोलले असल्यामुळे तात्कालिक कोपापासून रक्षण होते आणि सत्य तेच सांगितले असल्यामुळे कालान्तराने होणाऱ्या संभाव्य कोपापासूनही. उदाहरणार्थ, व्यसनी राजपुत्राने 'सुख कशात आहे?' असे विचारल्यावर मन्त्रिपुत्र उत्तर देतो – 'जो सर्वप्रकारे द्यूतात विजयी होतो (पक्षी, इन्द्रियांवर जय मिळवितो) आणि मद्याचे सेवन करण्यात (पक्षी, देवांची सेवा करण्यात) तत्पर असतो त्याच्या हाती अर्थाची आणि सुखाची समृद्धी आपोआप चालून येते.' असत् म्हणजे जी चांगली गोष्ट नाही तिचे प्रलपन यात असते म्हणून असत्प्रलाप म्हटले आहे.

'विद्वत्त्वात्' मुद्रित पाठ 'सिद्धत्वात्' आहे. पण आर्येतील 'विद्वान्' शब्द लक्षात घेता हस्तलिखितातील पाठच बरोबर आहे यात संशय नाही. – 'मन्त्रिपुत्रेण' हा शब्द हस्तलिखितात आहे. मुद्रितात नाही. मूळ पाठ 'मन्त्रिणा' असाच असण्याचा दाट संभव आहे. मंत्र्याला असा प्रश्न विचारण्याचा अधिक संभव आहे, मंत्रिपुत्राला नाही. 'राजपुत्रेण' शब्दातील 'पुत्रेण' शब्दाची पुढील शब्दात चुकीने द्विरुक्ती झालेली दिसते. – 'पृष्टेन' च्या ऐवजी मुद्रितात 'पृष्टे तेन' असे आहे. पण 'तेन' म्हणजे कोणी याचा त्यात उलगडा होण्यासारखा नाही. येथे शब्द पुढेमागे झालेले दिसतात. 'राजपुत्रेण किं सुखमिति पृष्टेन मन्त्रिणोत्तरं दीयते' असाच मूळ पाठ असावा.

**यदसद्भूतं वचनं संस्तवयुक्तं द्वयोः [1]परस्परतः ।**
**एकस्य चार्थहेतोः स हास्यजननः प्रपञ्चः स्यात् ॥ ११० ॥**

ज्यात दोघांमध्ये खरी नसलेली, स्तुतीने युक्त व एकाचे प्रयोजन सिद्ध करण्यासाठी परस्परांत वचने उच्चारली जातात तो हास्य उत्पन्न करणारा प्रपंच होय.

**यदसद्भूतमिति । यथा रत्नावल्याम् 'सुसंगते, कथमहमिहस्थो भवत्या ज्ञातः' इति राजन्युक्तवति सुसंगतयोच्यते 'ण केवलं भट्टा, चित्तफलहेण, ता देवीए णिवेदइस्सं' इत्यादौ आभरणदानपर्यन्ते प्रपञ्चः । तथा हि द्वयोः सागरिकासुसङ्गतयोः सागरिकानायकयोः राजसुसंगतयोः राजविदूषकयोः परस्परसंबन्धमाश्रित्यासद्भूतमसत्यं देव्यै निवेदयामीत्युक्तम् । संस्तवश्च तत्रास्ति 'भट्टिणो पसादेण कीळिदं मए' इति । हास्यमपि परिहासरूपं विद्यते । एकस्य च राज्ञोऽर्थे प्रयोजने सागरिकासंगमे हेतुर्भवत्येवेति अन्यथाभिधानात्प्रपञ्चः ।**

'यदसद्भूतम्' इत्यादी. उदाहरणार्थ, रत्नावलीमध्ये 'सुसंगते, मी येथे आहे हे तुम्हाला कळले का?' असे राजाने विचारल्यावर सुसंगता म्हणते, 'केवळ राजेसाहेब आहेत एवढेच कळले नाही, तर चित्रफलकाची गोष्टही कळली आहे. तर आता मी जाऊन राणीसाहेबांना सांगते' येथपासून तिला अलंकाराचे दान करीपर्यंतचा भाग प्रपंच होय. कारण, तेथे दोघांच्या म्हणजे सागरिका आणि सुसंगता, सागरिका आणि नायक, राजा आणि सुसंगता, राजा आणि विदूषक यांच्या परस्परसंबंधाला अनुलक्षून असद्भूत म्हणजे असत्य 'मी राणीसाहेबांना सांगते' हे वचन आहे. आणि 'राजेसाहेबांच्या कृपाप्रसादाने मी थट्टा केली आहे' या वचनात तेथे स्तुती सुद्धा आहे. आणि परिहासाच्या स्वरूपाचे हास्य सुद्धा तेथे आहे. एकाच्या म्हणजे राजाच्या अर्थाचा म्हणजे सागरिकेशी मिलनरूप प्रयोजनाचा हेतू असतोच म्हणून दुसऱ्या प्रकारे सांगितले असल्यामुळे प्रपंच असे नाव आहे.

१ **ब** परस्परं यत्तु, **नि** परस्परं यत्.

'द्वयोः' याच्या स्पष्टीकरणार्थ हस्तलिखितात चार जोड्यांचा निर्देश आहे. त्यांपैकी 'साग-रिकानायकयोः' आणि 'राजसुसंगतयोः ह्या दोन जोड्या मुद्रितात नाहीत. पण प्रस्तुत संदर्भात याच दोन जोड्यांतील अन्तर्गत परस्परसंबंधाला महत्त्व आहे. म्हणून त्या अत्यंत आवश्यक आहेत. एक वेळ इतर दोन जोड्या वगळल्या तरी चालेल, पण ह्या वगळता येण्यासारख्या नाहीत. – 'कीलिदं' मुळातील 'किमिदं' हा पाठ भ्रष्ट आहे. – 'अन्यथाभिधानात्प्रपञ्चः' याव-रून 'प्रपञ्च' शब्दाचा 'दुसऱ्या प्रकारे कथन' असा अर्थ केलेला दिसतो.

प्रस्तुत आर्येच्या दुसऱ्या चरणाच्या शेवटी बडोदे प्रतीत 'परस्परं यत्तु' असा पाठ आहे. पण त्यामुळे त्या चरणात एकवीस मात्रा होऊन वृत्तभंग होतो. काशी प्रतीचाच पाठ योग्य यात शंका नाही.

**यत्कारणाद्गुणानां दोषीकरणं भवेद्विवादकृतम् ।**
**दोषगुणीकरणं वा तन्मृदवं नाम विज्ञेयम् ॥ १११ ॥**

ज्याच्यामुळे विवादाच्या प्रसंगाने गुणांना दोषांचे स्वरूप दिले जाते अथवा दोषांना गुणांचे स्वरूप ते मृदव होय असे समजावे.

**यत्कारणादिति । गुणानां दोषत्वं दोषानां वा गुणत्वं यत्र क्रियते तन्मृदवम् । विवादकृतमित्यनेन लक्षणाद्विशेषमाह । इदं वृत्तान्तरस्वभावमित्यर्थः । यथा, 'शिरः श्वा काको वा द्रुपदतनयो वा परिमृशेत्' इत्यत्र दोषस्य गुणीकरणं विवादाकर्णनेन सह । 'यदि शस्त्रमुज्झितमशस्त्रपाणयः' इत्यत्र कर्णवचनेन प्रतिज्ञातपरिपालनस्य गुणस्यापि दोषीकरणं विवादकृतमेव । मृदवमिति मर्दनं मृद्, परपक्षमर्दनेन स्वपक्षमवति रक्षतीति ।**

'यत्कारणात्' इत्यादी. गुणांना दोष म्हणून आणि दोषांना गुण म्हणून ज्यात दाखविले जाते ते मृदव. 'विवादकृतम्' याने सामान्य लक्षणाहून ह्या अंगाची विशेषता स्पष्ट करतात. याचे स्वरूप दुसऱ्या वृत्तासारखे आहे असा याचा अर्थ. उदाहरणार्थ, वेणीसंहारात 'मस्तकाला कुत्रा अथवा कावळा अथवा द्रुपदाचा पुत्र कोणीही स्पर्श करील' या अश्वत्थाम्याच्या वचनात दोष गुण म्हणून निर्दिष्ट केला तो विवाद ऐकल्याबरोबर. 'जरी शस्त्राचा त्याग केला असला तरी ज्यांच्या हातात शस्त्र नाहीत ते' ह्या कर्णाच्या वचनात प्रतिज्ञापालनरूपी गुणाचे दोषात रूपांतर केले आहे ते विवादामुळेच. मृदव शब्दाची व्युत्पत्ती अशी – 'मृद्' म्हणजे मर्दन, परपक्षाच्या मर्दनाने जे स्वपक्षाला 'अवति' म्हणजे रक्षण देते ते मृदव.

'लक्षणात्' म्हणजे वर जे वीथ्यङ्गाचे प्रतिवचनवैचित्र्य असे सामान्य लक्षण केले आहे त्याहून थोडे वैशिष्ट्यपूर्ण असे हे अंग आहे. इतर अंगांत नसलेला विवाद अथवा कलह ह्याच अंगात असतो. – 'वृत्तान्तरस्वभावम्' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. मुळात 'वृत्त्यन्तरं स्वभावम्' असे आहे. या ठिकाणी वृत्तींचा काही संबंध दिसत नाही. वृत्त म्हणजे घटना. विवाद ही इतर अंगात आढळणाऱ्या घटनांहून निराळ्या स्वरूपाची घटना आहे असे येथे म्हणावयाचे आहे. त्यासाठी सर्व मिळून एकच समास असणे आवश्यक आहे हे उघड आहे. – 'विवादाकर्णनेन सह' 'विवाद' म्हणजे ह्या ठिकाणी नेपथ्यातून अश्वत्थाम्याने ऐकलेला द्रोणवधाचा वृत्तांत. तो ऐकल्यानंतर असा 'आकर्णनेन सह' चा अर्थ आहे. दुर्योधन व कर्ण यांच्या प्रवेशाच्या अगोदरचे हे अश्वत्थाम्याचे उद्गार आहेत. म्हणून विवाद म्हणजे कलह हा अर्थ ह्या उदाहरणात लागू नाही.

वेणीसंहारातील हे दोन श्लोक असे –

परित्यक्ते देहे रणशिरसि शोकान्धमनसा
शिरः श्वा काको वा द्रुपदतनयो वा परिमृशेत्।
स्फुरद्दिव्यास्त्रौघद्रविणमदमत्तस्य च रिपो-
र्ममैवायं पादः शिरसि निहितस्तस्य न करः॥ ३.२२.

यदि शस्त्रमुज्झितमशस्त्रपाणयो
न निवारयन्ति किमरीनुदायुधान्।
यदनेन मौलिदलनेऽप्युदासितं
सुचिरं स्त्रियेव नृपचक्रसंनिधौ॥ ३.३१.

– मृदव शब्दाची व्युत्पत्ती मृद् + अव अशी केली आहे.

परवचनमात्मनश्चोत्तरोत्तरसमुद्भवं द्वयोर्यत्तु[1] ।
अन्योन्यार्थविशेषकमधिबलमिति तद्बुधैर्ज्ञेयम् ॥ ११२ ॥

ज्यात दोन पात्रांमधील स्वतःची व दुसऱ्याची उत्तरोत्तर होत जाणारी वचने परस्परांच्या अर्थात विशेषता उत्पन्न करतात ते अधिबल होय असे सुज्ञ मनुष्यांनी समजावे.

परवचनमात्मनश्चेति । परस्य वचनमात्मनश्च वचनं परस्परमर्थविशेषलाभो यत्र भवति इत्युत्तरोत्तरस्याधिकाधिकस्यार्थस्य समुद्भवो यत्र तदधिबलम् । एतदुक्तं भवति । यत्रोक्तिप्रत्युक्तिक्रमे क्रियमाणे परस्परप्रज्ञानोपजीवनबलात् स्वपक्षसुघटितता, तद्बलसंबन्धादधिबलम् । यथा नागानन्दे 'रागस्या-

१ नि -र्यत्र.

स्पदमित्यवैमि' इत्यादित आरभ्य विदूषकेण सहोक्तिक्रमेण स्वपक्षो द्रढिमानमानीतो यावदाह 'ननु शरीरतः प्रभृति सर्वमेव मया परार्थं परिपाल्यते' इति ।

'परवचनमात्मनश्च' इत्यादी. दुसऱ्याचे वचन आणि स्वतःचे वचन यांच्या परस्पर संबंधाने विशेष अर्थाचा ज्यात लाभ होतो आणि म्हणून ज्यात उत्तरोत्तर म्हणचे अधिकाधिक अर्थाची निष्पत्ती होते तें अधिबल. याचा आशय असा – जेथे उक्ती आणि प्रत्युक्ती ह्या क्रमाने उच्चारल्या जात असता परस्परांना विशेष ज्ञान देण्याची प्रक्रिया बलवान् होऊन त्यामुळे स्वतःचा पक्ष सुघटित होतो; त्या बलाच्या संबंधामुळे अधिबल हे नाव दिले आहे. उदाहरणार्थ, नागानन्द नाटकात जीमूतवाहनाच्या 'अनुरागाचे स्थान आहे हें मी जाणतो' ह्या उक्तीपासून सुरुवात होऊन विदूषकाबरोबरच्या संवादाच्या क्रमाने त्याची स्वतःची बाजू दृढ केली जाते जेव्हा तो अखेर म्हणतो 'खरोखर, देहापासून सर्व काही मी दुसऱ्यांसाठी बाळगीत आहे.'

'-सुघटितता तद्बल-' हा हस्तलिखितातील पाठ आहे. मुद्रित पाठ '-सुघटितादधिबल-' असा आहे. स्वपक्षाला सुघटितता येते म्हणजे त्या पक्षाला बळकटी येते, तो दृढ होतो; आणि तो असा बलवान होतो म्हणून ह्या प्रक्रियेचे नाव अधिबल असे अभिनवगुप्ताला म्हणावयाचे आहे. त्यासाठी हस्तलिखिताचा पाठ अधिक समर्पक आहे. अधिबलसंबन्ध सुघटित होतो असे म्हटले असण्याची शक्यता कमी. – नागानन्दात पहिल्या अंकाच्या प्रारंभीच हा प्रसंग आहे–

**नायकः – सखे आत्रेय,**

**रागस्यास्पदमित्यवैमि न हि मे ध्वंसीति न प्रत्ययः**
**कृत्याकृत्यविचारणासु विमुखं को वा न वेत्ति क्षितौ ।**
**एवं निन्द्यमपीदमीप्सितफलप्राप्त्यै भवेद्यौवनं**
**भक्त्या याति यदीत्थमेव पितरौ शुश्रूषमाणस्य मे ॥५॥**

... ... ...

**नायकः – किं मतङ्गो राज्यं हरिष्यतीति शङ्कसे ।**
**विदूषकः – अध इं ।**
**नायकः – यद्येवं ततः किं स्यात् । ननु स्वशरीरात्प्रभृति सर्वं परार्थमेव मया परिकल्प्यते (पाठभेद – परिपाल्यते) ।**

**अन्यार्थमेव वाक्यं छलमभिसंधानहास्यरोषकरम् ।**
**प्रत्यक्षवृत्तिरुक्तो व्याहारो हास्यलेशार्थः ॥ ११३ ॥**

दुसऱ्याच अर्थाने वापरलेले वाक्य संबंधानुसार हास्यकर किंवा रोषकर होते तो छल होय. प्रत्यक्ष घडणाऱ्या गोष्टीविषयीचा थोडासा हास्यकारक अर्थ तो व्याहार असे म्हणतात.

**अन्यार्थमेव वाक्यमिति । यद्वाक्यं प्रयोजनान्तरमुद्दिश्य वचनमुच्यमानं कस्यचिद्वचनमन्यस्य हास्यमपरस्य रोषं जनयति तच्छलम् । यथा –**

**कस्स व ण होइ रोसो दट्ठूण पिआए सव्वणं अहरम् ।**
**सब्भमरपदुमग्घाइरि वारिअवामे सहसु एण्हिम् ॥**

**एतद्वचनं सखीसंबन्धि भर्तृप्रत्यायनं प्रयोजनमुद्दिश्य प्रयुक्तं तस्य पत्न्या अपि संबन्धिनां छलं विदग्धजनस्य हास्यं सपत्न्या रोषं जनयति ।**

**प्रत्यक्षवृत्तिरिति । प्रत्यक्षशब्देन भावी प्रत्यक्ष उच्यते । तदयमर्थः । भाविनि प्रत्यक्षेऽर्थे दैववशाद् वृत्तिर्यस्य स व्याहारः, विविधोऽर्थोऽभिनीयते येन । यथा 'उद्दामोत्कलिकाम्' इत्यादि ।**

'अन्यार्थमेव वाक्यम्' इत्यादी. जे वाक्य दुसऱ्या प्रयोजनाच्या सिद्धीसाठी उच्चारले असता कोणाला सरळ वचन म्हणून वाटते, दुसऱ्याला हास्यकर वाटते आणि आणखी कोणाला क्रोध उत्पन्न करते ते छल. उदाहरणार्थ, 'आपल्या प्रियेच्या अधरावर व्रण झालेला पाहून कोणाला बरे राग येणार नाही? नको म्हणत असताही हट्टी बनून आत भ्रमर असलेल्या कमळाचा वास घेणारी तू, आता पतीचा रोष सहन कर.' सखीसंबंधीचे हे वचन पतीचा संशय दूर करण्याच्या उद्देशाने योजिलेले असता त्याच्या पत्नीच्या इतर नातेवाइकांची सुद्धा फसवणूक करते, तसेच विदग्ध मनुष्याला हास्य आणि तिच्या सवतीला रोष उत्पन्न करते.

'प्रत्यक्षवृत्तिः' इत्यादी. प्रत्यक्ष शब्दाने नंतर होणारे प्रत्यक्ष अभिप्रेत आहे. म्हणून याचा अर्थ असा—नंतर प्रत्यक्ष घडणाऱ्या गोष्टीसंबंधी दैवयोगाने ज्यात अगोदर निदर्शन असते तो व्याहार, ज्याने विविध अर्थाचा अभिनय केला जातो तो. उदाहरणार्थ, 'खूप कळ्या आलेली (पक्षी, गाढ उत्कण्ठा असलेली)' इत्यादी.

'कस्यचिद्वचनम्' यातील 'वचन' शब्द सरळ, वाच्यार्थानेच घेतलेली उक्ती या अर्थी वापरला आहे. आर्येतील 'अभिसंधान' शब्दाची व्याख्या करण्यासाठी हा शब्द योजिला आहे. जे उक्ती वाच्यार्थाने घेतात त्यांचाच छल म्हणजे फसवणूक होते. – 'सब्भमर- इ०' आणि 'वारिअवामे' ही संबोधने आहेत. – 'अपि संबन्धिनाम्' यातील 'अपि' शब्द 'संबन्धिनाम्' नंतर समजावा. – 'सपत्न्या' नंतर मुळात 'वचनं' अधिक आहे. पण या ठिकाणी ह्या शब्दाची चुकीने पुनरुक्ती झालेली दिसते.

'दैववशात्' हे मुख्यतः शब्दश्लेषाने घडून येते. – 'व्याहारः' ह्या शब्दाची 'व्युत्पत्ती वि+आहृ पासून केली असून 'वि' चा विविध असा अर्थ आणि 'आहृ' चा अभिनय करणे असा अर्थ केला आहे. – 'उद्दामोत्कलिकाम्' रत्नावलीतील संपूर्ण श्लोक असा –

**उद्दामोत्कलिकां विपाण्डुररुचं प्रारम्भजृम्भां क्षणा-**
**दायासं श्वसनोद्गमैरविरतैरातन्वतीमात्मनः ।**
**अद्योद्यानलतामिमां समदनां नारीमिवान्यां ध्रुवं**
**पश्यन्कोपविपाटलद्युति मुखं देव्याः करिष्याम्यहम् ॥ २.४.**

प्रस्तुत आर्या आणि तिच्यावरील अभिनवगुप्ताची टीका दोन अलग झालेले भाग एकत्र आणून तयार केल्या आहेत. मुळात आर्येच्या दोन अर्धांच्या मध्ये पुढील ११४ वी आर्या आढळते. परंतु तशा तऱ्हेची रचना मूळ नाट्यशास्त्रकाराने केली असण्याची शक्यता नाही. कारण त्यामुळे दोन पूर्वार्धे मिळून एक आर्या व दोन उत्तरार्धे मिळून दुसरी आर्या असा बनाव दिसून येतो. अशा तऱ्हेच्या आर्या ह्या ग्रंथकाराने रचल्या असणे अशक्य आहे. असे दिसते की वीथ्यङ्गांच्या नावनिर्देशातील क्रमाच्या अनुरोधाने आर्येचे दोन अर्ध कोणीतरी विभक्त केले आहेत. छल आणि व्याहार यांच्या व्याख्या अर्ध्या आर्येतच संपत असल्यामुळे असे करणे शक्य झाले. काशी प्रतीत आणि डॉ. घोष यांच्या आवृत्तीत छलाची व्याख्या एका संपूर्ण आर्येत दिली असून व्याहाराची व्याख्या एका पूर्ण अनुष्टुभ् श्लोकात दिली आहे. अनुष्टुभ् छंद मूळ असण्याचा संभव कमी. प्रस्तुत ठिकाणी स्वीकारलेल्या आर्येच्या स्वरूपाला हस्तलिखितांत आधार नसावासे वाटते. तथापि वृत्ताच्या अनुरोधाने हेच रूप स्वीकारणे आवश्यक आहे यात शंका नाही. १०८ व्या आर्येच्या बाबतीतही असाच प्रकार घडला आहे हे वर आलेच आहे.

**श्रुतिसारूप्याद्यास्मिन्[1] बहवोऽर्था युक्तिभिर्नियुज्यन्ते ।**
**यद्धास्यमहास्यं वा तत्त्रिगतं नाम विज्ञेयम् ॥ ११४ ॥**

ज्यामध्ये शब्दसादृश्यामुळे एका वचनात पुष्कळ अर्थ युक्तिपूर्वक ग्रथित केले जातात – मग ते हास्यकर असोत अथवा नसोत – ते त्रिगत होय असे समजावे.

**श्रुतिसारूप्यादिति शब्दसारूप्यात् बहव इति प्रश्नप्रतिवचनस्वभावा यत्र नियुज्यन्ते युक्तिभिरिति काक्कादीनाम् तथैवोपपात्तिभिः । त्रिशब्दोऽनेकोपलक्षणम् अनेकमर्थं गतमिति त्रिगतम् । वाक्केल्यामुत्तरमनेकप्रश्नसाधारणम्, इह तु य एव प्रश्नस्तदेव प्रतिवचनमिति विशेषः । यथा –**

१ नि -प्यार्थात्मनि.

सर्वक्षितिभृतां नाथ दृष्टा सर्वाङ्गसुन्दरी ।
रामा रम्ये वनान्तेऽस्मिन् त्वया विरहिता मया ॥ (विक्रमो०, ४.५१)

**अत्रैतदेवोत्तरम् । साकाङ्क्षकाकुप्रयोगेऽपि प्रतिबिम्बे वामदक्षिणवैपरीत्यवन्निराकाङ्क्षा काकुः संवृत्ता यत एतद्धास्यम् । एवमहास्य उदाहार्यम् ।**

श्रुतिसारूप्यात् म्हणजे शब्दांच्या एकसारखेपणामुळे, पुष्कळ म्हणजे प्रश्न व प्रतिवचन यांच्या स्वरूपाचे, ज्यात योजिले जातात, काकु आदींच्या युक्तींनी तसेच उपपत्तींच्या साहाय्याने, ते त्रिगत. 'त्रि' शब्द अनेकाचे उपलक्षण आहे. अनेक अर्थांप्रत गेलेले ते त्रिगत. वाक्केलीमध्ये एकच उत्तर अनेक प्रश्नांना समान असते, परंतु यात जो प्रश्न तेच उत्तर असा ह्या दोहोत फरक. उदाहरणार्थ, विक्रमोर्वशीयात पुरूरवा 'हे सर्व पर्वतांच्या अधिपते, ह्या रम्य वनपरिसरात सर्वांगसुंदर रमणी माझ्या शिवाय असलेली तू पाहिली आहेस काय?' या ठिकाणी हेच उत्तर आहे. साकाङ्क्ष काकूचा उपयोग केला असताही ज्याप्रमाणे प्रतिबिम्बात डाव्या आणि उजव्या बाजूंची अदलाबदल होते त्याप्रमाणे ती निराकाङ्क्ष काकू बनली आहे, म्हणून हे हास्यकारक आहे. त्याचप्रमाणे हास्यकारक नसलेल्या त्रिगताचे उदाहरण द्यावे.

'-वचनस्वभावा' मुळात '-वचनस्य स्वभावा' आहे. पण समासघटित रूपच अधिक समुचित. – 'उपपत्तिभिः' म्हणचे ते अर्थ उपपन्न आहेत याचे ध्यान ठेवून. – 'वाक्केल्यामुत्तरम्' मुद्रितात 'वाक्ये मुख्यमुत्तरम्' असा सर्वथा असंभाव्य पाठ आहे. – 'क्षितिभृत्' म्हणजे पर्वत, तसेच राजा. – 'साकाङ्क्षकाकु-' सतराव्या अध्यायात (१७.१११) साकाङ्क्ष व निराकाङ्क्ष अशा दोन प्रकारच्या काकूंचे वर्णन आहे. काकु म्हणजे वाक्य उच्चारताना आवाज चढवीत जाण्याची किंवा उतरवीत जाण्याची क्रिया. साकाङ्क्ष काकूत वक्त्याला त्याच्या विधानाचे उत्तर पाहिजे असते; सामान्यतः तो प्रश्नात्मक स्वरूपाचा असतो. त्याची तारस्वरात सुरुवात होऊन मन्द्रस्वरात अंत होतो; याच्या विपरीत निराकाङ्क्ष काकु असतो असे नाट्यशास्त्रात म्हटले आहे. – 'अहास्ये उदाहार्यम्' याचे उदाहरण अभिनवगुप्तानेच दिले असते तर बरे झाले असते.

**संरम्भसंभ्रमयुतं विवादयुक्तं तथापवादकृतम् ।
बहुवचनाक्षेपकृतं गण्डं प्रवदन्ति तत्त्वज्ञाः ॥ ११५ ॥**

गडबड व गोंधळ यांनी युक्त, विवाद असलेले तसेच निंदेने युक्त, पुष्कळ वचनांचा आक्षेप करणारे जे वचन त्याला नाट्यतत्त्व जाणणारे गंड असे म्हणतात.

**संरम्भसंभ्रमयुतमिति । संरम्भेण कृतिविशेषेण यः संभ्रम आवेग तद्युक्तं, यद्विरुद्धवस्तुवदनेन कृतं पूर्वोक्तवस्त्वपवदनमेव च, तद्वचनं दृष्टार्थगर्भत्वाद् गण्ड**

इव गण्डः । ईषदसमाप्तं वचनं बहुवचनं तत्कृतेनाक्षेपेण कृतं स्वयं प्रतिवचनतां पूर्ववचनस्य गतमित्यर्थः । तथा च कोहलः –

वचसां संबद्धानामन्ते यस्मात्पदं त्वसंबद्धम् ।
संबद्धमिवाभाति हि तद्गण्डो नाम वीथ्यङ्गम् ॥

अनेनेषदसमाप्तिरेव दर्शिता । यथा दुर्योधनेन भानुमतीं प्रत्युच्यते –

अध्यासितुं तव चिराज्जघनस्थलस्य
पर्याप्तमेव करभोरु ममोरुयुग्मम् । इति । (वेणी. २.२३)

तत्र प्रविश्य कञ्चुकी –

भग्नं भीमेन मरुता भवतो रथकेतनम् । इति । (वेणी. २.२४)

तत्रोरुयुग्ममिति पूर्वविश्रान्तमपि भग्नमित्यत्र संबन्धयोग्यं जातम् ।

'संरम्भसंभ्रमयुतम्' इत्यादी. संरम्भाने म्हणजे एखाद्या विशेष घटनेमुळे जो संभ्रम म्हणजे आवेग त्याने युक्त, जे विरुद्ध वस्तूच्या उच्चारणामुळे बनलेले आणि अगोदर निर्दिष्ट केलेल्या वस्तूचा अपलापच करणारे ते वचन निदर्शित झालेला अर्थ त्याच्या गर्भात असल्यामुळे फोडासारखे म्हणून गण्ड. किंचित अपूर्ण असलेले वचन ते बहुवचन त्याच्या केलेल्या आक्षेपाने सिद्ध झालेले म्हणजे आपोआप पूर्वीच्या उक्तीला प्रतिवचनाच्या स्वरूपाचे झालेले असा अर्थ. कोहलाने तसेच म्हटले आहे. – 'परस्परांशी संबद्ध असलेल्या शब्दांच्या शेवटी ज्या अर्थी एक दुसरा शब्द असंबद्ध असताही संबद्ध असल्यासारखा भासतो त्या अर्थी ते गण्ड नावाचे वीथ्यङ्ग होते.' ह्या व्याख्येतही किंचित अपूर्णताच निदर्शित झाली आहे. उदाहरणार्थ, वेणीसंहारात दुर्योधन भानुमतीला म्हणतो – 'हे संदरि, पुष्कळ कालानंतर माझ्या मांड्या तुझ्या जघनस्थलाला बसण्यासाठी पुरेशा आहेतच.' त्या क्षणी कञ्चुकी प्रवेश करून म्हणतो – 'भयंकर अशा वाऱ्याने आपल्या रथाचा ध्वज मोडला आहे.' त्या ठिकाणी 'ऊरुयुग्म' हा शब्द अगोदर अन्वित झालेला असताही 'भग्न' शब्दाबरोबर संबद्ध होण्यास योग्य बनला आहे.

'संरम्भेण कृति-' मुळात 'संरम्भेणाकृति-' आहे. पण आकृति हा शब्द योजला असण्याचा संभव फार कमी. कृती म्हणजे घटना या अर्थाने वेणीसंहाराच्या दुसऱ्या अंकातील झंझावात ह्या कृति-विशेषाचा निर्देश अभिनवगुप्ताला अभिप्रेत आहे असे म्हणता येण्यासारखे आहे. – 'विरुद्धवस्तुवदनेन' ही आर्येतील 'विवाद' शब्दाची व्युत्पत्तिनिदर्शक व्याख्या आहे. म्हणून मुद्रितातील 'विरुद्धवस्तु यत्नेन' हा पाठ बरोबर नाही हे उघड आहे. वेणीसंहारातील पुढे दिलेल्या उदाहरणाच्या संदर्भात

'ऊरुयुग्मं भग्नम्' हा विवाद म्हणजे विरुद्धवस्तुवदन. – 'पूर्वोक्तवस्तु' म्हणजे त्या उदाहरणात 'ऊरुयुग्मं पर्याप्तम्'. – 'दृष्टार्थ' म्हणजे हाच अगोदरचा संकल्पित अर्थ. तो नवीन सूचित झालेल्या अर्थाने झाकला जातो. – 'बहुवचन' म्हणजे बहुतांशी अर्थ पूर्ण झालेले वचन असा अर्थ केला आहे. – 'यस्मात्पदं त्वसंबद्धम्' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'यस्मात्पदत्वनबन्धः' असा पाठ आहे आणि मुद्रितात 'यत्स्यात्पदे त्वसंबन्धः' असा. दोन्ही बरोबर नाहीत. पुढील 'आभाति' ला 'पदं' असा कर्ता आवश्यक आहे आणि पुढे ज्याअर्थी 'संबद्धमिव आभाति' असे म्हटले आहे त्याअर्थी 'असंबद्धम्' असेच त्याचे विशेषण वापरले असावे हे उघड आहे. – 'भानुमतीं' मुळात 'भानुमती' आहे. पण क्रियापद 'प्रत्युच्यते' असे नसून 'उच्यते' एवढेच आहे, आणि 'प्रति' चा 'भानुमतीं' शी अन्वय अभिप्रेत आहे.

**एतैस्त्रयोदशभिरङ्गैर्युक्ता वीथी । तस्याश्च सर्वरसत्वस्याभिधानात् पर्यायेण रसानां प्राधान्यादुत्तमो मध्यमोऽधमो वा नायको भवत्येव । तथा च कोहलः —**

**उत्तमाधममध्याभिर्युक्ता प्रकृतिभिस्तथा ।**
**एकहार्या द्विहार्या वा सा वीथीत्यभिसंज्ञिता ॥ इति ।**

**अधमप्रकृतेस्तु न नायकत्वमिति ब्रुवन् प्रहसनकभाणकादौ किं ब्रूयात् । हास्यादि-रसप्रधानत्वे ह्यधम एव नायकः । कथाशरीरफलेन प्रधानतया संबध्यमानो नायक उच्यते । अनायकत्वेऽपि चास्याधमत्वेनोपादेयता स्यात् । परिवारतया तस्यानुप्रवेशो हि अनिवारित एव सर्वत्र ।**

वीथी ह्या तेरा अंगांनी युक्त असते. आणि तिच्यात सर्व रस विद्यमान असतात असे म्हटले असल्यामुळे पर्यायाने रसांना प्राधान्य येऊन नायक उत्तम, मध्यम अथवा कनिष्ठ दर्जाचा असतोच. कोहलाने तसेच म्हटले आहे–

'उत्तम, कनिष्ठ आणि मध्यम अशा तीन प्रकृतींनी युक्त, आणि एका पात्राने अभिनीत केलेली अथवा दोन पात्रांनी अभिनीत केलेली, तिला वीथी अशी संज्ञा आहे.'

परंतु कनिष्ठ प्रतीचे पात्र नायक होणार नाही असे ज्याचे म्हणणे आहे तो प्रहसन, भाण आदींच्या संबंधात काय म्हणणार? कारण, ज्यात हास्य आदी रस प्रधान असतात त्यात कनिष्ठच नायक असतो. कथारूप शरीराच्या फलाशी ज्याचा मुख्यत्वेकरून संबंध जुळून येतो तो नायक. आणि नायक नसला तरी कनिष्ठ पात्र म्हणून त्याची योजना होऊ शकेल. कारण, परिजन म्हणून त्याच्या सर्वत्र समावेशाला कोणताही प्रतिबंध नाही.

'ब्रुवन्' ही मुळातील 'ध्रुवं' ची केलेली दुरुस्ती आहे. 'ध्रुवम्' ने काहीच अर्थ लागण्यासारखा नाही. 'ब्रुवन्'ने वाक्याचा व्यवस्थित अर्थ लागतो. – 'कथाशरीर-' कथा अथवा इतिवृत्त हे नाट्याचे शरीर असे पुढील अध्यायाच्या प्रारंभी (१९.१) सांगितले आहे. – 'अनायकत्वेऽपि चास्याधमत्वेनोपादेयता' हस्तलिखितात 'ऽपि' नाही, मुद्रितात आहे. पुढे हस्तलिखितात 'चास्याधमवदनुपादेयता' आहे, तर मुद्रित पाठ 'चास्याधमत्वं नानुपादेयं' असा आहे. हस्तलिखितातील 'अनुपादेयता' संभाव्य नाही, कारण ते पुढील वाक्याशी विसंगत होईल. त्या पाठात कमीत कमी बदल करून दुरुस्ती सुचविली आहे. मुद्रित पाठाचा अर्थ अंततः सूचित पाठासारखा आहे, तथापि त्यात निर्दिष्ट झाल्याप्रमाणे अधमत्व उपादेय आहे हे अभिप्रेत नसून अधम पात्र उपादेय आहे हे अभिप्रेत आहे.

**इति दशरूपविधानं सर्वं प्रोक्तं[1] मया हि लक्षणतः ।**

**[2]पुनरस्य शरीरविधानं[3]संधिविधिलक्षणं वक्ष्ये ॥ ११६ ॥**

**इति भारतीये नाट्यशास्त्रे दशरूप[4]निरूपणं नामा[5]ध्यायोऽष्टादशः समाप्तः ।**

याप्रमाणे दहा रूपकांच्या रचनेचे सर्व नियम मी लक्षणांच्या द्वारा सांगितले आहेत आता यापुढे मी कथानकाची रचना व संधींचे नियम यांची लक्षणे सांगणार आहे.

येथे भरतमुनींने रचलेल्या नाट्यशास्त्रातील दशरूपनिरूपण नावाचा
अठरावा अध्याय समाप्त होतो.

**अध्यायार्थमुपसंहरन् भाविनमर्थमनुसंधत्ते इति दशरूपविधानमिति । लक्षणत इत्यनेनेदमाह दशैवैतानि लक्षणानि, उदाहरणानां तु का गणना । एतच्च पूर्वमेव दर्शितम् । तत्रैषां पुमर्थोपयोगो निजनिजलक्षणावसरे दर्शित एवेति पौनरुक्त्यं नाश्रीयत इति शिवम् ।**

अध्यायातील विषयाचा उपसंहार करून पुढील विषयाचे अनुसंधान 'इति दशरूपविधानम्' या आर्येत करतात. 'लक्षणतः' ह्या शब्दाने असे दाखवितात की लक्षणे अशी ही दहाच आहेत, पण उदाहरणांची संख्या काही नियमित नाही. आणि हे आम्ही मागेच दाखविले आहे. त्यात ह्यांचा पुरुषार्थासाठी संभाव्य उपयोग आम्ही त्या त्या लक्षणाच्या प्रसंगी दाखवून दिला आहे म्हणून आता त्याची पुनरुक्ती करीत नाही. इति शिवम्.

१ **नि** मयाति-. २ **नि** इतिवृत्तद्विविधानं, **ब** पुनरस्य शरीरगतं. ३ **नि ब** संधिविधौ. ४ **का** -विधानं, **नि** -लक्षणं. ५ **का** विंशोऽध्यायः.

'लक्षणतः इ०' हे वाक्य मिळालेल्या हस्तलिखिताच्या प्रतीत नाही. तो लेखनदोष आहे. कारण हे वाक्य असल्याशिवाय पुढील वाक्याची संगती लागत नाही. – 'दशैवैतानि' ही 'दशैव तानि' ची दुरुस्ती आहे. 'तानि' पेक्षा 'एतानि' अधिक संभाव्य आहे. – उदाहरण म्हणजे सट्टक, रासक आदी नाट्यशास्त्रात निर्दिष्ट नसलेले रूपकप्रकार.

ह्या आर्येच्या द्वितीयार्धाचा पाठ पुढील अध्यायाच्या पहिल्या श्लोकावरील अभिनवगुप्ताच्या टीकेच्या अनुरोधाने स्वीकारला आहे. बडोदे प्रतीच्या संपादकांनी त्या ठिकाणी हा पाठ ग्राह्य मानला आहे.

**इति विमलशिशिरदीधितिकलितशिरोमण्डनाङ्घ्रिदास्यचणः ।**
**अभिनवगुप्तो गुप्तं दशस्वरूपं सतत्त्वकं व्यवृणोत् ॥**

याप्रमाणे विमल चन्द्राने ज्याचे शिरोभूषण बनले आहे त्या भगवान शंकराच्या चरणांचे दास्य करण्याविषयीं प्रसिद्ध असलेल्या अभिनवगुप्ताने दशरूपकांचे गूढ असलेले स्वरूप तत्त्वासहित स्पष्ट केले आहे.

'तेन वित्तश्चुञ्चुप्चणपौ (५.२.२६)' ह्या पाणिनीच्या सूत्राप्रमाणे 'साठी प्रसिद्ध' या अर्थी 'चण' प्रत्यय लावला आहे. – हस्तलिखितात 'दशरूपं' आहे. पण त्याने वृत्तहानि होते. हा गीति छन्द आहे.

**इति श्रीमहामाहेश्वराभिनवगुप्ताचार्यविरचितायां नाट्यवेदविवृतावभिनवभारत्यां दशरूपकविधानं नामाष्टादशोऽध्यायः ।**

येथे महान महेश्वरभक्त श्री अभिनवगुप्ताचार्यांनी रचलेल्या नाट्यशास्त्राच्या अभिनवभारती नावाच्या व्याख्येचा दशकरूपकविधान नावाचा अठरावा अध्याय समाप्त होतो.

# एकोनविंशोऽध्यायः[1]

**इतिवृत्तं तु नाट्यस्य शरीरं परिकीर्तितम् ।**
**पञ्चभिः संधिभिस्तस्य [2]विभागः संप्रकल्पितः ॥ १ ॥**

कथानक हे नाट्याचे शरीर होय असे सांगितले आहे. पाच संधींच्या योगाने त्याचे विभाग कल्पिले आहेत.

**देहे ससंध्यङ्गगणे समस्ते यत्स्थापनं स्पर्शनवृत्तिकारि ।**
**तदिन्द्रियं यस्य वपुर्नमामि तमान्तरस्पर्शमयं महेशम् ॥**

सांधे आणि अवयव यांच्या समूहाने युक्त अशा संपूर्ण देहामध्ये ज्या इंद्रियाची स्थापना स्पर्शज्ञान उत्पन्न करते ते स्पर्शेन्द्रिय ज्याचे शरीर आहे त्या आभ्यन्तर स्पर्शमय महेश्वराला मी नमन करतो.

नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे अध्यायावरील टीकेच्या प्रारंभी मंगलश्लोकात शिवाला वंदन केले आहे. तसे करताना अध्यायाचा जो विषय – संधी आणि त्यांची अंगे – त्याचा श्लेषाने निर्देश अन्तर्भूत केला आहे. – 'तदिन्द्रियं' म्हणजे वस्तुतः त्वगिन्द्रिय. म्हणजे देहातील स्पर्शज्ञान हा ईश्वराचा आविर्भाव आहे अशी कल्पना केली आहे. – 'आन्तरस्पर्श' हा बाह्यस्पर्शाहून भिन्न. ईश्वर आन्तरस्पर्श स्वरूपाचा आणि बाह्यस्पर्श हा त्याचा बाह्य आविष्कार. म्हणून त्या बाह्यस्पर्शाला शरीर म्हटले आहे.

**पुनरस्य शरीरविधानेत्यादिना शरीरमितिवृत्तात्मकं, विधानं च तस्य विधानरूपप्रकारात्मकं, संधयश्च मुखादयो, विधयश्च संध्यङ्गस्वभावा लक्षणीयत्वेन प्रतिज्ञाताः । तत्र शरीरमेवादौ लक्षयितव्यमिति दर्शयति इतिवृत्तं त्विति ।**

१ का एकविंशो. २ का विभागाः परिकीर्तिताः.

तुशब्दो व्यतिरेके । काव्यमात्रस्यानभिनेयस्य तावद् वृत्तमात्रं शरीरम्, नटनीयस्य त्वभिनेयरूपस्य इति एवंप्रकारतया यदुपस्कृतं वृत्तम्, अत एवेतिवृत्तशब्दवाच्यं तद्वस्तु शरीरम्। रसाः पुनरात्मा शरीराविर्भावकाः । अत एवार्थनिर्मापकत्वात् अर्थतादात्म्यात् अर्थरूपताध्यासात् अर्थैकज्ञाननिवेशितत्वात् अर्थोपरञ्जकत्वात् अर्थनिमित्ताद्वा इतिवृत्तार्थैकयोगक्षेमत्वं वागात्मनां शब्दानामिति । तदाशयेन 'वाचि यत्नस्तु कर्तव्यो नाट्यस्यैषा तनुः स्मृता' इति पूर्वमुक्तम्, इह तु वृत्तं शरीरमिति दर्शितमित्याविरोधः ।

'पुनरस्य शरीरविधान-' इत्यादी आर्येत शरीर इतिवृत्ताच्या स्वरूपाचे, आणि त्याचे विधान म्हणजे विधानाच्या स्वरूपाचे त्याचे प्रकार, संधी म्हणजे मुखसंधी आदी, आणि विधी संध्यङ्गांच्या स्वरूपाचे, या सर्वांचे लक्षण करावयाचे आहे म्हणून प्रतिज्ञा केली होती. त्यांपैकी प्रथम शरीराचेच लक्षण करावयाचे हे 'इतिवृत्तं तु' या श्लोकात निदर्शित करतात. तु शब्द फरक दाखवितो. ज्याचा अभिनय करावयाचा नसतो असे जे केवळ काव्य असते त्याचे केवळ वृत्त हे शरीर होय, परंतु नटनीय म्हणजे अभिनेय स्वरूपाचे जे काव्य त्याचे इति म्हणजे अशा प्रकारे उपस्कृत झालेले जे वृत्त, म्हणूनच इतिवृत्त ह्या शब्दाने ज्याचा बोध होतो ते कथानक शरीर होय. परंतु रस त्याचा आत्मा, शरीराचा आविष्कार करणारा म्हणूनच अर्थाचे निर्माण करणारे असल्यामुळे, अथवा अर्थाशी तादात्म्य असल्यामुळे, अथवा अर्थस्वरूपाचा अध्यास झाल्यामुळे, अथवा केवळ अर्थाच्या बोधासाठीच उपयुक्त होत असल्यामुळे, अथवा अर्थाला उज्ज्वलित करणारे असल्यामुळे अथवा अर्थाचे निमित्त असल्यामुळे वाग्रूपी शब्दांची इतिवृत्ताच्या अर्थाशी एकरूपता असते. ह्याच आशयाने पूर्वी 'शब्दांसंबंधी प्रयत्न केला पाहिजे, कारण ते नाट्याचे शरीर समजले जातात' असे म्हटले होते आणि या ठिकाणी वृत्त शरीर होय हे दाखविले आहे, तेव्हा यात काही विरोध नाही.

'पुनरस्य इ०' ही वरील अठराव्या अध्यायातील शेवटची आर्या (१८.११६). अध्याय संगती सांगण्यासाठी हा निर्देश केला आहे. – 'शरीरमेवादौ' हस्तलिखितात 'आदौ' नाही, आणि मुद्रितात 'एव' नाही. दोन्ही असल्यास चांगले. – 'नटनीयस्य' हा शब्द मूळ श्लोकातील 'नाट्यस्य' शब्दाचा पर्याय आहे. – 'एवंप्रकारतया' म्हणजे संधी, संध्यङ्ग इत्यादींच्या साहाय्याने. – 'उपस्कृत' म्हणजे परिष्कृत, संपन्न इत्यादी. – 'अर्थनिर्मापकत्वात् इ०' या ठिकाणी शब्दाच्या अर्थाशी संबंधाविषयी संभाव्य असलेल्या सर्व प्रकारच्या मतांचा उल्लेख केला असून शेवटी कोठलेही मत स्वीकारले तरी शब्द आणि अर्थ यांची एकात्मकता सिद्ध होते असे प्रतिपादन केले आहे. – 'अर्थरूपताध्यास' म्हणजे शब्दावर अर्थाचा आरोप होतो अशी वेदान्तसदृश कल्पना. – 'एकयोगक्षेमत्वम्' म्हणून शब्द आणि अर्थ यांचा संबंध अगदी घनिष्ठ असल्यामुळे ते एकरूप होतात. – 'वाचि यत्नस्तु इ०' हे नाट्यशास्त्रात १४.२

मध्ये विधान केले आहे. – 'अविरोधः' विरोधाचा संभव असा की त्या ठिकाणी शब्द हे नाट्याचे शरीर असे म्हटले आहे तर प्रस्तुत ठिकाणी कथानक म्हणजे त्याचा अर्थ हे नाट्याचे शरीर असे विधान आहे. पण शब्द आणि अर्थ एकरूपच असल्याकारणाने ह्या दोन विधानांत काही विरोध नाही असा हा युक्तिवाद आहे.

**स तु कथं प्रकारवैचित्र्य इत्याशङ्क्याह पञ्चभिः संधिभिरिति । एतदुक्तं भवति । प्रकारवैचित्र्यकल्पनामया एव संधयः । तत्र पारम्यपरतया पञ्च संख्येति । तेन हीनसंधित्वेऽपि न कश्चिदत्र विरोधः । अन्ये तु सर्वत्र पञ्चैव संधयः, अपूर्णाङ्गत्वात्तु कस्यचित्संधेर्हीनसंधित्वमुच्यत इत्याहुः । एतच्च स्वस्थाने वितनिष्यामः । एवमितिवृत्तशब्दे इतिभागस्य योऽर्थः सोऽप्रसिद्ध इति कृत्वा द्वितीयार्धेन पञ्चभिरित्यादिना व्याख्यातः । न तु संधिनिरूपणमेतदुद्देशक्रमस्यानेकविधत्वात् ।**

परंतु प्रकारांची विविधता असता तो विरोधाचा अभाव कसा असेल अशी शंका घेऊन 'पञ्चभिः संधिभिः' यात तिचे निराकरण करतात. याचा अर्थ असा – प्रकारांच्या विविधतेच्या कल्पनेवर अधिष्ठित असेच संधी आहेत. त्यांत पाच ही संख्या अधिकात अधिक अशी आहे. म्हणून कमी संधी असले तरी यात काही विरोध नाही. परंतु इतर टीकाकार म्हणतात की सर्वत्र पाचच संधी असतात; परंतु एखाद्या संधीची अंगे पूर्ण नसल्याकारणाने तेथे हीनसंधि असे म्हणतात. ह्याचे आम्ही योग्य स्थळी विवरण करू. याप्रमाणे इतिवृत्त शब्दामधील इति हा अंश प्रसिद्ध नाही म्हणून 'पञ्चभिः' इत्यादी उत्तरार्धाने त्याची व्याख्या केली आहे. परंतु येथे काही संधींचे निरूपण केलेले नाही, कारण उद्देशाचा क्रम अनेक प्रकारचा असू शकतो.

'स तु इ०' येथे 'प्रकारवैचित्र्ये' असे सप्तमीचे रूप असल्यामुळे 'सः' ने 'अविरोधः' चा निर्देश समजावा लागतो. शंकेचे स्वरूप याप्रमाणे अभिप्रेत असावे – कथानक विविध प्रकारचे असते तेव्हा निरनिराळ्या प्रकारांत आपसात विरोध असण्याचा संभव आहे. या शंकेत जेथे भिन्नता असते तेथे विरोध उत्पन्न होतो असे गृहीत धरलेले दिसते. ते विशेष समाधानकारक नाही. शंकेला उत्तर दिलेले आहे ते असे – कथानकात संधी असतात म्हणून निरनिराळ्या प्रकारांची कल्पना संभवते; एरव्ही कथानकाचा सर्वत्र एकच प्रकार दिसला असता. जास्तीत जास्त संधी पाच असतात, पण काही प्रकारांत त्याहून कमी असतात. परंतु त्यामुळे काही विरोध उत्पन्न होतो असे नाही. – 'पारम्यपरतया' हा मुद्रित पाठ आहे. हस्तलिखितात 'पारम्पर्यता' असा पाठ आहे. येथे परंपरेचा काही संबंध नसल्यामुळे तो पाठ बरोबर नाही. 'परम' पासून 'पारम्य' हे भाववाचक नाम बनले आहे. – 'स्वस्थाने' म्हणजे पुढे १६ व १७ ह्या श्लोकांवरील व्याख्येत. – 'उद्देशक्रमस्यानेकविधत्वात्' मुद्रितात 'उद्देशक्रमस्तस्या-' असे आहे. पण त्यात 'उद्देशक्रमः' हा प्रथमान्त शब्द 'संधिनिरूपणमेतत्' याच्याशी समानाधिकरण

आहे असे मानावे लागेल. ते संभवनीय नाही. अभिनवगुप्ताचे येथे असे म्हणणे दिसते की 'पञ्चभिः' संधिभिः' यात संधींचे निरूपण नाही. कारण कथानकाचे अवस्था, अर्थप्रकृति, संधि असे जे विशेष आहेत त्यांचा उद्देश व तदनुसार निरूपण ही निरनिराळ्या क्रमाने करता येतात. प्रस्तुत ग्रंथात संधींचे विवरण नंतर केले आहे, सर्वांआधी या ठिकाणी नाही.

**इतिवृत्तं द्विधा चैव बुधस्तु परिकल्पयेत् ।**
**आधिकारिकमेकं स्यात्[1]प्रासङ्गिकमथापरम् ॥ २ ॥**

आणि बुद्धिमान कवीने कथानकाची दोन प्रकारची रचना करावी. एक मुख्य असावे व दुसरे प्रासंगिक.

**एवं शरीरमाभिधाय तस्य विधानशब्देनोद्दिष्टं प्रकारवैचित्र्यं दर्शयति इतिवृत्तं द्विधा चैवेति । इतिवृत्तं स्थितं सत् बुधो विवेचकः कविर्द्विधैव कल्पयेत् । चकारात्प्रकरणादावितिवृत्तं च कल्पयेत् । तच्च द्विधा । एकमपरमित्यनेनेदमाह न निसर्गतः किंचिदाधिकारिकम् अन्यद्वा, कविधिया यदैकमाधिकारिकं कृतं तदापरस्य प्रासङ्गिकतास्तीति । द्विधाशब्देन यत्प्रकारद्वयं सूचितं तदेवेदं दर्शितम् । 'अधिकरणविचाले च' इति धाप्रत्ययः, एकं राशिं द्विधा कुर्विति यथा । तेनैकमेवेतिवृत्तं द्विशाखमिति यावत् ।**

याप्रमाणे शरीराचे वर्णन केल्यावर विधान शब्दाने निर्दिष्ट झालेली त्याच्या प्रकारांची विविधता 'इतिवृत्तं द्विधा चैव' या श्लोकात दाखवून देतात. इतिवृत्त निश्चित झाले असता बुध म्हणजे विवेचक कवीने ते दोन प्रकारांनीच तयार करावे. 'च' शब्दामुळे प्रकरण आदींमध्ये स्वकल्पित कथानक सुद्धा रचावे असा अर्थ निष्पन्न होतो. आणि ते कथानक दोन प्रकारचे. एक आणि अपर या शब्दांनी असे दाखवितात की निसर्गतःच एखादी गोष्ट आधिकारिक अथवा प्रासंगिक असते असे नाही तर कवीच्या बुद्धीने जेव्हा एक आधिकारिक केले जाते तेव्हा दुसऱ्याला प्रासंगिकता प्राप्त होते. द्विधा शब्दाने जे दोन प्रकार सूचित केले आहेत तेच हे दाखविले आहेत. 'अधिकरणविचाले च' या पाणिनीच्या सूत्राप्रमाणे 'धा' प्रत्यय लागला आहे, 'एका राशीचे दोन भाग कर' या उदाहरणाप्रमाणे. म्हणून एकच असलेल्या कथानकाच्या ह्या दोन शाखा आहेत असा अर्थ आहे.

'विधान' शब्द मागे १८.११६ मध्ये आला आहे. – 'यदैकम्' मुळात 'यदेतत्' असे आहे. पुढे 'तदा' असल्यामुळे अगोदर 'यदा' अपेक्षित आहे. आणि 'एतत्' पेक्षा 'एकम्' अधिक

१ नि तु.

संभाव्य आहे. श्लोकातील 'एकम्' 'अपरम्' चा येथे अनुवाद केला आहे हे उघड आहे. – 'यत्प्रकारद्वयं' हे शब्द मुद्रितात नाहीत, हस्तलिखितात आहेत. ते अर्थबोध सुगम करतात. – 'अधिकरणविचाले च' हे अष्टाध्यायीतील ५.३.४३ सूत्र आहे. – 'कुर्विति' मुद्रितात 'कुर्वति' असा असंभाव्य पाठ आहे.

यत्कार्यं हि फलप्राप्त्या [1]सामर्थ्यात्परिकल्प्यते ।
तदाधिकारिकं ज्ञेयमन्यत्प्रासङ्गिकं विदुः ॥ ३ ॥

कारणात्फलयोगस्य वृत्तं स्यादाधिकारिकम् ।
[2]तस्योपकरणार्थं तु कीर्त्यते ह्यानुषङ्गिकम् ॥ ४ ॥

जे कार्य त्याच्या समर्थतेमुळे फलप्राप्तीने युक्त असे कल्पिले जाते ते मुख्य असे समजावे; इतर कार्य प्रासंगिक असे मानावे.

फलाशी योग झाल्याकारणाने वृत्त आधिकारिक होते, परंतु त्याला उपायभूत असलेले ते आनुषंगिक असे म्हणतात.

तत्प्रकारद्वयं क्रमेण दर्शयति यत्कार्यं हीति । प्रधानत्वेन संपाद्ये फले यो ज्ञानेच्छाप्रयत्नक्रियालक्षण आरम्भः तत्कार्यमिति वक्ष्यते 'यदाधिकारिकं वस्तु' इति । तथाभूतो य आरम्भो मुख्यफलप्राप्त्या परिकल्प्यते स आधिकारिकमिति-वृत्तम् हि यस्मात् तथैव ज्ञेयम् । निरुक्तेनाधिकारः सर्वत्रानुयायित्वं हृदयानु-यायित्वं प्रयोजनमस्य । प्रासङ्गिकेऽपि तदन्तर्लीनमेव । आधिकारिके ईहाप्तेना-चिख्यासासाधनैषाफलजिहीर्षानिष्पत्तौ यथा न शक्त्यन्तरव्यापारणं तद्वत्प्रासङ्गि-केऽपि सर्वत्र शक्त्यन्तरव्यापाराभाव एव । शक्त्यन्तरे हि पृथग्व्यापार्यमाणे तस्याप्याधिकारिकत्वमेव स्यात् । प्रतिज्ञानिर्वहणं जगत्कण्टकरावणोद्धरणं शरणा-गतविभीषणरक्षणमित्याद्यपि हि प्रधानफले सीताप्रत्यानयनलक्षणे विवक्षिते न शक्त्यन्तरव्यापारसाध्यं, अपि तु तदुपयोगिसामाद्युपायचतुष्टयतद्द्विकत्रिकादि-भेदसंपादननान्तरीयकोपनीतम् । एवं तापसवत्सराजे राज्यप्रत्यापत्तेः प्रधान-फलत्वे वासवदत्तासंगमपद्मावतीप्राप्त्यादौ क्रियान्तरानुपयोग एव मन्तव्यः । यदि ह्यस्य वासवदत्ताप्राप्त्युपायत्वं पद्मावतीपरिणयस्य नोच्येत न वत्सराजस्तत्र प्रवर्तेत, तदप्रवृत्तौ कुतः प्रधानफलम् इति सर्वं प्रासङ्गिकमेकरूपमेव । प्रसक्तिर्हि प्रसङ्गः, तत आगतं प्रासङ्गिकम् । प्रसज्यते वा प्रधानफलनिष्पत्तये इति प्रसङ्गः, तत

१ नि समर्थ. २ का परोपकरणार्थं तु.

**आगतमिति । तेन शक्त्यन्तरयोगायोगाभ्यां च यत्प्रासङ्गिकस्यानेकविधत्वं टीकाकृद्भिरभ्यधायि न तदुपाध्यायाः संमन्यन्ते ।**

'यत्कार्यं हि' इत्यादी शब्दांत ते दोन प्रकार क्रमाने दर्शवितात. मुख्य म्हणून एखाद्या फलाची प्राप्ती करावयाची असता जो ज्ञान, इच्छा, प्रयत्न आणि क्रिया ह्या स्वरूपाचा उद्योग असतो त्याला कार्य असे पुढे 'यदाधिकारिकं वस्तु' इत्यादी श्लोकात निर्दिष्ट केले जाईल. तशा प्रकारचा जो उद्योग मुख्यफलाच्या प्राप्तीच्या योगाने कल्पिला जातो तो आधिकारिक इतिवृत्त 'हि' म्हणजे ज्याअर्थी आहे त्याअर्थी त्या संज्ञेनेच ओळखावा. व्युत्पत्तीप्रमाणे अधिकार म्हणजे सर्वत्र जाणे तसेच हृदयात प्रवेश करणे हे ज्याचे प्रयोजन आहे ते आधिकारिक. प्रासंगिकामध्ये सुद्धा ते प्रयोजन अन्तर्भूत असतेच. आधिकारिकात ज्याप्रमाणे अभिलाषा, आप्त मनुष्याला कथन करण्याची इच्छा, साधनांचा शोध, फल प्राप्त करण्याची इच्छा आणि फलाची प्राप्ती यांसाठी दुसऱ्या स्वतंत्र शक्तीचा वापर होत नाही त्याचप्रमाणे प्रासंगिकासाठी सुद्धा सर्वत्र इतर शक्तीच्या व्यापाराचा अभावच असतो. कारण, दुसऱ्या शक्तीचा तेथे स्वतंत्रपणे वापर झाला तर ते सुद्धा आधिकारिकच होईल. सीतेला परत आणणे हे प्रधानफल अभिप्रेत असता प्रतिज्ञापूर्ती, जगाला कंटकरूप झालेल्या रावणाचा उच्छेद, शरण आलेल्या विभीषणाचे रक्षण इत्यादी गोष्टी सुद्धा दुसऱ्या कोणत्या शक्तीच्या व्यापाराने साध्य होणाऱ्या आहेत असे नाही, तर त्या प्रधानफलाच्या सिद्धीला उपयोगी असे जे साम आदी चार उपाय आणि त्यांचे दोन दोन, तीन तीन इत्यादी एकत्र योजनेने होणारे प्रकार त्यांच्यामुळे होणाऱ्या सिद्धीने सर्वथा अभिन्न अशा प्रकारे निष्पन्न होतात. त्याचप्रमाणे तापसवत्सराज नाटकात राज्याची पुनःप्राप्ती हे प्रधान फल असता वासवदत्तेशी मिलन, पद्मावतीची प्राप्ती इत्यादी संबंधात दुसऱ्या कोठल्याही क्रियेचा उपयोग नाही असेच मानले पाहिजे. कारण पद्मावतीशी हा विवाह म्हणजे वासवदत्तेच्या प्राप्तीचा उपाय असे जर नसेल तर वत्सराज त्याला उद्युक्त होणार नाही आणि तो उद्युक्त झाला नाही तर मुख्य फल कोठून प्राप्त होणार? म्हणून सर्व प्रासंगिक एकरूपच असते. कारण प्रसङ्ग म्हणजे प्रसक्ती, त्यापासून आलेले ते प्रासंगिक. अथवा मुख्य फलाच्या निष्पत्तीला उपयुक्त होतो तो प्रसंग, त्यापासून आलेले. म्हणून इतर शक्तीचा संयोग आणि संयोगाचा अभाव यांच्यामुळे प्रासंगिकाचे अनेक प्रकार होतात असे जे टीकाकारांनी म्हटले आहे त्याच्याशी आमचे गुरुजी सहमत नाहीत.

'यदाधिकारिकं इ०' हा पुढील २५ वा श्लोक आहे. – '-फलप्राप्त्या' मूळ श्लोकातच हा शब्द तृतीयेत आहे. तेथेही चतुर्थ्यन्त पाठ अधिक योग्य झाला असता. – '-अनुयायित्वम्' यातील 'अनु' ह्या उपपदाचा विशिष्ट अर्थ अभिप्रेत आहे असे दिसत नाही. – 'आधिकारिके इ०' येथील पाठ संशयातीत नाही. मुद्रितात 'आधिकारिके' च्या पूर्वी 'यथा' अधिक आहे; पण

त्याची आवश्यकता नाही. हस्तलिखितात 'आधिकारिके' शब्द नाही. पण तो आवश्यक आहे. त्यानंतर 'ईहाप्तेन'च्या ऐवजी 'सहाप्तेन' असा मुद्रित पाठ आहे. असे दिसते कि कथानकाच्या आरम्भ-प्रयत्नादी पाच अवस्थांचा या ठिकाणी दुसऱ्या शब्दांत निर्देश केला आहे. ईहा म्हणजे अभिलाषा ही आरम्भावस्थेची द्योतक मानता येईल. त्यापुढील 'आप नाचिख्यासा' हे प्रयत्नावस्थेचे द्योतक आहेसे दिसते. पण 'ईहा' पासून सुरू होणाऱ्या दीर्घ समासात मध्येच 'आप्तेन' असा तृतीयान्त शब्द असंभाव्य आहे. मुद्रितातील 'सह' ने तृतीयेचा प्रश्न सुटतो; तथापि, समासात अन्तर्भूत असलेल्या 'आचिख्यासा' ह्या शब्दाशी संबद्ध असलेले 'सहाप्तेन' हे शब्द समासाच्या बाहेर असावेत हे सुद्धा अशास्त्रीयच. शिवाय, 'आप्तेन सह आचिख्यासा' हा शब्दप्रयोगही योग्य वाटत नाही. 'आप्ताय' अशी चतुर्थी अपेक्षित आहे. 'आप्तेन' शब्द गाळून 'ईहाचिख्यासा' असा पाठ स्वीकारल्यास ह्या अडचणी दूर होतील आणि अर्थाचीही काही हानी होणार नाही. – 'शक्त्यन्तरे हि' ही 'शक्त्यन्तरेऽपि' ची दुरुस्ती आहे. 'हि' आवश्यक आहे, कारण हे वाक्य हेतुनिदर्शक आहे. आणि 'अपि' चे काही प्रयोजन नाही. – 'प्रतिज्ञा- इ०' रामकथेवर आधारलेल्या नाटकांना अनुलक्षून हे विधान केले आहे. एखादे विशिष्ट नाटक अभिनवगुप्ताच्या दृष्टिसमोर असण्याचा संभव आहे. प्रतिज्ञा म्हणजे चौदा वर्षे वनवासात काढण्याची. – 'सामादि-' म्हणजे साम, दान, भेद आणि दण्ड. – 'तद्द्विकत्रिकादिभेद-' हे चार उपाय एका वेळेस एक एक, किंवा एकदम दोन दोन, तीन तीन किंवा चारही एकाच वेळेस याप्रमाणे एकंदर पंधरा प्रकारांनी वापरता येतात असे कौटिलीय अर्थशास्त्रात (९.७.७७–७८) सांगितले आहे. – 'एवम्' मुद्रित पाठ 'एव' असून तो अगोदरच्या वाक्याच्या शेवटी योजिला आहे. पण नवीन वाक्याच्या प्रारंभी हस्तलिखितातील 'एवम्' अधिक योग्य वाटतो. – 'प्रसक्तिः' म्हणजे दृढ संबन्ध, प्रासंगिक घटना व मुख्य फलस्वरूप घटना यांमधील. – 'प्रसज्यते' हे क्रियापद लागू पडते, 'उपयोगी ठरते या अर्थाने वापरलेले दिसते. – 'अनेकविधत्वम्' प्रत्यक्ष दोनच प्रकार निर्दिष्ट आहेत, जास्त नाहीत.

**अत एवाह कारणात्फलयोगस्येति । अयमर्थः । आधिकारिकं नामास्त्वितिवृत्तं यतः फलसंबन्धं करोति । स कविना वर्णनोपायारोहमानीतः तत्समर्थाचरणेन प्रयुज्यते । एवमन्यत्स्यादितिवृत्तमिति पूर्वपक्षमाशङ्क्य तत्रोत्तरमवान्तरेणाह तस्योपकरणार्थं त्विति । हिरप्यर्थे भिन्नक्रमः । आनुषङ्गिकमपि कीर्त्यत इति ।**

म्हणूनच 'कारणात्फलयोगस्य' इत्यादी म्हणतात. त्याचा अर्थ असा. इतिवृत्त आधिकारिक ह्या नावाने ओळखले जावे, कारण ते फलाशी संबंध घडवून आणते. कवी वर्णनात्मक उपायांनी परिणतावस्थेस आणलेल्या त्या फलसंबंधाचा समर्थ अशा कृतीने योग जुळवून आणतो. अशा तऱ्हेचे इतरही इतिवृत्त असू शकेल अशी पूर्वपक्षात शंका घेऊन तिला उत्तर 'तस्योपकरणार्थं तु' या दुसऱ्या वाक्यात दिले आहे. 'हि' शब्द अपि ह्या अर्थी वापरला असून त्याचा क्रम बदलला आहे–'आनुषङ्गिकमपि कीर्त्यते' असा क्रम आहे.

'अत एव' म्हणजे आधिकारिकासाठी जी उपाययोजना तीच प्रासंगिकासाठी उपयोगी पडते म्हणून. – 'आधिकारिकं इ०' या वाक्यात हस्तलिखितातील पाठात 'यतः' शब्द अधिक घातला आहे. त्याने अर्थबोध होण्यास मदत होते. मुळात तो असून लेखनदोषाने गहाळ झाला असण्याचा संभव आहे. ज्या अर्थी हे इतिवृत्त फलाशी संबंध प्रस्थापित करते त्या अर्थी त्याला आधिकारिक हे नाव द्यावे असा अर्थ निष्पन्न होतो व तो श्लोकातील शब्दांना अनुसरूनच आहे. पुढील 'सः' ने ह्या फलसंबन्धाचा निर्देश होतो. मुद्रित पाठात हे वाक्य 'स कविना इ०' वाक्याशी जोडले असून प्रारंभी 'आधिकारिकं नाम (अधिकारः) यस्त्वितिवृत्तं' असे दिले आहे. परंतु पुढील 'सः' मधील पुल्लिंगाच्या अनुरोधाने सुचविलेली 'अधिकारः' ही दुरुस्ती सर्वथा असंभाव्य आहे. त्या पाठाने श्लोकाला धरून असा कोणताही अर्थ निष्पन्न होत नाही. – 'तत्समर्थाचरणेन' असे तिसऱ्या श्लोकातील 'सामर्थ्यात्' शब्दाच्या अनुषंगाने म्हटले आहे. – 'भिन्नक्रमः' म्हणजे हा शब्द 'आनुषङ्गिकम्' शब्दानंतर आहे असे समजावे. श्लोकातील क्रम वृत्ताच्या अनुरोधाने आहे.

**कवेः प्रयत्नान्नेतॄणां युक्तानां विध्यपाश्रयात् ।**
**कल्प्यते हि[1] फलप्राप्तिः समुत्कर्षात्फलस्य च[2] ॥ ५ ॥**

कवीच्या प्रयत्नामुळे, योग्य अशा नायकांनी नियमांचा अवलंब केल्यामुळे आणि फलाच्या उत्कृष्टतेमुळे फलाच्या प्राप्तीची योजना केली जाते.

**ननु फलप्राप्तिलक्षणेन प्रयोजनेन सप्रयोजनत्वमाधिकारिकस्य लक्षणत्वमुक्तम्, फलप्राप्तिश्च प्रासाङ्गिकेऽप्यास्ति । सा प्रासङ्गिकीति चेत्, सिद्धे प्रासङ्गिकस्याधिकारिकाद्भेदे भवेदेतत् । तत एव तत्सिद्धौ चक्रकान्योन्याश्रयदोषः । तस्मात्फलप्राप्तिरेव विशिष्य वक्तव्येत्यभिप्रायेणाह कवेः प्रयत्नान्नेतॄणां युक्तानामिति । समुत्कर्षं प्राधान्यमवलम्ब्य फलप्राप्तिः कल्प्यते । प्रधानफलप्राप्तिप्रयोजनमाधिकारिकमिति ।**

येथे आक्षेप असा – फलप्राप्तिस्वरूपाचे जे प्रयोजन ते आधिकारिक इतिवृत्ताचे प्रयोजन अशी व्याख्या केली आहे. पण प्रासंगिक वृत्तामध्ये सुद्धा फलप्राप्ती असते. ती फलप्राप्ती प्रासंगिक असे म्हटले तर प्रासंगिक वृत्त आधिकारिक वृत्ताहून भिन्न आहे असे सिद्ध झाले तरच हे म्हणणे स्वीकारता येईल. त्याच कारणामुळे ते सिद्ध होण्यास अन्योन्याश्रयरूप चक्रकाचा अवलंब हा दोष उत्पन्न होतो. म्हणून फलप्राप्तीचेच विशेष रूपात वर्णन करावे या उद्देशाने 'कवेः प्रयत्नान्नेतॄणां युक्तानाम्' इत्यादी म्हणतात. समुत्कर्षाचा म्हणजे प्राधान्याचा अवलंब करून फलप्राप्ती कल्पिली जाते. प्रधान फलाची प्राप्ती हे प्रयोजन असलेले ते आधिकारिक असा अर्थ.

१ का यत्. २ का तु.

'चक्रक' म्हणजे वर्तुळाप्रमाणे गोलाकार युक्तिवाद करणे; अन्योन्याश्रय दोषाचाच हा प्रकार आहे. एक गोष्ट दुसरीवर अवलंबून व ती दुसरी पहिलीवर असे असता हा दोष उत्पन्न होतो.

**ननु फलप्राप्तेः कथं प्राधान्यम् । आधिकारिकनिर्वर्त्यत्वादिति चेत् स एव दोष इत्याशङ्क्याह कवेः प्रयत्नादिति । कविर्यत्फलमुत्कर्षेण विवक्षति तत् प्रधानफलम् । ननु पुरुषेच्छा यद्यनियन्त्रिता तदा पुनरपि स एव प्रश्न इत्याह नेतॄणां युक्तानां विध्यपाश्रयादिति । धीरोदात्तादिभेदानां नायकानां मध्ये यो यत्र नायको युक्त उचितः तस्य यो विधिः संपाद्यं वस्तु तदपाश्रयप्रयत्नाद्धेतोः कविफलं प्रधानमिति । यस्मिंश्च विधौ यो नायको युक्तः उचितस्तस्य मयैतत्कर्तव्यमित्यभिसंधानाभावेऽपि तत्संनिधौ फलं नायकत्वं विना कर्तव्यम्, यथा तापसवत्सराजे वत्सराजस्य राज्यप्रत्यापत्तिः कर्तव्यतायाममात्याभिसंहितायाम् । अत एव ह्यस्यासौ नेता फलस्य चाक्रष्टा अमात्यसंपादिताभिसंधिप्रत्युपायपरम्परार्जितस्यापि ।**

यावर आक्षेप असा — फलप्राप्तीला प्राधान्य कसे येते ? आधिकारिक इतिवृत्तात ती साध्य होते म्हणून असे म्हणालात तर तोच दोष उत्पन्न होईल अशी शंका घेऊन तिचे निरसन 'कवेः प्रयत्नात्' या शब्दांत करतात. कवी जे फल उत्कृष्ट म्हणून निर्दिष्ट करावयाचे इच्छितो ते प्रधान फल. पण जर पुरुषाची अनियंत्रित अशी इच्छाच असेल तर पुन्हा तोच प्रश्न उपस्थित होईल या आक्षेपाला 'नेतॄणां युक्तानां विध्यपाश्रयात्' या शब्दांत उत्तर देतात. धीरोदात्त इत्यादी चार प्रकारच्या नायकांपैकी जो नायक जेथे युक्त म्हणजे योग्य असेल त्याचा जो विधि म्हणजे संपादन करावयाची जी गोष्ट तिच्या आधाराने केलेल्या प्रयत्नामुळे कवीने योजिलेले फल प्रधान ठरते. आणि ज्या विधीमध्ये जो नायक युक्त म्हणजे योग्य असेल त्याची 'मला हे केले पाहिजे' अशी कल्पना नसतानाही त्याला नायकत्वाशिवाय फल समीप उपलब्ध करून द्यावे; उदाहरणार्थ तापसवत्सराज नाटकात अमात्यांनी उपाययोजना करून कार्य केले असता वत्सराजाला राज्याची पुनःप्राप्ती हे फल मिळते त्याप्रमाणे. म्हणूनच तो ह्याचा नेता आणि फल प्राप्त करणारा ठरतो, जरी ते फल अमात्यांनी साध्य केलेल्या व उद्दिष्टाला धरून असलेल्या अनेक उपाययोजनांनी प्राप्त झाले असले तरी सुद्धा.

'आधिकारिकनिर्वर्त्यत्वात्' मुद्रितात 'आधिकारिकं' असा स्वतंत्र शब्द असून त्याचा 'प्राधान्यम्' शी संबंध जोडला आहे. पण ते बरोबर नाही. — 'स एव' म्हणजे अन्योन्याश्रयाचा. — 'उत्कर्षेण विवक्षति' हे श्लोकातील 'समुत्कर्षात्' चे विवरण आहे. — 'स एव प्रश्नः' म्हणजे फलप्राप्तीला प्राधान्य कशामुळे येते हा प्रश्न शिल्लक राहातोच. कवीची स्वैर इच्छा

हे काही त्याचे उचित उत्तर नव्हे. 'प्रश्नः' च्या जागी 'प्रयत्नः' असा मुद्रित पाठ आहे. कोणताही प्रयत्न येथे निर्दिष्ट असण्याचा संभव नाही. – 'विध्यपाश्रयादिति' यातील 'इति' मुळात नाही. पण नेहमीच्या प्रथेला अनुसरून श्लोकातील शब्द उद्धृत केल्यावर तो आवश्यक आहे. या वचनाचा अर्थ असा की कवी केवळ आपल्या लहरीप्रमाणे अमुक फल प्रधान असे ठरवीत नाही तर कथानकासाठी ज्या अनुरूप नायकाची निवड केली असेल त्याचे प्रयत्नांनी साध्य होणारे जे फल तेच प्रधान असे ठरवितो. हे प्रयत्न स्वतः नायकाकडून केले जातात. – 'यस्मिंश्च विधौ इ०' या व पुढील वाक्यात नायकाने स्वतः प्रयत्न केले नसताही इतरांनी केलेल्या प्रयत्नांमुळे उत्पन्न होणाऱ्या फलाचा लाभ त्यालाच होतो आणि या प्रकारे सुद्धा उचित नायक व प्रधान फल यांचा संबंध प्रस्थापित होतो असे प्रतिपादन केले आहे. – 'नायकत्वं विना' म्हणजे इतिवृत्ताचे नेतृत्व करण्यात प्रयत्नशील नसताही. – 'अस्य नेता' म्हणजे ह्या तापसवत्सराज नाटकाचा नायक. येथील नेतृत्व स्वतःच्या प्रयत्नाशिवायही नायक असल्यामुळे प्राप्त होते. – 'अभिसंधि' म्हणजे उद्देश, उद्दिष्ट.

**नन्वेवमपि रामस्य स्वदारप्रत्यानयनकण्टकोद्धरणभीताभयवितरणादौ सर्वत्र कर्तव्यतौचित्यमस्तीति तथापि न व्यवस्थितं लक्षणमित्याह फलस्य चेति । चकारेण समुत्कर्षादित्यस्यावृत्तिर्द्योत्यते । तेनायमर्थः । यदेव फलं तावत्यंशे अधिकमुत्कर्षमवलम्बते तत्रैव तस्यौचित्यं कविना कल्पनीयम् । तथाहि रावणोच्छेदाद्यवधि सीताप्रत्यानयनमेव समुत्कृष्टं भवति, तस्यैव संपादनायेतरप्रवृत्तेः । सचिवायत्तसिद्धिस्तु यतो वत्सराजस्ततो यौगन्धरायणाद्यमात्यवर्गप्रयत्नस्तावानसाविति तदमात्याभिसंहितराज्यप्राप्तिफलस्यैव तत्रोत्कर्षः । स ह्येवं मन्यते राज्यभारचिन्ता एतैर्या कृता सा मयैवेति । एवमधिकाधिकं हृदयविपरिवर्तमानं समुचितं च नायकस्य फलं यद्यदा कविप्रयत्नेन विवक्ष्यते संपाद्यतया तदा तस्य प्रधानफलत्वं रामाभ्युदयादौ सीताप्रत्यानयनादेरिव । न हि तत्राश्वमेधयागादेर्नायकोचितस्य कविविवक्षितत्वमस्ति ।**

पण असे असले तरी स्वपत्नीला परत आणणे, कंटकांचे उद्धरण, भीतिग्रस्तांना अभय देणे इत्यादी सर्व गोष्टींच्या बाबतीत रामाच्या कर्तव्याचे औचित्य आहे म्हणून एवढ्यानेही लक्षण निश्चित होत नाही या आक्षेपाला 'फलस्य च' या शब्दांत उत्तर देतात. 'च' शब्दाच्या उपयोगाने 'समुत्कर्षात्' ह्या शब्दाची पुनरावृत्ती दाखविली आहे. म्हणून अर्थ असा—केवळ जे फल तेवढ्या अंशामध्ये अधिक उत्कर्ष पावते त्या ठिकाणी कवीने त्या फलाचेच औचित्य कल्पिले पाहिजे. उदाहरणार्थ, रावणाच्या उच्छेदापर्यंतची सीतेला परत आणण्याची घटनाच उत्कृष्ट ठरते, कारण ती संपादन करण्यासाठीच इतर गोष्टी प्रवृत्त होतात. परंतु ज्याअर्थी वत्सराज हा कार्यसिद्धीसाठी सचिवांवर अवलंबून आहे त्याअर्थी यौगन्धरायणप्रभृती अमात्यवर्गाचा तितका तो प्रयत्न आहे म्हणून अमात्यांनी

निर्धारित केलेले राज्यप्राप्तिरूप फलच त्या ठिकाणी उत्कृष्ट ठरते. कारण, राज्याचा भार वाहण्याची चिंता जी यांनी केली आहे ती मीच केली आहे असे तो मानतो. याप्रमाणे हृदयात अधिकाधिक घोळणारे आणि नायकाला योग्य असे जे फल जेव्हा कवीच्या प्रयत्नाने संपादित करावयाचे म्हणून विवक्षित असते तेव्हा ते फल प्रधान होते; उदाहरणार्थ रामाभ्युदयप्रभृती नाटकांत सीतेला परत आणण्याची घटना इत्यादी. कारण त्या ठिकाणी अश्वमेधादी घटना नायकाला उचित असल्या तरी कवीला त्या विवक्षित नसतात.

'अस्तीति' यातील 'इति' मुद्रित पाठात नाही. पण यानंतर 'तथापि' शब्द असला तरी 'इति' ची आवश्यकता आहे. लक्षण निश्चित का होत नाही याचे कारण अगोदरच्या वाक्यात सांगितले आहे हे 'इति' नें निदर्शित होते. – 'न व्यवस्थितं लक्षणम्' म्हणजे कवीला विवक्षित आणि नायकाला योग्य एवढे म्हटल्यानें प्रधान फल कोणते ते निश्चित होत नाही, म्हणून प्रधान फलाचे लक्षण स्पष्टपणे प्रस्थापित होत नाही. कंटकोद्धरण वगैरे गोष्टी सुद्धा कविविवक्षित आणि नायकोचित आहेत. – 'आवृत्तिः' श्लोकातील 'समुत्कर्षात्' शब्दाचा संबंध अगोदरच 'कवेः प्रयत्नात्' शी जोडून कवी उत्कर्षाने जे सांगू पहातो ते प्रधान फल असा अर्थ केला आहे. आता त्या शब्दाचा 'फलस्य' शी संबंध जोडला आहे. याप्रमाणे ह्या शब्दाचा श्लोकात दोन निरनिराळ्या प्रकारांनी अन्वय लावला आहे. – 'यदेव' मुद्रित पाठ 'यदेतत्' आहे. पण 'एतत्' संभाव्य नसून अर्थासाठी 'एव' आवश्यक आहे. – 'तावत्यंशे' म्हणजे कथेचा जो भाग नाटकात ग्रथित केला असेल त्यात. – 'इतरप्रवृत्तेः' मुद्रित पाठ 'इतरप्रवृत्तिः' असा आहे. पण हे वचन मागील विधान करण्याचा हेतू दाखविणारे असल्यामुळे पंचमी विभक्तीत असणे अधिक योग्य. – '-वर्गप्रयत्नस्तावानसौ' यातील 'प्रयत्न' हीं हस्तलिखितातील 'पर्यन्त' ची दुरुस्ती आहे. 'पर्यन्त' ला येथे काही अर्थ नाही. मुद्रितात हा शब्द नाही. पण प्रयत्न किंवा त्यासारखा शब्द आवश्यक आहे. 'तावान्' हे 'प्रयत्न' चे विशेषण. तावान् म्हणजे नाटकात दाखवला आहे तितका. – 'तदमात्या-' मुद्रितात 'तदामात्या-' आहे. 'तदा' येथे संभाव्य नाही. 'तत्' ने वत्सराजाचा बोध होतो. – 'नायकोचितस्य' नंतर 'अपि' अध्याहृत धरणे चांगले.

**नन्वेवमपि कविविवक्षैव पुनरपि प्रधानीभूता तत्र चोक्तो नियमहेत्वभाव इति तत्राह विध्यपाश्रयादिति । विधीयत इति विधिः सव्युत्पत्तिः, तस्यापाश्रयात् । एतदुक्तं भवति । यादृशी पुरुषार्थे व्युत्पत्तिः कर्तव्या तदुचितनायकग्रहणेन कविः प्रवर्तमानो न स्वेच्छया प्रवृत्तो भवतीति । हिशब्देन समुच्चयाभिधायिनैतत्सूचितम् – विध्यपाश्रयाद्युक्ता ये नेतारस्तेषां यत्फलं तस्योत्कर्षाद्यः कवेः प्रयत्नस्ततः फलप्राप्तिः समुत्कर्षावलम्बिनी कल्प्यत इति तात्पर्यम् ।**

पण असे असले तरीही पुन्हा कवीच्या विवक्षेलाच प्राधान्य येते आणि त्यात वर सांगितलेला नियमन करणाऱ्या हेतूचा अभाव असतो या आक्षेपाला उत्तर 'विध्यपाश्रयात्' ह्या शब्दात देतात. ज्याचा आदेश दिला जातो तो विधी, ज्यात बोध अन्तर्भूत असतो तो;

त्याच्या आश्रयाने. याचा अर्थ असा. ज्या प्रकारचा पुरुषार्थासंबंधी बोध द्यावयाचा असेल त्याला अनुरूप अशा नायकाची योजना करून कथानक रचणारा कवी केवळ स्वैर इच्छेनुसार वागत नाही. समुच्चयार्थक 'हि' शब्दाने पुढीलप्रमाणे अर्थ सूचित होतो—विधीचा आश्रय केल्यामुळे योग्य असे जे नायक त्यांचे जे फल त्याच्या उत्कृष्टतेमुळे कवीचा जो प्रयत्न त्यापासून समुत्कर्षयुक्त अशी फलप्राप्ती कल्पिली जाते हे तात्पर्य.

'विध्यपाश्रयात्' मागे ह्या वचनाचे दोन निरनिराळे अर्थ लावले होते. येथे त्याचा आणखी एक अर्थ लावला आहे. – 'सव्युत्पत्तिः' म्हणजे विधि अथवा आदेश हा बोधयुक्त अथवा उपदेशदायक असतो. – 'हिशब्देन' हि हे अव्यय समुच्चयार्थी क्वचितच असावे. पण त्या अर्थाच्या साहाय्याने श्लोकाचा संपूर्ण अर्थ एकत्रित देता आला आहे. त्यात 'समुत्कर्षात्' चा दोनदा अन्वय लावला आहे.

या श्लोकानंतर बडोदे प्रतीत पुढील अधिक श्लोक कंसात दिला आहे –

**लौकिकी सुखदुःखाख्या यथावस्था रसोद्भवा ।**
**दशधा मन्मथावस्था व्यवस्था त्रिविधा मता ॥**

हा श्लोक सर्वथा अस्थानी आहे.

**संसाध्ये फलयोगे तु व्यापारः कारणस्य[1] यः ।**
**तस्यानुपूर्व्या विज्ञेयाः पञ्चावस्थाः प्रयोक्तृभिः ॥ ६॥**

**प्रारम्भश्च प्रयत्नश्च तथा प्राप्तेश्च संभवः ।**
**नियता च फलप्राप्तिः फलयोगश्च पञ्चमः ॥ ७॥**

फलाशी योग सिद्ध होण्यासाठी त्याच्या कारणभूत गोष्टींचा जो व्यापार त्याच्या क्रमवार एकामागून एक अशा पाच अवस्था होतात—प्रारम्भ, प्रयत्न, प्राप्तीचा संभव, फलप्राप्तीची निश्चिती आणि फलाशी योग ह्या—असे काव्य रचणारांनी जाणावे.

**अथ कविप्रयत्नेन साध्ये व्यापारः परिस्पन्दो यो वाङ्मनसगतस्तस्य या अवस्था आनुपूर्व्येति उद्देशक्रमेणैव प्रयोक्तृभिः कविभिर्निबन्धनीयतया ज्ञातव्याः ता उद्दिशति प्रारम्भश्चेति । चकारैस्तथाशब्देन चावश्यंभाविक्रमत्वमासामुच्यते । न हि प्रेक्षापूर्वकारिणोऽवस्थान्तरासंभावनायां प्रारम्भ उचितो भवति । तत्प्रारम्भश्चेदुत्तरोत्तरावस्थाप्रसर एव । पञ्चम इत्यनेन क्रमो विवक्षित इति दर्शयति ।**

१ नि साधकस्य.

आता कवीच्या प्रयत्नाने साध्य करावयाच्या फलाच्या संबंधात जो व्यापार म्हणजे वाणी आणि मन यांचा परिस्पंद त्याच्या ज्या अवस्था योजना करणाऱ्यांनी म्हणजे कवींनी आनुपूर्व्या म्हणजे निर्दिष्ट केलेल्या क्रमानेच ग्रथित करणे आवश्यक आहे असे जाणले पाहिजे त्या अवस्था 'प्रारम्भश्च' इत्यादी श्लोकात निर्दिष्ट करतात. अनेक चकार आणि 'तथा' शब्द ह्यांच्या उपयोगाने ह्या अवस्थांचा क्रम अनिवार्यपणे घडून येणारा आहे असे दाखविले आहे. कारण, विचारपूर्वक कार्य करणाऱ्या मनुष्याने इतर अवस्थांची संभाव्यता नसता एखाद्या गोष्टीचा प्रारंभ करणे उचित होत नाही. आणि जर त्याने प्रारंभ केला असेल तर नंतरच्या अवस्थांना क्रमाने अवसर प्राप्त होतोच. 'पञ्चमः' ह्या शब्दाने क्रम अभिप्रेत आहे हे दाखवितात.

'साध्ये' ह्या शब्दानंतर श्लोकातील 'फलयोगे' किंवा त्याचा पर्याय टीकेतून गहाळ झाला आहे असे दिसते. – 'व्यापारः परिस्पन्दः' मुळात 'व्यापारपरिस्पन्दः' असा सामासिक शब्द आहे. पण नेहमीच्या प्रथेला अनुसरुन श्लोकातील 'व्यापारः' शब्द उद्धृत करून 'वाङ्मनसगतः परिस्पन्दः' अशी त्याची व्याख्या केली असण्याचाच अधिक संभव आहे. – 'तत्प्रारम्भः' यातील 'तत्' म्हणजे प्रेक्षापूर्वकारी मनुष्य असे समजले पाहिजे.

**औत्सुक्यमात्रबन्धस्तु[1] यद्बीजस्य निबध्यते ।**
**महतः फलयोगस्य स[2] फलारम्भ इष्यते ॥८॥**

मोठ्या फलाच्या प्राप्तीचे जे बीज त्याची जी केवळ औत्सुक्यरूपाने मांडणी केली जाते ती फलाची प्रारम्भावस्था मानली जाते.

**एताः क्रमेण लक्षयितुमाह औत्सुक्यमात्रबन्धस्त्विति । महतः प्रधानभूतस्य फलस्य युज्यमानस्य तत्तन्नायकोचितस्य यद्बीजमुपायसंपत् तस्य यदौत्सुक्यमात्रं तद्विषयस्मरणोत्कण्ठारूपम्, अनेनोपायेनैतत्सिध्यतीति, तस्य बन्धो हृदये विरूढिः प्रारम्भः । सा च नायकस्यामात्यस्य नायिकायाः प्रतिनायकस्य दैवस्य वा । तस्या हि तथैवानुमानाद् व्यवस्था । दैवसाध्यमपि च समुद्रदत्ताभिमतप्राप्त्यादिकं पुण्योपार्जनं प्रयत्नबहुमानसिद्धये, दैवसहायस्य पुरुषकारस्य फलवर्तिता तद्व्युत्पत्तिलाभाय च, प्रदर्श्यत इत्येवं वर्ण्यत इति ।**

यांची क्रमाने लक्षणे सांगण्यासाठी 'औत्सुक्यमात्रबन्धस्तु' इत्यादी श्लोक रचतात. मोठ्या म्हणजे प्रधानभूत असलेल्या, योजावयाचे असलेल्या म्हणजे त्या त्या नायकाला उचित अशा फलाचे जे बीज म्हणजे उपायांची समृद्धी, त्याचे जे केवळ औत्सुक्य,

१ नि मात्रं बन्धस्य. २ नि सोऽत्र प्रारम्भ, का स खल्वारम्भ.

'ह्या उपायाने हे साध्य होईल' अशा प्रकारे तत्संबंधी स्मरण व उत्कंठा ह्या स्वरूपाचे, त्याचा बन्ध म्हणजे हृदयात दृढारोपण ती प्रारम्भावस्था. आणि ती नायकाची, अमात्याची, नायिकेची, प्रतिनायकाची किंवा दैवयोगाची असू शकते. कारण, अनुमानाने त्या अवस्थेची अशीच व्यवस्था होते. आणि दैवयोगाने साध्य होणाऱ्या समुद्रदत्ताला अभिप्रेत वस्तूचा लाभ इत्यादी गोष्टी सुद्धा पुण्य मिळविले असल्याचा परिणाम म्हणून प्रयत्नाचे महत्त्व सिद्ध करणाऱ्या ठरून दैवाचे साहाय्य असलेला प्रयत्न सफल होतो ह्या बोधाचा लाभ प्रेक्षकांना व्हावा यासाठी हे दाखविले जाते, म्हणून अशा प्रकारे वर्णन केले आहे.

'लक्षयितुम्' मुद्रितातील 'दर्शयितुम्' नजरचुकीनें आलेले दिसते. – श्लोकातील 'फलयोगस्य' ची व्याख्या 'युज्यमानस्य फलस्य' अशी केली असून 'युज्यमान' म्हणजे युक्त अथवा उचित असा अर्थ केला आहे तो वरील पाचव्या श्लोकाच्या अनुरोधाने. – 'तद्विषय-' यातील 'तत्' म्हणजे उपायस्वरूप बीज. – 'सा' म्हणजे अवस्था. – 'तथैव...व्यवस्था' म्हणजे ही प्रारम्भावस्था नायकाची आहे की अमात्याची वगैरे हे अनुमानाने जाणता येते. – 'समुद्रदत्ताभिमत-' पुष्पदूषितक नावाच्या प्रकरणात नायक समुद्रदत्ताला नायिका नन्दयन्तीची प्राप्ती अखेरीस होते ती दैवयोगाने. सध्या उपलब्ध नसलेल्या ह्या प्रकरणातील विषयाचा थोडा निर्देश वर १८.४५ व्या आर्येवरील टीकेत केला आहे. प्रस्तुत ठिकाणी असा युक्तिवाद केलेला दिसतो की दैवयोगानें झालेली ईप्सितप्राप्ती वस्तुतः पुण्याईमुळे होते आणि ही पुण्याई म्हणजे सत्कृत्याचे फल; तेव्हा याने सत्कृत्य करण्यालाच प्रोत्साहन मिळते. म्हणजे जरी नाटकात दैवाचे प्राबल्य दिसत असले तरी पुरुषांचे प्रयत्न सुद्धा आवश्यक असलेले दिसतात. यावरून अशा नाटकांचाही प्रेक्षकांच्या मनावर योग्य तो परिणाम होतो व दैवाचे साहाय्य असलेल्या प्रयत्नांचे महत्त्व त्यांना पटते. – 'पुण्योपार्जनं' आणि 'फलवर्तिता' ही 'प्रदर्श्यते' ह्या क्रियापदाची स्वतंत्र कर्तृपदे. – 'एवं वर्ण्यत इति' हा अंश मुद्रितात नाही. 'एवम्' म्हणजे दैवसाध्य असे.

**अपश्यतः फलप्राप्तिं व्यापारो[1] यः फलं प्रति ।**
**परं चौत्सुक्यगमनं स[2] प्रयत्नः प्रकीर्तितः ॥ ९ ॥**

फलाची प्राप्ती दिसत नसल्यामुळे फलासाठी जो व्यापार होतो, आणि परमावधीची उत्सुकता उत्पन्न होते, तो प्रयत्न होय असे म्हणतात.

**अपश्यत इति । तदुपायव्यतिरेकेण फलप्राप्तिमपश्यतः फलदर्शनमसंभाव्यमानं विवेचयतः फलमुद्दिश्य यो व्यापारः उपायविषयपरमौत्सुक्यगमनलक्षणः तेन विनेदं फलं न भवति, तस्मात्स एवोपायोऽन्वेष्य इत्युपायविषयस्मरणेच्छासंतानस्वभावः स प्रयत्नः ।**

१ नि यो व्यापारः. २ नि प्रयत्नः परि-.

'अपश्यतः' इत्यादी. त्या उपायाशिवाय फलाची प्राप्ती पाहू न शकणाऱ्याचा म्हणजे फलाचे दर्शन असंभाव्य मानणाऱ्याचा फलाच्या उद्देशाने जो व्यापार, उपायाविषयी पराकाष्ठेचे औत्सुक्य होणे हे ज्याचे लक्षण आहे असा आणि 'त्या उपायाशिवाय हे फल मिळत नाही, म्हणून त्याच उपायाचा शोध केला पाहिजे' अशा प्रकारे उपायाविषयी सतत स्मरण व इच्छा हे स्वभाव असलेला (व्यापार) तो प्रयत्न होय.

'अपश्यत इति' या शब्दांच्या पूर्वी मुद्रितात 'एवम्' अधिक आहे. पण श्लोकावर टीका करण्यासाठी त्यातील पहिला शब्द येथे उद्धृत केला आहे इतकेच. त्याचा पुढील व्याख्येत अन्तर्भाव नाही. म्हणून 'एवम्' असंबद्ध राहाते.

**ईषत्प्राप्तिर्यदा काचित्फलस्य[1] परिकल्प्यते ।**
**भावमात्रेण तं प्राहुर्विधिज्ञाः प्राप्तिसंभवम् ।। १० ।।**

जेव्हा केवळ उपाय उपलब्ध झाल्यामुळे फलाची काही थोडी प्राप्ती कल्पिली जाते तेव्हा त्या अवस्थेला नियम जाणणारे प्राप्तिसंभव म्हणतात.

**ईषत्प्राप्तिरित्यादि। भवत्यस्मादिति भावः उपायः। तस्य सहकार्यन्तरयोगः प्रतिबन्धकवारणं च मात्रपदेनापसारितम्। तदयमर्थः। उपायमात्रेण लब्धेन यदा कदाचित् विशिष्टफलप्राप्तिरीषत्कल्प्यते संभावनामात्रेण स्थाप्यते न तु निश्चीयते तदा प्राप्तेः संभवः संभावनायोग्यत्वमसंभावनाविशिष्टत्वं नाम तृतीया कर्तुरवस्था।**

'ईषत्प्राप्तिः' इत्यादी. ज्यापासून निष्पत्ति होते तो भाव म्हणजेच उपाय. 'मात्र' शब्दाने इतर सहकाऱ्यांचा संबंध आणि अडथळ्यांचे निवारण या गोष्टींचे निराकरण केले आहे. म्हणून अर्थ असा. उपायच केवळ प्राप्त झाला असता जेव्हा कधी विशिष्ट फलाची प्राप्ती थोडक्यात कल्पिली जाते म्हणजे केवळ संभाव्यतेच्या स्वरूपात प्रस्तुत केली जाते, पण निश्चित स्वरूपात नाही, तेव्हा प्राप्तीचा संभव ह्या नावाची संभावनेला योग्य पण असंभावनेने लक्षित अशा स्वरूपाची तिसरी अवस्था कर्त्याची होते.

'अपसारितम्' मुद्रित पाठ 'अवधारितम्' आहे. पण तो असंभाव्य आहे. दोन गोष्टींचे निराकरण अभिप्रेत आहे, त्यांचा समावेश नाही. – 'संभावनायोग्यत्वम् इ०' म्हणजे संभाव्यता असली तरी असंभाव्यताही असतेच.

१ का -दर्थस्य.

नियतां तु[1] फलप्राप्तिं यदा[2] भावेन पश्यति ।
नियतां तां फलप्राप्तिं सगुणां[3] परिचक्षते ॥ ११ ॥

परंतु जेव्हा (नायक) फलप्राप्ती उपायामुळे निश्चित झालेली पाहतो तेव्हा त्या गुणसंपन्न अवस्थेला नियत फलप्राप्ती असे म्हणतात.

**नियतां तु फलप्राप्तिं यदेति। फलस्य प्रकर्षेणाप्तिर्यतः सहकारिवर्गः प्रतिबन्धकविध्वंसनसहिता च सामग्रीरूपा, तां सामग्रीं यदा तेन भावेन पूर्वोपात्ततया मुख्योपायेन नियतां नियन्त्रितां फलाव्यभिचारिणीं पश्यति तदा नियतफलप्राप्तिर्नामावस्था। ननु कर्तरीत्याशङ्क्याह सगुणामिति। गौणी उपचरिता तस्येयमवस्था। नियतफलकर्तृविषयत्वेन नियतफलप्राप्तिशब्दो विषयविषयिणोरभेदोपचारादुक्त इति यावत्। अत एव पश्यतीत्यनेन दर्शनमेवावस्थेति दर्शितम्। यदि वा सह गुणेन दर्शनेन वर्तते नियतफलप्राप्तिदर्शनं तन्नामावस्थेत्यर्थः। ये त्वकारप्रश्लेषादभावेन नियतां सन्देहमयीमिति व्याचक्षते ते नियता फलप्राप्तिः संदिग्धा चेत् कथमेतद्विरुद्धं संगच्छतामिति प्रष्टव्याः।**

'नियतां तु फलप्राप्तिं यदा' इत्यादी. फलाची प्रकर्षाने आप्ती म्हणजे सहकारीवर्ग आणि अडथळ्यांच्या नाशासहित असलेल्या सामग्रीच्या स्वरूपाची, त्या सामग्रीला जेव्हा त्या भावाने म्हणजे पूर्वीच अवलंबिलेला असल्यामुळे प्रमुख झालेल्या उपायाने नियत म्हणजे निश्चित झालेली, फलापासून विचलित न होणारी अशी पहातो तेव्हा नियतफलप्राप्ती नावाची अवस्था अस्तित्वात येते. ही अवस्था कर्त्याची का अशी शंका घेऊन तिचे निराकरण 'सगुणाम्' ह्या शब्दात करतात. ही त्याची अवस्था गौणी म्हणजे उपचारयुक्त आहे. नियत फलाच्या कर्त्याविषयी असल्यामुळे नियत फलप्राप्ति हा शब्द विषय आणि विषयी यांमधील अभेदाच्या उपचारामुळे योजिला आहे असा याचा अर्थ. म्हणूनच 'पश्यति' ह्या शब्दाने दर्शन हीच अवस्था हे दाखवितात. अथवा गुणाने म्हणजे दर्शनाने युक्त अशी असते, तेव्हा नियतफलप्राप्तीचे दर्शन ह्या नावाची ही अवस्था असा अर्थ. परंतु जे अकाराची योजना करून 'अभावेन नियताम्' म्हणजे संदेहयुक्त अशी व्याख्या करतात त्यांना असे विचारले पाहिजे की नियत फलप्राप्ती संदिग्ध असेल तर ह्या विरुद्ध वचनाची संगती कशी लावावयाची ?

'यतः सहकारिवर्गः इ०' येथील पाठ निश्चित नाही. हस्तलिखितात '-वर्गाः' बहुवचनात असून 'सामग्रीरूपतां' असा एक शब्द केला आहे. मुद्रितात '-सहितता च सामग्रीरूपतः,

१ **का** च. २ **का** यत. ३ **नि** सगुणाः, **का** सगुणस्तु विनिर्दिशेत्.

तां' असा पाठ आहे. 'प्रकर्षेण आप्तिः' म्हणजे काय ते येथे सांगितले आहे. सहकारिवर्ग आणि अडथळ्यांचा नाश यांची मिळून होणारी सामग्री असा 'प्रकर्षेण आप्तिः' चा अर्थ केला आहे हे स्पष्ट आहे. पण यातील 'यतः'चा कोठे अन्वय लागण्यासारखा नाही. 'या' चे ते अपभ्रष्ट रूप असण्याचा संभव आहे. नंतर 'सहकारिवर्गप्रतिबन्धकविध्वंसनरूपा सामग्री' असा पाठ असता तर अर्थ स्पष्ट झाला असता. हस्तलिखितातील आणि मुद्रितातील पाठ अन्वय लावण्यास कठीण आहेत. – 'ननु कर्तरि' यात 'कथं' सारखा एखादा शब्द गहाळ झाला आहे असे वाटते. येथे शंका अशी घेतली आहे की ही चौथी अवस्था कर्त्याची म्हणजे नायकाची आहे असे कसे काय म्हणता येईल? ही शंका उत्पन्न होण्याचे कारण असे दिसते की फलप्राप्ति नायकाच्या कर्तृत्वाशी साक्षात संबद्ध नाही. पहिल्या तीन अवस्था त्याच्या कर्तृत्वाशी संबद्ध आहेत, तशी ही नाही. मग ती त्याची अवस्था असे कसे म्हणता येईल? – 'गौणी' हा लक्षणेचा एक प्रकार आहे. श्लोकातील 'सगुणाम्' शब्दाचा लावलेला हा अर्थ पटणे कठीण आहे. – 'अभेदोपचारादुक्तः' अभेदरूप उपचारामुळे शब्द लाक्षणिक अर्थानें वापरतात. फलप्राप्ती-चा कर्ता आणि फलप्राप्ती यांत भेद नसल्यामुळे नायकाविषयी 'फलप्राप्ति' ह्या शब्दाचा उपयोग असा लाक्षणिक अर्थानें केला आहे. 'उक्तः' च्या ऐवजी 'युक्तः' असा मुद्रित पाठ आहे. पण 'उक्तः' अधिक योग्य वाटतो. – 'यदि वा इ०' यात 'सगुणाम्' शब्दाची दुसरी व्याख्या केली आहे. गुण म्हणजे दर्शन असा अर्थ केला आहे. – 'अकारप्रश्लेषात्' म्हणजे श्लोकातील 'यदा-भावेन' याचा 'यदा अभावेन' असा संधि सोडविला आहे. ही व्याख्या कोणत्या टीकाकारानें केली होती ते सांगितलेले नाही.

**अभिप्रेतं समग्रं च प्रतिरूपं क्रियाफलम् ।**
**इतिवृत्ते[1] भवेद्यस्मिन् फलयोगः प्रकीर्तितः ॥ १२ ॥**

ज्या कथानकात इच्छिलेले, पूर्ण आणि योग्य असे क्रियेचे फल उपलब्ध होते त्याला फलयोग असे म्हणतात.

**अभिप्रेतं समग्रं चेति । यस्मिन्नितिवृत्ते कर्त्रवस्थात्मनि नायकस्याभिप्रेतं, तादृशमपि च नानुचितम् अपि तु प्रतिरूपमुचितं, संभवात्पूर्णं, क्रियाफलमिति समनन्तरफलं, न च विधिफलमिव स्वर्गादि कालान्तरापेक्षि, वर्ण्यते, सावस्था नायकस्य फलयोगः फलोत्पत्तिर्नाम । तत्र सचिवामात्यादेरपि यावस्था सा वस्तुतो नायकगामिन्येव भवतीति नाटकेषु नावश्यं सर्वा नायकस्य साक्षा-देवोपनिबन्धनीयाः, अपि तु सचिवादिगतत्वेनापि, फलयोगस्तु साक्षादेव तद्गत इत्यभिप्रेतामित्यनेन दर्शितम् । अवस्थान्तराणि सचिवादिगतान्यपि पर्यवस्यन्ति नायकादेरेवेत्येतदेव सुकविना रत्नावल्यां 'प्रारम्भेऽस्मिन् स्वामिनः सिद्धिहेतौ' इति श्लोकेन प्रतिपदमुक्त्वा अस्मदभिप्रायः समुच्छ्रितेन दर्शितः ।**

१ का यद्दृश्यते निवृत्ते तु फलयोगः स उच्यते.

'अभिप्रेतं समग्रं च' इत्यादी. कर्त्याच्या अवस्थेच्या स्वरूपाच्या ज्या कथानकामध्ये नायकाला अभिप्रेत असलेले, तसे असूनही अनुचित नसलेले इतकेच नव्हे तर प्रतिरूप म्हणजे उचित असलेले, संभाव्यतेप्रमाणे पूर्ण असे क्रियाफल म्हणजे लगेच मिळणारे फल, यज्ञविधीच्या स्वर्गादी फलाप्रमाणे कालान्तराची अपेक्षा असणारे नव्हे, वर्णिले जाते ती नायकाची अवस्था फलयोग म्हणजे फलोत्पत्ती ह्या नावाची होय. त्यात सचिव, अमात्य आदींची जी अवस्था ती वास्तविकपणे नायकालाच प्राप्त होणारी असते म्हणून नाटकांमध्ये सर्व अवस्था प्रत्यक्ष नायकाशीच संबद्ध असलेल्या दाखविणे आवश्यक नाही, तर सचिवादींशी संबद्ध अशाही दाखविण्यास हरकत नाही; परंतु फलयोग मात्र त्याच्याशीच साक्षात संबद्ध असावा हे 'अभिप्रेत' या शब्दाने दाखविले आहे. इतर अवस्था सचिव आदींशी संबद्ध असल्या तरी त्यांचे पर्यवसान नायकाच्याच ठिकाणी होते हेच महाकवी श्रीहर्षाने रत्नावली नाटिकेत 'स्वामीच्या सिद्धीस कारणीभूत होणाऱ्या ह्या उद्योगात' इत्यादी श्लोकात स्पष्ट शब्दांत सांगून आमच्या मताला जोरदार पुष्टी दिली आहे.

'रत्नावल्याम्' संपूर्ण श्लोक पुढीलप्रमाणे आहे –

**प्रारम्भेऽस्मिन् स्वामिनो वृद्धिहेतौ दैवेनेत्थं दत्तहस्तावलम्बे ।**
**सिद्धेर्भ्रान्तिर्नास्ति सत्यं तथापि स्वेच्छाचारी भीत एवास्मि भर्तुः ॥ १.७.**

प्रथम चरणात अभिनवगुप्ताचा 'सिद्धिहेतौ' असा पाठ आहे. – 'प्रतिपदम्' म्हणजे स्पष्ट शब्दांत. – 'समुच्छ्रितेन' हस्तलिखितात या ठिकाणी 'अस्मदभिप्रायसंमूर्च्छितेन दर्शितम्' असा पाठ आहे. परंतु 'अभिप्रायः' असा कर्ता असलेले स्वतंत्र वाक्य अधिक चांगले. 'समुच्छ्रितेन' हे क्रियाविशेषण समजावे लागते. ते विशेष समाधानकारक नाही आणि शब्दही विशेष समर्पक नाही. तथापि तो स्वीकारल्याशिवाय गत्यंतर दिसत नाही.

**सर्वस्यैव हि कार्यस्य प्रारब्धस्य फलार्थिभिः ।**
**एतास्त्वनुक्रमेणैव[1] पञ्चावस्था भवन्ति हि ॥ १२ ॥**

फलाची इच्छा करणाऱ्यांनी सुरू केलेल्या कोणत्याही कार्याच्या ह्या पाच अवस्था क्रमशः होतातच.

**ननु मानुषव्यापारे नायकस्य तत्सचिवादेर्वा भवन्त्वेता अवस्थाः। प्रतिनायकेऽप्येवं, तत्र परमसदुपायापेक्षया। यत्र तु दैवायत्तं फलं वर्ण्यते तत्र कथम्। न च वर्ण्यम् पुरुषकारमात्राभिमानिनां दैवमवजानानानां चार्वाकादिमतमुपेयुषां दैवबहु-**

१ नि एता अनु-, का यथानुक्रमशो ह्येताः.

मानव्युत्पत्तये हि पुरुषकारोऽप्यफलस्तदभावोऽपि सफलः प्रदर्शनीयः, अत एव दरिद्रचारुदत्तादिरूपकाणि तद्विषयाणि इति । तस्माद्दैवायत्तत्वे कथमेतदवस्थापञ्चकम् । तत्परिहर्तुमाह सर्वस्यैव हीति । दैवादागच्छतोऽपीत्यर्थः । तत्रापि हि यद्यपि नायको न प्रवर्तते तथापि यत्र फलं भवति तत्रावश्यमवस्थाभिर्भाव्यम् । स एव च परं फलेन तदानीमर्थी भवति । यमर्थमधिकृत्य प्रवर्तत इति हि प्रयोजनलक्षणं वदन्ति । तथाहि सेवाद्यशेषोपायप्रारम्भं विनानन्दसंपादनहृदय एव । अपरथा परतः प्राप्तमपि फलं नाङ्गीकुर्यात् । अनङ्गीकरणेऽपि चास्य फलार्थित्वमेव, अधिकफलान्तरसंतोषमनु प्रसिद्ध्यादिफलान्तराभिसंधानात्, इति युक्तमुक्तं मुनिना सर्वस्यैव पञ्चावस्था इति ।

या ठिकाणी आक्षेप असा – जेथे मनुष्यांचा उद्योग असतो तेथे नायकाच्या किंवा त्याच्या सचिव आदींच्या ह्या अवस्था असू द्या. प्रतिनायकाच्या बाबतीतही तेच, केवळ तेथे दुष्ट उपायांच्या दृष्टीने त्या अवस्था असतात. परंतु जेथे फल दैवावर अवलंबून असते तेथे ह्या अवस्था कशा समजावयाच्या ? आणि 'प्रयत्नवादाचा अभिमान बाळगणारे, दैवाची हेटाळणी करणारे असे जे चार्वाक आदींच्या मताचे अनुयायी असतात त्यांना दैवाचे महत्त्व पटविण्यासाठी पुरुषप्रयत्न विफल झालेले आणि प्रयत्नांच्या अभावीही फल प्राप्त झालेले दाखवावयाचे असते आणि म्हणूनच दरिद्र-चारुदत्त इत्यादी रूपके त्या विषयावर आहेत' अशा तऱ्हेचे विवरण करू नये. तेव्हा फल दैवाधीन असता ह्या पाच अवस्था कशा समजावयाच्या ? या आक्षेपाचा परिहर 'सर्वस्यैव हि' इत्यादी श्लोकात करतात. सर्व म्हणजे दैवाने होत असलेल्या कार्याच्या ही असा अर्थ. कारण तेथे सुद्धा जरी नायक प्रवृत्त होत नाही तरी जेथे फलनिष्पत्ती होते तेथे ह्या अवस्था अवश्य असतातच. आणि नंतर तोच त्या फलाचा अर्थी होतो कारण जी गोष्ट मनात योजून मनुष्य उद्युक्त होतो ते प्रयोजन अशी त्याची व्याख्या करतात. उदाहरणार्थ, सेवाप्रभृती सर्व उपायांच्या योजनेशिवाय आनन्द प्राप्त करण्याची इच्छा त्याच्या मनात असतेच. नाही तर दुसऱ्याकडून मिळालेले फल तो स्वीकारणार नाही. आणि जरी त्याने स्वीकार न केला तरी त्याचे फलाविषयीचे अर्थित्व असतेच, कारण संतोषरूपी दुसरे अधिक फल प्राप्त झाल्यावर त्यापाठोपाठ प्रसिद्धी वगैरे इतर फलाचे अनुसंधान होते; म्हणून सर्वच कार्याच्या पाच अवस्था असे भरतमुनीने म्हटले आहे ते योग्यच आहे.

'भवन्त्वेता' मुद्रित पाठ 'भवन्त्येता' आहे. परंतु आक्षेपाच्या वचनात 'भवन्तु' अधिक समुचित. – 'न च वर्ण्यम्' याचा संबंध 'तद्विषयाणि इति' येथपर्यंत आहे. ते स्पष्ट करण्यासाठी मुळात नसलेला 'इति' शब्द घातला आहे. आक्षेपकाचे म्हणणे असे आहे की कार्य दैवयोगाने घडून

येते तेव्हा त्याच्या अवस्था कशा समजावयाच्या ह्या त्याच्या प्रश्नाचे उत्तर 'पुरुषकार .... तद्विषयाणि' ह्या शब्दांत समाधानकारकपणे मिळण्यासारखे नाही. आणि हे त्याचे म्हणणे बरोबर आहे. कारण त्यात दैवाधीन कार्याच्या अवस्थांची उपपत्ती दिलेली नसून नाटकात दैवाधीन कार्यसिद्धी कशासाठी दाखवावयाची त्याचे स्पष्टीकरण आहे. – 'अवजानानानां' ही मुळातील 'अवजानानां' चीं दुरुस्ती आहे. ज्ञा धातूचे धातुसाधित विशेषण 'जानान' असे असल्यामुळे त्याचे षष्ठीचे बहुवचन 'जानानानाम्' असेच होणार. – 'मतमुपेयुषाम्' हस्तलिखितात 'अपेयुषाम्' असा भ्रष्ट पाठ आहे. मुद्रितात 'एयुषाम्' आहे. पण 'उपेयुषाम्' अधिक संभाव्य आहे. या शब्दानंतर मुळात 'सः' अधिक आहे. पण त्याचा वाक्यात कोणत्याही प्रकारे अन्वय लावणे शक्य नसल्यामुळे तो शब्द गाळला आहे. – 'न प्रवर्तते' हस्तलिखितात 'न वर्तते' आणि मुद्रितात 'न यतते' आहे. पण 'प्रवर्तते' हेच क्रियापद मूळ असण्याचा संभव आहे. – 'स एव च इ०' श्लोकातील फलार्थिभिः ह्या शब्दाची उपपत्ती सांगण्यासाठी हे वाक्य व पुढील वाक्ये योजिली आहेत. – 'यमर्थम् इ०' 'फलार्थिन्' मधील 'अर्थ' म्हणजे प्रयोजन हे सांगण्याच्या उद्देशाने प्रयोजनाची ही व्याख्या येथे उद्धृत केली आहे. – 'सेवाग्रशेषो- इ०' ह्या वाक्याचा अर्थ पूर्णपणे स्पष्ट नाही. त्याचा असा आशय दिसतो की स्वतः काहीही उपाययोजना न करता एखाद्या फलाचा लाभ झाला तर मनुष्याचे हृदय आनंदाने भरून येतेच व तो त्या फलाचा स्वीकार करतो. दैवाधीन फल असता नायकाच्या बाबतीत ही गोष्ट घडते. म्हणून तेथेही नायक फलार्थी असतो असे म्हणावयास हरकत नाही. – 'चास्य' ही हस्तलिखितातील 'हास्य' ची दुरुस्ती आहे. मुद्रितातील 'वास्य' पेक्षा 'चास्य' अधिक समर्पक. – 'अधिकफलान्तर- इ०' याचा अर्थ असा दिसतो की प्रत्यक्ष फलाचा स्वीकार न केला तरी संतोष आणि प्रसिद्धी इत्यादी इतर फले अनायासे प्राप्त होतातच. समासात 'अधिकफलान्तर' हे संतोषाचेच वर्णन आहे.

**आसां[1] स्वभावभिन्नानां परस्परसमागमात् ।**
**विन्यास एकभावेन फलहेतुः[2] प्रकीर्तितः ॥ १४ ॥**

स्वभावतः भिन्न असलेल्या ह्या अवस्थांच्या परस्पर समागमाने एकरूप झालेली त्यांची योजना फलसिद्धीला कारणीभूत मानली आहे.

**नन्वासां तावत्स्वभावभेदः कालभेदश्च, कालभिन्नानां चैककालत्वाभावात् 'संसाध्ये फलयोगे तु व्यापारः कारणस्य' इति यदुक्तं तत्कथम्, किंच फलयोगे साध्ये पञ्चावस्थाः कारणस्येति पञ्चमीहावस्था फलयोग एव न तु सा काचिदन्येत्याशङ्क्याह आसां स्वभावभिन्नानामिति । स्वभावभेदेन कालभेदोऽप्युपलक्ष्यते स्वभावभेदे दिक्काले दण्डचक्रादिभिरेकफलसंपादना । तेन कालभिन्नानामपि आसां**

१ नि तासां. २ का फलाय परिकल्प्यते.

**परस्परमन्योन्यं संगत्या नान्तरीयकत्वेन यदागमनं तदवलम्ब्य यो विन्यासः यः फलहेतुस्तत आद्यन्तापकर्षणम्, निश्चितोत्तरोत्तरकार्याणां कारणकारणानामपि हेतुत्वानपायादिति भावः। यच्चोक्तं फलयोगे कथं फलयोगान्तरमिति तत्राप्याह एकभावेन फलहेतुरिति। एकभावः संबन्धः। तेनायं भावः। फलस्योत्पत्त्यवस्था एका नायकेन सह संबद्धा, द्वितीया येयं संसाध्ये फलयोग इत्यत्र निर्दिष्टा। पूर्वा त्ववस्था मध्ये तेन युज्यमाना योग्यफलोत्पत्तिदार्शीता पञ्चम्यवस्थेत्यर्थः।**

येथे शंका अशी – ह्या अवस्थांच्या स्वरूपात भेद आहे तसेच त्यांच्या कालातही भेद आहे. आणि ज्यांच्या कालात भेद आहे त्यांचा काल एकच नसल्यामुळे 'फलयोग साध्य करावयाचा असता कारणाचा व्यापार' असे जे वर म्हटले आहे ते कसे? शिवाय फलयोग साध्य करावयाचा असता कारणाच्या पाच अवस्था असतात त्यांतील पाचवी अवस्था म्हणजे फलयोगच, ती काही दुसरी कोणती अवस्था नाही. ह्या शंकेचे समाधान 'आसां स्वभावभिन्नानाम्' यात करतात. स्वभावभेदाने कालभेद सुद्धा उपलक्षित होतो. स्वरूपात भिन्नता असूनही दण्ड, चक्र इत्यादींनी घटाच्या रूपात एक फल संपादित होते. म्हणून ह्या अवस्थांत कालभिन्नता असली तरी त्यांचे परस्पराशी म्हणजे एकमेकाशी संगतीने म्हणजे मध्ये काहीही वेळ जाऊ न देता जे आगमन त्याचा अवलंब करून जो विन्यास म्हणजे फलाचे जे कारण त्यापासून आदिपासून अंतापर्यंत विस्तार तो होतो; कारण उत्तरोत्तर होणारी कार्ये निश्चित असली तर कारणाचे जे कारण त्याचे नंतरच्या कार्याचेही कारणत्व नाहीसे होत नाही असा भावार्थ. आणि फलयोगामध्ये दुसरा फलयोग कसा असू शकेल अशी जी शंका घेतली आहे तिचे समाधान 'एकभावेन फलहेतुः' या शब्दांत करतात. एकभाव म्हणजे संबंध. म्हणून अर्थ असा. फलाची उत्पत्तिरूप एक अवस्था नायकाशी संबद्ध असते, दुसरी 'संसाध्ये फलयोगे' यात निर्दिष्ट झाली आहे ती. पण पहिली अवस्था म्हणजे मध्ये त्याच्याशी संबद्ध होऊन योग्य अशा फलाच्या उत्पत्तीने निदर्शित अशी पाचवी अवस्था असा याचा अर्थ.

'कालभिन्नानां' मुळात 'कालाभिन्नानां' आहे. ते अर्थात बरोबर नाही. – 'तत्कथम्' वर सहाव्या श्लोकात फलयोग साधावयासाठी व्यापार होतो असे म्हटले आहे. तो व्यापार एकच असल्यामुळे त्याला लागणाऱ्या कालाचे खंड पडणार नाहीत, म्हणजे त्यात कालभिन्नता येणार नाही. पण अवस्था भिन्न भिन्न कालात अस्तित्वात येतात. तेव्हा याचा मेळ कसा घालावयाचा असे या शंकेचे स्वरूप दिसते. – 'किं च फलयोगे इ०' या वाक्यात थोडी दुरुस्ती सुचविली आहे. मुळात 'साध्ये' नंतर आणखी एक 'च' आहे. 'किं च' असता त्याचा काहीच आवश्यकता नाही, म्हणून तो गाळला आहे. मुळातील 'तत्रावस्था' च्या जागी 'पञ्चावस्थाः' असा पाठ स्वीकारला आहे. 'तत्र' प्रस्तुत ठिकाणी अर्थहीन आहे आणि 'पञ्चावस्थाः' हे शब्द वर सहाव्या श्लोकात आलेलेच आहेत. पुढे 'पञ्चेतीहावस्था' या मुळातील पाठाच्या

जागी 'पञ्चमीह्यवस्था' अशी दुरुस्ती केली आहे. पञ्चमी असे अवस्थेचे विशेषण आवश्यक आहे आणि मुळातील 'इति' निरर्थक आहे. शेवटी 'कदाचित्' ची 'काचित्' अशी दुरुस्ती केली आहे. 'काचित्' अधिक समर्पक आहे हे उघड आहे. आक्षेपाने घेतलेली ही दुसरी शंका अशी की फलयोग साध्य करावयाचा असता पाच अवस्था होतात, म्हणजेच ह्या फलयोगाच्या पाच अवस्था होत. मग त्यापैकी एकीला – पाचवीला – फलयोग असे नाव दिले आहे. तिच्यात आणि वरील फलयोगात फरक नाही. तेव्हा हे कसे ? – 'स्वभावभेदेन' ही मुळातील 'स्वभावभेदे तु' ची दुरुस्ती आहे. 'तु' येथे अर्थहीन आहे. आणि उपलक्षित करणारा शब्द तृतीयेत असण्याचाच संभव आहे. – 'स्वभावभेदे दिक्काले' यातील 'दिक्काले' ची काही अर्थसंगती लागण्यासारखी नाही. 'स्वभावभेदे' नंतर 'ऽपि' आवश्यक वाटतो. – 'तेन' हा शब्द 'तथा' ह्या अर्थी वापरलेला असावा. कारण 'म्हणून' असा अर्थ योग्य वाटत नाही. भिन्न स्वरूपाच्या गोष्टींनी एकच कार्य सिद्ध होते म्हणून भिन्न कालातील गोष्टींनीही एक कार्य सिद्ध होऊ शकते असा युक्तिवाद कसा करता येईल ? वस्तुतः मूळ श्लोकात स्वभावभिन्नतेचाच निर्देश आहे, कालभिन्नतेचा मुळीच नाही. पण अभिनवगुप्ताची सर्व टीका कालभिन्नतेच्या अनुरोधाने केलेली आहे. – 'संगत्या' असा श्लोकातील 'समागम' मधील 'सम्' उपसर्गाचा अर्थ केला असून 'नान्तरीयकत्वेन' अशी त्याची व्याख्या केली आहे. – 'यः फलहेतुः' ही हस्तलिखितातील 'यत्फलहेतुः' ची दुरुस्ती आहे. मुद्रितात 'यत्फलभेदः' असा पाठ आहे. पण 'भेद' संभाव्य नाही. – 'ततः' म्हणजे त्या फलहेतुपासून. – 'आद्यन्तापकर्षणम्' मुद्रित पाठ '-वहर्षणं' आहे. पण तो बरोबर वाटत नाही. 'ततः' ह्या पंचम्यर्थ शब्दानंतर 'अपकर्षण' च अधिक समर्पक आहे. 'यः फलहेतुः ततः आद्यन्तापकर्षणम्' ही 'विन्यासः' ची व्याख्या आहे पण यानंतर काही शब्द गहाळ झाले असावेत असे वाटते. 'यो विन्यासः' ने सुरुवात झालेले वाक्य पूर्ण केलेले नाही. श्लोकातील 'प्रकीर्तितः' चे विवरण करणारे शब्द मुळात होते व ते पुढे लेखनदोषाने लुप्त झाले असा संभव आहे. – 'फलयोगे' म्हणजे पाचही अवस्थाभर पसरलेल्या फलयोगामध्ये. – 'फलयोगान्तरम्' म्हणजे पाचव्या अवस्थेतील फलयोग. – 'पूर्वा' म्हणजे ह्या ज्या दोन अवस्था सांगितल्या आहेत त्यांपैकी पहिली. – 'मध्ये तेन' मुद्रित पाठ 'मध्यत्रयेण' असा आहे. पण तो संभाव्य वाटत नाही. मधल्या तीन अवस्थांचा अशा प्रकारचा निर्देश संभवनीय नाही. 'तेन' म्हणजे 'नायकेन' असे अभिप्रेत आहे. – 'योग्यफलोत्पत्तिदर्शिता' हस्तलिखितातील '-त्पत्तिर्दर्शिता' ची ही दुरुस्ती आहे. ती आवश्यक आहे. मुद्रित पाठ '-त्पत्तिदर्शना' आहे तो विशेष समर्पक नाही.

**इतिवृत्तं समाख्यातं[१] प्रत्यगेवाधिकारिकम् ।**
**तदारम्भादि कर्तव्यं फलान्तं च यथा भवेत् ॥ १५ ॥**

पूर्वी जे मुख्य कथानक म्हणून सांगितले त्याची प्रारम्भावस्थेपासून सुरुवात करावी व फलप्राप्तीने शेवट होईल असे करावे.

१ का यथाख्यातं पुरस्तादाधि-.

एवमवस्थापञ्चकं प्रदर्श्य तदनुयायित्वेनेतिवृत्तस्याधिकारिकत्वं समर्थयितुमाह इतिवृत्तं समाख्यातमिति । यद्यस्मात् तत्कर्तव्यं कार्यं वस्तु आरम्भादि फलान्तं च तदिति तस्मात् तदवस्थानुयायित्वेनाधिकृतत्वादाधिकारिकमुच्यते । चस्तुशब्दस्यार्थे । यथा तु तदितिवृत्तशब्दवाच्यं भवेत् तथा प्राक्सम्यगाख्यातम् इतिशब्दार्थनिरूपणेन 'पञ्चभिः संधिभिस्तस्य विभागः' इत्यनेन। एतच्च तद्गतवक्तव्यान्तरोपक्षेपाय पुनरभिहितम्।

याप्रमाणे पाच अवस्थांचे निरूपण केल्यावर त्यांचा अवलंब केल्यामुळे इतिवृत्त आधिकारिक होते असे समर्थन करण्यासाठी 'इतिवृत्तं समाख्यातम्' इत्यादी सांगतात. यत् म्हणजे ज्याअर्थी ते कर्तव्य म्हणजे रचावयाचे असलेले कथानक आरंभापासून सुरू होऊन फलात अंत पावते, तत् म्हणजे त्याअर्थी त्या अवस्थांचा अवलंब केल्यामुळे अधिकृत होते, म्हणून त्याला आधिकारिक असे म्हणतात. 'च' शब्द 'तु' म्हणजे परंतु ह्या अर्थी वापरला आहे. परंतु ते कथानक इतिवृत्त शब्दाने निर्दिष्ट कसे होऊ शकेल ते पूर्वी सुस्पष्टपणे सांगितले आहे – 'पाच संधींनी त्याचे भाग' इत्यादी शब्दांत केलेल्या 'इति' शब्दाच्या विवरणात. आणि त्यासंबंधात दुसरे काही सांगावयाचे आहे त्याचा उपक्षेप करण्यासाठी हे येथे पुन्हा सांगितले आहे.

'तदनुयायित्वेन' कथानक पाच अवस्थांना अनुसरून रचिले जाते हे 'तदनुयायि' मध्ये अभिप्रेत आहे. – 'यत्' वस्तुतः हा शब्द श्लोकात नाही आणि तो त्यात असण्याची संभाव्यताही नाही. श्लोकाची व्याख्या करताना अन्वय फार ओढाताण करून लावला आहे. – 'इतिशब्दार्थनिरूपणेन' ही दुरुस्ती आहे. 'इतिशब्दार्थमिति निरूपणेन' ह्या मुळातील पाठात अधिक असलेला 'इति' शब्द निरर्थक आहे. आणि सर्व मिळून एक समास असणे आवश्यक आहे. – 'पञ्चभिः इ०' हा वरील पहिल्या श्लोकाचा उत्तरार्ध आहे. त्या उत्तरार्धात इतिवृत्त शब्दातील इति शब्दाचा अर्थ विषद केला आहे असे अभिनवगुप्ताने त्या ठिकाणी सांगितले आहे. – 'तद्गत' म्हणजे इतिवृत्तासंबंधी. – 'वक्तव्यान्तर' संधि, अर्थप्रकृति इत्यादी.

**पूर्णसंधि च[1] कर्तव्यं हीनसंध्यपि वा पुनः ।**
**नियमात्पूर्णसंधि[2] स्याद्धीनसंध्यथ कारणात् ॥ १६॥**

आणि ते कथानक सर्व संधीनी पूर्ण असे करावे अथवा काही संधीनी विरहित असेही करावे. नियमाप्रमाणे ते पूर्णसंधि असावे व कारणपरत्वे हीनसंधि करावे.

१ नि तु तत्कार्यं. २ नि पञ्चसंधि.

ननु किं सर्वत्र पञ्चैव संधय इत्याह पूर्णसंधि चेति। विकल्पः सर्वत्रेति कश्चिदाशङ्कते तं प्रत्याह नियमादिति । उत्सर्गेणेति केचित् । उपाध्यायास्त्वाहुः । सर्वत्रेतिवृत्तं पञ्चसंध्येव। न हि कश्चिदपि व्यापारः प्रारम्भाद्यवस्थापञ्चकं विनास्ते ऊनीकृत्य वा। उक्तं हि–

सर्वस्यैव हि कार्यस्य प्रारब्धस्य फलार्थिभिः।
एतास्त्वनुक्रमेणैव पञ्चावस्था भवन्ति हि ॥ इति।

अवस्थापञ्चकानुयायिना संधिपञ्चकेनापि भाव्यमेव। तेन सर्वं नियमात्पञ्चसंधि। हीनसंधित्वं तु तत्र कारणादपूर्णाङ्गत्वलक्षणादुच्यते । अत एव पूर्णसंध्यपि व्यपदिश्यते इत्यपिशब्देन चोक्तम् ।

सर्वत्र पाचच संधी असतात का या प्रश्नाचे उत्तर 'पूर्णसंधि च' इत्यादी शब्दांत देतात. सर्वत्र विकल्प असतो काय अशी जो शंका घेईल त्याला 'नियमात्' ह्या शब्दात उत्तर देतात. उत्सर्ग करून अशी काहींची व्याख्या आहे. परंतु आमचे गुरुजी म्हणतात – सर्वत्र इतिवृत्तामध्ये पाच संधी असतातच. कारण कोणताही व्यापार प्रारंभ आदी पाच अवस्थांशिवाय अथवा त्यांपैकी काही कमी करून असत नाही. मागे म्हटलेलेच आहे की 'फलाची इच्छा करणाऱ्यांनी प्रारंभ केलेल्या कोणत्याही कार्याच्या ह्या पाच अवस्था अनुक्रमाने होतातच.' आणि पाच अवस्थांना अनुसरून असणारे पाच संधी असलेच पाहिजेत. म्हणून सर्व कथानकात नियमाने पाच संधी असतात. परंतु त्यात हीनसंधित्व असल्याचे म्हणतात ते संधींची अंगे पूर्ण नसतात ह्या कारणामुळे. म्हणूनच 'पूर्णसंधि' असा सुद्धा त्याचा निर्देश होतो हे 'अपि' शब्दाने दाखविले आहे.

- 'उत्सर्गेणेति केचित्' नियम शब्दाचा काही टीकाकारांनी उत्सर्ग असा अर्थ केला होता, तो अभिनवगुप्ताला मान्य नाही. यावरून उत्सर्ग शब्द 'त्याग, कमी करणे' अशा भिन्न अर्थाने वापरला आहे असे उघड दिसते. – 'विनास्ते ऊनीकृत्य वा' हस्तलिखितात येथे 'इति विद्यास्ते औनीकृत्य वा' असा पाठ आहे. त्यातील 'इति' अनावश्यक आहे, 'औन' असे ऊन पासून भाववाचक रूप बनविण्याचे काही प्रयोजन नाही आणि 'विद्यास्ते' हा उघडच भ्रष्ट पाठ आहे. मुद्रित पाठ 'विना सिद्ध्येत्, न शक्यमौनीकृत्यं वा' आहे. त्यात शुद्धीकरणाचा प्रयत्न केलेला दिसतो. तो मूळ पाठ असण्याचा संभव कमी. – 'सर्वस्यैव इ०' हा वरील तेरावा श्लोक. – पूर्णसंध्यपि' मुद्रित पाठ 'पूर्णसंधीति' आहे. पण तो बरोबर नाही. 'अपि' आवश्यक आहे.

**एकलोपे चतुर्थस्य द्विलोपे त्रिचतुर्थयोः ।**
**द्वितीयत्रिचतुर्थानां त्रिलोपे लोप इष्यते ॥ १७॥**

एका संधीचा लोप करावयाचा असल्यास चौथ्या संधीचा लोप करणे इष्ट होय, दोन संधींचा लोप करावयाचा असल्यास तिसऱ्या व चौथ्या संधींचा आणि तीन संधींचा लोप करावयाचा असल्यास दुसऱ्या, तिसऱ्या व चौथ्या संधींचा लोप करणे इष्ट होय.

**हीनसंध्यपि वा पुनरिति। 'डिमः समवकारश्च चतुःसंधी' इति वक्ष्यते, तत्रावमर्शस्य लोपः । 'व्यायोगेहामृगौ चापि सदा कार्यौ त्रिसंधिकौ' ततः गर्भावमर्शयोर्लोपः । 'द्विसंधि तु प्रहसनं वीथ्यङ्को भाण एव च' तत्र प्रतिमुखगर्भावमर्शानां लोपः । त्रिशब्देन तृतीयो लक्ष्यते । तत्रोपक्रमोपसंहारौ तावत्सर्वत्रावश्यंभाविनौ । तत्र तु ये प्रेक्षापूर्वकारिणो विततं कर्तव्यं बहुफलमारभन्ते तेषां पञ्चैव संधयः । आर्तिसहिष्णुत्वेन शङ्क्यमानविरुद्धप्रत्ययस्यापाकरणे 'द्वौ प्रतिषेधौ विधिं द्रढयतः' इति न्यायात्सुदृढो हि भवत्येषां फलयोगः । डिमादिनायकास्त्वत्युद्धतप्रायत्वात् नातीव विनिपातमाशङ्कन्ते । व्यायोगादिनायका अपि तारतम्येन फलयोगाङ्गिभावं नाद्रियन्ते । प्रहसनादिनायकास्त्वधर्मप्रायत्वात् तादितिवृत्तस्य चर्वितशरीरत्वादुपक्रमोपसंहारमात्रे विश्राम्यन्ति । इत्यपूर्णा अवमर्शादयः ।**

'हीनसंध्यपि वा पुनः' याचे पुढीलप्रमाणे स्पष्टीकरण. 'डिम व समवकार यात चार संधी असतात' असे पुढे म्हटले आहे. त्यात अवमर्शसंधीचा लोप होतो. 'व्यायोग आणि ईहामृग नेहमी तीन संधींनी युक्त करावेत' म्हणून त्यात गर्भ व अवमर्श ह्या संधींचा लोप होतो. 'पण प्रहसन, वीथी, अङ्क आणि भाण दोन संधींनीच युक्त असावेत' तेव्हा त्यांत प्रतिमुख, गर्भ आणि अवमर्श ह्यांचा लोप होतो. 'त्रि' शब्द तिसरा ह्या अर्थी वापरला आहे. यांपैकी उपक्रम आणि उपसंहार ह्या दोन गोष्टी तर सर्वत्र असाव्याच लागतात. परंतु त्यात जे नायक आधी विचार करून दीर्घ, पुष्कळ फलाने युक्त अशा कार्याचा आरंभ करतात त्यांचे पाचही संधी होतात. दुःख सहन करण्याची शक्ती असल्यामुळे संभाव्य अशा विरोधी प्रत्ययांचे निराकरण करताना 'दोन निषेधांनी विधि दृढमूल होतो' या न्यायाने ह्या नायकांचा फलयोग सुदृढ होतो. पण डिम आदींचे नायक प्रायः अती उद्धत स्वभावाचे असल्यामुळे त्यांना सिद्धी प्राप्त होणार नाही अशी शंका मुळीच येत नाही. व्यायोग आदींचे नायक सुद्धा कमी अधिक प्रमाणात फलयोगाचे

१ नि चतुर्थस्यैकलोपे तु.

अंगी होण्याची पर्वा करीत नाहीत. प्रहसन आदींचे नायक तर प्रायः धर्मरहित असल्यामुळे त्यांच्या इतिवृत्ताचे शरीर चोथा झालेले असते म्हणून ते केवळ उपक्रम व उपसंहार यांत विश्रांत होतात. याप्रमाणे अवमर्श आदी संधी अपूर्ण होत.

'डिमः समवकारश्च इ०' येथे उद्धृत केलेले श्लोकार्ध पुढे ४२-४४ ह्या श्लोकांत आढळतील. वस्तुतः सधीसंबंधीची या व मागील १६ व्या श्लोकांतील विधाने संधींचे स्वरूप स्पष्ट केल्यानंतरच अधिक समुचित ठरली असती. संधींचा अवस्थांशी दृढ संबंध असल्यामुळे अवस्थांच्या विवेचनानंतर संधिविषयक ही विधाने येथे केलेली असावीत. – 'त्रिशब्देन' श्लोकात 'त्रिचतुर्थयोः' आणि 'द्वितीयत्रिचतुर्थानां' यांमध्ये आलेला 'त्रि' शब्द वस्तुतः 'तृतीय' असा पाहिजे. – 'विरुद्धप्रत्यय' यातील प्रत्यय शब्द अनुभव या अर्थी वापरलेला असून त्याने घटनांचा सुद्धा बोध होतो असे समजावयास हरकत नाही. – 'विनिपातम्' म्हणजे विनाश, सिद्धीचा अभाव. – 'फलयोगाङ्गिभावं नाद्रियन्ते' ही दुरुस्ती आहे· मुळात '-भावान्नाद्रियन्ते' असे आहे, आणि मुद्रितात '-ङ्गी-' दीर्घ आहे. फलयोग हे अङ्ग व नायक हे अङ्गिन् अशी कल्पना करून नायक अङ्गिभावरूप संबंधाची पर्वा करीत नाहीत असे येथे म्हटले आहे. याचा अर्थ ते फलयोगाविषयी फारसे उत्सुक नसतात असा होतो. म्हणून ते विशेष प्रयत्नशील नसतात आणि त्यामुळे त्यांच्या इतिवृत्तात गर्भ व अवमर्श ह्या संधींना अवकाश नसतो असा हा युक्तिवाद आहे. तेव्हा 'अङ्गिभावात्' असे पञ्चम्यन्त रूप समुचित नाही हे उघड आहे. – 'चर्वित' म्हणजे चाऊन चोथा झालेले आणि म्हणून वैचित्र्यपूर्ण रचनेला ज्यात अवकाश नाही असे. त्यामुळे मधले तीन संधी नसतात. – 'अपूर्णाः' श्लोकात 'लोप' आहे. पण अभिनवगुप्ताने हीन म्हणजे अपूर्ण अशीच व्याख्या केली आहे.

**प्रासङ्गिके परार्थत्वान्न ह्येष नियमो भवेत् ।**
**यद्वृत्तं संभवेत्तत्र तद्योज्यमविरोधतः ॥ १८ ॥**

प्रासंगिक कथानक दुसऱ्याचे प्रयोजन साध्य करणारे असल्यामुळे त्याच्या बाबतीत हा नियम लागू करू नये. त्यात जी घटना संभाव्य असेल तिची योजना विरोध न होईल अशा रीतीने करावी.

**एवं पञ्चभिरितीतिवृत्तशब्दे यस्य हीतिशब्दो व्याख्यातः सोऽनेन निर्वाहितार्थः, प्रासाङ्गिके तु क इतिशब्दस्यार्थ इति दर्शयति प्रासङ्गिक इति। नियमो य उक्तो 'नियमात्पूर्णसंधि स्याद्' इत्यादि स तत्र न भवेत् । विभीषणप्रतिष्ठापनविषये रामस्य चेदौत्सुक्यबन्धादि योज्येत तर्हि तदेव यत्नसंपाद्यं भवेत्। परामृशति यद्वृत्तमिति। तत्राधिकारिके यदविरुद्धमत्र प्रासङ्गिके संभवि वृत्तं प्रारम्भस्य ...न मुंचत तदेव प्रासङ्गिके योजनार्हमिति ।**

याप्रमाणे 'पञ्चभिः' इत्यादी श्लोकार्धात 'इतिवृत्त' शब्दातील 'इति' शब्दाची ज्याच्या संबंधात व्याख्या केली होती त्याचा अर्थ ह्या श्लोकांत पूर्ण केला आहे. परंतु प्रासङ्गिकात 'इति' शब्दाचा कोणता अर्थ आहे ते 'प्रासङ्गिके' इत्यादी श्लोकात सांगतात. नियमाने पूर्णसंधी असावे असा जो नियम सांगितला आहे तो त्यास लागू करू नये. कारण जर विभीषणाला राज्यावर बसविण्याच्या संबंधी रामाचे औत्सुक्यबन्ध इत्यादीची योजना केली तर तीच गोष्ट प्रयत्नाने साध्य करावयाची आहे असे ठरेल. यासंबंधी 'यद्वृत्तम्' इत्यादीत विचार मांडतात. त्या आधिकारिक कथानकाला विरुद्ध नसलेले असे जे ह्या प्रासङ्गिक कथानकामध्ये संभवनीय वृत्त असेल...तेच प्रासङ्गिकात योजण्याच्या योग्यतेचे होय.

'पञ्चभिः इ०' हा पहिल्या श्लोकाचा उत्तरार्ध. – 'यस्य' म्हणजे ज्या आधिकारिक कथानकाच्या संबंधात. इतिवृत्त शब्दातील 'इति' चा पाच संधींनी विभागलेले असा जो अर्थ केला आहे तो आधिकारिक कथानकालाच लागू आहे. – 'अनेन' म्हणजे मागील १६ व १७ ह्या श्लोकांत. – 'नियमात्पूर्णसंधि स्यात्' हा नियम १६ व्या श्लोकात आहे. – 'प्रारम्भस्य...न मुंचत' असा भ्रष्ट पाठ हस्तलिखितात आढळतो. त्यापासून काही अर्थबोध होण्यासारखा नाही. मुद्रित पाठ 'प्रारम्भेष्व-न्यतमं च' असा आहे. त्यातील 'प्रारम्भेषु' हा सप्तमी बहुवचनात असलेला शब्द अत्यंत संशयास्पद आहे. 'अन्यतमं' संभाव्य आहे, पण त्याचा 'प्रारम्भ' शब्दाशी अन्वय कसा लावता येईल याचा बोध होत नाही.

**इतिवृत्ते यथावस्थाः पञ्चारम्भादिकाः स्मृताः ।**
**अर्थप्रकृतयः पञ्च तथा बीजादिका अपि ॥ १९ ॥**

**[1]बीजं बिन्दुः पताका च प्रकरी कार्यमेव च ।**
**अर्थप्रकृतयः पञ्च ज्ञात्वा योज्या यथाविधि ॥ २० ॥**

कथानकात ज्याप्रमाणे प्रारम्भ आदी पाच अवस्था सांगितल्या आहेत त्याचप्रमाणे बीज आदी पाच अर्थप्रकृती सुद्धा सांगितल्या आहेत. बीज, बिन्दु, पताका, प्रकरी आणि कार्य ह्या पाच अर्थप्रकृतींचे स्वरूप जाणून त्यांची नियमपूर्वक योजना करावी.

**ननूक्तम् 'औत्सुक्यमात्रन्धस्तु यद्बीजस्य' इत्यादि । तत्र चोपायतत्सह-कारिवर्गप्रतिबन्धत्वं तद्विध्वंसनं चोपक्षिप्तम् । तत्र तत्स्वरूपं न ज्ञातमित्युपाय-सामग्रीस्वरूपं दर्शयितुमाह इतिवृत्ते यथावस्था इति । इतिवृत्तविषये यथा येन प्रकारेणाधिकारिकस्य खण्डनलक्षणेन पञ्चावस्था उक्ताः तेनैव प्रकारेणार्थप्रकृतयोऽ-**

१ का बीजबिन्दुपताकाश्च.

पि पञ्चैव पठ्यन्ते । तदनभिधाने उपायादिस्वरूपापरिज्ञानात् प्रारम्भाद्यवस्थानां परमार्थतोऽसंवेदने आधिकारिकत्वमविदितं स्यात् । तत्रार्थः फलं, तस्य प्रकृतय उपायाः, फलहेतव इत्यर्थः । तत्र जडचेतनतया द्विधाकरणम् । जडश्च मुख्यकारण-भूतः गूढतरो वा । आद्यं बीजं, द्वितीयं कार्यं करणीयं प्रयोक्तव्यमित्यर्थे । चेतनोऽ-पि द्विधा, मुख्य उपकरणभूतश्च । अन्त्योऽपि द्विधा, स्वार्थसिद्धिसहिततया परार्थसिद्ध्या युक्तः, शुद्धयापि च । तत्राद्यो बिन्दुः, द्वितीयः पताका, तृतीयः प्रकरी । तदेतैः पञ्चभिरुपायैः पूर्णफलं निष्पद्यते । अत एवाह ज्ञात्वा योज्या यथाविधीति । तासामौद्देशिकोक्तिवदुपनिबन्धक्रमानियम इत्यर्थः ।

अन्ये त्वाहुः । अर्थस्य समस्तरूपकवाच्यस्य प्रकृतयः प्रकरणानि अव-यवा अर्थखण्डा इत्यर्थप्रकृतयः । एतच्च व्याख्यानं नातीव प्रकृतं पोषयति । संध्यादीनामपि चार्थप्रकृतित्वमत्र व्याख्याने स्यात् । इतिवृत्तमेव च समुदाय-रूपमर्थः, इतिवृत्ते प्रकृतय इति वक्तव्येऽर्थग्रहणमतिरिक्तं स्यादिति अवस्थाभिश्च तुल्यतावर्णनं वर्णनमात्रं स्यादिति किमनेन ।

'बीजाचा केवळ औत्सुक्याच्या स्वरूपाचा बंध' इत्यादी वर म्हटले आहे. आणि तदनुषंगाने उपाय व त्यांचा सहकारिवर्ग यांना होणारा प्रतिबन्ध अणि त्या प्रतिबंधाचा नाश ह्या गोष्टींचा उपक्षेप केला आहे. तेथे त्यांचे स्वरूप ज्ञात नाही म्हणून समग्र उपा-यांचे स्वरूप स्पष्ट करण्यासाठी 'इतिवृत्ते यथावस्थाः' इत्यादी सांगतात. इतिवृत्ताच्या संबंधात यथा म्हणजे आधिकारिकाच्या विभागणीच्या स्वरूपाच्या ज्या प्रकाराने पाच अवस्था सांगितल्या आहेत त्याच प्रकाराने अर्थप्रकृती सुद्धा पाचच निर्देशितात. त्यांचा जर निर्देश केला नाही तर उपाय आदींच्या स्वरूपाचे ज्ञान न झाल्याकारणाने प्रारम्भ आदी अवस्थां-चे खरे ज्ञान न होऊन आधिकारिकाचे स्वरूप अज्ञातच राहील. त्यात अर्थ म्हणजे फल, त्याच्या प्रकृती म्हणजे उपाय; म्हणजे फलाचे हेतू असा अर्थ. त्यांचे जड आणि चेतन असे दोन प्रकार होतात. आणि जड फलहेतू मुख्य कारण असलेला आणि अधिक गूढ असा दोन प्रकारचा. त्यांपैकी पहिला फलहेतू बीज आणि दुसरा कार्य म्हणजे जे करावया-चे असते, ज्याची योजना करावयाची असते ते या अर्थी. चेतन फलहेतू सुद्धा मुख्य आणि उपकरणरूप असा दोन प्रकारचा. त्यांपैकी दुसऱ्याचे आणखी दोन प्रकार – स्वतः-च्या प्रयोजनाच्या सिद्धीबरोबर इतराच्या प्रयोजनाच्या सिद्धीने युक्त आणि केवळ इतरा-च्या प्रयोजनाच्या सिद्धीने युक्त असे. त्यांपैकी पहिला फलहेतू बिन्दु, दुसरा पताका आणि तिसरा प्रकरी. तेव्हा ह्या पाच उपायांच्या द्वारा पूर्ण फल निष्पन्न होते. म्हणूनच 'ज्ञात्वा योज्या यथाविधि' असे म्हणतात. त्या अर्थप्रकृतींचा उद्देशात निर्दिष्ट झाल्याप्रमाणेच योजना करताना क्रम ठेवावा असा नियम आहे असा याचा अर्थ.

परंतु इतर टीकाकार म्हणतात. अर्थाच्या म्हणजे संपूर्ण रूपकात व्यक्त झालेल्या गोष्टीच्या प्रकृती म्हणजे प्रकरणे, अवयव, अर्थाचे भाग असा अर्थप्रकृतींचा अर्थ. पण ही व्याख्या प्रस्तुताला मुळीच पोषक नाही. ह्या व्याख्येप्रमाणे संधी आदी सुद्धा अर्थप्रकृती ठरतील. आणि समुदायरूप इतिवृत्त म्हणजेच अर्थ, तेव्हा इतिवृत्तातील प्रकृती असे म्हणावयाचे असता अर्थ शब्दाचा उपयोग निरर्थक ठरेल आणि अवस्थांच्या वर्णनासारखेच असलेले हे अर्थप्रकृतींचे केवळ वर्णन होईल. तेव्हा याचा अधिक विचार कशाला ?

'औत्सुक्यमात्र- इ०' हा वरील आठवा श्लोक आहे. – 'खण्डनलक्षणेन' खण्डन म्हणजे संधींमध्ये विभागणी. – 'गूढतरो' हा मुद्रितातील पाठ आहे. हस्तलिखितात 'मूढतरो' आहे. कार्यरूप उपायाचे वर्णन करण्यास हे दोन्ही शब्द समर्पक नाहीत. त्यातल्या त्यात गूढतर अधिक संभाव्य वाटतो. – 'निष्पद्यते' मुद्रित पाठ 'निष्पाद्यते' आहे. पण प्रयोजकाचे रूप आवश्यक आहे असे दिसत नाही. – 'औद्देशिक' म्हणजे उद्देशाच.

'समस्तरूपकवाच्यस्य' हस्तलिखितात 'समस्तरूपकाव्यस्य' असा पाठ आहे. तोही असंभाव्य नाही. 'अवयवा अर्थखण्डा' मुळात ह्या दोन शब्दांचा मिळून एक समास केला आहे. पण दोन स्वतंत्र शब्द अधिक योग्य.

**[1]स्वल्पमात्रं समुत्सृष्टं बहुधा यद्विसर्पति ।**
**फलावसानं [2]यच्चैव बीजं [3]तत्परिकीर्तितम् ॥ २१ ॥**

अल्प मात्रेत सोडले असता जे अनेक प्रकारे विस्तार पावते आणि ज्याचा फलात शेवट होतो त्याला बीज असे म्हणतात.

**तदेतत्पञ्चकमुद्देशक्रमेण लक्षयति स्वल्पमात्रमिति । यद्वस्तु सागरिकान्तःपुरनिवासेन वसन्तोत्सवसमये गम्भीरप्रयोजनसंवेदनाभावात् स्वल्पमात्रमाकिंचित्करप्रायं शङ्क्यते संवादेनोत्सृष्टं प्रक्षिप्तं यथावश्यं फलान्तम्, यतो बहुभिः प्रकारैर्विसर्पत्येव सर्वथा प्रसरति यत् तत्सिद्धिस्तत्फलमपि यदि निरूढफलत्वेन प्रवर्तते, प्रथमप्रक्षेपेणैव देशकालौचित्यापेक्षे तद्बीजवद्वयस्यारघट्टपरिवर्तनन्यायेन बहुतरोपायपरम्परोपरि कार्यमेव यस्यापेक्ष्यं तद्बीजम् । यद्यस्मात्परितः समन्तात्तत्कीर्तितं प्रसिद्धम् । तच्च क्वचिदुपायमात्रं क्वचित्फलमात्रं क्वचिद् द्वयम् । फलं च क्वचिदुपादानं क्वचिद्धेयव्यसननिवर्तनं क्वचिदुभयमिति । तत्रापि क्वचिन्नायकोद्देशेन क्वचित्प्रतिनायकाश्रयेणेत्यादिभेदैर्बहुधा भिद्यते । तत्र चक्र-**

१ का अल्प-. २ नि तच्चैव. ३ नि तदिह कीर्तितम्, का तदभिधीयते.

**वर्तिपुत्रलाभो मुनिजनाशीर्वचनद्वारेण फलस्वभाव एवाभिज्ञानशाकुन्तले, फलमपि च भविष्यदुपायाविनाभावाद् बीजमित्युच्यते । एवमन्यत्रापि यथायथमुदाहार्यम् । आनन्त्याद् ग्रन्थगौरवभयाच्च न प्रतिपदं लिखितम् ।**

ह्या पाच अर्थप्रकृतींचे लक्षण उद्देशातील क्रमानुसार 'स्वल्पमात्रम्' इत्यादी श्लोकापासून करतात. जी गोष्ट – उदाहरणार्थ, सागरिकेच्या अंतःपुरातील निवासाने वसन्तोत्सवाच्या समयी घडणारी – गंभीर अशा प्रयोजनाची जाणीव नसल्याकारणाने स्वल्पमात्र म्हणजे अगदी क्षुल्लक अशी वाटते ती संवादाच्या द्वारा उत्सृष्ट म्हणजे प्रस्तुत केली जाऊन जशी निश्चितपणे शेवटी फलापर्यंत जाते, कारण ती पुष्कळ प्रकारांनी विसर्पण पावतेच म्हणजे सर्व प्रकारे पसरते, तिची सिद्धी, तिचे फल सुद्धा जर स्वाभाविकपणे वाढणाऱ्या फलाच्या स्वरूपाचे असेल तर देश आणि काल यांचे औचित्य लक्षात घेऊन केलेल्या पहिल्या पेरणीनेच ते बीजाप्रमाणे टाकले जाऊन रहाटाच्या भ्रमणाच्या न्यायाने पुष्कळ उपायांच्या परंपरेच्या अखेरीस कार्याचीच जिच्यापासून अपेक्षा असते ती गोष्ट म्हणजे बीज. 'यत्' म्हणजे ज्याअर्थी 'परितः' म्हणजे सर्वत्र 'कीर्तित' म्हणजे प्रसिद्ध असते. आणि ते बीज कधी केवळ उपायाच्या स्वरूपाचे असते, कधी केवळ फलाच्या स्वरूपाचे असते तर कधी दोन्हींच्या स्वरूपाचे असते. आणि फल कधी स्वीकरणीय वस्तू असते, कधी त्याज्य अशा व्यसनापासून निवृत्तीच्या स्वरूपाचे असते, तर कधी दोन्ही प्रकारचे असते. त्यात सुद्धा नायकाच्या उद्देशाने, प्रतिनायकाच्या आश्रयाने इत्यादी अनेक प्रकारे फलाचे भेद होतात. उदाहरणार्थ, मुनिजनांच्या आशीर्वचनाच्या द्वारा निर्देशिलेली चक्रवर्ती पुत्राची प्राप्ती अभिज्ञानशाकुन्तल नाटकात फलाच्या स्वरूपाचीच आहे आणि हे फल असले तरी ते पुढे होणाऱ्या उपायांशी अविच्छिन्नपणे निगडित असल्याकारणाने त्याला बीज असे म्हणतात. याप्रमाणेच इतरही नाटकातील उचित अशी उदाहरणे द्यावीत. उदाहरणे अनन्त असल्यामुळे आणि ग्रंथ मोठा होईल ह्या भीतीने प्रत्येक उदाहरण दिले नाही.

'यद्वस्तु' ह्याचा अन्वय 'शङ्क्यते' शी लागून पुढे त्याचा वाक्याच्या शेवटी आलेल्या 'तद्बीजम्' शी संबंध प्रस्थापित होतो. – 'सागरिका- इ०' रत्नावली नाटिकेतील हे उदाहरण 'स्वल्पमात्र' च्या स्पष्टीकरणासाठी दिलेले दिसते. पण ते स्पष्ट व पूर्ण शब्दात मांडलेले नाही. 'यथा' किंवा 'इव' यासारखा शब्द अपेक्षित आहे. हस्तलिखितातील या ठिकाणचा पाठ '-निवासेन सादि ... यंप्रवसमये' असा भ्रष्ट आहे. 'वसन्तोत्सवसमये' ही संपादक श्री कवींनी सुचविलेली दुरुस्ती आहे. – 'संवादेन' ही श्लोकातील 'समुत्सृष्टम्' मधील 'सम्' उपपदाची व्याख्या आहे. – 'यथावश्यम्' म्हणजे आवश्यकतेनुसार असा अर्थ होऊ शकेल. पण 'अवश्यम्' याचा खात्रीनें, निश्चितपणे असा अर्थ अभिप्रेत दिसतो. कारण बीजाचे फलात पर्यवसान अवश्य होते असे येथे म्हणावयाचे आहे. – 'यतो ... प्रसरति' श्लोकातील शब्दांचे विवरण करणाऱ्या ह्या हेतुदर्शक वाक्याचा सरळ अन्वय लागत नाही. – 'यत् तत्सिद्धिस्तत्फलं' येथे केलेली 'यत्' ची पुनरावृत्ती आवश्यक

वाटत नाही. 'तत्फलम्' हे 'तत्सिद्धिः' चे स्पष्टीकरण आहे. किंवा उलटही समजता येण्यासारखे आहे. बीजाची सिद्धी म्हणजे बीजाचे फल. – 'निरूढफलत्वेन' ही 'निरुध्य फलत्वेन' ची सुचविलेली दुरुस्ती आहे. 'निरुध्य' म्हणजे अडवणूक करून हा अर्थ येथे समर्पक वाटत नाही. 'निरूढ' म्हणजे स्वभावतःच निष्पन्न होणारे. 'प्रवर्तते' चा कर्ता 'तत्फलम्'. मागील वाक्य पूर्ण झालेले नसताही 'यदि' ने युक्त असे नवीन वाक्य सुरू केले आहे. – '-त्यापेक्षे' मुद्रित पाठ '-त्यापेक्षैः' आहे. पण तृतीया बहुवचनाचा कुठे अन्वय लावण्यासारखा आहे असे दिसत नाही. '-त्यापेक्षया' असा पाठ अधिक योग्य झाला असता. – 'तद्बीजवन्न्यस्य' तत् म्हणजे वाक्याच्या प्रारंभी निर्देशिलेली 'वस्तु'. – हे प्रदीर्घ वाक्य क्लिष्ट स्वरूपाचे झाले असून त्याचा अन्वय लावणे अत्यंत अवघड आहे. – 'परितः समन्तात् इ०' ही श्लोकातील 'परिकीर्तितम्' ची व्याख्या आहे. – 'क्वचित्फलमात्रं' म्हणजे बीज हे कधी कधी केवळ फलाच्या स्वरूपात सुद्धा असू शकते. याचे उदाहरण पुढे शाकुन्तलातून दिले आहे. – 'फलस्वभाव एव' मुळात 'फलस्वभावस्यैव' असे आहे. पण षष्ठयन्त शब्दाचा कोठे अन्वय लागण्यासारखा नाही. शाकुन्तलाच्या पहिल्या अंकात तपस्व्यांनी दुष्यन्ताला 'पुत्रमेवंगुणोपेतं चक्रवर्तिनमाप्नुहि' असा आशीर्वाद दिला आहे. त्यात निर्देशिलेला चक्रवर्तिपुत्रलाभ हे ह्या नाटकाचे बीज आणि फल अशा दोन्ही स्वरूपाचे आहे असा अभिनवगुप्ताच्या म्हणण्याचा आशय आहे. – 'प्रतिपदं' मुद्रित पाठ 'प्रतिदिशं' आहे.

**प्रयोजनानां विच्छेदे यदविच्छेदकारणम् ।**
**यावत्समाप्तिर्बन्धस्य स [1]बिन्दुः परिकीर्तितः ॥२२॥**

प्रयोजनांच्या सिद्धीत बाधा आली असताना ज्याच्यामुळे काव्याच्या समाप्तीपर्यंत सांधा जोडला जातो त्याला बिन्दु असे म्हणतात.

**अथ बिन्दुं लक्षयति प्रयोजनानां विच्छेद इति । प्रयुज्यते फलं यैरुपायानुष्ठानैः तेषामितिवृत्तवशादवश्यकर्तव्यतादिभिर्विच्छेदेऽपि सति यदनुसंधानात्मकं प्रधाननायकगतं संधिद्रव्यज्ञानं स बिन्दुः ज्ञानविचारणं, फललाभोपायत्वात् । यावदविच्छेदः प्रत्यनुसंधानेन न कृतस्तावन्न किंचिदपि कार्यं निर्वहति । ननु बीजं तावत्फलान्तमास्ते बिन्दोस्तु कथं स्थितिरित्याह यावत्समाप्तिरिति । बध्यमानस्य फलस्य सम्यगाप्तिस्तावत् । एतदुक्तं भवति । सकलोपायप्रतिजागरणनिमित्तं ह्यनुसंधानं यावद्धि मुख्यनायकेन प्रत्यनुसंधानेन न क्रियते तावज्जडाजडरूपः सर्वोऽप्युपायधर्मोऽनुपायकल्प एव । तथाहि तापसवत्सराजे वासवदत्ताप्रेमानुसंधानं राजमुखेन प्रत्यङ्कं दर्शितम् – 'तद्वक्त्रेन्दुविलोकनेन दिवसो नीतः प्रदोषस्तथा' इति यावत् षष्ठेऽङ्के –**

१ का बिन्दुरिति संज्ञितः.

त्वत्संप्राप्तिविलोभितेन सचिवैः प्राणा मया धारिताः
तन्मत्वा त्यजतः शरीरकमिदं नैवास्ति निःस्नेहता ।
आसन्नोऽवसरस्तवानुगमने जाता रतिः किं त्वयं
खेदो यच्छतधा गतं न हृदयं तस्मिन् क्षणे दारुणे ॥ इति । (६.३)

**तत्र प्रधानसिद्धिरायत्तसिद्धिरुभयसिद्धिरिति प्रधानसिद्धावयं बिन्दुः। आयत्तसिद्धिस्तु राज्यप्राप्तिलक्षणा, तस्याममात्यवर्गकृतमेवानुसंधानं बिन्दुः। उभयसिद्धौ तूभयकृतम्। येन यत्प्राधान्येनाभिसंहितं स एव तदनुसंधत्ते। इत्येवं प्रधानानुसंधानचेतनव्यापारः कारणानुग्राही स्वयं च परमकारणस्वभावस्तैलबिन्दुवत्सर्वव्यापकत्वादपि बिन्दुः । बीजं च मुखसंधेरेव प्रभृत्यात्मानमुन्मेषयति, बिन्दुस्तदनन्तरमिति विशेषोऽनयोः, द्वे अपि तु समस्तेतिवृत्तव्यापके ।**

आता 'प्रयोजनानां विच्छेदे' या श्लोकात बिन्दूचे लक्षण करतात. उपायांच्या ज्या अनुष्ठानांमुळे फलाची योजना होते ते प्रयोजन त्यात कथानकाच्या अनुरोधाने अवश्य करावयाच्या इतर गोष्टींमुळे खंड पडला असतानाही अनुसंधानाच्या स्वरूपाचे मुख्य नायकाच्या ठिकाणी असलेले जे जोडणाऱ्या वस्तूचे ज्ञान तो बिन्दु म्हणजे ज्ञानपूर्वक विचार; कारण तो फलप्राप्तीला कारणीभूत होतो. जोपर्यंत प्रत्यनुसंधानाने विच्छेदाचा भंग केला जात नाही तोपर्यंत कोणतेही कार्य तडीस जात नाही. बीज तर फल प्राप्त होईपर्यंत असते, पण बिन्दु कोठे असतो या प्रश्नाचे उत्तर 'यावत्समाप्तिः' या शब्दात देतात. म्हणजे ठरविलेल्या फलाची उत्तम प्रकारे प्राप्ती होईपर्यंत. याचा अर्थ असा. सगळ्या उपायांच्या संबंधात जागरूकतेला हेतुभूत जे अनुसंधान ते मुख्य नायक जोपर्यंत प्रत्यनुसंधानाने करीत नाही तोपर्यंत जड आणि चेतन स्वरूपाचे सर्व काही उपाय असून नसल्यासारखेच होत. तदनुसार तापसवत्सराज नाटकात राजाच्या उक्तीद्वारा वासवदत्ताविषयक प्रेमाचे अनुसंधान प्रत्येक अंकात दाखविले आहे—पहिल्या अंकातील 'तिच्या मुखचंद्राच्या अवलोकनाने दिवस घालवीत असे आणि प्रदोषसमयही' इत्यादी वचनापासून सहाव्या अंकातील 'सचिवांनी तुझ्या पुनःप्राप्तीचे विलोभन दाखविल्यामुळे मी जीवित राहिलो. ते जाणून ह्या क्षुद्रदेहाचा त्याग करताना मला स्नेह वाटत नव्हता असे मुळीच नाही. तुझ्या पाठोपाठ जाण्यास अवसर जवळ आला म्हणून आनंद झाला. परंतु, ह्या गोष्टीचे मला दुःख होते की त्या दारुण क्षणी हे माझे हृदय शतधा विदीर्ण झाले नाही' ह्या उक्तीपर्यंत. सिद्धी तीन प्रकारची असते – मुख्य नायकावर अवलंबून, त्याच्या सेवकांवर अवलंबून आणि त्या दोघांवर अवलंबून. हा आता निर्दिष्ट केलेला बिन्दु मुख्य नायकावर अवलंबून असलेल्या सिद्धीसंबंधात आहे. सेवकांवर अवलंबून असलेली सिद्धी राज्यप्राप्तीच्या स्वरूपाची; तिच्या संबंधात अमात्यवर्गाने केलेले अनुसंधानच बिन्दु होय. दोघांवर अवलंबून

असलेल्या सिद्धीत दोघांचे अनुसंधान. जो जे प्राधान्येकरून प्राप्त करण्याचे ठरवितो तोच त्याचे अनुसंधान करतो. याप्रमाणे मुख्य नायकाच्या अनुसंधानाच्या स्वरूपाचा चेतनकृत व्यापार, जो इतर कारणांना उपकारक होऊन स्वतः सर्वश्रेष्ठ कारणरूप असतो तो तेलाच्या थेंबाप्रमाणे सर्व व्यापणारा असल्यामुळेही बिन्दु म्हणून ओळखला जातो. आणि बीज मुखसंधीपासूनच स्वतःच विकास करीत जाते, तर बिन्दु त्यानंतर हा त्या दोघांमधील फरक, परंतु दोन्हीही समग्र कथानकाला व्यापतात.

'संधिद्रव्यज्ञानं' असा मुद्रित पाठ आहे. हस्तलिखितात 'संधि ··· व्यज्ञानं' असा त्रुटित पाठ आहे. द्रव्य शब्द विशेष समाधानकारक नाही, पण तो स्वीकारल्याशिवाय गत्यंतर दिसत नाही. संधि शब्द पारिभाषिक अर्थाने योजलेला नसून सांधा, जोड या अर्थी वापरलेला असावासे वाटते. या पुढील 'सः' शब्द मुळात नाही. तो घातल्याने अर्थ स्पष्ट होण्यास मदत होते. श्लोकात तो आहेच. – 'ज्ञानविचारणं' ही बिन्दु शब्दाशी समानार्थक अशी व्याख्या आहे. पण बिन्दु म्हणजे ज्ञान किंवा विचार असा अर्थ प्रसिद्ध नाही. – 'न कृतः' यातील 'न' संपादकांनी सुचविल्याप्रमाणे घातला आहे. तो आवश्यक आहे. – 'बध्यमानस्य फलस्य' ही श्लोकातील 'बन्धस्य' शब्दाची व्युत्पत्तीच्या साहाय्याने केलेली व्याख्या आहे. याच्या अगोदर मुद्रितात 'यावत्स्वस्य' हे अधिक शब्द आहेत. पण 'स्वस्य' शब्द मूळ असण्याचा विशेष संभव नाही. – 'सम्यगाप्तिः' हे श्लोकातील 'समाप्ति' शब्दाचे स्पष्टीकरण. – 'न क्रियते' ही संपादकांनी सुचविलेली दुरुस्ती आहे. – 'तद्वक्त्रेन्दु- इ०' संपूर्ण श्लोक असा –

> **तद्वक्त्रेन्दुविलोकनेन दिवसो नीतः प्रदोषस्तथा**
> **तद्गोष्ठ्यैव निशापि मन्मथकृतोत्साहैस्तदङ्गार्पणैः ।**
> **तां संप्रत्यपि मार्गदत्तनयनां द्रष्टुं प्रवृत्तस्य मे**
> **बद्धोत्कण्ठमिदं मनः किमथवा प्रेमासमाप्तोत्सवम् ॥ (१.१८)**

– 'प्रधानसिद्धिः इ०' अर्थशास्त्रात सिद्धीविषयीचे हे विवेचन आढळते. मुद्राराक्षसातही या सिद्धीच्या प्रकारांचा निर्देश आहे. – 'उभयसिद्धौ' ह्याचे उदाहरण दिले नाही. – 'तैलबिन्दुवत्' बिन्दु शब्दाची ही उपपत्ती अधिक समर्पक.– 'मुखसंधेरेव प्रभृत्या-' मुद्रितात 'प्रवर्त्या-' असे आहे. पण 'प्रभृति' शब्दच येथे आवश्यक आहे. 'प्रवर्त्य' हे अर्थवाही नाही.

**यद्वृत्तं तु[1] परार्थं स्यात्प्रधानस्योपकारकम् ।**
**प्रधानवच्च कल्प्येत सा पताकेति कीर्तिता ॥ २३ ॥**

परंतु, जी घटना मुख्य कथानकाला उपकारक असून दुसऱ्यासाठी असते आणि मुख्य कथानकाप्रमाणे कल्पिली जाते तिला पताका असे म्हणतात.

१ नि हि.

**यद्वृत्तं तु परार्थं स्यादिति । यस्य संबन्धि वृत्तं संविदनुसंधानं परस्य प्रयोजनसंपत्तये भवदपि स्वप्रयोजनं संपादयति, अत एवाह प्रधानवच्च कल्प्येतेति । सचेतनानुसंधाना पताकासिद्धिः प्रधानस्योपकारिणी । एवं सुग्रीवविभीषणप्रभृतिरपि रामादिनाऽर्थक्रियामारभमाणो रामादेरात्मनश्चोपकाराय प्रभवमानो प्रसिद्धिप्राशस्त्ये संपादयतीति । एवमौचित्यज्ञानोपयोगिन्यानयात्र पताकावदुपयोगित्वादियं पताकेति चिरन्तनाः ।**

'यद्वृत्तं परार्थं स्यात्' इत्यादी. ज्याच्या संबंधीचे वृत्त म्हणजे चेतनाने केलेले अनुसंधान दुसऱ्याचे प्रयोजन साध्य करीत असताही स्वतःचे प्रयोजन साध्य करते ती पताका. म्हणूनच 'प्रधानवच्च कल्प्येत' असे म्हटले आहे. सचेतनाने केलेल्या अनुसंधानाने निष्पन्न झालेली पताकेची सिद्धी प्रधानाला उपकारक होते. उदाहरणार्थ, सुग्रीव, विभीषण प्रभृती सुद्धा राम आदींच्या मुळे प्रयोजनयुक्त कार्य करीत असता राम आदींला आणि स्वतःलाही उपयुक्त होण्यास समर्थ होऊन प्रसिद्धी आणि प्रशंसा संपादन करतात. याप्रमाणे औचित्याचे ज्ञान देण्यास यासंबंधात पताकेप्रमाणे उपयोगी असल्यामुळे हिला पताका म्हणतात असे प्राचीन टीकाकारांनी म्हटले आहे.

'संविदनुसंधानं' यात 'संविद्' शब्द चेतन अथवा सचेतन या अर्थी वापरला आहे. — 'प्रधानवत्' स्वतःचे प्रयोजन साध्य करणे हे प्रधान वृत्त अणि पताकावृत्त यांतील साम्य. — 'रामादिनाऽर्थक्रियामारभमाणो' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'रामादिनोऽर्थ-' असे आहे. पण 'रामादिनः' असे रूप अशक्य आहे. 'रामादिना' ह्या तृतीयेनंतर 'उद्युक्तः', 'प्रेरितः' असा शब्द अध्याहृत धरता येण्यासारखा आहे. मुद्रित पाठ 'रामादिनोपक्रियमाणे' असे आहे. त्यात 'उपक्रियमाणे' हे 'प्रसिद्धिप्राशस्त्ये' चे विशेषण होते. पण ही कल्पना संभवनीय वाटत नाही. आणि प्रधानाने उपकार करण्याचा प्रश्न उपस्थित होत नसल्यामुळे हा पाठ मूळ असण्याची शक्यता कमी. — 'प्रभवमानो' ही मुळातील 'प्रभवमाने' ची दुरुस्ती आहे. हे 'सुग्रीव विभीषणप्रभृतिः' चे विशेषण आहे, 'प्रसिद्धिप्राशस्त्ये' चे नाही. — 'एवमौचित्य-' हस्तलिखितात 'एवं नौचित्य-' आणि मुद्रितात 'एवमौचित्यानौचित्य-' असे आहे. पण केवळ औचित्यच मूळ असण्याचा अधिक संभव आहे.

**फलं प्रकल्प्यते यस्याः परार्थायैव[1] केवलम् ।**
**अनुबन्धविहीनत्वात्[2] प्रकरीति विनिर्दिशेत् ॥ २४ ॥**

जिचे फल केवळ दुसऱ्याच्या साठीच कल्पिले जाते ती अनुबंधाने विरहित असल्याकारणाने प्रकरी अशी निर्दिष्ट केली जावी.

१ नि परार्थं केवलं बुधैः, का परार्थं यस्य केवलम्. २ नि -बन्धविहीनं स्यात्प्रकरीमिति निर्दिशेत्, का -बन्धेन हीनस्य प्रकरीं तां.

फलं प्रकल्प्यते यस्या इति । यतश्च परार्थमेव केवलं सर्वमनुतिष्ठति ततः सा प्रकरी । यथा कृत्यारावणे कुलपतिः, वेणीसंहारे भगवान्वासुदेवः । प्रकर्षेण स्वार्थानपेक्षया करोतीति । इक् सार्वधातुभ्यः संविदपेक्षया च स्त्रीलिङ्गत्वे कृदिकारादिति ङीष् । फलमिति फलतीति कृत्योपायानुष्ठानमुच्यते ।

'फलं प्रकल्प्यते यस्याः' इत्यादी. ज्याअर्थी दुसऱ्यासाठीच सर्व काही करते म्हणून ती प्रकरी. उदाहरणार्थ, कृत्यारावण नाटकात कुलपति, वेणीसंहारात भगवान वासुदेव. प्रकर्षाने म्हणजे स्वार्थाची अपेक्षा नसता करते ती प्रकरी. 'सार्वधातुकार्धधातुकयोः' ह्या सूत्राप्रमाणे 'कृ' धातूतील ऋ चा गुण झाला आहे आणि सचेतनविषयक म्हणून स्त्रीलिंगी असता कृत्-प्रत्यत्य असल्यामुळे 'ई' प्रत्यय लागला आहे. फल म्हणजे ज्यापासून फल मिळते ते म्हणजे कार्यासंबंधी उपायाचे अनुष्ठान असे अभिप्रेत आहे.

'ततः' शब्द 'यतश्च' नंतर होता तो तेथून काढून 'सा' च्या पूर्वी टाकला आहे. त्यामुळे अन्वय नीट होतो. – 'इक् सार्वधातुभ्यः' अष्टाध्यायीतील 'सार्वधातुकार्धधातुकयोः' (७. ३. ८४) ह्या सूत्राप्रमाणे गुण होऊन प्रकृ चे प्रकर् झाले. त्याला 'ई' हा स्त्रीलिंगी कृत्-प्रत्यय लागून प्रकरी हे रूप सिद्ध होते.

यदाधिकारिकं वस्तु[1] सम्यक्प्राज्ञैः प्रयुज्यते ।
तदर्थो यः समारम्भस्तत्कार्यं परिकीर्तितम्[2] ॥ २५ ॥

प्राज्ञ कवींनी जे प्रधान कथानक चांगल्या तऱ्हेने योजले जाते त्याच्या सिद्धीसाठी ज्या क्रिया केल्या जातात त्यांना कार्य म्हणतात.

यदाधिकारिकमिति । प्राज्ञैः प्रधाननायकपताकानायकप्रकरीनायकैश्चेतनरूपैः यद्वस्तु फलरूपं प्रयुज्यते संपाद्यते संपाद्यत्वेनानुसंधीयते तत्फलप्रयोजनो यः संपूर्णतादायी पूर्वपरिगृहीतस्य प्रधानस्य बीजाख्योपायस्य फलमारभत इत्यारम्भशब्दवाच्यो द्रव्यक्रियागुणप्रभृतिः स सर्वोऽर्थः सहकारी कार्यमित्युच्यते, चेतनैः कार्यते फलमिति व्युत्पत्त्या । सम्यगिति प्रभुमन्त्रोत्साहशक्तित्रयसंपन्नैरित्यर्थः । तेन जनपदकोशदुर्गादिकव्यापारवैचित्र्यं सामाद्युपायवर्ग इत्येतत्सर्वं कार्येऽन्तर्भवति । तत्र परं प्रथमपरिगृहीतः प्रधानभूतोऽभ्युपायो बीजत्वेनोक्तः ।

१ नि वृत्तं. २ का समुदाहृतम्.

'यदाधिकारिकम्' इत्यादी. प्राज्ञ म्हणजे सचेतनस्वरूप अशा मुख्य नायक, पताका-नायक आणि प्रकरीनायक यांनी जी फलरूप वस्तू योजिली जाते म्हणजे संपादित केली जाते म्हणजेच संपादन करावयाची म्हणून जिचे अनुसंधान केले जाते, ते फल ज्याचे उद्दिष्ट आहे असा, परिपूर्णता उत्पन्न करणारा, पूर्वी उपन्यास केलेल्या प्रधानभूत बीज नावाच्या उपायाच्या फलाचा प्रारम्भ करतो म्हणून आरम्भ ह्या शब्दाने निर्दिष्ट होणारा, द्रव्य, क्रिया गुण प्रभृती, तो सर्व सहकारी स्वरूपाचा अर्थसमूह कार्य म्हणून ओळखला जातो. सचेतनांनी फल निष्पन्न केले जाते अशी ह्या कार्य शब्दाची व्युत्पत्ती. सम्यक् म्हणजे प्रभु, मन्त्र आणि उत्साह या तिन्ही शक्तींनी संपन्न अशा नायकांनी असा अर्थ. त्यामुळे जनपद, कोश दुर्ग इत्यादींच्या व्यापारांचे वैचित्र्य, साम आदी उपायवर्ग इत्यादी सर्व कार्यामध्ये अन्तर्भूत होते. परंतु त्यात प्रथम उपन्यास केलेला प्रधानभूत जो उपाय त्याला बीज असे म्हणतात.

'प्रधान- .... चेतनरूपैः' ही श्लोकातील 'प्राज्ञैः' शब्दाची व्याख्या आहे. पण मुळात तो शब्द कवींना उद्देशून वापरलेला असण्याचा अधिक संभव आहे. – 'संपूर्णतादायी' श्लोकातील 'समारम्भः' शब्दात असलेल्या 'सम्' ह्या उपपदाचा हा अर्थ केला आहे. – 'फलमारभते इति' ही 'समारम्भः' मधील 'आरम्भ' शब्दाची व्युत्पत्ती. – 'स सर्वोऽर्थः' मुद्रितात 'सः' नाही. पण तो असला म्हणजे संपादकांनी सुचविल्याप्रमाणे 'सर्वोऽर्थः' नंतर 'यस्य' आणि 'सहकारी' नंतर 'तत्' हे शब्द घालण्याची गरज उरत नाही. शिवाय, 'यस्य' घालणे बरोबरही नाही. हा सगळा अर्थ म्हणजेच कार्य. तो कार्याचा सहकारी अशी कल्पना नाही. – 'प्रभुमन्त्रोत्साह-' राजाच्या ह्या तीन शक्ती अर्थशास्त्रात प्रसिद्ध आहेत. – 'जनपदकोशदुर्ग-' राज्याच्या सात प्रकृतींपैकी ह्या तीन जड स्वरूपाच्या प्रकृती. कार्य आणि बीज जड स्वरूपाचे असतात हे मागे सांगितलेले आहेच.

**एतेषां यस्य येनार्थो यतश्च गुण इष्यते ।**
**तत्प्रधानं तु कर्तव्यं गुणभूतान्यतः परम् ॥ २६ ॥**

ह्यांपैकी ज्याच्या योगाने नायकाचे प्रयोजन साध्य होत असेल व ज्यापासून गुणाची सिद्धी अपेक्षित असेल ते मुख्य ठरवावे आणि त्याशिवाय इतरांना गौण स्थान द्यावे.

**ननु प्रारम्भादिवदासामर्थप्रकृतीनां किं सर्वत्र सर्वासां संभवः, तथा अर्थप्रकृतीनां संध्यवस्थाभिः सह किं यथासंख्यनियमः, तथा किं स्वात्मन्यासां कर्तृक्रमः इति शङ्कात्रयमपाकर्तुमाह एतेषामिति । पञ्चकवर्गत्रयं परामृश्यते एकैकस्य वर्गस्यैकशेषेण । तदयमर्थः । न सर्वत्र प्रारम्भादिवत्सर्वा अर्थप्रकृतयः,**

१ का प्रधानं तत्प्रकर्तव्यं.

अपि तु यस्य नायकस्य येनार्थप्रकृतिविशेषेण प्रयोजनसंपत्तिरधिका तदेव प्रधानम्, अन्यत्तु भवदपि गुणभूतमसत्कल्पम्। यथा स्वपराक्रमबहुमानशालिनां पताकाप्रकर्यावविवक्षिते एव। बीजबिन्दुकार्याणि तु सर्वत्रानपायीनि। तत्रापि तु गुणप्रधानभावः। तथा संध्यवस्थार्थप्रकृतीनां यस्य येनोचितः संबन्धस्तत्प्रधानं नाटकादि कार्यमिति द्वितीयापि निरस्ता। यतश्च गुण उपकारो झटिति वाच्यते तदेवार्थप्रकृतिरूपं पञ्चानामन्यतमं प्रधानत्वेन बाहुल्येन निबन्धनीयम्, अन्यद् गुणभावेन। प्रधानसिद्धावायत्तसिद्धौ च निबध्यमानायां यो यत्रांशेऽप्यधिकोपकारकारी स तत्र प्रधानीकर्तव्यः, यथा वासवदत्तालाभे बिन्दुः प्रधानं कौशाम्बीराज्यलाभे तु प्रकरी। पताका च प्रधाना, अमात्यस्य राज्यसिद्धौ स्वार्थसिद्धिरिति पताकात्वं केचिदाहुः। एवं सुसङ्गतासांकृत्यायनीबीजधर्मादिषु वाच्यम्। अपरे तु प्रथमतरमेव नायकस्य तावद्रूपत्वान्नैवं प्रमाणं पृथङ् नायकत्वम्, सुग्रीवादयस्तु पृथग्भूता एव सांप्रतिके कार्ये केवलमाश्रिता इत्येवंप्रमाणमेव पताकादिरूपत्वम्। तेषां मते तापसवत्सराजे उभयत्रापि बिन्दुरेव प्रधानम्। एवं तु पञ्चानामप्यर्थप्रकृतीनामन्यतमस्य द्वयास्तिसृणां चतसृणां सर्वासां वा प्राधान्यं यथास्वं विभजनीयम्।

प्रारम्भ आदी अवस्थांप्रमाणे ह्या अर्थप्रकृतींचा सुद्धा सर्वत्र संभव असतो काय? तसेच अर्थप्रकृतींचा संधी आणि अवस्था ह्यांच्याबरोबर क्रमशः संबंध आहे काय? आणि ह्यांचा आपसातील कर्तृत्वाचा क्रम आहे काय? ह्या तीन शंकांचे निराकरण 'एतेषाम्' इत्यादी श्लोकात करतात. पाच पाचाच्या ह्या तीन समूहांचा परामर्श प्रत्येक समूहाच्या एकवचनी शब्दाने केला आहे. तेव्हा अर्थ असा. प्रारम्भ आदीप्रमाणे अर्थप्रकृती सर्वत्र असत नाहीत, तर ज्या नायकाची प्रयोजनसिद्धी ज्या अर्थप्रकृतीद्वारा अधिक होईल तीच प्रधान, इतर असल्या तरी गौण, नसल्यासारख्या. उदाहरणार्थ, ज्यांना स्वतःच्या पराक्रमाविषयी फार अभिमान आहे त्यांच्या संबंधात पताका आणि प्रकरी अभिप्रेत नसतात. बीज, बिन्दु आणि कार्य ही मात्र सर्वत्र अपरिहार्य आहेत. तथापि त्यांच्यातही गौण आणि प्रधान अशी विभागणी होतेच. त्याचप्रमाणे संधी, अवस्था आणि अर्थप्रकृती यांच्यापैकी ज्याचा ज्याच्याशी योग्य संबंध असेल त्याला प्राधान्य देऊन नाटकाची रचना करावी; याप्रमाणे दुसऱ्या शंकेचे सुद्धा निरसन केले आहे. आणि ज्याच्यापासून गुण म्हणजे उपकार झटकन निर्दिष्ट होतो त्याच पाचापैकी एका अर्थप्रकृतीची प्रधानत्वाने म्हणजे पुष्कळ प्रमाणात योजना करावी, इतरांची गौण स्वरूपात. प्रधानसिद्धीची आणि आयत्तसिद्धीची योजना करीत असता जो ज्या अंशामध्ये अधिक उपकार करणारा असेल त्याला त्या बाबतीत प्राधान्य द्यावे; उदाहरणार्थ, वासवदत्तेच्या

प्राप्तीच्या संबंधात बिन्दु प्रधान, पण कौशाम्बीराज्याच्या लाभाच्या संबंधात प्रकरी प्रधान. कोणी म्हणतात की या संबंधात पताका प्रधान आहे; राज्यलाभात अमात्याची सुद्धा स्वार्थसिद्धी होते म्हणून ही पताका. याचप्रमाणे सुसंगता आणि सांकृत्यायनी यांच्या संबंधातील अर्थप्रकृतीविषयी समजावे. परंतु दुसरे असे म्हणतात की अगदी अगोदरच नायकाचे नायकत्व प्रस्थापित झाले असल्यामुळे दुसरा स्वतंत्र नायक असेल ह्याला प्रमाण नाही. सुग्रीव आदी हे स्वतंत्रच असून प्रस्तुत कार्याचा केवळ आश्रय घेतात एवढेच पताकेच्या स्वरूपाने प्रमाणित होते. त्यांच्या मते तापसवत्सराज नाटकात दोन्ही प्राप्तींच्या संबंधात बिन्दूलाच प्राधान्य आहे. परंतु वरीलप्रमाणे पाचही अर्थ-प्रकृतींपैकी एक, दोन, तीन, चार किंवा सर्व प्रकृतींना औचित्यानुसार प्राधान्य वाटून द्यावे.

'अर्थप्रकृतीनां संध्यवस्थाभिः सह' ही दुरुस्ती आहे. मुळात ' -प्रकृतिसंध्य-' असा एक समास आहे. पण 'सह' असल्यामुळे दुरुस्ती आवश्यक आहे. किंवा सर्व समास षष्ठ्यन्त असून 'सह' नसेल तरी चालण्यासारखे आहे. – 'यथासंख्यनियम' म्हणजे पाच अवस्था आणि पाच संधी यांच्याशी पाच अर्थप्रकृतींचा क्रमवार संबध – प्रारम्भावस्था व मुखसंधि यांच्याशी बीजाचा इत्यादी प्रकारचा. – 'कर्तृक्रमः' म्हणजे कोणती गोष्ट अगोदर करावयाची, कोणती नंतर, म्हणजे कोणती अर्थ-प्रकृति अधिक महत्त्वाची, कोणती गौण. – 'एकशेषेण' म्हणजे जरी 'यस्य' 'येन' इत्यादी एकवचनी शब्द वापरलेले असले तरी त्यांनी पाचांचा बोध होतो असे समजावयाचे. – 'पताकाप्रकर्याविविवक्षिते' हस्तलिखितात हा शुद्ध पाठ आहे. मुद्रितात 'पताकाप्रकर्यें विवक्षिते' असे आहे. पण 'प्रकर्ये' असे द्विवचनी रूप अशक्य आहे, आणि संदर्भ पहाता असंभाव्य आहे. 'संबन्धस्त-त्प्रधानं' ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'संबन्धप्रधानं' आणि मुद्रितात 'संबन्धः प्रधानं' असे आहे. पण केलेली दुरुस्ती अर्थबोधासाठी आवश्यक आहे हे उघड आहे. – 'द्वितीयापि निरस्ता' दुसऱ्या शंकेचे या वाक्याने पूर्ण निरसन झाले आहे असे दिसत नाही. – 'प्रधानसिद्धावायत्तसिद्धौ च' असा शुद्ध पाठ हस्तलिखितात आहे. मुद्रितात 'प्रधानायत्तसिद्धौ च' असे आहे. पण दोन निरनिराळ्या सिद्धींचा निर्देश अभिप्रेत आहे हे 'च' च्या उपयोगावरून स्पष्ट आहे. – 'पताकात्वं केचिदाहुः' ह्या टीकाकारांचे म्हणणे असे की यौगन्धरायणादी अमात्यांच्या उपाय-योजनेने राज्यलाभ वत्सराजाला होतो हे खरे; पण त्याला असा लाभ झाल्याने त्यांचाही स्वार्थ साधला जातो. तेव्हा ह्या अर्थप्रकृतीला प्रकरी असे न म्हणता पताका म्हटले पाहिजे. – 'एवं सुसंगता- इ०' 'एवं' म्हणजे प्रकरी म्हणून किंवा काहीजण म्हणतात त्याप्रमाणे पताका म्हणून. सुसंगता हि रत्नावलीतील नायिकेची सखी आणि सांकृत्यायनी ही तापसवत्सराज नाटकातील वासवदत्तेची मैत्रीण. – 'तावद्रूपत्वात्' म्हणजे 'नायकरूपत्वात्'. ह्या दुसऱ्या टीकाकारांच्या म्हणण्याचा आशय असा दिसतो की पताका आणि प्रकरी यांना त्यांचे त्यांचे स्वतंत्र नायक असतात असे म्हणणे योग्य नसून ह्या अर्थप्रकृतींना प्राधान्य येते असे समजणे बरोबर नाही. पताका नेहमी प्रधान कार्याच्या आश्रयाने असते. – 'एवं तु' 'तु' च्या उपयोगावरून हे स्पष्ट आहे की ह्या दुसऱ्या टीकाकारांचे मत अभिनवगुप्ताला मान्य नाही.

एकोऽनेकोऽपि वा संधिः पताकायां[1] तु यो भवेत् ।
प्रधानार्थानुयायित्वादनुसंधिः[2] प्रकीर्त्यते ॥ २७ ॥

पताकेमध्ये एक किंवा एकाहून अधिक जे संधी असतील ते मुख्य कार्याला अनुसरून असल्यामुळे त्यांना अनुसंधि म्हणतात.

पताकावृत्तस्य प्रधानवदतिदेशात्पञ्चसंधीत्यस्य पृथग्गणना अस्त्विति । असौ परार्थत्वादेव, अत एव च कृतः संधिः सूच्यते वाभ्यूह्यते वा निबध्यते वा । यथा मायापुष्पके –

वाली यथा विनिहतः प्रथितप्रभावो
दग्धा यथैककपिना प्रसभं च लङ्का ।
तीर्णो यथा जलनिधिर्गिरिसेतुना च
मन्ये तथा विलसितं चपलस्य धातुः ॥ इति ।

पताकायां हि पूर्णवर्णने पताकान्तरं स्यादित्यनवस्था । तद्युक्तमुक्तमनुसंधित्वान्न पृथग्गणनमस्येति । लोल्लटाद्यास्तु मन्यन्ते परार्थे साधयितव्ये पताकानायकस्येति-वृत्तभागा अनुसंधयः । यथा कृत्यारावणे –

धन्यास्ते ते कृतिनः श्लाघ्या तेषां च जन्मनो वृत्तिः ।
यैरुज्झितात्मकार्यैस्तेषामर्थाः प्रसाध्यन्ते ॥

इति मुखानुसंधिः, 'वाली यथा' इति प्रतिमुखस्यानुसंधिः, शक्तिहते लक्ष्मणे ओषध्यानयने गर्भस्य, अङ्गददौत्येऽवमर्शस्य, मन्दोदर्याक्षेपे 'असत्यनार्ये, तिष्ठ तिष्ठ' इत्यवसाने निर्वहणस्य इति । एतत्तु भवति । सर्वस्यैव हि पञ्चावस्था भवन्तीत्युक्तम् । किं त्वस्यानुसंधित्वाभिधाने प्रयोजनं न पश्यामः ।

पताकेचे कथानक मुख्य कथानकासारखे असा अतिदेश केला असल्यामुळे त्याचे पाच संधी होतात, तेव्हा याची स्वतंत्र गणना असू द्यात. ती दुसऱ्याच्या साठीच असते, म्हणून तिच्यात योजिलेला संधी सूचित केला जातो किंवा अनुमानाने ज्ञात होतो किंवा ग्रथित केला जातो. उदाहरणार्थ, मायापुष्पक नाटकात – 'पराक्रमाविषयी प्रसिद्ध असलेला वाली ज्याअर्थी मारला गेला आहे, एका वानराने ज्याअर्थी बलात्काराने

१ का पताकायाश्च योजयेत्. २ का -बन्धः स कीर्त्यते.

लंका जाळली आहे आणि ज्याअर्थी पर्वतातील दगडांच्या सेतूने समुद्र पार केला आहे, त्या अर्थी हे चंचल विधात्याचे विलसित आहे असे मला वाटते.' कारण, पताकेमध्ये पूर्ण वर्णन असल्यास तिच्यात दुसरी पताका असेल आणि याप्रमाणे अनवस्थाप्रसंग ओढवेल. म्हणून अनुसंधी असल्यामुळे त्याची स्वतंत्र गणना नाही असे म्हटले आहे ते योग्य आहे. परंतु लोल्लटप्रभृतींची मान्यता अशी आहे की दुसऱ्याचे प्रयोजन साध्य करावयाचे असता पताकानायकाच्या वृत्ताचे भाग ते अनुसंधी होत. उदाहरणार्थ, कृत्या-रावण नाटकात – 'ते धन्य होत, ते कृतकृत्य होत, त्यांचे जीवित प्रसशंनीय होय, जे आपल्या देहावर तिलांजली देऊन त्या इतरांचे प्रयोजन साध्य करतात' हा मुखाचा अनुसंधि, 'वाली ज्यावरून' इत्यादि हा प्रतिमुखाचा अनुसंधि, शक्तीने लक्ष्मण निश्चेतन झाला असता औषधी आणण्याच्या प्रसंगात गर्भाचा अनुसंधि, अंगदशिष्टाईच्या प्रसंगात अवमर्शाचा अनुसंधि आणि शेवटी मन्दोदरीच्या 'हे कुलटे, अनार्ये, थांब थांब' ह्या निर्भर्त्सनात निर्वहणाचा अनुसंधि. पण हे सर्व आहे; कारण सर्व वृत्ताच्या पाच अवस्था असतात असे म्हटलेच आहे. परंतु ह्यांना अनुसंधी म्हणण्याचे प्रयोजन आम्हाला दिसत नाही.

ह्या श्लोकावरील टीकेचा प्रारंभीचा अंश गहाळ झाला आहे असे दिसते. व्याख्येच्या प्रारंभी पहिले एक दोन शब्द प्रतीक म्हणून उद्धृत व्हावयास पाहिजे होते. तसेच श्लोकाचा अर्थ लावणे-ही अपेक्षित आहे. टीकेच्या उपलब्ध अंशातील प्रारंभीच्या वाक्यात अभिनवगुप्ताचे स्वतःचे मत नसून एका आक्षेपकाचे मत निर्दिष्ट आहे. कारण, ह्या वाक्यात पृथग्गणना असावी असे म्हटले आहे, तर पुढे टीकेत पृथग्गणना नाही हेच विधान योग्य असे म्हटले आहे. यावरून असे दिसते की ह्या प्रारंभीच्या वाक्याच्या पूर्वी अनुसंधींची पृथग्गणना करण्याची आवश्यकता नाही असे म्हटलेले असावे. आणि श्लोकातील 'प्रधानार्थानुयायित्वात् अनु-संधिः' या शब्दांची व्याख्या करताना असे म्हटलेले असणे स्वाभाविक आहे. – 'पताकावृत्तस्य' ही मुळातील 'पताकाप्रवृत्तस्य' ची दुरुस्ती आहे. 'प्रवृत्त' या ठिकाणी अर्थहीन आहे. आणि ज्या-२३ व्या श्लोकात 'प्रधानवत्' असा अतिदेश आहे त्यात 'वृत्त' शब्दच आहे. – 'पञ्चसंधीत्यस्य पृथग्' हस्तलिखितात 'पञ्चसंधीत्यस्यात् पृथग्' असा किंचित भ्रष्ट पाठ आहे. मुद्रितात 'पञ्चसंधीत्या-सां भवेत् पृथग्' असा आहे. 'आसाम्' ने कशाचा बोध संभाव्य आहे हे सांगता येण्यासारखे नाही. आणि 'अस्तु इति' प्रस्तुत वाक्याच्या शेवटी अन्तर्भूत करणे आवश्यक असल्यामुळे मुळात 'भवेत्' असण्याची शक्यता नाही. – 'असौ इ०' हे आक्षेपाला दिलेले उत्तर आहे. – 'कृतः' हा हस्तलिखितातील पाठ आहे. मुद्रितात 'कुतः' आहे पण त्याने समुचित अर्थबोध होत नाही. कृत म्हणजे पताकावृत्तात जो केलेला म्हणजे अन्तर्भूत असतो तो. तो क्वचित सूचित होतो, क्वचित अनुमित होतो तर क्वचित स्पष्टपणे ग्रथितही होतो. –'न पृथग्गणनमस्येति' यातील 'अस्य' म्हणजे 'पताकावृत्तस्य'. या शब्दांनंतर मुळात 'तथा' हा शब्द अधिक आहे. पण प्रस्तुत वाक्याच्या शेवटी तो अनुपपन्न आहे मुद्रितात आहे त्याप्रमाणे पुढील वाक्याच्या प्रारंभी सुद्धा तो संभवनीय नाही. लोल्लटादींचे मत भिन्न आहे

हे 'तु' वरून स्पष्ट आहे. त्याचा निर्देश करताना 'तथा' शब्द योजणार नाहीत. म्हणून तो शब्द गाळला आहे. – मायापुष्पक आणि कृत्यारावण ही दोन्ही नाटके सध्या उपलब्ध नाहीत. – 'उज्झितात्मकार्यैस्तेषाम्' हा हस्तलिखितातील पाठ आहे. मुद्रितात '-कार्यैर्येषाम्' असे आहे. पण 'कार्य' पेक्षा 'काय' ने विधान अधिक अर्थवाही होते. आणि आत्मत्याग करणारे धन्य वगैरे होत असे म्हणावयाचे असल्यामुळे त्यांचाच निर्देश करणारा 'येषाम्' शब्द वापरला असण्याची शक्यता कमी. 'तेषाम्' म्हणजे ज्यांचे कार्य साधले जाते ते दुसरे. – 'वाली यथा' हा श्लोक जर वर उद्धृत केलेलाच असेल तर मायापुष्पक आणि कृत्यारायण ह्या दोन्ही नाटकांत एकच श्लोक आढळावा हे चमत्कारिकच होईल. हा निराळा श्लोक असण्याचा संभव आहे. – 'ऽवमर्शस्य' मुळात ह्या शब्दाच्या पूर्वी 'मन्दोदर्याक्षेपे' हा शब्द आहे. पण मन्दोदरीच्या आक्षेपाचे वचन नंतर उद्धृत केलेले आहेसे दिसते, म्हणून हा शब्द नंतर घातला आहे. शिवाय 'मन्दोदर्याक्षेपे' अवमर्शातच अन्तर्भूत असते, तर ह्या शब्दानंतर 'च' अपेक्षित होता. – 'असत्यनार्ये तिष्ठ तिष्ठ इत्यवसाने' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'असक्तनार्ये तिष्ठ तिष्ठेतिरथ-स्त्वंसाने' असा भ्रष्ट पाठ आहे. मुद्रित पाठ 'आ! अशक्त, अनार्ये तिष्ठ तिष्ठ, अतिरथस्त्वं सा न' असा आहे. तोही असंभाव्य वाटतो. त्यात लिंगभेद मुळीच मानलेला दिसत नाही. – 'एतत्' म्हणजे ह्या प्रकारची इतिवृत्ताची विभागणी. – 'किं त्वस्या-' ही 'किं तस्या-' ची दुरुस्ती आहे. या वाक्यात लोल्लटादींच्या मतावर आक्षेप घेतलेला दिसतो; म्हणून 'किंतु' आवश्यक आहे. – 'अनुसंधित्वाभिधाने' ही मुळातील 'अनुसंधिद्वित्वाभिधाने' ची दुरुस्ती आहे. 'द्वित्व' ला येथे काहीच अर्थ नाही. अभिनवगुप्ताचे म्हणणे असे दिसते की कृत्यारावण नाटकातील हे प्रसंग प्रधान इतिवृत्ताच्या संधींत आहेत हे खरे आहे. पण ते सर्व अनुसंधि या संज्ञेला पात्र आहेत असे म्हणता येण्यासारखे नाही. श्लोकात म्हटल्याप्रमाणे पताकेच्या इतिवृत्तात जो संधि असतो यालाच अनुसंधि म्हणतात.

**आगर्भादाविमर्शाद्वा पताका विनिवर्तते ।**
**कस्माद्यस्मान्निबन्धो[१]ऽस्याः परार्थः[२] परिकीर्त्यते ॥ २८ ॥**

गर्भसंधीच्या आत किंवा विमर्श संधीच्या आत पताकेची समाप्ती होते. याचे कारण असे की तिची योजना दुसऱ्यासाठीच करावयास सांगितले आहे.

**स्वफलसिद्धये यतमानस्य तत्र तत्रावश्यं पृथग्गणनशङ्केति तत्प्रयोजनम् । अस्मत्पक्षे कस्मिंस्तर्हि प्रधानसंधौ तस्यानुयायित्वमिति दर्शयितुमाह आगर्भा-दाविमर्शाद्वेति । प्रतिमुखे गर्भे वा यमर्थं व्याप्य निवर्तते पताकेतिवृत्तं तावत्येव पताकानायकस्य स्वफलसिद्धिरुपनिबन्धनीया । सिद्धफलस्त्वसौ प्रधानफल एव व्याप्रियमाण आसीनोऽपि भूतपूर्वगत्या पताकाशब्दवाच्यो न मुख्यत्वेन । अत्राह कस्मादिति । अस्याभिप्रायः, प्रधानवच्च कल्प्येतेत्युक्तत्वात् निर्वाहादपि किं**

१ का तु बन्धो. २ का परार्थायोपकल्पते.

**तद्भवति । अत्रोत्तरं यस्मादिति । निर्वहणपर्यन्ते तत्फले क्रियमाणे तुल्यकालयो-रुपकार्योपकारकत्वाभावात् तेन प्रधानोपकारो न भवेत् । अभिविधावाङ् । ये तु मर्यादायां तं व्याचक्षते ते न सम्यगमंसत । विनिपातप्रतीकारे प्रधानविमर्शसंधौ प्रत्युतोपयोगः पताकायाः । यत्र कृतघ्नता दृष्टा तन्नोच्यते, कृतज्ञस्तु प्राप्तफलो विनिपातान् प्रतिकुर्यादेवेति ।**

स्वतःच्या फलाच्या सिद्धीसाठी प्रयत्न करणाऱ्याच्या वृत्ताची त्या त्या ठिकाणी अवश्य स्वतंत्र गणना होईल अशी शंका संभवते हे त्यांचे प्रयोजन. तर मग आमच्या मताप्रमाणे कोणत्या प्रधान संधीमध्ये त्या संधीचे अनुयायित्व केले जाते ते 'आगर्भादा-विमार्शाद्वा' या श्लोकात दाखवितात. पताकेचे इतिवृत्त प्रतिमुखसंधीत किंवा गर्भसंधीत ज्या प्रयोजनास व्यापून निवृत्त होते तेवढ्याच अंशात पताकानायकाच्या स्वतःच्या फलाची योजना करावी. पण त्याचे फल सिद्ध झाल्यानंतर तो प्रधान नायकाच्या फलासाठी उद्योग करीत राहिला तरी पूर्वी असलेल्या त्याच्या स्थितीमुळे पताका शब्दानेच ओळखला जातो, प्रधान म्हणून नाही. येथे 'कस्मात्' असे म्हटले आहे. त्याचा अर्थ असा. 'प्रधान इतिवृत्ताप्रमाणे कल्पिले जाते' असे म्हटले आहे, म्हणून ते कार्य तडीस जाण्याच्या वेळेसही असते काय? याचे उत्तर 'यस्मात्' इत्यादी शब्दांत देतात. निर्वहणापर्यन्त जर पताका-इतिवृत्ताचे फल योजित केले तर दोन्ही फले एकाच वेळी सिद्ध होऊन त्यांच्यात उपकार्य आणि उपकारक अशा तऱ्हेचा संबंध उत्पन्न होणार नाही आणि त्यामुळे ते इतिवृत्त प्रधान इतिवृत्ताला उपकारक ठरणार नाही. 'आ' हे कर्मप्रवचनीय 'अभिविधि' म्हणजे पासून या अर्थी वापरले आहे. जे त्याची 'मर्यादा' म्हणजे पर्यन्त या अर्थी व्याख्या करतात त्यांनी नीट विचार केला नाही. प्रधान इतिवृत्ताच्या विमर्श संधीत उलट पताकेचा अडचणींवर मात करण्यासाठी उपयोग होतो. जेथे कृतघ्नता दिसून येते त्याचा निर्देश केला जात नाही. पण कृतज्ञ असा जो पताकानायक असतो तो स्वफलप्राप्तीनंतर अडचणींचा प्रतिकार अवश्य करतोच.

'स्वफलसिद्धये इ०' हे वाक्य येथे का योजिले आहे ते स्पष्ट नाही. टीकेच्या याच्या अगोदरच्या भागात लोल्लट आदींच्या अनुसंधिविषयक मताचा उल्लेख केला आहे, त्याला अनुलक्षून हे विधान केले असण्याची शक्यता आहे. तसे असल्यास 'तत्प्रयोजनम्' मधील 'तत्' ने लोल्ल-टादींचा निर्देश अभिप्रेत असणे संभाव्य आहे. पाच अनुसंधी मानण्यात त्यांचा हेतू असा असावा हे येथे सूचित केलेले दिसते. 'तत्प्रयोजनम्' च्या जागी मुद्रित पाठ 'तत्प्रशमनप्रयोजनम्' असा आहे. पण तो मूळ असेलसे वाटत नाही. प्रस्तुत श्लोकात ह्या वाक्यात निर्दिष्ट झालेल्या शंकेचे प्रशमन मुळीच केलेले नाही. — 'गर्भे वा यमर्थे' ही हस्तलिखितातील 'गर्भो अन्यदिवायमर्थे' ची सुचविलेली दुरुस्ती आहे. मुद्रित पाठ 'गर्भे यदि वा । यमर्थे' असा आहे. 'अन्यद् इव अयम्' ह्याचा किंवा 'यदि' चा वाक्यात कोठे अन्वय लागण्यासारखा नाही. येथे असे म्हटले आहे

की पताकानायकाचा स्वार्थ प्रतिमुख किंवा गर्भसंधीतच सिद्ध झालेला दाखवावयाचा असतो; पुढील संधीतील त्याचे अस्तित्व परार्थ म्हणजे प्रधाननायकाच्या फलसिद्धीला साहाय्यभूत असते. – 'कस्मादिति' यातील 'इति' हस्तलिखितात नाही, पण तो आवश्यक आहे. मुद्रित पाठ 'कस्माद्यस्मादिति। कस्माद्' असा आहे. पण 'यस्मात्' पुढे स्वतंत्रपणे अवतारित केले आहे. आणि त्याचा अर्थ सांगण्यासाठी 'कस्मात्' शब्दाची पुनरावृत्ती करण्याची आवश्यकता नाही. – 'निर्वाहात्' यातील पंचमी विशेष समर्पक नाही. सप्तमी अपेक्षित आहे. – 'तद्भवति' यातील 'तत्' म्हणजे पताकानायकाचे स्वतःचे फल. – 'अभिविधावाङ्' पाणिनीच्या 'आङ्मर्यादाभिविध्योः' (२.१.१३) ह्या सूत्राप्रमाणे आ हे कर्मप्रवचनीय अभिविधि आणि मर्यादा या दोन अर्थी वापरता येते. अभिविधि अर्थ घेतला तर ज्याच्याबरोबर ते वापरले असते त्याचा अन्तर्भाव होतो. म्हणजे 'आगर्भात्' याचा अर्थ 'गर्भापासून, गर्भ धरून' असा होतो. पण मर्यादा हा अर्थ घेतला तर 'गर्भापर्यंत म्हणजे गर्भ सोडून' असा अर्थ होईल. मग गर्भसंधीत (किंवा विमर्शसंधीत) पताकेचे अस्तित्व दाखविता येणार नाही. ती अगोदरच संपुष्टात आलेली दाखवावी लागेल. – 'विनिपातप्रतीकारे' ही '-प्रतीकारः' ची दुरुस्ती आहे. 'उपयोगः' शी ह्याचा अन्वय लावावयाचा असल्यामुळे सप्तमीच संभाव्य आहे. – 'प्रत्युतोपयोगः' मुद्रित पाठ 'प्रस्तुतोपयोगः' आहे. पण 'प्रस्तुत'ला येथे काही विशेष अर्थ नाही. 'प्रत्युत' हे अधिक अर्थवाही आहे. पताका विमर्शात नसते असा जो अर्थ आ मर्यादार्थी मानल्यामुळे निष्पन्न होतो त्याच्या उलट स्थिती आहे. – 'दृष्टा तन्नोच्यते' हा सुचविलेला पाठ आहे. हस्तलिखितात 'दृष्टात्वेनीत्योच्यते' असा भ्रष्ट पाठ आहे. मुद्रितात 'दृष्टा तन्न नीत्योच्यते' असे आहे. नीतीचा येथे काही संबंध अभिप्रेत असेलसे वाटत नाही. येथील म्हणण्याचा आशय असा दिसतो की पताकानायक जर कृतघ्न असेल तर आपली कार्यसिद्धी झाल्यावर तो प्रधाननायकाच्या मार्गात आलेल्या अडचणी दूर करण्यास साहाय्य करणार नाही; म्हणून अशा तऱ्हेच्या पताकानायकाची योजना करीत नाहीत. – 'कृतज्ञस्तु' सुग्रीवाचे उदाहरण ध्यानात आणून हे लिहिले आहे हे उघड आहे.

**[1]यत्रार्थे चिन्तितेऽन्यस्मिंस्तल्लिङ्गोऽन्यः प्रयुज्यते ।**
**आगन्तुकेन भावेन पताकास्थानकं तु तत् ॥ २९ ॥**

जेव्हा एका गोष्टीचा विचार चालू असता तिच्यासारख्या दुसऱ्या गोष्टीची योजना आगंतुकपणे केली जाते तेव्हा ते पताकास्थानक होते.

**तत्र पताकानायको यथा स्वार्थे प्रवर्तते परार्थे च, तथा भृत्यस्यान्यस्य वा जडस्य वा स्थितिः स्वार्थेऽपि सति परार्थे संपद्यते तत्पताकास्थानकम्, पताकासदृशम् । तत्र जडस्य स्वार्थपरार्थप्रवृत्तौ तावदभिसंधानाभावात् अभिसंधानवतः सुग्रीवादेः पताकानायकाद्भेदः । अजडस्यापि स्वार्थे यद्यप्यभिसंधा-**

१ नि यत्रान्यस्मिन्युज्यमाने, का यत्रार्थे चिन्त्यमानेऽपि तल्लिङ्गार्थः.

नमस्ति तथापि परार्थे नास्तीति विशेषः । प्रधानवच्च कल्प्येतेति पताकालक्षणेऽभिधानात् बहुतरेतिवृत्ते व्यापकता नायकस्य, अस्य तु परिमितेतिवृत्तव्यापकत्वमित्यपि विशेषः ।

पताकानायक ज्याप्रमाणे स्वतःच्या प्रयोजनासाठी आणि इतराच्या प्रयोजनासाठी प्रवृत्त होतो त्याप्रमाणे सेवकाची अथवा इतर कोणाची अथवा अचेतन वस्तूची स्थिती स्वार्थ साधीत असतानाही परार्थ साधते ती स्थिती म्हणजे पताकास्थानक, पताकेप्रमाणेच होय. त्यांत अचेतन वस्तू स्वार्थ आणि परार्थ यांसाठी प्रवृत्त होते तेव्हा तेथे संकल्पाचा अभाव असल्यामुळे बुद्धिपूर्वक संकल्प करणाऱ्या सुग्रीव आदी पताकानायकाहून ती भिन्न आहे. आणि सचेतन भृत्य वगैरे जरी आपल्या प्रयोजनासाठी संकल्प करतात तरी दुसऱ्याच्या प्रयोजनासाठी तो करीत नाहीत हा फरक. आणि पताकेच्या लक्षणात 'आणि प्रधान इतिवृत्ताप्रमाणे ती कल्पिली जाते' असे म्हटले असल्यामुळे तिचा नायक इतिवृत्ताच्या मोठ्या अंशात विद्यमान असतो, तर हे पताकास्थानक अगदी अल्प इतिवृत्ताला व्यापते असा सुद्धा ह्या दोहोंत फरक आहे.

या ठिकाणी नाट्यशास्त्रात पताकास्थानक व त्याचे चार प्रकार ह्यांचे वर्णन आहे. पताका आणि पताकास्थानक यांच्यात साम्य असल्यामुळे पताकेच्या विवरणानंतर पताकास्थानकांचे वर्णन स्वाभाविक आहे असे सुचवून प्रस्तुत परिच्छेदात अभिनवगुप्ताने त्या दोहोंमधील भेदही स्पष्ट केला आहे. – 'तथा' हा शब्द मुळात नाही. पण अर्थासाठी आवश्यक म्हणून तो घातला आहे. 'स्थितिः' हा शब्द पताकास्थानकमधील 'स्थान' च्या पर्यायार्थी वापरलेला दिसतो. – 'पताकासदृशम्' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. मुळात केवळ 'पताका' आहे. पण 'पताका' व 'पताकास्थानकम्' यांच्यात सामान्याधिकरण अभिप्रेत असण्याची शक्यता कमी. – 'अभिसंधान' म्हणजे मनात योजून काही करण्याचा संकल्प करणे. – 'यद्यप्यभिसंधानमस्ति' यातील 'अभिसंधानम्' ही मुळातील 'अनुसंधानम्' ची दुरुस्ती आहे. येथेही अभिसंधानच अभिप्रेत आहे यात शंका नाही.

तस्य पताकास्थानकस्य वक्ष्यमाणभेदैर्भेदवत्त्वात् सामान्यलक्षणं तावदाह यत्रार्थे चिन्तितेऽन्यस्मिन्निति । अर्थः प्रयोजनम् उपायश्च कर्मकरणव्युत्पत्त्या । अन्यस्मिन्नुपाये प्रयोजने वा चिन्तितेऽन्यः उपायान्तरप्रयोजनान्तरलक्षणः प्रकर्षेण युज्यते संबध्यते यत्रेति तत्पताकास्थानकम् । पताकाधारत्वादुपचारादितिवृत्तमपि पताकास्थानकम् । उपाध्यायास्त्वाहुः । पताकायाः स्थानमितिवृत्तता, तत्र चार्थः क्रियमाणोऽपि पूर्वपदार्थमुपसंक्रामति, राजवाहन इवायमुद्धुरकन्धरस्तिष्ठतीति यथा । तेन पताकास्थानकमितिवृत्तमेवोच्यते । तत्र वर्ण्यमानं तु जडाजडरूपं पताकासदृशमित्यर्थादुक्तं भवति । स चान्योऽर्थस्तल्लिङ्गः तं मुख्यमर्थं लिङ्गयति विचित्रयतीति । ननु किं तत्र पताकासादृश्यमित्याह आगन्तुकेन भावेनेति ।

**भावनं भावः कारणत्वम् । तच्च द्विविधं स्वरूपकृतं सहकारिकृतं च । सहकारिकृतमागन्तुकमुच्यते । सहकारित्वसामान्यात् तत्समर्थाचरणलक्षणात् पताका सादृश्यमिति यावत्। अन्याभिसंधानेऽन्यसिद्धिश्चेत् भूषणभूतापि कैश्चिद् दूषणत्वेन गृहीता। तैरर्थशब्दः उपायवाच्येवाश्रितः, तल्लिङ्गः इति कारणत्वधर्माभावप्रवृत्तिनिमित्त उपायः । उदाहरणं सामान्यलक्षणस्य विशेषलक्षणव्याख्याने शक्ययोजनमिति तत्रैव दर्शयिष्यामः ।**

पुढे सांगणार असलेल्या प्रकारांमुळे त्या पताकास्थानकाचे भेद आहेत, तेव्हा त्याचे सामान्य लक्षण 'यत्रार्थे चिन्तितेऽन्यस्मिन्' ह्या श्लोकात करतात. अर्थ म्हणजे प्रयोजन आणि उपाय, कर्म आणि करण या अर्थांच्या व्युत्पत्तीने. एक उपाय किंवा प्रयोजन चिंतिले असता जेथे दुसरा उपाय किंवा दुसरे प्रयोजन ह्या स्वरूपाचा निराळा अर्थ प्रकर्षाने योजिला जातो म्हणजे संबंधित केला जातो ते पताकास्थानक. पताकेला आधार असल्यामुळे उपचाराने इतिवृत्ताला सुद्धा पताकास्थानक म्हणतात. पण आमचे गुरुजी म्हणतात– पताकेचे स्थान म्हणजे इतिवृत्ताचे अस्तित्व; आणि त्यात केला जाणारा अर्थ सुद्धा पूर्वीच्या शब्दाच्या अर्थाला संक्रामित होतो; उदाहरणार्थ 'राजाच्या वाहनाप्रमाणे ह्या घोड्याची मान जूविरहित अशी ताठ आहे.' म्हणून इतिवृत्तालाच पताकास्थानक म्हणतात. त्यात वर्णन केलेले सचेतन आणि अचेतन स्वरूपाचे विषय पताकेसारखे आहेत हे अर्थातच अभिप्रेत आहे. आणि तो दुसरा अर्थ तल्लिङ्ग असतो म्हणजे त्या मुख्य अर्थात वैचित्र्य आणतो. त्यात पताकेशी सादृश्य कोणते या प्रश्नाचे उत्तर 'आगन्तुकेन भावेन' ह्या शब्दांत देतात. भाव म्हणजेच भावन म्हणजेच कारणभूत होणे. आणि ते दोन प्रकारचे, त्याच्या स्वरूपामुळे होणारे आणि सहकाऱ्यामुळे होणारे. सहकाऱ्यामुळे होणारे ते आगन्तुक असे म्हणतात. ते कार्य साधण्यास समर्थ आचरण असणारे अशा स्वरूपाच्या सहकारित्वाशी समानता असल्यामुळे पताकेशी सादृश्य आहे असा याचा अर्थ. एकाचा संकल्प केला असता दुसऱ्याची सिद्धी जर झाली तर ते भूषणावह असले तरी काहींनी ते दूषण ठरविले आहे. त्यांनी अर्थ शब्द उपाय ह्या अर्थानेच स्वीकारला आहे आणि तल्लिङ्ग उपाय म्हणजे कारणीभूत होण्याच्या धर्माच्या अभावामुळे प्रवृत्त होणारा असे मानले आहे. पताकास्थानकाच्या प्रकारांच्या लक्षणांच्या व्याख्या करताना ह्या सामान्य लक्षणाच्या उदाहरणाची योजना करणे शक्य आहे हे आम्ही त्या ठिकाणीच दाखवून देऊ.

'कर्मकरणव्युत्पत्त्या' ऋ धातूपासून व्युत्पन्न झालेला 'अर्थ' हा शब्द त्या धातूचे कर्म म्हणून 'अर्यते असौ' अशा प्रकारे आणि त्या धातूचे करण म्हणून 'अर्यते येन तत्' अशा प्रकारे अनुक्रमे प्रयोजन आणि उपाय ह्या अर्थी वापरला आहे. —'उपचारात्' म्हणजे इतिवृत्ताच्या काही भागाला पताकास्थानक म्हणतात ते गौण अर्थाने. पताकेचे स्थान म्हणजे तिला

आधारभूत असल्यामुळे हा गौण अर्थ निष्पन्न होतो. – 'उपाध्यायास्त्वाहुः' भट्ट तोताचे म्हणणे असे की इतिवृत्ताला पताकास्थानक म्हणतात ते मुख्य अर्थाने, गौण अर्थाने नाही. – 'तत्र चार्थः इ०' या वाक्याचा अर्थ विशेष स्पष्ट नाही. पताका जर इतिवृत्त आहे तर तोच अर्थ पताकास्थानकालाही लागू पडतो असा आशय संभवनीय आहे. पण यात 'पूर्वपद' शब्दाने पताकास्थानकाचा बोध होतो असे समजावे लागते. त्याची नीट उपपत्ती लागत नाही. – 'राजवाहन इव इ०' ह्या उदाहरणाचा अर्थ असा असावा – उद्धुरकन्धर हे राजवाहनाचे वर्णन; ते दुसऱ्या वाहनालाही लागू केले आहे. ते वर्णन दुसऱ्या वाहनाला सुद्धा मुख्य अर्थानेच लागू होते, गौण अर्थाने नाही. त्याचप्रमाणे पताकेचे इतिवृत्त असे वर्णन पताकास्थानकाला लागू होते ते मुख्य अर्थानेच, गौण अर्थाने नाही. – 'लिङ्गयति' ह्या क्रियापदाचा 'विचित्रयति' म्हणजे वैचित्र्य उत्पन्न करतो असा अर्थ केला आहे. – 'सहकारित्वसामान्यात् इ०' पताका आणि पताकास्थानक यांत साम्य असे की दोन्हीही प्रधान कार्याला सहकारी म्हणून उपयोगी पडतात. आणि हा सहकारिभाव म्हणजे उपयोगी पडण्याची समर्थता. – 'उपायवाच्येवाश्रितः' मुद्रित पाठ 'उपायवाच्योपाश्रितः' असा आहे. तो क्लिष्ट आहे.– 'कारणत्वधर्माभावप्रवृत्तिनिमित्तः' ही ह्या टीकाकारांनी केलेली 'तल्लिङ्गः' शब्दाची व्याख्या. कारणीभूत न होणारा असे ह्या व्याख्येचे सार आहे. दुसरा उपाय अशा तऱ्हेचा असतो म्हणून ते दूषण मानले आहे.

**सहसैवार्थसंपत्तिर्गुणवत्युपकारतः[1] ।**
**पताकास्थानकमिदं प्रथमं परिकीर्तितम् ॥ ३० ॥**

ज्याच्यामध्ये उपकारक असलेली व गुणसंपन्न अशी प्रयोजनाची संप्राप्ती एकाएकी सिद्ध होते ते पहिल्या प्रकारचे पताकास्थानक असे म्हणतात.

**तद्भेदान् क्रमेण लक्षयति सहसैवार्थसंपत्तिरिति । यत्रोपकारमपेक्ष्य गुणवती उत्कृष्टा अर्थस्य फलस्य सहसैवाचिन्तितत्वेन भवति संपत्तिः तत्प्रथममिति साध्यफलयोगात्प्रधानं पताकास्थानम् । यथा रत्नावल्यां सागरिकायां पाशावलम्बनप्रवृत्तायां वासवदत्तेयमिति मन्यमानो राजा यदा पाशं मुञ्चति तदा तदुक्त्या सागरिकां प्रत्यभिज्ञाय 'हा कथं प्रिया मे सागरिका । अलमलमतिमात्रम्' इत्यादि । अत्रान्यत्प्रयोजनं चिन्तितं तद्वैचित्र्यकारि च प्रयोजनान्तरं संपन्नम् । तत्र च दैवयोगात्तथाभूतदेशकालयोगो नायकः स्वात्मनोऽभिसंधिबलात् कल्पितभेदः । सागरिकैव च मरणमेवोचितमित्यन्याभिसंधानेन वदतीति पताकानायकसदृशत्वं भजते । अन्यस्मिन्नुपाये चिन्तिते सहसोपायान्तरप्राप्तिः यथा नागानन्दे जीमूतवाहनस्य शङ्खचूडप्राप्यवध्यपटस्य कञ्चुकिना वासोयुगलार्पणम् ।**

१ का -त्युपचारतः.

त्याच्या प्रकारांचे 'सहसैवार्थसंपत्तिः' येथपासून क्रमाने लक्षण करतात. जेथे उपकाराच्या अपेक्षेने गुणवती म्हणजे उत्कृष्ट प्रकारची अर्थाची म्हणजे फळाची, सहसा एव म्हणजे तिची कल्पनाही नसता, संपन्नता होते ते प्रथम म्हणजे साध्य करावयाच्या फळाशी संबद्ध असल्यामुळे मुख्य प्रकारचे पताकास्थान. उदाहरणार्थ, रत्नावली नाटिकेत तिसऱ्या अंकात सागरिका गळफास लावून घेण्यास प्रवृत्त झाली असता ती वासवदत्ता आहे असे समजून राजा जेव्हा तिचे पाश सोडतो तेव्हा तिच्या उद्गारावरून ती सागरिका आहे असे ओळखून 'काय? ही माझी प्रिया सागरिका? पुरे पुरे' इत्यादी प्रसंग. त्या ठिकाणी दैवयोगाने त्या विशिष्ट देशकालाशी संबद्ध झालेला नायक आपल्या स्वतःच्या संकल्पाच्या जोरावर भिन्न कल्पना करतो. आणि सागरिकाच 'मरण हेच उचित' असे निराळाच संकल्प मनात योजून म्हणते म्हणून तिचे पताकानायकाशी सादृश्य होते. एक उपाय चिन्तिला असता अकस्मात दुसऱ्या उपायाच्या प्राप्तीचे उदाहरण नागानन्द नाटकात जीमूतवाहनाला शंखचूडापासून प्राप्त व्हावयाच्या वध्य मनुष्याच्या वस्त्राऐवजी कंचुकीने केलेले दोन वस्त्रांचे अर्पण.

'उपकारमपेक्ष्य' हा उपकार पताकास्थानकाकडून प्रधान इतिवृत्तावर व्हावयाची अपेक्षा असते. मुद्रितात 'उपकारकमपेक्ष्य' आहे. पण तो तितकासा समर्पक नाही. – 'तदुक्त्या' सागरिकेची यावेळची उक्ती आहे– 'मुंचदु मुंचदु मं भट्टा। पराहीणो क्खु अअं जणो। ण उण ईरिसं अवसरं मरिदुं पावेदि। (सोडा सोडा मला. मी परस्वाधीन आहे. मरणाची अशी संधी मला पुन्हा मिळणार नाही.)' – 'अन्यत्प्रयोजनं चिन्तितम्' वासवदत्तेची मुक्तता करणे असा राजाचा उद्देश होता, त्याऐवजी सागरिकेशी मीलन हे दुसरे प्रयोजन सिद्ध झाले. या वाक्यात पताकास्थानकाचे वरील सामान्य लक्षण प्रस्तुत प्रकाराला लागू असल्याचे दाखविले आहे. – 'तत्र च इ०' या वाक्यात 'दैवयोगः' च्या ऐवजी 'दैवयोगात्' आणि 'स्वात्मैव' च्या ऐवजी 'स्वात्मनो' अशा दुरुस्त्या सुचविल्या आहेत. मुळात अनेक शब्द प्रथमा विभक्तीत आहेत. त्यांच्या एकत्रित अन्वयाची शक्यता फारशी नाही. सुचविलेल्या दुरुस्तींनंतर '-कालयोगः' हे 'नायकः' चे विशेषण आणि 'कल्पितभेदः' हे विधेय असे समजणे शक्य आहे. – 'अभिसंधिबलात्' नायकाचा संकल्प असतो वासवदत्तेची पाशापासून मुक्तता करण्याचा. त्यामुळे वस्तुतः सागरिका तेथे असता ती वासवदत्ता अशी त्याची भिन्न स्वरूपाची कल्पना होते, असा 'कल्पितभेदः' याचा अर्थ दिसतो. – 'सागरिकैव च इ०' वर उद्धृत केलेल्या सागरिकेच्या उक्तीत 'मरणच योग्य' असा तिचा संकल्प प्रकट झालेला दिसतो; पण खरोखर तिच्या मनात दुसराच अभिसंधि म्हणजे संकल्प असतो – राजाशी मीलन व्हावे असा. म्हणजे येथेही एक प्रयोजन असता दुसरे प्रयोजन सिद्ध होते. – 'पताकानायकसदृशत्वं भजते' सागरिकेचे पताकानायकाशी सादृश्य कसे ते स्पष्ट नाही. पताकानायक स्वार्थ अणिं परार्थ दोन्ही साधतो. सागरिकेच्या बाबतीत तसे म्हणता येण्यासारखे आहे असे दिसत नाही. तिचा स्वतःचा अर्थ आणि राजाचा अर्थ एकच होत. मनात दुसरा उद्देश असणे एवढेच यासाठी पुरेसे आहे असे वाटत नाही. शिवाय ती तर या नाटिकेची नायिका. – 'अन्यस्मिन्नुपाये इ०' वर अर्थ शब्दाचे प्रयोजन आणि उपाय असे दोन अर्थ केले आहेत. प्रयोजनाचे उदाहरण रत्नावलीतून दिले आहे. आता उपायाचे उदाह-

रण नागानन्द नाटकातील दिले आहे. – 'शङ्खचूडप्राप्यवध्यपटस्य' शंखचूड हा त्या दिवशी गरुडाचे भक्ष्य म्हणून ठरलेला सर्प. वध्य म्हणून त्याला रक्त वस्त्राने झाकावयाचे होते. शङ्खचूडाच्या जागी नायक जीमूतवाहन स्वतः बली जाऊ इच्छितो. त्याच वेळेस कंचुकी येऊन विवाहानंतर वापरावयाचे म्हणून त्याला रक्त वस्त्र अर्पण करून जातो. शंखचूडाजवळील रक्त वस्त्र ह्या उपायाचे चिंतन केले असता अकस्मात कंचुकीने दिलेले वस्त्र हा दुसरा उपाय प्राप्त होतो. ह्या समासात मुळातील 'प्राप्त' च्या ऐवजी 'प्राप्य' शब्द वापरून दुरुस्ती केली आहे.

**अन्ये तु चतुष्पताकापरमम् इति भाविसंधिचतुष्टयाभिप्रायेण मन्यमानाः प्रथमद्वितीयादिशब्दान् मुखादिसंधिविषयप्रयोगाभिप्रायेण व्याचक्षते । अत्र च युक्तिर्न लक्ष्यते न वा चमत्कारं करोतीत्यसदेवैतत् । तुल्यतया गणनं भूतेन्द्रियैः पताकापञ्चकगणनमप्यापादयेदिति च वदद्भिश्चिरन्तनैरेवायमुपहासपात्रीकृतः पक्ष इत्यास्ताम् ।**

परंतु दुसरे टीकाकार 'अधिकात अधिक चार पताकांनी युक्त' हे वचन पुढे सांगितलेल्या चार संधींच्या संबंधात आहे असे मानून प्रथम, द्वितीय आदी शब्द मुख आदी संधींच्या विषयी योजले आहेत अशी व्याख्या करतात. यात काही औचित्य नाही किंवा चमत्कृती नाही म्हणून हे बरोबर नाही. एकच संख्या असल्यामुळे संबंध जोडावयाचा असे असेल तर पाच पताकांचा महाभूतांशी व इन्द्रियांशी संबंध जोडता येईल असे म्हणून प्राचीनांनीच हे मत हास्यास्पद ठरविले आहे. असो.

'चतुष्पताकापरमम्' इत्यादी पुढे ३४ व्या श्लोकात म्हटले आहे. – 'युक्तिर्न लक्ष्यते न वा चमत्कारं' हा पाठ मुद्रिताप्रमाणे आहे. हस्तलिखिताचा पाठ 'युक्तिर्न वक्ष्यं नैवानकाङ्क्षं' असा भ्रष्ट आहे. पण यापुढील 'करोति' हे तेथील क्रियापद मुद्रितातील 'भजति' पेक्षा अधिक संभाव्य वाटते. – 'गणनं' असा स्वतंत्र शब्द ही दुरुस्ती आहे. त्याचा 'भूतेन्द्रियैः' बरोबर समास करणे उचित नाही. 'गणनम्' हा 'आपादयेत्' चा कर्ता. पाच महाभूते आणि पाच इंद्रिये प्रसिद्ध आहेत.

**[1]वचः सातिशयं श्लिष्टं काव्यबन्धसमाश्रयम् ।**
**पताकास्थानकमिदं द्वितीयं परिकीर्तितम् ॥ ३१ ॥**

अतिशयोक्ती व श्लेष यांनी युक्त आणि काव्यविषयाशी संबद्ध असलेले वचन म्हणजे दुसरे पताकास्थानक असे म्हणतात.

**वचः सातिशयं श्लिष्टमिति। काव्यस्य प्रकृतस्य वर्णनीयस्य यो बन्धः अतिशयोक्त्यादिना योजनं तन्निमित्तवशाद्यद्वचनं सातिशयं श्लिष्टं प्रकृतं प्रत्यु-**

१ का वचसातिशयश्लिष्टं.

चितं जातं तद्वचनं तदर्थो वा तदुच्चारयिता वा याद‍ृच्छिकेन प्रकृतोपयोगित्वेन सहकारित्वं गच्छन् द्वितीयं पताकास्थानमनभिसंधानापेक्षया । यथा रामाभ्युदये तृतीयेऽङ्के सीतां प्रति सुग्रीवस्य संदेशोक्तिः –

बहुनात्र किमुक्तेन पारेऽपि जलधेः स्थिताम् ।
अचिरादेव देवि त्वामाहरिष्यति राघवः ॥

अत्रान्यप्रयोजनेनातिशक्त्याशयेन प्रयुक्तेऽपि वचसि पारेऽपीत्यादि प्रकृतोपयोगातिशयात्पताकास्थानकम् ।

'वचः सातिशयं श्लिष्टम्' इत्यादी. काव्याचा म्हणजे वर्णन करावयाचा असलेल्या प्रस्तुत विषयाचा जो बंध म्हणजे अतिशयोक्ती आदींच्या बरोबर योजना त्या निमित्ताने होणारे जे सातिशय वचन श्लिष्ट म्हणजे प्रकृताला उचित असे होते ते वचन अथवा त्याचा अर्थ अथवा ते उच्चारणारा वक्ता यदृच्छेने प्रकृताला उपयोगी असल्यामुळे सहकारी होतो ते दुसरे पताकास्थानक, यात संकल्प केलेला नसतो म्हणून. उदाहरणार्थ, रामाभ्युदय नाटकातील तिसऱ्या अंकात सुग्रीवाने सीतेला उद्देशून पाठविलेल्या संदेशाचे वचन—'या बाबतीत अधिक सांगण्याची काय आवश्यकता आहे ? हे देवि, समुद्राच्या पलीकडे तू असलीस तरी राघव तुला लवकरच घेऊन येईल.' यात दुसऱ्या प्रयोजनाने अतिशय सामर्थ्य दाखविण्यासाठी योजलेल्या वचनात 'पारेऽपि' इत्यादी प्रकृताला उपयोगी असणाऱ्या अतिशयामुळे पताकास्थानक आहे.

'सातिशयं श्लिष्टं' ही दुरुस्ती आहे. मुळातल्याप्रमाणे दोहोंचा मिळून 'सातिशयश्लिष्टं' असा समास बरोबर नाही. श्लोकातील 'सातिशयं' ची व्याख्या अगोदरच्या 'अतिशयोक्त्यादिना' इत्यादि शब्दांत दिली आहे. – 'प्रकृतं' ही सुद्धा मुळातील 'अप्रकृतं' ची दुरुस्ती आहे. अप्रकृत म्हणजे अप्रस्तुत असंभाव्य आहे. – 'याद‍ृच्छिकेन' ही 'याद‍ृच्छिकं वा' ची दुरुस्ती आहे. याद‍ृच्छिकमध्ये एखादा नवीन पर्याय नसून पूर्वीचेच तीन पर्याय यदृच्छेने प्रकृताला उपयोगी पडतात असे म्हणावयाचे आहे. – 'गच्छन्' मुद्रित पाठ 'गच्छद्' आहे. – 'अनभिसंधानापेक्षया' ही सुद्धा 'अभिसंधानापेक्षया' ची दुरुस्ती आहे. जे याद‍ृच्छिक आहे त्याचे अभिसंधान म्हणजे बुद्धिपूर्वक संकल्प केला असण्याचा संभव नाही.

अर्थोपक्षेपणं यत्र[1] लीनं सविनयं भवेत् ।
श्लिष्टप्रत्युत्तरोपेतं तृतीयमिदमिष्यते ॥ ३२ ॥

ज्यामध्ये अर्थाचा उपक्षेप गूढपणे व नम्रपणे केला जातो व ज्यात श्लेषयुक्त प्रतिवचन असते ते तिसऱ्या प्रकारचे पताकास्थानक असे मानतात.

१ का यत्तु.

अर्थोपक्षेपणं यत्रेति। लीनमस्फुटरूपमुपाक्षिप्यमाणमर्थजातं श्लिष्टेन संबन्धयोग्येनाभिप्रायान्तरप्रयुक्तेनापि प्रत्युत्तरेणोपेतं सद् यत्र सविनयं विशेषनयनेन विशेषनिश्चयप्राप्त्या सहितं संपद्यते तत्तृतीयं पताकास्थानकम्। यथा मुद्राराक्षसे चाणक्यः 'अपि नाम दुरात्मा राक्षसो गृह्येत' एवमस्फुटेऽर्थे उपक्षिप्ते प्रविश्य सिद्धार्थकः 'अअं गहीदो' इत्येतत्प्रत्युत्तरं संदेशाशयेन प्रयुक्तमौचित्याद्विशेषनिश्चयं करोति। तथा च पुनश्चाणक्यः सहर्षमात्मगतम् 'हन्त, गृहीतो दुरात्मा राक्षसः' इति। इदं च प्रकृतसाध्योपयोगाश्रयात्पताकास्थानीयमिति वीथ्यङ्गाद् गण्डादस्य भेदः। 'ऊरुयुग्मं भग्नम्' एतद्धि प्रत्युत दुर्योधनेन नेष्टं तदाशयश्च दुष्टः, कस्तस्योपयोगः। पाण्डवानुसारेण तु भवत्विदं पताकास्थानम्। भिन्नविषयत्वं कृतं ह्येतद्रूपं न क्षतिमावहति।

'अर्थोपक्षेपणं यत्र' इत्यादी. लीन म्हणजे अस्फुट रूपाने उपक्षिप्त होणारा सर्व अर्थ श्लिष्ट म्हणजे संबंधित होण्यास योग्य अशा, दुसऱ्याच उद्देशाने उच्चारलेल्याही प्रत्युत्तराने युक्त होऊन जेथे सविनय म्हणजे विशेष नयनाने सहित म्हणजेच विशेष निश्चयाच्या प्राप्तीने युक्त असा निष्पन्न होतो तेथे तिसरे पताकास्थानक असते. उदाहरणार्थ, मुद्राराक्षस नाटकात चाणक्य म्हणतो 'तो दुरात्मा राक्षस पकडला जाईल काय?' याप्रमाणे अस्फुट अर्थ उपक्षिप्त झाला असता सिद्धार्थक प्रवेश करून म्हणतो 'हा घेतला.' हे प्रत्युत्तर संदेशाविषयी उच्चारलेले असता औचित्यामुळे विशेष निश्चय उत्पन्न करते. त्या प्रमाणे चाणक्य आनंदून स्वतःशी म्हणतो 'उत्तम! दुरात्मा राक्षस पकडला गेला.' आणि प्रकृत साध्याला उपयोगी असल्यामुळे हे पताकास्थानक आहे आणि म्हणून वीथीचे अंग जे गण्ड त्याहून भिन्न. गण्डाच्या उदाहरणातील 'दोन्ही मांड्या मोडल्या' हे उलट दुर्योधनाला इष्ट नसते आणि त्याचा आशय दुष्ट आहे; प्रस्तुताला त्याचा काय उपयोग? तथापि पांडवांच्या दृष्टीने हे पताकास्थानक असे समजण्यास हरकत नाही. भिन्न विषयासंबंधी मानले असता अशा प्रकारचे पताकास्थानक काही नुकसान करीत नाही.

'उपक्षिप्यमाणं' ही मुळातील 'उत्क्षिप्यमाणं' ची दुरुस्ती आहे. उपक्षिप् धातूच अभिप्रेत असणे शक्य आहे हे श्लोकातील 'अर्थोपक्षेपणं' वरून स्पष्ट आहे. – 'विशेषनिश्चयप्राप्ति' श्लोकातील विनय शब्दाचा व्युत्पत्तिपूर्वक केलेला हा अर्थ जरा विलक्षणच वाटतो. – 'अस्फुटेऽर्थे उपक्षिप्ते' यातील 'उपक्षिप्ते' हा शब्द हस्तलिखितात नाही. पण तो मुळात असण्याचा फार संभव आहे. – 'प्रकृतसाध्योपयोगाश्रयात्' मुद्रित पाठ 'योगाङ्गित्वात्' असा आहे. पण उपयोगाची 'अङ्गिन्' अशी कल्पना असण्याचा संभव फार कमी. – 'गण्डाद्भेदः' गण्ड ह्या वीथ्यंगाचे लक्षण १८.११९ मध्ये दिलेले असून त्या आर्येवरील व्याख्येत अभिनवगुप्ताने वेणीसंहारातील हे उदाहरण दिले आहे. पताकास्थानकात शब्द अन्वित झाल्याने होणारा नवीन अर्थ प्रकृताला उपयोगी असतो, तर गण्डात तो नसतो. 'राक्षसः गृहीतः' हे चाणक्याच्या प्रस्तुताला उपयोगी

आहे, पण 'ऊरुयुग्मं भग्नम्' हे दुर्योधनाच्या प्रस्तुताला उपयोगी नाही हा त्या दोहोंमधील फरक असे अभिनवगुप्ताचे म्हणणे आहे. – 'दुर्योधनेन नेष्टं तदाशयश्च दुष्टः' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'दुर्योधनेन···दाशश्च दुष्टं' असा भ्रष्ट पाठ आहे. मुद्रित पाठ 'दुर्योधननाशादाशयश्च दुष्टः' असा आहे. 'नाश' अभिप्रेत असेलसे वाटत नाही, आणि 'च' ने अगोदर दुसरे वाक्य आहे हे सूचित होते. – 'पाण्डवानुसारेण' म्हणजे पांडवांना अभिप्रेत असलेले जे प्रस्तुत – दुर्योधनाचा ऊरुभङ्ग – त्याला हे उपयोगी आहे ह्या दृष्टीने वेणीसंहारातील ह्या प्रसंगातही पताकास्थानक आहे असे म्हणता येईल. – 'भिन्नविषयत्वं कृतं' म्हणजे प्रस्तुत निराळे आहे असे मानले तर. – 'एतद्रूपं' म्हणजे ह्या स्वरूपाचे. हे 'पताकास्थानकम्' चे विशेषण आहे असे समजता येईल.

**द्व्यर्थो वचनविन्यासः सुश्लिष्टः काव्ययोजितः ।**
**उपन्याससुयुक्तश्च[1] तच्चतुर्थमुदाहृतम् ॥ ३३ ॥**

काव्यात योजिलेली, सुसंबद्ध रचनेची, दोन अर्थ असलेली आणि पुढील घटनांचा उपन्यास करणारी वचने म्हणजे चौथ्या प्रकारचे पताकास्थानक असे म्हणतात.

**द्व्यर्थो वचनविन्यास इति । यो वचनविन्यासः कथारूपं वा सालंकारत्वसंपत्त्याशयेन शोभनः प्रसादयुक्तः श्लेषवशाद् द्व्यर्थ इति अनेकार्थसंप्रयुक्तः तादृशः सन्नुपन्यासे वस्त्वन्तरोपक्षेपे सुष्ठु युक्तः संपद्यते तच्चतुर्थम् । यथा – 'प्रीत्युत्कर्षकृतो दृशामुदयनस्येन्दोरिवोद्वीक्षते' इति । अत्र हि काव्यरूपताशयेन श्लेषः प्रयुक्तः प्रधानवस्त्वन्तरं सागरिकागतमुपक्षिपति 'अअं सो राआ उदअणो जस्स अहं तादेण दिण्णा' इति । 'उद्दामोत्कलिकाम्' इति तु नोदाहरणम्, द्व्यर्थताप्रतिपत्तावपि हि नात्रार्थेन सहकारिता कुत्रचिदाचरिता । तस्मादेतद्वीथ्यङ्गस्य व्याहारस्यैवोदाहरणं युक्तम् ।**

'द्व्यर्थो वचनविन्यासः' इत्यादी. उक्तींचा केलेला जो विन्यास अथवा कथेचे स्वरूप अलंकारांनी युक्त अशा समृद्धीमुळे शोभन म्हणजे प्रसादयुक्त, श्लेष असल्यामुळे द्व्यर्थ म्हणजे एकाहून अधिक अर्थांत योजलेला अशा प्रकारचा असून उपन्यासाला म्हणजे दुसऱ्या गोष्टींचा उपक्षेप करण्यास चांगल्या रीतीने योग्य होतो ते चौथे पताकास्थानक. उदाहरणार्थ, रत्नावलीतील 'चन्द्राच्या प्रमाणे उदयनाच्या, नेत्रांना अतिशय आनंद देणाऱ्या, पदांची सेवा करण्यासाठी राजेलोक वर मान करून पहात आहेत.' कारण, या ठिकाणी काव्यमय करण्याच्या उद्देशाने योजिलेला श्लेष सागरिकेसंबंधीच्या दुसऱ्या प्रधान वस्तूचा उपक्षेप

[1] नि उपन्यासः संयुतश्च.

करतो 'हा तो राजा उदयन काय की ज्याला मला द्यावयाचे तातांनी ठरविले आहे?' परंतु या नाटिकेतील 'उद्दामोत्कलिकाम्' इत्यादी वचन ह्या पताकास्थानकाचे उदाहरण नाही. कारण जरी त्यात दोन अर्थांचा बोध होत असला तरी ह्याने कोठेच अर्थाशी सहकारिता केलेली नाही. म्हणून हे वीथीचे अङ्ग जे व्याहार त्याचेच उदाहरण म्हणून योग्य होय.

'काव्यरूपं वा' ही शब्दयोजना समाधानकारक नाही. यातील 'वा' चे काहीच प्रयोजन नाही. श्लोकातील 'काव्ययोजितः' च्या अनुरोधाने 'काव्यरूपेण' असा मूळ पाठ असण्याची शक्यता आहे. – 'शोभनः' ही श्लोकातील 'सुश्लिष्टः' मधील 'सु' शब्दाची व्याख्या आणि 'प्रसादयुक्तः' हे तिचे स्पष्टीकरण. – 'सुष्ठु युक्तः' हे श्लोकातील 'सुयुक्तः' चे विश्लेषण. मुद्रितात 'युक्तः' शब्द नाही. पण तो आवश्यक आहे हे उघड आहे. – 'प्रीत्युत्कर्ष- इ०' संपूर्ण श्लोक असा –

> अस्तापास्तसमस्तभासि नभसः पारं प्रयाते रवा-
> वास्थानीं समये समं नृपजनः सायंतने संपतन् ।
> संप्रत्येष सरोरुहद्युतिमुषः पादांस्तवासेवितुं
> प्रीत्युत्कर्षकृतो दृशामुदयनस्येन्दोरिवोद्वीक्षते ॥१.२३.

'व्याहारस्य' वीथीच्या ह्या अंगाचे लक्षण वर १८.११८ मध्ये केले आहे. त्यावरील टीपेत 'उद्दामोत्कलिकाम्' इत्यादी श्लोक उद्धृत केला आहे. त्या श्लोकात प्रकृताला उपयोगी काही नाही असे अभिनवगुप्ताचे म्हणणे आहे.

यानंतर वडोदे प्रतीत पुढील श्लोक कंसात दिला आहे –

> यत्र सातिशयं वाक्यमर्थोपक्षेपणं भवेत् ।
> विनाशि दृष्टमन्ते च पताकार्धं तु तद्भवेत् ॥

हा श्लोक उघडच प्रक्षिप्त आहे. 'पताकार्ध' असा प्रकार अन्यत्र कोठे निर्दिष्ट नाही.

**चतुष्पताकापरमं नाटके कार्यमिष्यते[1] ।**
**पञ्चभिः संधिभिर्युक्त तांश्च वक्ष्याम्यतःपरम्[2] ॥ ३४ ॥**

नाटकामध्ये कार्य अधिकात अधिक चार पताकास्थानक असलेले व पाच संधींनी युक्त असे असावे. आता यानंतर मी त्या पाच संधींविषयी सांगतो.

**एषामुत्कर्षं दर्शयितुमाह चतुष्पताकापरमामिति । पताकाशब्देन समनन्तरं पताकास्थानमुक्तम् । तैश्चतुर्भिः कृतैः परममुत्कृष्टं नाटके नाट्यविषये कार्य-**

१ नि काव्य-. २ नि पुनः.

मिष्यते । तस्मात्तथा कर्तव्यमित्यर्थः । पताकास्थानकेन हि यल्लेशतः कर्तव्यं तदेकेन क्रियते चतुष्टयेन वा । केचित्त्वाहुः । चतुर्षु संधिषु चत्वारः पताकानायकाः, तेषां यथाक्रमं सूचकानि पताकास्थानानि, प्रथमं मुखसंधौ यावच्चतुर्थमवमर्शसंधाविति । तच्चासत् । पताकाया इव प्रकरीबिन्दुकार्यबीजानामपि सूचकान्तराणि तदानीं वक्तव्यानि स्युः । चत्वारश्च नियमेन पताकानायका भवेयुः । आगर्भादिति च पक्षे चतुष्पताकापरममित्यसंगतं स्यात् । मुख्यनायके चेतिवृत्तसूचकं न लक्षणं कथ्यते, पताकानायके तु कथ्यते, इत्यधरोत्तरमाश्रितं स्यात् । न च मुखसंधावाद्यं द्वितीयं प्रतिमुखसंधावित्यादिक्रमो न्याय्यं लक्ष्ये वा साक्ष्यमाक्षिपति इत्यलमनेन ।

एवमितिवृत्तं व्याख्यातम्, तस्य च भेदद्वयं निरूपितम् । प्रसङ्गादाधिकारिकत्वसिद्धये अनुवृत्तस्थानभूता अवस्थाः पञ्च दर्शिताः, अर्थप्रकृतयश्च, तत्प्रसङ्गादेव पताकास्थानानि । अधुना त्वितिशब्दार्थं प्रयुक्तं पञ्चभिः संधिभिर्युक्तमिति तत्र प्रतिज्ञां करोति तांश्च वक्ष्यामीति ।

ह्या पताकास्थानकांची परमावधी 'चतुष्पताकापरमम्' यात दखवितात. पताका शब्दाने त्यानंतरचे पताकास्थान अभिप्रेत आहे. नाटकात म्हणजे नाट्याच्या संबंधात ते चार योजल्याने परम म्हणजे उत्कृष्ट असे कार्य अपेक्षित आहे. म्हणून त्याप्रमाणे करावे असा अर्थ. कारण, पतकास्थानकाने जे थोडक्यात करावयाचे असते ते एकाने केले जाते किंवा चारांनीं. परंतु काही टीकाकार असे म्हणतात—चार संधींमध्ये चार पताकानायक, त्यांचे क्रमवार सूचक असे चार पताकास्थानक, मुखसंधीत पहिले ते अवमर्शसंधीत चौथे याप्रमाणे. पण हे चूक आहे. तसे असेल तर पताकेप्रमाणेच प्रकरी, बिन्दु, कार्य आणि बीज यांचे सुद्धा दुसरे सूचक सांगावे लागतील. आणि पताकानायक नियमाने चार होतील. शिवाय, 'आ गर्भात्' हा पर्याय स्वीकारल्यास 'चतुष्पताकापरमम्' याची संगती लागणार नाही. आणि मुख्य नायकाच्या संबंधात इतिवृत्ताचे सूचक चिह्न सागितले नाही, पण पताकानायकाच्या संबंधात ते सांगितले आहे, असा उलटा प्रकार अवलंबिल्यासारखे होईल. आणि मुखसंधीत पहिले, प्रतिमुखसंधीत दुसरे इत्यादी क्रम युक्तियुक्तता किंवा पताकास्थानकाच्या बाबतीत साक्ष्य दाखवीत नाही. तेव्हा हे इतके पुरे.

याप्रमाणे इतिवृत्ताची व्याख्या करून त्याच्या दोन प्रकारांचें निरूपण केले आहे. त्या प्रसंगाने आधिकारिकत्व सिद्ध करण्यासाठी अनुवृत्ताच्या स्वरूपाच्या असलेल्या पाच अवस्था, तसेच अर्थप्रकृती आणि त्या निमित्ताने पताकास्थानक यांचे वर्णन केले आहे. आता इति शब्दाचा अर्थ सांगण्यासाठी 'पाच संधींनी युक्त' असे म्हटले होते, त्यासंबंधी 'तांश्च वक्ष्यामि' या शब्दांत प्रतिज्ञा करतात.

'पताकाशब्देन' मुळात 'चतुष्पताकाशब्देन' आहे. त्यातील 'चतुष्' चुकीने पुनरुक्त झाले आहे. – 'पताकास्थानकेन' ही मुळातील 'पताकानायकेन' ची दुरुस्ती आहे. एक ते चार हे पताका-स्थानकासंबंधी विधान आहे, पताकानायकासंबंधी नाही. – 'केचित्त्वाहुः' हा पाठ हस्तलिखितातील 'केनचित्त्वाहुः' वरून दुरुस्त केला आहे. मुद्रित पाठ 'केचिदित्याहुः' आहे. – 'तदानीं' हा शब्द मुद्रितात नाही. तो मुद्रणदोषाने गहाळ झाला असण्याचा संभव आहे. – 'आ गर्भात् इ०' वरील २८ व्या श्लोकातील पहिला पर्याय स्वीकारला तर अवमर्शात पताकाच असणार नाही. मग तिचे सूचक पताकास्थानक कोठून असणार? –'लक्षणं' हा शब्द येथे चिह्न या अर्थी वापरला आहे. म्हणून मुद्रितातील 'लक्षणतः' हा पाठ मूळ असण्याची शक्यता कमी. – 'क्रमो न्यायं' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'क्रमे न्यायो' आणि मुद्रितात 'क्रमो न्याये' असे आहे. 'आक्षिपति' ला 'क्रमः' असा प्रथमान्त कर्ता आवश्यक आहे. आणि 'न्यायम्' असे त्याचे एक कर्म व 'साक्ष्यम्' हे दुसरे अशा प्रकारे अर्थ अधिक संगतवार लागतो. 'न्याय' म्हणजे युक्तियुक्तता. – 'लक्ष्ये' म्हणजे ज्याचे लक्षण करावयाचे ते, प्रस्तुत संदर्भात पताकास्थानक. – 'साक्ष्यम्' म्हणजे प्रत्यक्ष नाटकांतील उदाहरणांची साक्ष.

'अनुवृत्त-' ही 'अनुवृत्ति-' ची सुचविलेली दुरुस्ती आहे. अनुवृत्ति शब्द अवस्थांच्या वर्णनपर असण्याचा संभव कमी. अनुवृत्त म्हणजे इतिवृत्ताचा अंश असा अर्थ संभाव्य आहे. – 'इतिशब्दार्थे' यातील 'इति' शब्द इतिवृत्त शब्दातील. – 'पञ्चभिः संधिभिः' हे ह्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकात आहे.

**मुखं प्रतिमुखं [1]चैव गर्भो विमर्श एव च।**
**तथा निर्वहणं [2]चेति नाटके पञ्च संधयः ॥ ३५॥**

मुखसंधी, प्रतिमुखसंधी, गर्भसंधी, विमर्शसंधी आणि निर्वहणसंधी असे हे नाटकातील पाच संधी होत.

**अथ निर्णिनीषुरुद्देशं तावदाह मुखं प्रतिमुखं चैवेति। समुच्चयपदैः पञ्चानां सर्वत्रावश्यंभावित्वं द्योतितम्। नियमवाचिभिः क्रमनियमः। नाटक इत्यभिनेयरूपक इत्यर्थः। महावाक्यार्थरूपस्य रूपकस्य पञ्चांशा अवस्थाभेदेन कल्प्यन्ते, तत्र मुखस्य स्वतन्त्रस्येतिवृत्ते समाप्तप्रयोजनस्यात एव नायकशब्दवाच्यस्य स्वमुखेन परद्वारेण चोपक्षिप्तः, या प्रारम्भावस्था प्रथमा व्याख्याता तदुपयोगी, यावानर्थराशिः स मुखसंधिः। तस्यार्थराशेरवान्तरभागा उपक्षेपाद्यानि संध्यङ्गानि। एवमन्येषु संधिषु वाच्यम्। तेनार्थावयवाः संधीयमानाः परस्परमङ्गैश्च संधय इति समाख्या निरुक्ता। तदेषां सामान्यलक्षणम्।**

१ नि गर्भो विमर्शश्च तथैव हि. २ का चैव संधयो नाटके स्मृताः.

आता संधींच्या स्वरूपाचा निर्णय करण्याच्या हेतूने प्रथम 'मुखं प्रतिमुखं चैव' इत्यादीत नामनिर्देश करतात. समुच्चयवाचक 'च' शब्दांनी पाचही संधी सर्वत्र अवश्य असले पाहिजेत हे सुचविले आहे. आणि नियमवाचक 'एव' शब्दांनी क्रमाचा नियम सूचित केला आहे. नाटकात म्हणजे अभिनय करण्यास योग्य अशा रूपकात असा अर्थ आहे. मोठ्या वाक्याच्या अर्थाच्या स्वरूपाच्या रूपकात अवस्थांच्या भेदांमुळे पाच भाग कल्पिले जातात; त्यांपैकी मुखाचा म्हणजे स्वतंत्र, कथानकात ज्याचे प्रयोजन सिद्ध होते त्याचा, म्हणून नायक म्हणून जो ओळखला जातो त्याचा, स्वतःच्या मुखाने तसेच इतरांच्या द्वारा उपक्षिप्त झालेला, प्रारम्भावस्था म्हणून जी पहिली अवस्था सांगितली आहे तिला उपयोगी असा जो संपूर्ण अर्थसमूह तो मुखसंधि. त्या अर्थसमूहाचे अवान्तर भाग म्हणजे उपक्षेप आदी संध्यंगे. असेच दुसऱ्या संधींच्या बाबतीत समजावे. म्हणून अर्थाचे परस्पर आणि अंगांशी सांधले जाणारे अवयव ते संधी अशी ह्या नावाची व्युत्पत्ती. ते यांचे सामान्य लक्षण.

'मुखस्य' यातील व पुढील शब्दांतील षष्ठीचा संबंध 'अर्थराशिः' शी जोडावयाचा आहे. आणि मुख शब्दाचा अर्थ कथानकात ज्याचे कार्य सिद्ध होते तो नायक असा केला आहे. स्वतन्त्र हे नायकाचे विशेषण. – 'समाप्तप्रयोजनस्य' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'समतिस्तंप्रयोजनस्य' असा भ्रष्ट पाठ आहे. मुद्रित पाठ 'समस्त-' आहे. पण समस्त शब्द विशेष समर्पक नाही. – 'नायकशब्दवाच्यस्य' ही हस्तलिखितातील 'नायकशब्दस्य' ची दुरुस्ती आहे. मुद्रितात केवळ 'नायकस्य' आहे. – 'चोपक्षिप्तः' हे शब्द मुळात नाहीत. पण 'अर्थराशिः' च्या विशेषणपर 'उपक्षिप्तः' किंवा तत्सदृश शब्द अर्थासाठी आवश्यक आहे. अन्यथा 'स्वमुखेन' व 'परद्वारेण' यांतील तृतीयेचा अर्थ लावणे कठीण आहे. मुद्रितात या ठिकाणी फक्त 'वा' आहे. पण येथे विकल्प संभाव्य नाही. नायकाच्या स्वतःच्या उक्ती आणि इतरांच्या उक्ती मिळून अर्थराशि होतो. म्हणून 'च' आवश्यक आहे. – 'अवान्तरभागा उप-' ही दुरुस्ती आहे. मुद्रितात '-भागान्युप-' आहे. पण भाग शब्द पुल्लिंगी आहे. हस्तलिखितात '-भावानुप-' असे आहे. पण भाव हा शब्द आणि त्याचे द्वितीयेचे रूप दोन्ही संभाव्य नाहीत. – 'तत्' म्हणजे 'परस्परम् अङ्गैश्च संधीयमानाः अर्थावयवाः' हे संधीचे सामान्य लक्षण.

या श्लोकानंतर बडोदे प्रतीत पुढील श्लोक कंसात दिला आहे –

**पञ्चभिः संधिभिर्युक्तं प्रधानमनु कीर्त्यते ।**
**शेषाः प्रधानसंधीनामनुग्राह्यनुसंधयः ॥**

हा श्लोक बऱ्याच हस्तलिखितांत आढळतो. पण तो मूळ असण्याचा संभव नाही. अभिनवगुप्ताला तो अवगत नाही.

यत्र बीजसमुत्पत्तिर्नानार्थरससंभवा ।
काव्ये शरीरानुगता[1] तन्मुखं परिकीर्तितम् ॥ ३६ ॥

ज्यात विविध प्रयोजनांच्या अनुरोधाने रसोत्पत्ती करीत करीत काव्याच्या कथानकाचे बीज निर्माण होते तो मुखसंधी असे म्हणतात.

तत्रैषां क्रमेण विशेषलक्षणमाह यत्र बीजसमुत्पत्तिरिति । प्रागारम्भभावित्वान्मुखमिव मुखमिति यावत् । यावत्यर्थभागराशौ बीजस्य मुख्योपायस्य सम्यगुत्पत्तिः शरीरेण प्रारम्भात्मना अनुगता भवति । नानाभूतोऽर्थवशात्प्रसङ्गायातो रससंभवो यस्याम् । एतदुक्तं भवति । प्रारम्भोपयोगी यावानर्थराशिः प्रसक्तानुप्रसक्त्या विचित्रास्वाद आपतितः तावान्मुखसंधिः, तदभिधायी च रूपकैकदेशः । यथा रत्नावल्यां प्रथमोऽङ्कः । तथा हि अमात्यस्य वीरः, वत्सराजस्य शृङ्गाराद्भुतौ, इति इयानयं सागरिकाया राजदर्शनेऽमात्यप्रारम्भविषयीकृतेऽर्थराशिरुपयोगीति मुखसंधिः । एवं प्रतिसंधि वक्तव्यम् ।

'यत्र बीजसमुत्पत्तिः' इत्यादीपासून ह्या संधींची विशेष लक्षणे सांगतात. प्रथम सुरुवातीला असल्यामुळे मुखासारखा म्हणून मुखसंधि असा अभिप्राय. जेवढ्या अर्थभागाच्या राशीमध्ये बीजाची म्हणजे मुख्य उपायाची योग्य प्रकारे उत्पत्ती प्रारंभस्वरूप शरीराने युक्त अशी होते. नाना प्रकारचा अर्थाच्या अनुरोधाने म्हणजे प्रसंगानुरूप झालेला रसांचा संभव जिच्यात आहे अशी उत्पत्ती. याचा अर्थ असा. प्ररम्भावस्थेला उपयोगी पडणारा जेवढा अर्थराशि कमीअधिक संबंधामुळे विविध प्रकारच्या आस्वादास योग्य होतो तेवढा मुखसंधि, आणि तो कथन करणारा रूपकाचा भाग सुद्धा मुखसंधि. उदाहरणार्थ रत्नावलीतील पहिला अंक. तेथे अमात्य यौगन्धरायणाचा वीररस, वत्सराजाचे शृङ्गार आणि अद्भुत रस एवढा हा अमात्याच्या प्रारंभाचा विषय झालेल्या, सागरिकेला होणाऱ्या राजाच्या दर्शनाला उपयोगी होणारा अर्थराशि म्हणजे मुखसंधि. याचप्रमाणे प्रत्येक संधीच्या बाबतीत समजावे.

'मुखमिति यावत्' यातील 'इति' शब्द मुळात नाही. पण अन्वय स्पष्ट होण्यासाठी तो आवश्यक वाटतो. – 'यावत्यर्थभागराशौ' हस्तलिखितात येथील पाठ भ्रष्ट आहे. मुद्रितात 'क्रियावत्यर्थ-' असे आहे. पण 'क्रियावति' असा मूळ शब्द असण्याचा संभव कमी. श्लोकातील 'काव्ये' शब्दाचा अर्थ करताना क्रियेचा निर्देश अप्रस्तुत आहे. – 'मुख्योपायस्य' हा हस्तलिखितातील पाठच बरोबर आहे, मुद्रितातील 'मुखोपायस्य' हा नाही. बीजाला मुख्य उपाय असे म्हटलेलेच

१ का नुगतं.

आहे. – 'सम्यगुत्पत्तिः' हे 'समुत्पत्तिः' चे विश्लेषण. – 'यस्याम्' ही मुळातील 'यः स्यात्' ची दुरुस्ती आहे. 'समुत्पत्तिः' चे विशेषण असलेल्या बहुव्रीहि समासाचा विग्रह करून दाखविला आहे हे उघड आहे. आणि 'यः स्यात्' चा नीट अन्वय होण्यासारखाही नाही. – 'प्रसक्तानुप्रसक्त्या' याचा अर्थ काही काव्यांश अथवा रस प्रधानत्वाने असतात, तर काही आनुषंगिक अथवा गौण रूपाचे असा दिसतो. त्यामुळे आस्वादात विचित्रता येते. – 'अमात्यस्य वीरः' हा वीररस कर्तव्यपालनरूप धर्मवीर असावा. – 'शृङ्गाराद्भुतौ' ह्या अंकात उदयनाच्या वासवदत्ताविषयक प्रेमाचा आविष्कार आहे. आणि त्याची मदनाच्या स्वरूपात पूजा केली जाते यात अद्भुतरस मानलेला दिसतो. यानंतर हस्तलिखितात 'शृङ्गारः' व मुद्रितात 'ततः शृङ्गारः' एवढे अधिक आहे. ते मूळ असण्याची शक्यता कमी. सागरिकेचा शृङ्गार येथे आविष्कृत झालेला नाही. आणि 'सागरिकायाः' ह्या शब्दाचा संबंध 'राजदर्शने' शी आहे

**बीजस्योद्घाटनं यत्र[1] दृष्टनष्टमिव क्वचित् ।**
**मुखन्यस्तस्य[2] सर्वत्र तद्वै प्रतिमुखं स्मृतम्[3] ॥ ३७ ॥**

मुखसंधीमध्ये उपक्षेपित झालेल्या बीजाचे कधी दृश्य तर कधी अदृश्य झाल्यासारखे असे अनुसंधान ज्यात सगळीकडे केले जाते त्याला प्रतिमुखसंधी म्हणतात.

बीजस्योद्घाटनं यत्रेति । कार्यतया दृष्टं कारणतया नष्टमिति केचित् । उपादेये दृष्टं हेये नष्टमिति केचित् । नायकवृत्ते दृष्टं प्रतिनायकेतिवृत्ते नष्टमित्यपरे । न चैतत्समञ्जसम्, एकविषयतामन्तरेण संधानायोगात् । नाशस्यापि च हेयादिविषयस्य प्रारम्भवशेन दृष्टतयैव संग्रहसंपत्तेः । तस्मादयमर्थः । बीजस्योद्घाटनं तावत् फलानुगुणो दशाविशेषः । तद्दृष्टमपि विरोधिसंनिधेर्नष्टमिव, पांसुना पिहितस्येव बीजस्याङ्कुररूपमुद्घाटनम् यथा वेणीसंहारे कञ्चुकिवचनम् –

आशस्त्रग्रहणादकुण्ठपरशोस्तस्यापि जेता मुने-
स्तापायास्य न पाण्डुसूनुभिरयं भीष्मः शरैः शायितः ।
प्रौढानेकधनुर्धरारिविजयश्रान्तस्य चैकाकिनो
बालस्यायमरातिलूनधनुषः प्रीतोऽभिमन्योर्वधात् ॥

अत्र पाण्डवाभ्युदयस्य मुखोपक्षिप्तस्योद्घाटनं भीष्मवधाद्दृष्टमभिमन्युवधान्नष्टमिति वेदिव्यतमिति केचित् । तदा चार्थो न संगमितः स्यात् । दृष्टतैव प्रतिमुख उपयोगिनी नष्टता त्ववमर्श एवेति केचिदुत्तरोत्तरविकासतारतम्यं दृष्टनष्टत्वमाहुः । पूर्वावस्था हि दृष्टाप्युत्तरदृष्टविकासापेक्षया नष्टा, एवं संमृष्टोपमविकासा उत्तरा-

१ नि यत्तु. २ का मुखे न्यस्तस्य. ३ का भवेत्.

पेक्षयेति मन्यन्ते । अत्रापि इवार्थो न संगच्छत एव, न कार्यजननं शक्यम् । तस्मादयमत्रार्थः । दृष्टं नष्टमिव कृत्वा तावन्मुखे न्यस्तं भूमाविव बीजममात्येन सागरिकाचेष्टितं वसन्तोत्सवकामदेवपूजादिना तिरोहितं नष्टमिव । सागरिकाचेष्टितस्य हि बीजस्येव तदाच्छादकमप्युत्सवादिरूपं भूमिरिव प्रत्युद्बोधकम् । तस्य दृष्टनष्टतुल्यं कृत्वा न्यस्तस्य अत एव कुङ्कुमबीजस्य यदुद्घाटनं तत्कल्पं यत्रोद्घाटनं सर्वत्रैव कथाभागसमूहे तत्प्रतिमुखम्, प्रतिराभिमुख्येन यतोऽत्र वृत्तिः । पराङ्मुखता हि दृष्टनष्टकल्पनानिदर्शनम् । रत्नावल्यां 'परप्पेसणदूसिदं वि मे सरीरं एतस्स दंसणेण अज्ज मे बहुमदं संवुत्तं' इत्यादिसागरिकोक्तेरनङ्गाङ्कात्सुसंगताराचितराजतत्समागमपर्यन्तं काव्यं द्वितीयाङ्कगतं प्रतिमुखसंधिः उद्घाटितत्वाद्बीजस्य । स्तोकमात्रं तु शङ्कादिभिरुदाहृतं यत् तदेकदेशोपलक्षणमिति द्रष्टव्यम् ।

'बीजस्योद्घाटनं यत्र' इत्यादी. कार्यस्वरूपात दृष्ट, कारणस्वरूपात नष्ट असे काहींचे मत. ग्रहण करण्यास योग्य गोष्टींच्या बाबतीत दृश्य, त्याज्य गोष्टींच्या बाबतीत नष्ट असे काहींचे मत. नायकाच्या वृत्तासंबंधात दृश्य, प्रतिनायकाच्या इतिवृत्तासंबंधात नष्ट असे इतरांचे मत. पण हे सर्व बरोबर नाही; कारण, एक विषयासंबंधी असल्याशिवाय दृष्ट व नष्ट यांना एकत्र जोडणे अयोग्य ठरेल. आणि त्याज्य वगैरे गोष्टींचा नाश सुद्धा प्रारंभीच असल्याकारणाने दृश्य अवस्थेतच समाविष्ट करणे उत्तम होईल. म्हणून अर्थ पुढीलप्रमाणे आहे. बीजाचे उद्घाटन म्हणजे फलोत्पत्तीला अनुरूप अशी विशिष्ट दशा. ते दृष्ट असले तरी विरोध करणारी गोष्ट जवळ असल्यामुळे नष्ट झाल्यासारखे, मातीने झाकलेल्या बीजाच्या प्रमाणे अंकुराच्या स्वरूपात उद्घाटन. उदाहरणार्थ, वेणीसंहार नाटकात कंचुकीचे पुढील वचन—'शस्त्रधारण करण्यास प्रारम्भ केल्यापासून ज्याचा परशू अकुंठित राहिला त्या मुनीला सुद्धा जिंकणारा हा भीष्म पाण्डवांनी शरांनी जमिनीवर आडवा केला त्याचे ह्या दुर्योधनाला दुःख झाले नाही. आणि अनेक मोठ्या धनुर्धर शत्रूंवर विजय मिळविल्यामुळे दमलेल्या व शत्रूने धनुष्याची दोरी तोडली असताना एकाकी अशा बाल अभिमन्यूच्या वधाने ह्याला आनंद झाला आहे.' या ठिकाणी मुखसंधीत उपक्षिप्त झालेले पांडवांचा अभ्युदयरूपी बीज भीष्मवधामुळे दृश्य तर अभिमन्युवधामुळे नष्ट असे समजावे असे काहींचे मत. पण त्यात अर्थाची संगती होणार नाही. प्रतिमुखसंधीत फक्त दृश्यताच उपयोगी आणि नष्टता अवमर्शसंधीतच याप्रमाणे दृष्टनष्टत्व म्हणजे उत्तरोत्तर होणाऱ्या विकासातील कमीअधिकपणा असे काहींचे म्हणणे आहे. कारण पूर्वीची अवस्था दृश्य असली तरी नंतर दिसणाऱ्या विकासाशी तुलनेने नष्टच म्हणजे नंतरच्या अवस्थेच्या मानाने विकास दबल्यासारखा असलेली अशी असते असे ते

मानतात. ह्या व्याख्येत सुद्धा 'इव' शब्दाच्या अर्थाची संगती लागतच नाही, आणि कार्याची उत्पत्ती शक्य होणार नाही. तेव्हा ह्या श्लोकाचा अर्थ असा. भूमीत बीज टाकावे त्याप्रमाणे अमात्याने मुखसंधीत दृश्य असूनही नष्ट झाल्यासारखे असे उपक्षिप्त केलेले, सागरिकेच्या चेष्टिताच्या स्वरूपाचे बीज वसन्तोत्सव, कामदेवाची पूजा इत्यादींनी तिरोधान पावले असता नष्ट झाल्यासारखे आहे. कारण, सागरिकेच्या चेष्टिताला उत्सवादी स्वरूपाच्या झाकून टाकणाऱ्या गोष्टी असल्या तरी त्या गोष्टीच भूमी बीजाचे उद्बोधन करते त्याप्रमाणे त्या चेष्टिताचे उद्बोधन करतात. दृश्य असता नष्ट अशासारखे करून उपक्षिप्त केलेल्या बीजाचे, म्हणूनच कुङ्कुमबीजाचे उद्घाटन होते त्यासारखे, उद्घाटन ज्या कथाभागाच्या समूहात सर्वत्र होते तो प्रतिमुखसंधि, कारण यात प्रति म्हणजे आभिमुख्याने अस्तित्व असते. पराङ्मुख असणे हेच दृष्टनष्ट ह्या कल्पनेचे निदर्शन. रत्नावलीत 'दुसऱ्याची सेवा करण्याने दूषित झालेले असले तरी हे माझे शरीर ह्याच्या दर्शनाने अतीव माननीय झाले आहे' इत्यादी पहिल्या अंकातील सागरिकेच्या उक्तीपासून सुसंगतेने घडवून आणलेल्या राजाच्या व तिच्या समागमापर्यंतचा दुसऱ्या अंकातील काव्यभाग हा प्रतिमुखसंधि, कारण त्यात बीजाचे उद्घाटन झाले आहे. परंतु शंकुक आदींनी जे याचे थोडकेच उदाहरण दिले आहे ते एका अंशाचे उपलक्षण आहे असे समजावे.

'एकविषयताम्' मुद्रित पाठ 'एकविषयम्' आहे. पण भाववाचक नाम अधिक योग्य. 'संधानायोगात्' दृष्ट आणि नष्ट यांचा समास केल्यामुळे ते एकत्र जोडले गेले आहेत. तेव्हा त्या दोहोंचा विषय एकच असणे आवश्यक आहे, कारण-कार्य, उपादेय-हेय, नायक-प्रतिनायक असे भिन्न भिन्न मानणे योग्य नाही. – 'नाशस्यापि इ०' याचा अर्थ असा की हेय वगैरे नष्ट असे मानले आहे, पण त्यांची सुद्धा प्रारंभावस्था दृश्य स्वरूपात असल्याशिवाय त्यांचा बोध सुद्धा होणार नाही. – 'तस्मादयमर्थः' हा पुढे दिलेला अर्थ अभिनवगुप्ताचा नसून दुसऱ्या प्राचीन टीकाकारांचा विस्ताराने उद्धृत केला आहे. – 'नष्टमिति वेदिव्यमिति' ही मुळातील 'नष्टमत्रापि वेदितमिति' ची दुरुस्ती आहे. अर्थबोधास ती आवश्यक आहे हे उघड आहे. – 'चार्थः' म्हणजे 'च शब्दाचा अर्थ' असे समजता येण्यासारखे आहे आणि हा 'च' 'दृष्टं च तत् नष्टं च' ह्या समासविग्रहातील अभिप्रेत आहे असेही मानता येईल. तथापि श्लोकात साक्षात 'च' नसल्यामुळे येथे 'च' अव्ययरूपातच वापरले असावे. ह्या टीकाकारांच्या मतावर घेतलेला आक्षेप पूर्वीसारखाच आहे. – 'संमृद्योपमविकासा' ही मुळातील '-विकास (=विकासः)' ची दुरुस्ती आहे. 'पूर्वावस्था'चे हे विशेषण मानणे आवश्यक आहे. 'संमृष्ट' म्हणजे घासून घासून नष्ट केलेला. – 'मन्यन्ते' ही 'मन्यते'ची दुरुस्ती आहे. 'केचित्' संबंधी हे विधान असल्यामुळे बहुवचन आवश्यक आहे. – 'इवार्थः' म्हणजे श्लोकात वापरलेल्या 'इव' शब्दाचा अर्थ. – 'न कार्यजननं शक्यम्' मुळात 'शक्यम्' ऐवजी 'शक्त्या' आहे. पण त्याने काही अर्थबोध होत नाही. सुचविलेल्या दुरुस्तीनेही अर्थ विशेष स्पष्ट होत नाही. असा अर्थ संभवनीय दिसतो की अगोदरची अवस्था नष्टप्राय होते असे मानले तर तिच्यापासून अपेक्षित असलेले कार्य निष्पन्नच होणार नाही. वाक्यात 'न' नंतर 'च' किंवा 'वा' अपेक्षित आहे. – 'सागरि-

काचेष्टितम्' हे बीज. यात सागरिकेच्या संबंधात घडलेल्या घटना मुख्यत्वेकरून अभिप्रेत आहेत. त्या बीजाचे 'प्रत्युद्बोधन' होते ते तिच्या स्वतःच्या चेष्टिताच्या रूपात. – 'वृत्तिः' म्हणजे बीजाचे अस्तित्व. 'पराङ्मुखता' मुखसंधीत असते, कारण बीज तेथे दृष्टनष्ट असल्यासारखे असते. प्रतिमुख-संधीत 'अभिमुखता' असते, कारण बीजाचे तेथे उद्घाटन होते. अभिनवगुप्ताने 'दृष्टनष्टमिव' चा अन्वय 'मुखन्यस्तस्य' शी लावला आहे. – 'अनङ्गाङ्कात्' रत्नावलीतील पहिल्या अंकाला हे नाव दिलेले आहे, कारण त्यात कामदेवाच्या पूजेचे वर्णन आहे. – 'स्तोकमात्रम्' शङ्कुकाने कोणते थोडकेच उदाहरण दिले होते ते समजण्यास मार्ग नाही. – '-उपलक्षणम्' मुद्रित पाठ '-लक्षणम्' आहे. तो विशेष समर्पक नाही.

**उद्भेदस्तस्य बीजस्य प्राप्तिरप्राप्तिरेव वा ।**
**पुनश्चान्वेषणं यत्र स गर्भ इति संज्ञितः ॥ ३८ ॥**

ज्यात त्या बीजाची वाढ, त्याची प्राप्ती अथवा अप्राप्ती आणि त्याचा पुन्हा शोध या गोष्टी असतात त्याला गर्भसंधी अशी संज्ञा आहे.

**उद्भेद इति । तस्येति उत्पत्त्युद्घाटनदशाद्वयाविष्टस्य बीजस्य यत्रोद्भेदः फलजननाभिमुखत्वं स गर्भः । उद्भेदमेव विवृणोति प्राप्तिरित्यादिना । प्राप्ति-र्नायकविषया, अप्राप्तिः प्रतिनायकचरिते, पुनश्चान्वेषणमित्युभयसाधारणम् । अन्ये तु वीररौद्रविषय एवैतस्यार्थस्य भावादव्याप्तित्वादेवमाहुः । प्राप्तिरप्रा-प्तिरन्वेषणमित्येवंभूताभिरवस्थाभिः पुनः पुनर्युक्तो गर्भसंधिः, प्राप्तिसंभवाख्य-यावस्थया युक्तत्वेन फलस्य गर्भीभावात् । तथा हि रत्नावल्यां द्वितीयेऽङ्के 'अदक्खिणा दाणिं तुमं जा एव्वं भट्टिणा हत्थेणं गहीदा वि कोवं ण मुंचेसि' इत्यादौ प्राप्तिः । पुनर्वासवदत्ताप्रवेशेऽप्राप्तिः । तृतीयेऽङ्के 'तद्वृत्तान्तान्वेषणाय गतश्चिरयति वसन्तकः' इत्यन्वेषणम् । विदूषकः 'ही ही भोः कोसंबीरज्जलंभेण वि ण तारिसो पिअवअस्सस्स परितोसो जारिसो मम सआसादो पिअवअणं सुणिअ भविस्सदि' इत्यादौ प्राप्तिः । पुनर् 'इह तदप्यस्त्येव बिम्बाधरे' इति, 'किं अवरं' इति अप्राप्तिर्वासवदत्ताप्रत्यभिज्ञानात् । पुनः सागरिकायाः संकेत-स्थानागमने अन्वेषणम् । पुनर्लतापाशकरणे प्राप्तिः, इत्येवं गर्भः । अप्राप्त्यं-शश्चात्रावश्यंभावी । अन्यथा हि संभावनात्मा प्राप्तिसंभवः कथम्, निश्चय एव हि स्यात् । अवमर्शे त्वप्राप्तेरेव प्रधानता प्राप्त्यंशस्य च न्यूनतेति विशेषः ।**

'उद्भेद' इत्यादी. त्याचा म्हणजे उत्पत्ती आणि उद्घाटन या दोन अवस्थांनी युक्त असलेल्या बीजाचा ज्यात उद्भेद म्हणजे फलोत्पत्तीकडे अभिमुखता असते तो गर्भसंधि. उद्भेदाचेच विवरण 'प्राप्तिः' इत्यादीत करतात. प्राप्ति नायकाच्या संबंधात, अप्राप्ति प्रतिनाय-

काच्या चरितात आणि पुन्हा अन्वेषण दोघांच्या बाबतीत समान. परंतु हा अर्थ वीर आणि रौद्र रसांच्या विषयालाच लागू पडणारा असल्यामुळे त्यात अव्याप्तिदोष आहे; म्हणून दुसरे टीकाकार पुढीलप्रमाणे व्याख्या करतात. प्राप्ति, अप्राप्ति आणि अन्वेषण अशा प्रकारच्या अवस्थांनी पुन्हा पुन्हा युक्त होतो तो गर्भसंधि; कारण प्राप्तिसंभव नावाच्या अवस्थेने फल युक्त होत असल्यामुळे ते गर्भरूप होते. उदाहरणार्थ, रत्नावलीत दुसऱ्या अंकात सुसंगतेच्या 'तुला मुळीच सभ्यता नाही; राजाने हातात हात घेतला असताही तू अद्याप राग सोडून देत नाहीस' इत्यादी वचनात प्राप्ति आहे. पुन्हा वासवदत्तेच्या प्रवेशाने अप्राप्ति होते. तिसऱ्या अंकात 'तिची बातमी काढावयास गेलेल्या वसन्तकाला खूप उशीर झाला आहे' या राजाच्या उक्तीत अन्वेषण आहे. विदूषकाच्या 'आहा! कौशाम्बीच्या राज्याच्या प्राप्तीने सुद्धा प्रियवयस्याला जितका आनंद झाला नसेल तितका आनंद माझ्याकडून प्रिय वचन ऐकल्यावर होईल' ह्या वचनात प्राप्ति. पुन्हा 'ते सुद्धा येथे तुझ्या बिम्बाधरात आहेच' आणि 'दुसरे काय' या प्रसंगात अप्राप्ति, कारण येथे वासवदत्तेची ओळख पटते. पुन्हा सागरिका संकेतस्थानी येते तेव्हा अन्वेषण. पुन्हा ती लतापाश करते तेव्हा प्राप्ति. याप्रमाणे गर्भसंधि. अप्राप्तीचा अंश ह्यात अवश्य असतो. कारण, एरव्ही संभाव्यतेच्या स्वरूपाचा प्राप्तिसंभव त्यात कसा असेल? निश्चयच होइल. परंतु अवमर्शात अप्राप्तीच प्रधान असते, प्राप्तीचा अंश कमी असतो.

'-भिमुखत्वं' मुद्रित पाठ '-भिमुख्यत्वं' आहे. तो योग्य नाही. अभिमुखताच अपेक्षित आहे. – 'उद्भेदमेव' मुद्रितात 'एवं' आहे. पण 'एव' च अधिक समर्पक आहे. – 'प्रतिनायकचरिते' म्हणजे प्रतिनायकाच्या कृत्यांमुळे नायकाला होणारी फलाची प्राप्ती त्या वेळेस होत नाही. – 'पुनः पुनर्युक्तो' मुद्रितात 'युक्तो' च्या पूर्वी 'भवन्तीभिः' शब्द अधिक आहे. पण तो आवश्यक आहे असे नाही. – 'इह तदप्य- इ०' संपूर्ण श्लोक पुढीलप्रमाणे आहे –

**किं पद्मस्य रुचं न हन्ति नयनानन्दं विधत्ते न किं**
**वृद्धिं वा झषकेतनस्य कुरुते नालोकमात्रेण किम् ।**
**वक्त्रेन्दौ तव सत्ययं यदपरः शीतांशुरुज्जृम्भते**
**दर्पः स्यादमृतेन चेदिह तदप्यस्त्येव बिम्बाधरे ॥** ३.१३.

हा श्लोक राजाने सागरिकेला उद्देशून उच्चारला आहे. परंतु त्यावेळेस तेथे सागरिका नसून वासवदत्ता उपस्थित झालेली असते. – 'किं अवरं' हस्तलिखितात येथे 'अस्ताम् । नवरं' असा भ्रष्ट पाठ आहे. ही वासवदत्ता आहे असे कळल्यावर राजाने विदूषकाला 'हे काय?' असे विचारले, त्यावर विदूषकाची ही उक्ती आहे. – 'अवमर्शे त्वप्राप्तेरेव इ०' संपादकांनी एका टीपेत असे सुचविले आहे की ह्या वाक्यात 'अप्राप्तेः' च्या जागी 'प्राप्तेः' आणि 'प्राप्त्यंशस्य' च्या जागी 'अप्राप्त्यंशस्य' असे मूळ पाठ असावेत. कारण गर्भापेक्षा अवमर्शात प्राप्तीची शक्यता अधिक वाढलेली असते. पण ही सूचना अस्वीकार्य आहे हे पुढील श्लोकावरील टीकेवरून स्पष्ट होईल.

गर्भनिर्भिन्नबीजार्थो[1] विलोभनकृतो[2]ऽथ वा ।
क्रोधव्यसनजो वापि स विमर्श इति स्मृतः ॥ ३९ ॥

विलोभनामुळे किंवा क्रोधामुळे किंवा व्यसनामुळेही बीजाचे कार्य गर्भातून बाहेर फुटून येते तेव्हा तो विमर्शसंधि होय असे समजतात.

गर्भनिर्भिन्नबीजार्थ इति । केचिद्विमर्श इति पठन्ति अन्येऽवमर्श इति । तत्र संदेहात्मको विमर्शः । ननु पूर्वः संभावनाप्रत्यय ततः संशय इति नेदमुचितम् । संशयनिर्णयान्तरालवर्तिनं हि तर्कं तार्किकाः प्राहुः । किं च विमर्शसंधिर्नियतफलप्राप्त्यवस्थया व्याप्तः, तच्च नियतत्वं संदेहश्च किमेतत् । अत्राहुः। तर्कानन्तरमपि हेत्वन्तरवशाद् व्याप्तिरूपतापराकरणे संशयो भवन् किं न भवति । इहापि च निमित्तबलात्कुतश्चित् संभावितमपि फलं यदा बलवता प्रत्यूह्यते कारणानि च बलवन्ति भवन्ति तदा जनकविघातकयोस्तुल्यबलत्वात्कथं न संदेहः । तुल्यबलविरोधकविधीयमानवैधुर्यव्याधूननसंधीयमानस्फारफलावलोकनायां च पुरुषकारः सुतरामुद्धुरकन्धरभिवतीति तर्कानन्तरमत्र संशयस्ततो निर्णय इत्येतदेवोचिततरम् । तथाहि पुरुषकारशालिन एव श्लाघ्यन्ते अद्भुतमद्भुतम्, प्राणसंदेहादपि अनेनात्मा समुत्तारितः, यत्र संभावनापि नाभवत् । यत एव चान्यप्रयत्नतो विधुरप्रयत्नतो वा उपनिपातः तत एव पुरुषकारोद्यतः पुमानपि जिगीषागर्भत्वेन प्रोद्यमं भजतीति तदाशयेन नियता फलप्राप्तिरुच्यते । श्रेयांसि बहुविघ्नानीति पश्यन् तदत्र मया विघ्नापसारणं कर्तव्यमिति साभिमानं स्वमुद्योगं सहस्रगुणीकुरुते । तथाहि सागरिकाबन्धनेऽपि महामात्यप्रयुक्तमैन्द्रजालिकवृत्तं सुनिपुणमुपनिबद्धम् ।

'गर्भनिर्भिन्नबीजार्थः' इत्यादी. कोणी 'विमर्शः' असा पाठ स्वीकारतात, तर इतर 'अवमर्शः' असा. त्यात विमर्श संदेहाच्या स्वरूपाचा. यावर आक्षेप असा की प्रथम संभाव्यतेचा प्रत्यय आणि नंतर संशय हे उचित नाही. कारण, नैय्यायिकांनी तर्क हा संशय व निर्णय यांच्या मध्यंतरी असतो असे म्हटले आहे. शिवाय, विमर्शसंधि नियतफलप्राप्तीच्या अवस्थेने व्यापलेला असतो; ते नियतत्व आणि हा संदेह हे कसे काय? या आक्षेपाला पुढीलप्रमाणे उत्तर दिले आहे. तर्क केल्यानंतर सुद्धा दुसऱ्या कारणामुळे व्याप्तीच्या स्वरूपाचे निराकरण केले असता उत्पन्न होणारा संशय का असणार नाही? प्रस्तुत संबंधात सुद्धा कोणत्या तरी कारणामुळे संभाव्य झालेल्या फलाला जेव्हा बलवान

१ नि गर्भान्निर्भिन्न-. २ नि ऽपि वा.

कारणामुळे विरोध होतो आणि ही कारणे बलवान असतात तेव्हा उत्पन्न करणारी आणि विरोध करणारी दोन्ही कारणे तुल्यबल असता संदेह कसा उत्पन्न होणार नाही? तुल्यबल असलेल्या विरोधकाने निर्मिलेल्या संकटाला झुगारून दिल्यामुळे प्राप्त होणाऱ्या महान फला-च्या दर्शनानेच पुरुषकार ताठ मान करून असतो म्हणून येथे तर्कानंतर संशय व त्यानंतर निर्णय हेच अधिक उचित. उदाहरणार्थ, पुरुषकार दाखविणाऱ्यांचीच प्रशंसा केली जाते 'आश्चर्य, आश्चर्य! प्राण संदेहात आहेत अशा स्थितीतूनही ह्याने आपले कार्य साध्य केले आहे, की जेथे संभावना सुद्धा नव्हती.' आणि ज्याअर्थी इतरांच्या प्रयत्नामुळे किंवा स्वतःच्या निष्फळ प्रयत्नामुळे अडचण निर्माण होते त्याअर्थी पुरुषकारास तयार असलेला पुरुष सुद्धा मनात विजिगीषा बाळगून असल्यामुळे जोराने उद्योगास प्रवृत्त होतो हा आशय लक्षात घेऊन फलप्राप्ती नियत असते असे म्हटले आहे. श्रेयस्कर गोष्टींच्या मार्गात पुष्कळ विघ्ने असतात हे जाणून असा मनुष्य 'तर मला यातील विघ्ने दूर केलीच पाहिजेत' असा विचार करून अभिमानपूर्वक आपला उद्योग सहस्रपट करतो. उदाहरणार्थ, सागरिकेला बंधनात टाकले असताही अमात्याने योजिलेल्या ऐन्द्रजालिकाचा वृत्तान्त कौशल्याने ग्रथित केला आहे.

'व्याप्तिरूपतापराकरणे' ही दुरुस्ती सुचविली आहे, पण तीही समाधानकारक नाही. हस्त-लिखितात 'वाह-केलिरूपता-' आणि मुद्रितात 'बाधच्छलरूपता-' असे आहे. पराकरण म्हणजे निराकरण, दूरीकरण असा अर्थ आहे. निर्णयाच्या किंवा तर्काच्या आड येणाऱ्या बाध आणि छल ह्या गोष्टींचे निराकरण झाले तर संशय उत्पन्न होण्याचा संभव नसून त्याची निवृत्ती होण्याचाच अधिक संभव आहे. म्हणून मुद्रित पाठ स्वीकार्य वाटत नाही. प्रस्तुत ठिकाणी असा अर्थ असण्याची शक्यता आहे की तर्क करताना एका हेतूच्या साहाय्याने एक निर्णय संभाव्य असता दुसरा हेतू उपस्थित झाल्यास संशयाला जागा निर्माण होते, त्यावेळेस 'व्याप्ति' च्या स्वरूपाचे निराकरण झालेले असते. पहिला हेतू व साध्य यांच्यातील संबंध म्हणजे व्याप्ति. दुसरा हेतू असल्यामुळे व्याप्तीची निर्णायकता नाहीशी होऊन संशय उत्पन्न होतो. – 'भवन्' मुद्रित पाठ 'भवेत्' आहे. वस्तुतः कोणत्याही रूपात ह्या शब्दाची आवश्यकता नाही. – 'बलवता' नंतर 'निमित्तेन' अध्याहृत धरावे. – 'उद्धुरकः स्थिरीभवति' असा हस्तलिखितातील पाठ आहे. तो असंभाव्य नाही. पण मुद्रित पाठ 'उद्धुरकन्धरीभवति' अधिक संभाव्य वाटतो. – 'अनेनात्मा' आणि 'संभावनापि नाभवत्' ह्या केलेल्या दुरुस्त्या आहेत. मूळ पाठ अनुक्रमे 'अनेकात्मा' आणि संभाव (वि) ना विनाभवति' असे आहेत. त्यांनी काहीच अर्थबोध होण्यासारखा नाही. हे वाक्य इतरांनी केलेल्या स्तुतिपर आहे. – 'चान्यप्रयत्नतो' ही मुळातील 'चात्र प्रयत्नतो' ची दुरुस्ती आहे. नुसताच 'प्रयत्नतः' शब्द वापरला असण्याचा संभव नाही. आणि 'अत्र' शब्द अनावश्यक आहे. त्याचप्रमाणे पुढे 'य' च्या जागी 'वा' अशी दुरुस्ती केली आहे. कारण 'वा' आवश्यक आहे आणि 'यः' चा कोठे अन्वय लागण्यासारखा नाही. – 'पुमानपि' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्त-लिखितात 'पुन्नाथमपि' असा भ्रष्ट पाठ आहे. मुद्रितात 'पुनर्नाशमपि' असे आहे. पण तो मूळ पाठ असण्याचा संभव फार कमी. 'नाशम्' चा अन्वय लावणे कठीण आहे. – 'पश्यन्' ही

हस्तलिखितातील 'पश्यन्तः' आणि मुद्रितातील 'पश्यता' यांची दुरुस्ती आहे. 'भजति' ह्या क्रियापदाच्या अनुरोधाने प्रथमेच्या एकवचनाचे रूप आवश्यक आहे हे उघड आहे. – 'साभिमानं' मुद्रितात 'साभिमानः' आहे. पण अव्ययीभावाचे रूप अधिक चांगले. 'स्वमुद्योगं' मुद्रितात 'स्वमुद्योगसूत्रं' आहे. 'सूत्र' ची काही आवश्यकता दिसत नाही.

अन्ये त्ववमर्शो विघ्न इति विदन्ति । तत्र च व्याख्याने बीजशब्देन तद्बीजफलमर्थशब्देन निवृत्तिरुच्यते । तेन गर्भनिर्भिन्नं प्रदर्शितमुखं यद्बीजफलं तस्य योऽर्थो निवृत्तिः पुनस्तत्रैव संपादनमनिष्प्रत्यूहप्राप्तप्रसूतिः । तच्छब्देन यत्रेत्याक्षिप्तम् । सा च निवृत्तिः क्रोधेन च निमित्तेन लोभेन वा व्यसनेन शापादिना वा । अपिशब्दाद्विघ्ननिमित्तान्तराणां प्रतिपदमशक्यनिर्देशानां संग्रहः । स च देव्या वासवदत्तया सागरिकायाः कारानिक्षेपात्प्रभृति या तुरीयेऽङ्के राज्ञ उक्तिः –

कण्ठाश्लेषं समासाद्य तस्याः प्रभ्रष्टयानया ।<br>
तुल्यावस्था सखीवेयं तनुराश्वास्यते मम ॥ (४.४)

अत्र विघ्ने वासवदत्ताक्रोधो निमित्तम् । लोभस्तु निमित्तं यथा तापसवत्सराजे 'त्वत्संप्राप्तिविलोभितेन सचिवैः प्राणा मया धारिताः' इति । तदपरे न सहन्ते न ह्यत्र वासवदत्ताप्राप्तिलोभः प्रकृते फले विघ्नकारीति । इदं तदोदाहरणम् । तत्रैव परिणीतायामपि पद्मावत्यां वासवदत्तामलभमानस्य राज्ञो मरणाध्यवसायः, मुमूर्षोस्तदलाभे मन्त्रिणां सुतरां राज्यप्राप्तिदीर्घलोभो निमित्तमिति । शापव्यसनं त्वमर्षनिमित्तमित्यभिज्ञानशाकुन्तले दार्शितम् । एवमन्यदुत्प्रेक्ष्यम् । तथा हि सपत्न्यां विद्याप्रभावो निमित्तमवमर्शे । क्वचिद्दैवम् । क्वचित्समयो यथा विक्रमोर्वश्यां पुत्रवदनावलोकनादुर्वश्याः स्वर्गगमनाध्यवसाये ।

परंतु दुसरे टीकाकार अवमर्श म्हणजे विघ्न असे समजतात. आणि त्या व्याख्येमध्ये बीज म्हणजे त्या बीजाचे फल आणि अर्थ म्हणजे निवृत्ति असे समजले आहे. म्हणून गर्भातून बाहेर पडलेले म्हणजे ज्याचा आरंभ दाखविला गेला आहे असे जे बीजाचे फल त्याचा जो अर्थ म्हणजे निवृत्ति म्हणजेच पुन्हा त्याच ठिकाणी संपादन, विघ्नसहित होणारी निष्पत्ती. 'तत्' शब्दाने 'यत्र' हा शब्द अध्याहृत धरावा लागतो. आणि ती निवृत्ति क्रोध ह्या निमित्ताने किंवा लोभामुळे किंवा शाप आदी संकटामुळे होते. 'अपि' शब्दाने व्यक्तिशः निर्देश करणे अशक्य असलेल्या विघ्नाच्या इतर कारणांचा समावेश होतो. आणि तो अमवर्श रत्नावलीत राणी वासवदत्तेने सागरिकेला कारागृहात टाकल्यापासून चौथ्या अंकात 'त्या सागरिकेच्या कंठाभोवती आलिंगन प्राप्त होऊन तिच्यापासून दूर

झालेली ही रत्नमाला समान अवस्था असलेल्या मैत्रिणीप्रमाणे माझ्या तनूला आश्वासन देत आहे' ह्या राजाच्या उक्तीपर्यंत. येथे विघ्नाला वासवदत्तेचा क्रोध कारण झाला आहे. लोभ निमित्त असल्याचे उदाहरण तापसवत्सराज नाटकात 'सचिवांनी तुझ्या प्राप्तीचे विलोभन दाखविल्यामुळे मी प्राणधारण करू शकलो' हें राजाचे वचन. पण इतरांना हे उदाहरण मान्य नाही; कारण यात वासवदत्तेच्या प्राप्तीचा लोभ प्रकृत फलाच्या मार्गात विघ्न उत्पन्न करतो असे नाही. तेव्हा हे त्याचे उदाहरण – त्याच नाटकात पद्मावतीशी विवाह केल्यानंतरही वासवदत्तेची प्राप्ती झाली नाही म्हणून राजाचा मरणाचा विचार आणि मरणाची इच्छा करूनही तिची प्राप्ती न होण्याचे कारण म्हणजे मंत्र्यांनी दाखविलेला राज्यप्राप्तीरूप मोठा लोभ. रागामुळे आलेले शापरूप संकट अभिज्ञानशाकुन्तलात दाखविले आहे. याप्रमाणे इतर ही समजावे. उदाहरणार्थ, सवतीवर दाखविलेला विद्येचा प्रभाव हे अवमर्शात विघ्नाचे निमित्त. क्वचित दैव विघ्न उत्पन्न करते. क्वचित अट, उदाहरणार्थ, विक्रमोर्वशी नाटकात पुरूरव्याने केलेला पुत्रमुखाच्या अवलोकनामुळे उर्वशीचा स्वर्गलोकी जाण्याचा विचार.

'विदन्ति' मूळ पाठ 'वदन्ति' असण्याचा संभव आहे. पण 'विदन्ति' नेही उचित अर्थ-बोध होतोच. – 'तत्र च' ही हस्तलिखितातील 'न च' आणि मुद्रितातील 'स च' ची दुरुस्ती आहे. 'न' आणि 'सः' दोन्ही असंभाव्य आहेत. – 'गर्भनिर्भिन्नं' मुद्रितात ह्यांचा पुढील 'प्रद-र्शितमुखं' शी जोडून एक समास केला आहे. पण 'प्रदर्शितमुखम्' ही श्लोकातील 'गर्भनिर्भिन्न' ची व्याख्या आहे. तेव्हा दोन्ही शब्द स्वतंत्र असणे आवश्यक आहे. – 'तत्रैव' म्हणजे गर्भा-तच. – 'संपादनमनिष्प्रत्यूहप्राप्तप्रसूतिः' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. मुळात 'संपादनं निष्प्रत्यूहप्राण-' प्रसूतिः ('-प्राणतया फलप्रसूतिः' मुद्रित)' असे आहे. पण निष्प्रत्यूह म्हणजे विघ्नरहित प्रसूती असा निवृत्ति शब्दाचा अर्थ दिलेला असण्याची शक्यता नाही, विशेषतः अवमर्श म्हणजे विघ्न हे विशद करीत असता. तसेच 'प्राण' शब्दाचे काही प्रयोजन दिसत नाही. मुद्रितातील 'फल' असंभाव्य आहे. कारण, 'तस्य निवृत्तिः' यात 'तस्य' ने बीजफलाचा निर्देश झालेलाच आहे. तेव्हा 'अनिष्प्रत्यूहप्राप्तप्रसूतिः' म्हणजेच विघ्नयुक्त होणारी प्रसूति असाच अर्थ अभिप्रेत असणार हे उघड आहे. – 'तच्छब्देन' हा श्लोकातील 'सः' शब्दाचा निर्देश आहे. – 'तनुरा-श्वास्यते मम' ह्या श्लोकानंतर 'इत्येतावत्पर्यन्तम्' अशा अर्थाचे वचन अपेक्षित आहे. – 'त्वत्सं-प्राप्ति- इ०' हा संपूर्ण श्लोक वर २२ व्या श्लोकावरील व्यांख्येत उद्धृत केला आहे. – 'तद-लाभे' मुद्रितात 'तदलोभे' आहे. ते संभाव्य नाही. – '-दीर्घलोभो' ही '-दीर्घलाभो' ची दुरुस्ती आहे. येथे असे म्हणावयाचे आहे की वासवदत्तेची प्राप्ती हे जे फल ते लांबणीवर पडण्याचे कारण मंत्र्यांनी उदयनाला दाखविलेला राज्यप्राप्तीचा लोभ. पद्मावतीशी विवाह केल्यावरसुद्धा राज्याची पुनःप्राप्ती झाली नाही. त्यामुळे राजा मरणास उद्यत झाला असता त्याला त्यापासून परावृत्त केले ते राज्यप्राप्तीच्या लोभाने. – 'शापव्यसनं' मुद्रित पाठ 'तच्च व्यसनं' अर्थहीन आहे. वर 'शापादिना' म्हटले आहे त्याचे येथे उदाहरण निर्दिष्ट केले आहे. – 'सपत्न्यां विद्याप्रभावो' हा कोणत्या नाटकातील प्रसंग ते समजण्यास मार्ग नाही.

विमर्श आणि अवमर्श ही ह्या संधीची दोन्ही नावे असल्याचे अभिनवगुप्ताला मान्य आहे. म्हणून त्याने यांपैकी एकच पाठाचा स्वीकार करणाऱ्या दोन्ही प्रकारच्या प्राचीन टीकाकारांची मते विस्ताराने उद्धृत केली आहेत. विमर्श म्हणजे संदेह उत्पन्न होऊन फलप्राप्ती लांबणीवर पडते असा एका पाठाचा अर्थ, तर अवमर्श म्हणजे विघ्न उत्पन्न झाल्याकारणाने फलप्राप्ती संदिग्ध होते असा दुसऱ्याचा अर्थ. विमर्शाच्या व्याख्येत अभिनवगुप्ताने क्रोध, विलोभन आदींचा निर्देश केला नाही हे लक्षात ठेवले पाहिजे. पण ते काहीही असले तरी या संधीत 'अप्राप्तीला प्राधान्य असते असे जे अभिनवगुप्ताने मागील श्लोकावरील टीकेच्या शेवटी म्हटले आहे तेच बरोबर आहे. संपादकांनी तेथे सुचविलेली दुरुस्ती करणे चूक होईल.

**अन्ये त्वावृत्त्या विमर्शशब्दं कल्पयन्त इत्थं व्याचक्षते । गर्भान्निर्भिन्नो बीजार्थः फलं यस्मिन् विमर्शादिकारणत्वात् विमर्शरूपे कथावयवे स विमर्शो नामेति । अत्र व्याख्याने मुख्यमस्य संधेर्यद्रूपं विदूरीकरणसंपादकात्मकत्वं नाम तदस्पृष्टमेव स्यात् ।**

परंतु दुसरे टीकाकार विमर्श शब्द दोनदा कल्पून पुढीलप्रमाणे व्याख्या करतात. गर्भातून बाहेर आलेला बीजार्थ म्हणजे फल विमर्श आदीला कारणीभूत असल्यामुळे विमर्श-स्वरूपाच्या ज्या कथाभागामध्ये असते तो विमर्श नावाचा संधि. ह्या व्याख्येत ह्या संधीचे जे मुख्य रूप – फल लांबणीवर टाकण्याचे कार्य संपादन करण्याच्या स्वरूपाचे – त्याला स्पर्श सुद्धा होत नाही.

'आवृत्त्या विमर्शशब्दं' ही 'आवृत्तिविमर्शशब्दं' ची दुरुस्ती आहे. एकत्र समास संभाव्य नाही. श्लोकात 'विमर्श इति' असे आहे. संधिनियमाप्रमाणे मूळ 'विमर्शः' किंवा 'विमर्शो' आहे असे समजता येईल. ह्या टीकाकारांच्या म्हणण्याप्रमाणे दोन्हीही रूपे येथे अभिप्रेत आहेत. – 'बीजार्थः फलं' ही 'बीजार्थफलं' ची दुरुस्ती आहे. 'फलं' ही 'बीजार्थः' ची व्याख्या आहे. म्हणून तो शब्द स्वतंत्र असणे आवश्यक आहे. – 'विमर्शरूपे कथावयवे' 'विमर्शो' असे रूप कल्पून त्याचा हा अर्थ दिला आहे. – 'विदूरीकरणसंपादकात्मकत्वं' यात थोडीशी दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'विदूरकारण-' आहे. च्वि-रूपाने अभिप्रेत अर्थ स्पष्ट होतो. मुद्रितात 'विदूरकार-णसंपातात्मकत्वं' असे आहे. पण 'संपात' पेक्षा 'संपादक' अधिक उपपन्न आहे.

**अन्ये तु लाभयोग्यत्वं नाशावस्था अन्वेषणावस्था च यथारुचि गर्भे निबन्धनीया । तत्र यदा लाभात्मिका प्राप्त्यवस्था प्रतिमुखेनैव निबध्यते तदा अन्ये द्वे गर्भसंधौ, यदाप्यवमर्शे नाशावस्था तदा गर्भेऽन्वेषणमेव, गर्भे यदा नाशान्वेषणे तदा चावमर्शे विचारो निबन्धनीयः – कथं मया प्राप्तप्रायमप्यप-हारितम्, किमत्र विगुणोपायानुष्ठानं मया कृतम्, उत प्राप्तियोग्यमेवैतन्न भवतीति । यदाहोद्भटः – नाशान्वेषणभूमिरवमृष्टिरवमर्श इति । तच्चेदं व्याख्यानं**

**लक्ष्यविरुद्धं युक्त्या च पूर्वोदितप्रारम्भाद्यवस्थापञ्चकगतक्रमनियमसमर्थनप्रस्तावोक्तया विरुद्धमित्यास्ताम् ।**

परंतु दुसरे असे म्हणतात की लाभाचा संभव, नाशावस्था आणि अन्वेषणावस्था यांची आवडीनुसार गर्भसंधीत योजना करावी. त्यात जेव्हा लाभस्वरूपाची प्राप्त्यवस्था प्रतिमुखसंधीतच दाखविली जाते तेव्हा इतर दोन अवस्था गर्भसंधीत योजाव्यात, जेव्हा अवमर्शसंधीत नाशावस्था दाखवावयाची असेल तेव्हा गर्भसंधीत फक्त अन्वेषणच योजावे आणि गर्भसंधीत जेव्हा नाश आणि अन्वेषण दोन्ही असतील तेव्हा अवमर्शात विचार होत असलेला दाखवावा — 'जवळ जवळ हातात आलेले फल सुद्धा मी कसे घालविले ? मी या बाबतीत निरुपयोगी उपाय योजिले होते काय ? का ही गोष्ट प्राप्त करण्याच्या योग्यतेचीच नाही ?' उद्भटाने म्हटले आहे – नाशाच्या अन्वेषणाचे स्थान म्हणजे अवमृष्टि अथवा अमवर्श. पण ही व्याख्या लक्ष्याच्या विरुद्ध आहे आणि पूर्वी सांगितलेल्या प्रारम्भ आदी ज्या पाच अवस्था त्यांच्या क्रमाच्या नियमाचे समर्थन करण्यायाठी योजिलेल्या युक्तिवादाच्या विरुद्ध आहे. असो.

'यथारुचि' मुद्रितात हा शब्द चुकून दोनदा छापला गेला आहे. – 'निबध्यते' मुळात फक्त 'बध्यते' आहे. नेहमीप्रमाणे 'निबध्यते' च मूळ पाठ संभवनीय आहे. – 'नाशान्वेषणभूमिः' मुद्रित पाठ 'यासावन्वेषणभूमिः' असा आहे. पण 'या' असल्यास नंतर 'सा' अपेक्षित आहे. शिवाय ज्याच्या समर्थनासाठी उद्भटाचे हे मत उद्धृत केले आहे त्या मागील वाक्यांत नाशाचे अन्वेषण म्हणजे त्याच्या कारणांचा शोध आहे, नेहमीचे अन्वेषण नाही. अवमृष्टि अथवा अवमर्श म्हणजे विचार असाच अर्थ ह्या व्याख्येत अभिप्रेत आहे हे उघड आहे. – 'लक्ष्यविरुद्धं' म्हणजे ह्या संधींच्या ज्या व्याख्या दिलेल्या आहेत त्यांच्या विरुद्ध. – 'युक्त्या' हा युक्तिवाद वर सहाव्या श्लोकात व त्यावरील टीकेत सापडण्यासारखा आहे.

**अहमनेन विफलायां क्रियायां विलोभ्य प्रवर्तित इति यत्र कर्ता विमृशति स विलोभनकृत इति, क्रोधव्यसनादेस्तु व्यापद्यमाने फलव्यापत्तिविषयो यः कर्तुर्विचारः स क्रोधव्यसनजो विमर्श इत्येवं विमर्शनस्वभाव एव विमर्शः, कार्यविनिपातस्तूत्तरनिर्वहणसंधिनिबध्यमानाद्भुतरसपरिपोषकत्वेन निबध्यते इति श्रीशङ्कुकः । तन्मते विचारस्य सर्वसंध्यनुपायत्वात् पृथग्विमर्शशब्देनाभिधानं स्यात् ।**

'ह्याने मला प्रलोभन दाखवून निष्फळ क्रिया करण्यास प्रवृत केले' असा विचार ज्या ठिकाणी कर्ता करतो तो विलोभनकृत विमर्श; आणि क्रोध, व्यसन आदींनी फल नष्ट होत असता त्याच्या नाशासंबंधीचा जो कर्त्याचा विचार तो क्रोधव्यसनज विमर्श; याप्रमाणे विमर्श

ह्या विचाराच्याच स्वरूपाचा आहे. आणि कार्याचा नाश हा नंतर निर्वहण संधीत योजावयाचा असलेल्या अद्भुत रसाचा परिपोष करण्याचे साधन म्हणून योजिला जातो असे श्रीशङ्कुकाचे मत आहे. त्याच्या मते विचाराचा सर्व संधींत उपाय म्हणून उपयोग नसल्यामुळे विमर्श शब्दाने त्याचा स्वतंत्र निर्देश केला असे दिसते.

'सर्वसंध्यनुपायत्वात्' मुद्रित पाठ 'सर्वसंध्यनुयायित्वात्' आहे. पण शङ्कुकाच्या मते विचार सर्व संधींत केलेला असतो असे म्हटले असण्याचा संभव नाही. तो फक्त चौथ्या संधीत केला जातो म्हणून त्या संधीला विमर्श असे नाव आहे. इतर संधींत विचाराचा उपाय म्हणून उपयोग होत नाही; पण या संधीत त्याचा तसा उपयोग होतो, म्हणून त्याचा विमर्श ह्या निराळ्या शब्दाने निर्देश केला आहे. – 'विमर्शशब्देन' ही 'विमर्शसत्त्वेन' ची दुरुस्ती आहे. पुढे 'अभिधानम्' आहे, तेव्हा 'शब्देन' हेच मूळ असण्याचा संभव आहे.

**व्यापत्तिविषयो विचार इति केचित् । पुनरप्यस्य सरणिरेव । सा च न व्याख्यानेन क्रमेण दर्शिता । विलोभनकृतोदाहरणं च न व्यापत्तिविमर्शः । इति सर्वं चासमञ्जसं यथारुचि परिकल्पितमित्यलमनेन ।**

काहींचे म्हणजे असे की विमर्श म्हणजे नाशासंबंधी विचार. पुन्हा ही त्याचीच पद्धती. आणि क्रमाने व्याख्या करून ती स्पष्ट केली नाही. आणि विलोभनकृताचे उदाहरण म्हणजे व्यापत्तीसंबंधी विचार नाही.

याप्रमाणे ही सर्व अयथार्थ मते ज्याने त्याने आपल्या आवडीप्रमाणे बनविली आहेत. तेव्हा हे आता पुरे.

'पुनरप्यस्य सरणिरेव' 'अस्य' म्हणजे शंकुकाची असा अर्थ दिसतो. 'अस्य' नंतर 'एव' वापरलेला असता तर बरे झाले असते. हस्तलिखितात 'पुनरस्मत्सरणिरेव' असा पाठ आहे. पण तो असंभाव्य आहे. शंकुकाच्या मतात आणि ह्या मतात फरक असा की विलोभनकृतात व्यापत्तीचा विचार नसतो असे शंकुकाचे मत, तर तेथेही नुसता विचार नसून व्यापत्तीचा विचार असतो असे ह्या टीकाकारांचे मत. हे ह्या टीकाकारांचे मत चूक असे अभिनवगुप्ताने म्हटले आहे.

**समानयनमर्थानां[1] मुखाद्यानां सबीजिनाम् ।**
**नानाभावोत्तराणां[2] यद्भवेन्निर्वहणं तु तत् ॥४०॥**

बीजाच्या विविध अवस्थांनी युक्त अशा मुख व इतर संधींतील विविध भावांनी पूर्ण असलेल्या कार्यांना ज्यात एकत्र आणतात तो निर्वहणसंधी होय.

१ **नि** समानं च समर्थानां मुख्यार्थानां. २ **का** फलोपसंगतानां च ज्ञेयं निर्वहणं तु तत्.

**समानयनमिति । मुखाद्यानां चतुर्णां संधीनां येऽर्थाः प्रारम्भाद्याः तेषां सह बीजिभिर्बीजविकारैः क्रमेणावस्थाचतुष्टये भवद्भिः उत्पत्त्युद्घाटनोद्भेदगर्भनिर्भेदलक्षणैर्वर्तमानानां नानाविधैः सुखदुःखात्मकैः हासशोकक्रोधादिभिर्भावैरुत्तराणां चमत्कारास्पदत्वेन जातोत्कर्षाणां यत्समानयनं, यस्मिन्नर्थराशौ समानीयन्ते फलनिष्पत्तौ योज्यन्ते तन्निर्वहणम्, फलयोगावस्थया व्याप्तम् ।**

'समानयनम्' इत्यादी. मुख आदी चार संधींचे जे प्रारम्भ आदी चार अर्थ ते बीजी म्हणजे क्रमाने चार अवस्थांमध्ये होणारे उत्पत्ती, उद्घाटन, उद्भेद आणि गर्भनिर्भेद हे बीजाचे विकार त्यांनी युक्त आणि विविध प्रकारचा सुख आणि दुःख यांच्या स्वरूपाच्या हास, शोक, क्रोध इत्यादी भावांमुळे उत्तर म्हणजे चमत्कृतीचे निधान होऊन उत्कृष्ट झाले असता त्यांचे जे समानयन म्हणजे ज्या अर्थराशीमध्ये ते अर्थ एकत्र आणले जातात म्हणजे फलनिष्पत्तिसाठी योजले जातात तो निर्वहण संधी, फलयोग ह्या पाचव्या अवस्थेने व्याप्त असलेला.

'सह बीजिभिः इ०' येथील व्याख्येत श्लोकातील शब्दांचा अर्थ स्पष्ट करून सांगितला आहे. त्यातील अन्वय असा – 'बीजविकारैः सह वर्तमानानां नानाविधैः भावैः जातोत्कर्षाणां (च) तेषां अर्थानां यत्समानयनम्'.

**अत्र केचिदमून् सर्वान् संधीनवस्थापञ्चकनिर्वहणे पृथग्वृत्त्या योज्यमानानिच्छन्ति । अन्ये तु संधौ संध्यन्तरानुप्रवेशमिच्छन्तोऽपि प्रागवस्थाया एकोत्तरावस्थापरिणामात्मकत्वे कारणं न पश्यन्ति, अपि तु कार्यं भवतीति सांख्यदर्शनच्छायाश्रयेण एकावस्थायाः फलसंगमनसंबन्धोपकरणभावप्राप्त्या तदेकभावानामवस्थान्तराणां फलसंगमनमुचितमेवेति मन्यन्ते ।**

येथे काही टीकाकार असे म्हणतात की हे सर्व संधी पाच अवस्थांच्या निर्वहणात स्वतंत्र रीतीने योजावयाचे आहेत. परतु दुसरे टीकाकार एका संधीचा दुसऱ्या संधीत अन्तर्भाव होतो असे मानीत असले तरी अगोदरची अवस्था नंतरच्या एक सोडून दुसऱ्या अवस्थांत परिणत होऊ शकेल याला प्रमाण नाही असे मानतात, परंतु कार्य अस्तित्वात येते म्हणून सांख्यदर्शनाचा अवलंब करून एका अवस्थेच्या फलाशी संगमनरूप संबंधाचा उपाय म्हणून उत्पन्न झालेल्या स्वरूपामुळे त्या अवस्थेशी एक भाव असलेल्या इतर अवस्थांचे ही फलाशी संगमन उचितरूप होय असे मानतात.

'अमून् सर्वान् इ०' ह्या वाक्याचा अर्थ विशेष स्पष्ट नाही. शब्दशः अर्थ असा होतो की पाचही अवस्था परिपूर्ण होत असता (निर्वहण म्हणजे निर्वाह, तडीस नेणे या अर्थी) प्रत्येक

अवस्थेत हे पाच संधी होतात. म्हणजे नाटकात एकंदर पंचवीस संधींची योजना करावी असे ह्या टीकाकारांचे म्हणणे असण्याचा संभव आहे. – 'संधौ संध्यन्तरानुप्रवेशम्' म्हणजे वरील टीकाकारांनी म्हटल्याप्रमाणे एका अवस्थेत पाचही संधी असा अर्थ अभिप्रेत असावा. – 'एकोत्तर' म्हणजे मधली एक सोडून नंतरची. उदाहरणार्थ, प्रारम्भावस्थेच्या दृष्टीने प्रयत्नावस्था सोडून नंतरच्या तीन अवस्था. या टीकाकारांच्या म्हणण्याचा आशय असा दिसतो की एका अवस्थेची नंतरच्या एक अवस्थेत परिणती होते (उदाहरणार्थ प्रारंभाची प्रयत्नात) हे मान्य करता येईल, पण प्रारंभाची प्राप्त्याशा वगैरे त्यानंतरच्याही अवस्थांत परिणती होते असे मानण्याचे कारण नाही. – 'कार्यं भवतीति' हस्तलिखितात 'कार्यं भवन्तीति' आणि मुद्रितात '(ताः) कार्यीभवन्तीति' असे पाठ आहेत. हस्तलिखितातील 'भवन्ति' संभाव्य दिसत नाही. कारण बहुवचनातील कर्ता अगोदरच्या शब्दांत सापडण्यासारखा नाही. मुद्रितात सुचविलेल्या 'ताः' ने सर्व अवस्थांचा बोध होतो असे मानले तरी सर्व अवस्थांचे कार्यात रूपांतर होते असा अर्थ अभिप्रेत असेलसे वाटत नाही. 'कार्यं भवति' याचा अर्थ फलाची प्राप्ती होते. तेव्हा तिचा सर्व अवस्थांशी संबंध कसा येतो हे पुढील शब्दांत सांगितले आहे. – 'सांख्यदर्शनच्छायाश्रयेण' मुद्रितात '-दर्शनतच्छाया-' असे आहे. पण मधील 'तत्' अनावश्यक आहे. ह्या वाक्याचा सुद्धा अर्थ विशेष स्पष्ट नाही. सांख्यांच्या परिणामवादाप्रमाणे मूळ प्रकृतीपासून महत्, त्यापासून अहंकार इत्यादी प्रकारे विविध तत्त्वे परिणामाने अस्तित्वात येतात. त्यात पुढील तत्त्व फक्त त्याच्या मागच्या तत्त्वाचा परिणाम म्हणून अस्तित्वात येते, त्याच्याही अगोदरच्या तत्त्वांपासून नाही. त्याप्रमाणे फलयोगरूप कार्य अस्तित्वात येते ते त्यापूर्वीच्या नियत फलप्राप्तिरूप चौथ्या अवस्थेचा परिणाम म्हणून, अगोदरच्या प्रारम्भादी अवस्थांचा परिणाम म्हणून नाही. तथापि, ही चौथी अवस्था पूर्वीच्या अवस्थांतून क्रमशः परिणत होत आलेली असल्यामुळे त्या अवस्था सुद्धा फलयोगाशी दूरान्वयाने का होईना पण संबद्ध होतात. श्लोकात 'मुखाद्यानां समानयनम्' असे जे म्हटले आहे त्याची ही थोडी निराळी उपपत्ती आहे. प्रारम्भादी चारही अवस्था फलयोगाशी साक्षात संबद्ध नसून फक्त चौथीच तशी संबद्ध आहे, तथापि अप्रत्यक्षपणे त्यांचा सुद्धा फलयोगाशी संबंध आहे असे म्हटले आहे, अशा प्रकारचे ह्या टीकाकारांचे म्हणणे असावेसे दिसते. 'एकावस्था' ही एक अवस्था म्हणजे चौथी अवस्था. 'फलसंगमन' म्हणजे फलयोग. हा शब्द ह्या वाक्यात पुढेही आलेला आहे. म्हणून मुद्रितात असलेला 'फलसंबन्धसंगमन' हा पाठ बरोबर नाही. – '-प्राप्त्या' ही '-प्राप्तं' ची दुरुस्ती आहे. प्रथमा अथवा द्वितीया विभक्तीचा योग्य अन्वय लागण्यासारखा नाही.

**अन्ये तु मुखसंधौ ये अवलम्ब्यमानतया आद्याः प्रधानभूता अर्थाः उपायास्ते महौजसः फलसंपत्तौ साधकास्तेषां फलसंगत्या समानयनमिति व्याचक्षते 'महौजसां फलोपसंगतानां च' इति पाठेन ।**

**यदा च सुखप्राप्तेः फलवत्त्वं तदा रतिहासादिबाहुल्यं प्रारम्भादीनाम्, दुःखहानेस्तु फलत्वे क्रोधशोकादिदुःखात्मकभावबाहुल्यं स्वोचितव्यभिचारिसहितं द्रष्टव्यम् । उदाहरणं रत्नावल्यामैन्द्रजालिकप्रवेशात्प्रभृत्यासमाप्तेः । एषामवस्था-**

**संध्यादीनां नायकतदमात्यतत्परिवारनायिकादिमुखेनापि नियोजनम् । न त्वेक-मुखेनैवेति नियम इत्युक्तमेव ।**

परंतु दुसरे टीकाकार 'महौजसां फलोपसंगतानां च' असा पाठ स्वीकारून मुख-संधीमध्ये आधारभूत असल्यामुळे जे आद्य म्हणजे प्रधानरूपाचे अर्थ म्हणजे उपाय, महौजस म्हणजे फलसमृद्धी साध्य करणारे असे, त्यांचे फलयोगाशी एकत्र आणणे अशी व्याख्या करतात.

आणि जेव्हा सुखाची प्राप्ती हे फल असते तेव्हा प्रारम्भ आदी अवस्थांमध्ये रति, हास, आदी स्थायिभावांची विपुलता आणि जेव्हा दुःखाचे निवारण हे फल असते तेव्हा क्रोध, शोक, आदी दुःखात्मक भावांची विपुलता त्यांना त्यांना उचित अशा व्यभिचारि-भावांसहित असते असे समजावे. उदाहरणार्थ, रत्नावलीत ऐन्द्रजालिकाच्या प्रवेशापासून शेवटपर्यंत. ह्या अवस्था आणि संधींची योजना नायक, त्याचे अमात्य, त्याचा नोकरवर्ग आणि नायिका ह्यांच्या द्वारेही करावी, एकाच्याच मार्फत करू नये हे सांगितलेलेच आहे.

श्लोकातील 'सबीजिनाम्। नानाभावोत्तराणां' ह्या ऐवजी 'महौजसाम्। फलोपसंगतानां च' असा पाठ स्वीकारून काही टीकाकारांनी व्याख्या केली आहे. – 'फलसंपत्तौ साधकाः' ही 'महौ-जसः' शब्दाची व्याख्या. – 'पाठेन' मुद्रितात 'पाठे' आहे. पण तृतीयायुक्त पाठ अधिक चांगला. टीकाकारांचे म्हणणे येथपर्यंतच आहे.

'-दुःखात्मकभावबाहुल्यं' ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितात '-भावत्वात् बाहुल्यं' आणि मुद्रितात 'भावाद् बाहुल्य' आहे. परंतु ह्या भावांचे बाहुल्य असा अर्थ अभिप्रेत असल्यामुळे हे दोन्ही पाठ बरोबर नाहीत. – 'उक्तमेव' वर सहाव्या श्लोकावरील व्याख्येत अशा प्रकारचा निर्देश आहे. – या परिच्छेदातील विधाने अभिनवगुप्ताची आहेत, इतर टीकाकारांच्या मतांशी त्यांचा संबंध नाही.

**एते तु[1] संधयो ज्ञेया नाटकस्य प्रयोक्तृभिः ।**
**तथा प्रकरणस्यापि शेषाणां च[2] निबोधत ॥ ४१ ॥**
**डिमः समवकारश्च चतुःसंधी प्रकीर्तितौ ।**
**न तयोरवमर्शस्तु कर्तव्यः कविभिः सदा ॥ ४२ ॥**
**व्यायोगेहामृगौ चापि सदा कार्यौ त्रिसंधिकौ ।**
**गर्भावमर्शौ न स्यातां त[3]योर्वृत्तिश्च कैशिकी ॥ ४३ ॥**

१ का हि. २ नि विनिबोधत. ३ नि न च वृत्तिस्तु कैशिकी.

**द्विसंधि तु प्रहसनं वीथ्यङ्को भाण एव च ।**
**मुखनिर्वहणे[1] तत्र कर्तव्ये कविभिः सदा ॥ ४४ ॥**

परंतु, हे पाच संधी नाटकामध्ये तसेच प्रकरणामध्येही असतात हे काव्याची रचना करणारांनी लक्षात ठेवावे. इतर रूपकप्रकारांत किती संधी असतात ते ऐका. डिम व समवकार यांत चार संधी असावेत असे म्हटले आहे. कवींनी त्यांत अवमर्श संधीची योजना कधी करू नये. आणि व्यायोग व ईहामृग यांत नेहमी तीन संधींची योजना करावी, त्यांत गर्भ व अमवर्श हे संधी आणि कैशिकी वृत्ती ह्या गोष्टी नसाव्यात. प्रहसन, वीथी, अङ्क आणि भाण यांत दोनच संधी असावेत. त्यांच्या बाबतीत कवींनी मुख व निर्वहण ह्या दोन संधींची नेहमी योजना करावी.

**एषां विनियोगं विभजति एते त्वित्यादिना मुखनिर्वहणे तत्र कर्तव्ये कविभिः सदा इत्यन्तेन । एतच्च पूर्वमेव निर्णीतार्थम् एकलोपे चतुर्थस्य इत्यादि-व्याख्यानावसरे ।**

**कस्मात्तौ चतुःसंधी इत्याह न तयोरित्यादिना । तुर्हेतौ, यतस्तयोरवमर्शो निबद्धुमशक्य इति । एवमुत्तरत्रापि । हेतुग्रन्थान्तरत्वेनेदं योज्यं न तु लोपस्था-नित्वेन, तस्य एकलोपे इत्यादिना पूर्वमेवोक्तत्वात् ।**

यांच्या योजनेसंबधीची भिन्न भिन्न व्यवस्था 'एते तु' पासून 'मुखनिर्वहणे तत्र कर्तव्ये कविभिः सदा' येथपर्यंतच्या श्लोकांत सांगतात. ह्याचा निर्णय आम्ही पूर्वीच 'एकलोपे चतुर्थस्य' इत्यादी श्लोकाची व्याख्या करताना लावला आहे.

त्या दोन प्रकारांत चार संधीच का याचे उत्तर 'न तयोः' इत्यादीत देतात. 'तु' शब्द हेत्वर्थी वापरला आहे. त्या दोहोंत अवमर्शाची योजना करणे अशक्य आहे म्हणून. याचप्रमाणे पुढील बाबतीतही समजावे. हेतू सागणारे हे निराळे विधान आहे, केवळ लोपाची स्थाने सांगणारे अशा प्रकारचे नाही असा अर्थ समजावा; कारणे ते मागेच 'एकलोपे' इत्यादीत सांगितले आहे.

'एकलोपे चतुर्थस्य' हा वरील सतरावा श्लोक.

१ नि स्यातां तेषां वृत्तिश्च भारती.

'अवमर्शो निबद्धुमशक्यः' मुद्रित पाठ 'अवमर्शो निबद्धमशक्यम्' आहे. पण तसा पाठ आवश्यक आहे असे नाही. श्लोकातील प्रथमान्त शब्द व्याख्येत तसाच उद्धृत केला असणे अधिक संभाव्य आहे. – 'हेतुग्रन्था- इ०' प्रस्तुत श्लोक हेतू सांगण्याच्या उद्देशाने रचले आहेत, कोणत्या संधीचा लोप होतो हे सांगण्यासाठी नाही असा याचा अर्थ. –'पूर्वमेवोक्तत्वात्' त्या सतराव्या श्लोकावरील व्याख्येत लोपस्थानांचा निर्देश आहे, प्रत्यक्ष श्लोकात तो नाही हे लक्षात ठेवले पाहिजे.

ह्यानंतर बडोदे प्रतीत पुढील श्लोक कंसात दिला आहे –

**वीथी चैव हि भाणश्च तथा प्रहसनं पुनः ।**
**कैशिकीवृत्तिहीनानि कार्याणि कविभिः सदा ॥**

हा श्लोक येथे अस्थानी आहे. शिवाय त्यातील विधान वर अठराव्या अध्यायातील ८–९ ह्या श्लोकांत याचप्रमाणे आढळते. हा श्लोक येथे प्रक्षिप्त आहे हे उघड आहे.

**एवं हि संधयः कार्या दशरूपे प्रयोक्तृभिः ।**
**पुनरेषां[1] तु संधीनामङ्गकल्पं निबोधत ॥४५॥**

याप्रमाणे नाट्य रचणाऱ्यांनी दहा रूपकांमध्ये संधींची योजना करावी. आता ह्या संधींच्या अंगांसंबंधीचे नियम ऐका.

**ननु संधिपञ्चकात्मक इतिवृत्तशरीरारम्भे कथं दशरूपकादिभेद इत्याशङ्क्याह एवं हीति । हि यस्मादेवमुक्तेन विनियोगप्रकारेण संधयो भवन्ति ततो दशरूपकभेद इति केचिदाशङ्कापूर्वं व्याचक्षते । तच्चासत्, लक्ष्यभेदादेव दशरूपकभेदस्य दर्शितत्वात् । अवश्यं चैतत्, अन्यथा डिमसमवकारयोश्चतुःसंधित्वाविशेषात्कथं भेदः स्यात्, नाटकादीनां वा । तस्मादुपसंहारग्रन्थोऽयमिति हीति । अङ्गानां कल्पं कल्पनाप्रकारो वा । तेनैवंप्रायमन्यदपीतिवृत्तोपयोगि भवति ।**

इतिवृत्तरूप नाट्य शरीराचा आरंभ पाच संधींच्या स्वरूपाचा असता दहा रूपकांचे भेद कसे होतात अशी शंका घेऊन तिचे निरसन 'एवं हि' इत्यादी श्लोकात करतात. हि म्हणजे ज्याअर्थी याप्रमाणे म्हणजे सांगितलेल्या योजनेच्या प्रकाराने संधी होतात त्याअर्थी त्यामुळे दहा रूपकांचे भेद उत्पन्न होतात अशी आशंकापूर्व व्याख्या काही टीकाकार करतात. पण ते बरोबर नाही; कारण, त्यांच्या लक्षणांतील भेदामुळेच दहा रूपकप्रकार भिन्न

१ का पुनः संध्यन्तरं तेषाम्.

भिन्न होतात हे दाखवून दिले आहे. आणि हे आवश्यकच आहे; नाही तर चार संधी असणे ही गोष्ट समान असता डिम आणि समवकार यांत काय फरक होईल किंवा नाटक आदी-मध्ये काय भेद होईल? म्हणून हा उपसंहारात्मक श्लोक आहे हे दाखविण्यासाठी 'हि' शब्द वापरला आहे. अंगांचा कल्प म्हणजे विनियोगाचे नियम किंवा कल्पिण्याचा प्रकार. त्यावरून अशाच प्रकारच्या इतरही गोष्टी इतिवृत्ताला उपयोगी होतात असे समजावे.

'हि यस्मात्' मुळात 'हियस्मात्' आहे. पण येथे इतर टीकाकारांची व्याख्या उद्धृत केली आहे. तिच्यात श्लोकातील 'हि' शब्द तशाचा तसाच अवतारित करून त्याचा 'यस्मात्' असा अर्थ केला आहे. त्याचे प्रथमेचे रूप केलेले असणे संभवनीय नाही. –'आशङ्कापूर्व' शंका अशी की पाच संधी आहेत, तेव्हा पाचच रूपकप्रकार होतील, दहा नाही. – 'अन्यथा' ही मुळातील 'अन्यद्वा' ची दुरुस्ती आहे. 'अन्यद्' ह्या नपुंसकलिंगी रूपाचा वाक्यात कोठे अन्वय लागण्यासारखा नाही. शिवाय, अर्थासाठी 'अन्यथा' आवश्यक आहे. – 'नाटकादीनां' यातील 'आदि' ने फक्त प्रकरणाचाच बोध होऊ शकतो. नाटक आणि प्रकरण या दोहोंतच पाचही संधी असतात. –'कल्प' शब्दाचा नेहमीचा अर्थ दिलेला नाही, फक्त 'कल्पनाप्रकार' हा दुसरा अर्थ दिला आहे. – 'तेन' ह्मणजे कल्पनेचे प्रकार संभाव्य असल्यामुळे.

**संधीनां यानि वृत्तानि प्रदेशेष्वनुपूर्वशः ।**
**स्वसंपद्गुणयुक्तानि तान्यङ्गान्युपधारयेत् ॥४६॥**

संधींच्या भागांमध्ये स्वकार्यसिद्धिकर गुणांनी युक्त असे जे क्रमवार वृत्तान्त असतात त्यांना संधींची अंगे असे समजावे.

**अङ्गानां सामान्यस्वरूपं प्रयोजनद्वारेण दर्शयितुं प्रथमेन स्वरूपं द्वाभ्यां प्रयोजनमेकेन द्वयं प्रकाशयन्नाह श्लोकषट्कं संधीनां यानि वृत्तानीत्यादि शोभामेति न संशय इत्यन्तम् । अर्थभागराशिः संधिरित्युक्तम्, तत्र संधीनां संबन्धीनि यानि वृत्तानि संविधानखण्डानि, अनुपूर्वश इति मुख्यप्रयोजनसंपादनबलोपनतेन क्रमेण न तु लक्षणनिरूपणप्रसङ्गपरिकल्पितेन, प्रदेशेष्वादिमध्यान्तभागेषु वर्तनेन अङ्गानि । कुत इत्याह स्वस्य अङ्गिनः संधेर्या संपत्तिर्निष्पत्तिः तत्र गुणवत्त्वे शेषभावे यतो युक्तान्युचितानि, संधिसंपादकत्वादङ्गानीत्यर्थः । अन्ये त्वाहुः स्वसंपदो बीजोत्पत्त्युद्धाटनादिकाः गुणाश्च शब्दार्थवैचित्र्याणि, स्वसंपदां वा गुणाः, तैरेव युक्तानीति ।**

प्रयोजनांच्या द्वारा अंगांचे सामान्य स्वरूप स्पष्ट करण्यासाठी पहिल्या श्लोकात स्वरूप, नंतरच्या दोन श्लोकांत प्रयोजन, नंतर एका श्लोकात दोन्ही स्पष्ट करून 'संधीनां

यानि वृत्तानि' येथपासून 'शोभामेति न संशयः' येथपर्यंत सहा श्लोकांत सांगतात. अर्थाच्या एका भागाचा समूह तो संधि असे म्हटले आहे; त्यात संधींच्या संबंधीचे जे वृत्तान्त म्हणजे संविधानकाचे भाग, क्रमवार म्हणजे मुख्य प्रयोजन साध्य करण्यासाठी आवश्यक त्या क्रमाने, त्यांच्या लक्षणांचे निरूपण करण्याच्या निमित्ताने कल्पिलेल्या क्रमाने नाही, प्रदेशांमध्ये म्हणजे संधींच्या आरंभ, मध्य आणि अन्त या भागांमध्ये विद्यमान असलेले (वृत्तान्त) ते संधींची अंगे. हे कशावरून ते सांगतात—स्वतःची म्हणजे अङ्गी जो संधि त्याची जी संपत्ति म्हणजे निष्पत्ती तिच्याशी गुणरूपात म्हणजे शेषरूपात युक्त म्हणजे उचित असतात म्हणून; ते संधी निष्पन्न करीत असल्यामुळे त्यांना अंगे म्हटले आहे असा याचा अर्थ. परंतु दुसऱ्या टीकाकारांचे म्हणणे असे की बीजाची उत्पत्ती, उद्घाटन आदी संधींच्या स्वतःच्या संपत्ती आणि शब्दार्थांचे वैचित्र्यरूप गुण, किंवा स्वतःच्या संपत्तींचे गुण, त्यांनीच युक्त असा अर्थ.

'द्वाभ्यां' म्हणजे ४७ व ४८ श्लोकांत. – 'एकेन' म्हणजे ४९ व्या श्लोकात. – 'द्वयं' म्हणजे स्वरूप व प्रयोजन. यानंतर मुद्रितात 'द्वयेन' अधिक आहे. ते निरर्थक आहे. – 'संबन्धीनि' मुद्रित पाठ 'संबन्धनीयानि' आहे. तो निष्कारण क्लिष्ट आहे. – 'वर्तनेन' 'वृत्तानि' शब्दाची व्युत्पत्ती सूचित करण्यासाठी हा शब्द वापरला आहे. – 'संपत्तिर्निष्पत्तिः' मुद्रितात संपत्तेर्निष्पत्तिः' आहे. पण 'संपत्ति' शब्दाचा 'निष्पत्तिः' असा अर्थ दिला आहे. तेव्हा दोन्ही शब्द प्रथमा विभक्तीतच असणे आवश्यक आहे. – 'गुणवत्त्वे' याचा अर्थ 'शेषभावे' असा दिला आहे. दोहोंचा गौण स्वरूपाचे, प्रधानाचे शेषभूत म्हणजे त्याचे अवयवस्वरूप अशा तऱ्हेचा अर्थ अभिप्रेत आहे. – 'यतो' मुळात 'यतो यतो' आहे. पण त्याने निराळाच अर्थ उत्पन्न होतो. 'कुतः' ह्या विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर दिले आहे त्यात 'यतः' म्हणजे ज्याअर्थी असा अर्थ अभिप्रेत आहे. 'यतो यतो' म्हणजे जेथून जेथून. – इतर टीकाकारांनी 'स्वसंपद्-गुणाः' चे दोन वैकल्पिक अर्थ दिले आहेत – 'स्वसंपदश्च गुणाश्च' असा कर्मधारय आणि 'स्वसंपदां गुणाः' असा षष्ठी तत्पुरुष. त्यांनी केलेला 'युक्त' शब्दाचा अर्थ अधिक स्वीकार्य आहे.

**इष्टस्यार्थस्य रचना[1] वृत्तान्तस्यानुपक्षयः ।**
**रागप्राप्तिः प्रयोगस्य गुह्यानां चैव गूहनम् ॥४७॥**
**आश्चर्यवद[2]भिख्यानं प्रकाश्यानां प्रकाशनम् ।**
**[3]अङ्गानां षड्विधं ह्येतद् दृष्टं शास्त्रे प्रयोजनम् ॥४८॥**

इष्ट असलेल्या कार्याची रचना, वृत्तान्त अबाधित ठेवणे, प्रयोगात रंजकता उत्पन्न करणे, गुह्य गोष्टी गुप्त राखणे, विस्मयकारक रीतीने कथन करणे आणि उघड करणे

१ **घो** वचनं. २ **नि** -दभिख्यातं. ३ अयं श्लोकार्धः **नि** पुस्तके नास्ति.

आवश्यक असलेल्या गोष्टी उघड करणे – असे हे अंगांचे सहा प्रकारचे प्रयोजन शास्त्रात सांगितले आहे.

**इष्टस्येत्यादिना प्रयोजनमाह । अभीष्टस्य प्रयोजनस्य रसास्वादकृतो रचना विस्तारणा । वृत्तान्तस्यानुपक्षयः क्रमेण स्फुटत्वादयःशलाकाकम्बलत्वाभावः । एतत्प्रयोजनं सर्वसाधारणम् । प्रयोगस्येतिवृत्तस्य स्वयं परस्परस्यापि रागप्राप्तिः रञ्जनायोग्यत्वलाभः । व्युत्पत्त्यवस्थायोगाद्यदि वा पौनरुक्त्याद्याभासाद् ये गुह्याः संछादनीया अर्थास्तेषां संछादनम् । पुनः पुनः श्रुतमपि यदभिख्यातामितिवृत्तं, तत एव नाश्चर्यकारि, तदप्यङ्गयोजनायामपूर्वतामिवादधदद्भुततामेति, तदाहाश्चर्यवदिति । यच्च व्युत्पत्तौ सातिशयोपयोगि, तत एव प्रकाश्यं, तस्य प्रकाशनं विस्तारणम् । आद्यं तु प्रयोजनं चमत्कारकृतं स्मृतिदृष्टमपि प्रत्यक्षविशेषसिद्धमेव, न तु संध्योपासनादिवददृष्टं नापि पूर्वरङ्गाङ्गवदुभयरूपमित्यर्थः । शास्त्र इति नाट्यात्मके वेद इत्यर्थः । एषां प्रयोजनानामङ्गलक्षणेषूदाहरणं वर्णयिष्यामः ।**

'इष्टस्य' इत्यादी श्लोकांमध्ये प्रयोजन सांगतात. इष्ट असलेल्या रसास्वाद उत्पन्न करणाऱ्या प्रयोजनाची रचना म्हणजे विस्तार. वृत्तान्ताचा क्षय न होणे म्हणजे क्रमशः स्पष्ट होत असल्यामुळे लोखंडी काड्यांच्या घोंगड्याप्रमाणे नसणे. हे प्रयोजन सर्व अंगांना समान आहे. प्रयोगाची म्हणजे इतिवृत्ताची स्वतः आणि एकमेकांना रागप्राप्ती म्हणजे रंजन करण्याच्या सामर्थ्याचा लाभ. बोध देण्याच्या उद्देशामुळे अथवा पुनरुक्ततेचा भास होत असल्यामुळे ज्या गोष्टी गुह्य म्हणजे गुप्त ठेवण्यासारख्या असतात त्या गुप्त ठेवणे. पुन्हा पुन्हा ऐकलेले, चांगले माहीत असलेले, म्हणूनच आश्चर्य वाटावयास न लावणारे असे कथानक सुद्धा त्याच्या अंगांच्या योजनेत अपूर्वता निर्माण करून अद्‌भुत स्वरूपाचे होते, हे 'आश्चर्यवद्' यात सांगतात. आणि जी गोष्ट बोध देण्यास अतिशय उपयोगी आणि म्हणूनच प्रकाशित करण्यासारखी असते तिचे प्रकाशन म्हणजे विस्तार. परंतु चमत्कृति उत्पन्न करणारे पहिले प्रयोजन स्मृतीत विहित असले तरी विशेष प्रकारच्या प्रत्यक्षाने सिद्ध होणारे असेच आहे, संध्योपासना इत्यादीप्रमाणे अदृष्ट फलाच्या स्वरूपाचे नाही किंवा पूर्वरंगाच्या अंगांप्रमाणे दृष्ट व अदृष्ट अशा दोन्ही स्वरूपाचे नाही असा अर्थ आहे. शास्त्रात म्हणजे नाट्यरूप वेदात असा अर्थ. ह्या प्रयोजनांची उदाहरणे आम्ही अंगांच्या लक्षणांच्या व्याख्यांत दाखवून देऊ.

'अयःशलाकाकम्बलत्वाभावः' याचा अर्थ स्पष्ट नाही. अयःशलाका म्हणजे लोखंडी सळ्या, त्यांनी बनविलेल्या कांबळ्यात वीण घट्ट न झाल्यामुळे मध्ये मध्ये तुटकपणा भासतो तसा तुटकपणा संविधानकात असू नये अशा प्रकारचा अर्थ असण्याची शक्यता आहे. मुद्रितात '-कल्प-

स्वाभावः' असे पाठाच्या शेवटी आहे. पण त्यानेही अर्थ स्पष्ट होण्यास मदत होत नाही. – 'परस्परस्य' म्हणजे अंगांची परस्परात रंजकता उत्पन्न करण्याची क्षमता. – 'व्युत्पत्त्यवस्थायोगात्' व्युत्पत्ति म्हणजे सामाजिकांना बोध अथवा उपदेश देणे. त्यासाठी काही गोष्टी उघड न करणे इष्ट असते. – '-ग्राभासाद् ये' मुद्रितात '-ग्राभासे' असा पाठ असून पुढील 'ये' गाळला आहे. पण ते बरोबर नाही. हेतुदर्शक पञ्चमी, तसेच 'ये' दोन्ही आवश्यक आहेत. – 'अद्भुतताम्' हस्तलिखितात 'अभूतताम्' आहे. तोही पाठ असंभवनीय नाही. – 'स्मृतिदृष्टम्' स्मृति म्हणजे नाट्यशास्त्र असे अभिप्रेत असावे आणि दृष्ट म्हणजे विहित केलेले, सांगितलेले. नाट्यशास्त्राला वेद म्हटलेले असल्यामुळे कदाचित मूळ पाठ 'श्रुतिदृष्टम्' असावा. मीमांसाशास्त्राप्रमाणे क्रियेचे फल दृष्ट म्हणजे याच लोकी उपभोगावयाचे किंवा अदृष्ट म्हणजे परलोकी भोगावयाचे असे असू शकते. चमत्कृति किंवा रसास्वाद हे दृष्ट फल, प्रत्यक्ष रंगमंदिरात अनुभविता येते.

**अङ्गहीनो नरो यद्वन्नैवारम्भक्षमो भवेत्[1] ।**
**अङ्गहीनं तथा काव्यं न प्रयोगक्षमं भवेत् ॥४९॥**
**उदात्तमपि यत्काव्यं स्यादङ्गैः परिवर्जितम् ।**
**हीनत्वाद्धि[2] प्रयोगस्य न सतां रञ्जयेन्मनः ॥५०॥**
**काव्यं यदपि हीनार्थं सम्यगङ्गैः समन्वितम् ।**
**दीप्तत्वात्तु[3] प्रयोगस्य शोभामेति न संशयः ॥५१॥**

ज्याप्रमाणे अंगहीन असलेला मनुष्य कार्य करण्यास समर्थ होणार नाही त्याप्रमाणे अंगांनी विरहित असलेले काव्य प्रयोगास योग्य होणार नाही. उदात्त असलेले काव्य सुद्धा जर अंगविहीन असेल तर प्रयोग हीन प्रतीचा होत असल्यामुळे सज्जनांच्या मनाचे रंजन करू शकणार नाही. आणि कनिष्ठ प्रतीचे काव्य सुद्धा जर अंगांनी समुचित रीतीने युक्त असेल तर प्रयोग उत्कृष्ट होत असल्यामुळे शोभा पावते यात शंका नाही.

**अत एव दृष्टान्तेन द्रढयति अङ्गकर्तव्यसंपादनम् । न प्रयोगक्षममिति ततः प्रयोजनस्यासंपत्तेः, दृष्टस्य वा प्रत्युतासंभावनात् ।**

**एतद् व्यतिरेकद्वारेण स्फुटयति उदात्तमपीति । लक्षणगुणालंकृतियुक्तमित्यर्थः । प्रयोगस्येति अपादानमपि संबन्धि, वृक्षस्य पर्णं पततीति यथा । तस्य प्रयोगस्य तस्य काव्यस्य यतो हीनत्वं तदयोग्यत्वं तस्मात् सतां परोपकारप्रवृत्तानां कविनटानां साधुभूतानां वा सामाजिकानां मनो न रञ्जयतीति संभाव्यते ।**

१ नि यद्वद् युद्धारम्भेऽक्षमो. २ नि -त्वात्तु. ३ का दीप्ताङ्गत्वात्.

अन्वयद्वारेणोपसंहरति यदपीति । हीनार्थमिति स्वल्पप्रयोजनं प्रहसनानिदर्शितकथंचार्थेत्यादि । प्रयोगः प्रयुक्तिः, तत्राङ्गं प्रयोजकं रञ्जनातिशयो व्युत्पत्त्यतिशयश्च, तदुभयं तत्र काव्ये दीप्तं स्फुटमित्यर्थः ।

म्हणूनच दृष्टांताच्या साहाय्याने योजावयाच्या अंगांचे संपादन दृढ करतात. प्रयोगक्षम होणार नाही म्हणजे त्यामुळे प्रयोजनाची निष्पत्ती होणार नाही किंवा उत्पन्न झालेले प्रयोजन उलट असंभाव्य असेल.

हेच 'उदात्तमपि' इत्यादी नकारात्मक विधानाने स्पष्ट करतात. उदात्त म्हणजे लक्षण, गुण आणि अलंकार यांनी युक्त असा अर्थ. 'प्रयोगस्य' यात अपादान अशा अर्थी सुद्धा संबंधदर्शक षष्ठी, 'वृक्षस्य पर्णं पतति' यात आहे त्याप्रमाणे. त्या प्रयोगापासून त्या काव्याची ज्याअर्थी हीनता म्हणजे त्यासाठी अयोग्यता आहे त्याअर्थी ते काव्य सज्जनांच्या म्हणजे इतरांवर उपकार करण्यास प्रवृत्त झालेल्या कवींच्या आणि नटांच्या किंवा साधुस्वरूप प्रेक्षकांच्या मनाचे रंजन करणार नाही असा संभव आहे.

'यदपि' इत्यादी अस्तिपक्षी विधानाने उपसंहार करतात. हीनार्थ म्हणजे अगदी अल्प प्रयोजन असलेले प्रहसन आदी काव्य. प्रयोग म्हणजे प्रयोजना, त्यात अंग म्हणजे प्रयोजक, उत्कृष्ट रंजकता आणि उत्कृष्ट बोधदायित्व; ती दोन्ही त्या काव्यात दीप्त म्हणजे स्पष्ट असतात असा अर्थ.

'द्रढयति' या शब्दानंतर टीकेतील काही शब्द गहाळ झाले असावेत असे वाटते. श्लोकातील प्रारंभीचा शब्द प्रतीक म्हणून उद्धृत केला असण्याचा संभव आहे. तसेच 'आरम्भक्षमः' शब्दाचा अर्थ विशद केला असण्याचीही शक्यता आहे. – 'अङ्गकर्तव्यसंपादनम्' हा समास 'अङ्गैः स्वकर्तव्यस्य संपादनम्' असा सोडविल्यास 'द्रढयति' पेक्षा अधिक समर्पक क्रियापद अपेक्षित आहे. 'कर्तव्यानि यानि अङ्गानि तेषां संपादनम्' असा अर्थ शक्य आहे. पण तसा समास विचित्र वाटतो. '-कर्तव्यतासंपादनम्' असा पाठभेद सुचविता येईल. – 'न प्रयोगक्षममिति' मुळात 'न' नाही. परंतु पुढे जो अर्थ दिला आहे तो 'न' चा अन्तर्भाव करून दिला आहे. तेव्हा श्लोकातून शब्द उद्धृत करताना तोही केला असणारच. – 'दृष्टस्य वा प्रत्युतासंभावनात्' ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'दृष्टस्य वा प्रत्युत संभावनात्' आणि मुद्रितात 'दृष्टस्य वा प्रच्युतसंभावनात्' असे आहे. दृष्ट म्हणजे निष्पन्न होणारे प्रयोजन असा अर्थ अभिप्रेत दिसतो. त्याची असंभाव्यता निदर्शित करण्यासाठी 'असंभावनात्' आवश्यक आहे. 'प्रच्युतसंभावनात्' हे संभाव्य नाही. प्रच्युतीची कल्पना प्रयोगाच्या अक्षमतेशी जुळण्यासारखी नाही.

'अपादानमपि संबन्धि' हस्तलिखितात 'सन्धिबन्धि' असा भ्रष्ट पाठ आहे. मुद्रितात 'संबन्धित्वेन' असून त्यानंतर 'षष्ठी' हा शब्द संपादकांनी सुचविला आहे. 'प्रयोगस्य' हे षष्ठीचे रूप

आहे. षष्ठीचा सामान्यतः संबन्ध दाखविण्यासाठी उपयोग होतो. पण येथे तो अपादान हा पंचमीचा अर्थ दाखविण्यासाठी केला आहे, म्हणजेच 'प्रयोगस्य' हे रूप 'प्रयोगात्' या अर्थी वापरले आहे. अशा तऱ्हेच्या षष्ठीच्या उपयोगाचे उदाहरण 'वृक्षस्य पर्णं पतति' हे दिले आहे. – 'तस्य प्रयोगस्य' वस्तुतः वरील विवेचनानुसार 'तस्मात् प्रयोगात्' असा शब्दप्रयोग येथे अपेक्षित आहे. 'प्रयोगात्' याचा अन्वय 'हीनत्वात्' शी लावावयाचा; त्यातील हीन हे विशेषण काव्याचे; 'प्रयोगात्' म्हणजे प्रयोगापासून, प्रयोगामुळे काव्य हीन होते म्हणजे प्रयोगाला अयोग्य होते म्हणून असा एकंदर अर्थ अभिनवगुप्ताने केलेला दिसतो. हा खटाटोप करण्याचे प्रयोजन स्पष्ट नाही. –'तदयोग्यत्वं तस्मात्' मुद्रितात 'यदयोग्यत्वं यस्मात्' असे आहे. पण ते बरोबर नाही. 'तत्' ने प्रयोगाचा बोध होतो. – 'परोपकार-' यातील 'पर' म्हणजे सामाजिक किंवा प्रेक्षक.

'स्वल्पप्रयोजनं' ही मुळातील 'स्वल्पमपि प्रयोजनं' ची दुरुस्ती आहे. 'हीनार्थं'ची ही व्याख्या असल्यामुळे समासघटित शब्द आवश्यक आहे. 'काव्यं' चे हे विशेषण आहे. – प्रहसनानिदर्शितकथंचाथीत्यादि' असा अत्यंत भ्रष्ट पाठ हस्तलिखितात आहे. हीनार्थ काव्याचे यात उदाहरण आहे. त्यातील प्रहसन एवढाच भाग स्पष्ट आहे. मुद्रितात 'प्रहसननिदर्शनकथाख्यायिकादि' असा पाठ दिला आहे. पण तो मुळीच संभाव्य नाही. प्रयोगाच्या संदर्भात कथा व आख्यायिका यांचा निर्देश अशक्य आहे. प्रहसनाबरोबर उत्सृष्टिकाङ्क, भाण व वीथी यांचा निर्देश केला असल्याची संभाव्यता आहे. कारण तेही स्वल्पप्रयोजन होत असे म्हणता येईल. तथापि, ह्या समासाचे मूळ रूप काय असावे हे सूचित करणे कठीण आहे. – 'अङ्गं प्रयोजकं' श्लोकातील 'अङ्गैः' ने संध्यङ्गांचा बोध होत असता अङ्ग म्हणजे प्रयोजक असा अर्थ केला आहे तो त्याचे वैशिष्ट्य – रंजकता आणि व्युत्पत्ति असे दोन प्रकारचे – दाखविण्याच्या उद्देशाने.

संपादकांनी टीपेत असे म्हटले आहे की नाट्यशास्त्राच्या सर्व हस्तलिखितांत ५१ वा श्लोक ५० व्या श्लोकाच्या पूर्वी आढळतो. अभिनवगुप्ताच्या व्याख्येच्या अनुरोधाने त्यांनी क्रम बदलला आहे हे उघड आहे.

**तस्मात्संधिप्रदेशेषु[१] यथायोगं[२] यथारसम् ।**
**कविनाङ्गानि कार्याणि सम्यक्तानि[३] निबोधत ॥५२॥**

**उपक्षेपः परिकरः परिन्यासो विलोभनम् ।**
**युक्तिः प्राप्तिः समाधानं विधानं परिभावना ॥५३॥**

**उद्भेदः करणं भेदं[४] एतान्यङ्गानि वै मुखे ।**
**तथा प्रतिमुखे चैव शृणुताङ्गानि[५] नामतः ॥५४॥**

१ नि प्रयोगेषु. २ नि -देशं. ३ नि प्रदेशास्तु. ४ नि भेदो द्वादशा-
५ नि वक्ष्याम्यङ्गानि, का शृणुताङ्गान्यतः परम्.

विलासः परिसर्पश्च विधूतं तापनं तथा ।
नर्म नर्मद्युतिश्चैव तथा प्रगयणं[6] पुनः ॥ ५५ ॥
निरोधश्चैव विज्ञेयः पर्युपासनमेव च ।
पुष्पं वज्रमुपन्यासो वर्णसंहार एव च ॥ ५६ ॥
एतानि वै प्रतिमुखे गर्भेऽङ्गानि निबोधत ।
अभूताहरणं मार्गो रूपोदाहरणे क्रमः ॥ ५७ ॥
संग्रहश्चानुमानं च प्रार्थनाक्षिप्तिरेव[7] च ।
तोटकाधिबले चैव ह्युद्वेगो विद्रवस्तथा ॥ ५८ ॥
एतान्यङ्गानि वै गर्भे ह्यवमर्शे[8] निबोधत ।
अपवादश्च संफेटो विद्रवः[9] शक्तिरेव च ॥ ५९ ॥
व्यवसायः प्रसङ्गश्च द्युतिः[10] खेदो निषेधनम् ।
विरोधनमथादानं छादनं[11] च प्ररोचना ॥ ६० ॥
[12]एतान्यवमृशेऽङ्गानि भूयो निर्वहणे शृणु ।
संधिर्निरोधो[13] ग्रथनं निर्णयः परिभाषणम् ॥ ६१ ॥
[14]द्युतिः प्रसाद आनन्दः समयो ह्युपगूहनम् ।
भाषणं पूर्ववाक्यं च काव्यसंहार[15] एव च ॥ ६२ ॥
प्रशस्तिरिति[16] संहारे ज्ञेयान्यङ्गानि नामतः ।
चतुःषष्टिर्बुधैर्ज्ञेयान्येतान्यङ्गानि संधिषु ॥ ६३ ॥

म्हणून कवीने संधींच्या भागांमध्ये रसाला अनुरूप व यथोचित अशी अंगे योग्य रीतीने योजावीत. त्या अंगांची नावे ऐका. उपक्षेप, परिकर, परिन्यास, विलोभन, युक्ति, प्राप्ति, समाधान, विधान, परिभावना, उद्भेद, करण आणि भेद ही मुखसंधीतील अंगे होत.

६ नि प्रशमनं, घो प्रगमनं. ७ ब -क्षिप्तमेव. ८ नि विमर्शे च. ९ घो -ऽभिद्रवः. १० घो द्रुतिः. ११ घो सादनं. १२ ब व्यवहारश्च युक्तिश्च विमर्शाङ्गान्यमूनि च. १३ घो -विबोधो. १४ नि धृतिः, घो कृतिः. १५ नि कार्य-. १६ का चाङ्गानि कुर्यान्निर्वहणे बुधः.

आता प्रतिमुखसंधीतील अंगांची नावे ऐका. विलास, परिसर्प, विधूत, तापन, नर्म, नर्मद्युति, प्रगयण, निरोध, पर्युपासन, पुष्प, वज्र, उपन्यास आणि वर्णसंहार ही प्रतिमुखातील अंगे होत. आता गर्भसंधीतील ऐका. अभूताहरण, मार्ग, रूप, उदाहरण, क्रम, संग्रह, अनुमान, प्रार्थना, आक्षिप्ति, तोटक, अधिबल, उद्वेग आणि विद्रव ही गर्भसंधीतील अंगे. आता अवमर्शातील ऐका. अपवाद, संफेट, विद्रव, शक्ति, व्यवसाय, प्रसङ्ग, द्युति, खेद, निषेधन, विरोधन, आदान, छादन, आणि प्ररोचना ही अवमृशसंधीतील अंगे होत. आता निर्वहणसंधीतील ऐका. संधि, निरोध, ग्रथन, निर्णय, परिभाषण, द्युति, प्रसाद, आनंद, समय, उपगहन, भाषण, पूर्ववाक्य, काव्यसंहार आणि प्रशस्ति ही निर्वहणातील अंगांची नावे होत असे समजावे. बुद्धिमान कवींनी संधींतील ही चौसष्ट अंगे जाणून घ्यावीत.

**अथाङ्गानामुद्देशमाह उपक्षेपः परिकर इत्यादिना एतान्यङ्गानि संधिष्वित्यन्तेन । मुखे द्वादश, प्रतिमुखे गर्भे च त्रयोदश, अवमर्शे द्वादश, निर्वहणे चतुर्दशेत्येवं मिलित्वा चतुष्षष्टिः ।**

आता 'उपक्षेपः परिकरः' इत्यादीपासून 'एतान्यङ्गानि संधिषु' येथपावेतो अंगांचा नामनिर्देश करतात. मुखसंधीत बारा, प्रतिमुख आणि गर्भ संधीत प्रत्येकी तेरा, अवमर्श संधीत बारा आणि निर्वहणात चौदा याप्रमाणे सर्व मिळून चौसष्ट.

'अवमर्शे द्वादश' वस्तुतः अवमर्शातही तेरा अंगांचा नामनिर्देश आहे. आणि पुढे ह्या तेराही अंगांच्या व्याख्या दिल्या आहेत. त्यामुळे एकंदर अंगांची संख्या पासष्ट होते, चौसष्ट नाही. पुढेही व्याख्यांची संख्या पासष्टच होते आणि त्या सर्व व्याख्यांवर अभिनवगुप्ताची टीका आहे. मूळ अंगांची संख्या चौसष्ट असणार. नंतर त्यात एका अंगाची भर पडली असावी. पण हे नवीन अंग कोणते हे सांगता येण्यासारखे नाही. दशरूप आदी उत्तरकालीन ग्रंथांतून गर्भसंधीतील 'प्रार्थना' हे अङ्ग गाळलेले आढळते.

येथील ५२ वा श्लोक संपादकांनी कंसात दिला आहे. त्यावर अभिनवगुप्ताची टीका नाही. तथापि तो मूळ असण्याचा फार संभव आहे. मागील श्लोकांवरून स्वाभाविकपणे निघणारा निष्कर्ष त्यात अहे.

**केचिन्मन्यन्ते । इह उपक्रम उपसंहारो मध्यमिति प्रत्यवस्थं स्थानभेदत्रयम्, तत्र प्रत्येकं सूक्ष्मेणारम्भाद्यवस्थापञ्चकेन भाव्यमिति पञ्चदश्यो दशाः क्रमभाविनः । तत्राद्यास्तावद्दशा नाङ्गत्वेन वर्ण्यन्ते, अङ्गिबुद्ध्यनुदयात्तत्रेति । चतुर्दश निर्वहणे फलयोगबलात्सर्वा एवोपपाद्यन्ते । अन्यत्र तु मुखादौ काश्चिल्लीनीक्रियन्ते, न द्वादशादिभेदानि तत्राङ्गानीति । तदेतदसत् । एवं हि वक्षमा-**

**णेषु तेनैव क्रमेण भाव्यम्, न चासावस्ति । प्रयोजनशङ्काषट्कं ततश्चानुपपन्नं स्यात्, अनुपक्षय इत्येकमेव हि प्रयोजनं भवेत् । भेदकरणेऽपि च नियमनिदानानुपपत्तौ द्वयोर्द्वादश द्वयोस्त्रयोदशेति कुतस्त्यो विभाग इत्यास्तामदः ।**

काही टीकाकारांचे असे मत आहे की प्रत्येक अवस्थेत प्रारम्भ, अन्त आणि मध्य अशी तीन स्थाने असतात. त्यात प्रत्येकी सूक्ष्म स्वरूपाच्या आरम्भ आदी पाच अवस्था असतात म्हणून पंधरा दशा क्रमाने अस्तित्वात येतात. त्यांपैकी आरंभीच्या दशांचे अंग म्हणून वर्णन होत नाही, कारण त्यावेळी अंगीविषयीच्या कल्पनेचा उदय झालेला नसतो निर्वहणसंधीत फलयोग असल्याकारणाने सर्व चौदाही दशा उपपन्न केल्या जातात. परंतु मुख आदी इतर संधींमध्ये काहींचा लोप केला जातो, त्यांत बारा इत्यादी प्रकारची भिन्न अंगे नसतात. पण हे मत बरोबर नाही. असे असते तर सांगितल्या जाणाऱ्या अंगांचा तोच क्रम ठरला असता; पण तसा तो क्रम अभिप्रेत नाही. आणि तसे समजल्यास सहा प्रयोजनांचा संभव उपपन्न होणार नाही, अनुपक्षय हेच एक सर्व अंगांचे प्रयोजन ठरेल. आणि भेद करण्यामध्ये सुद्धा नियमिततेचे कारण उपपन्न नसल्यामुळे दोन संधींत बारा, दोन संधींत तेरा अशा प्रकारची विभागणी कोठून होणार? तेव्हा हे राहू द्या.

'तत्र प्रत्येकं इ०' ह्या टीकाकारांचे म्हणणे असे की पाच अवस्थांमध्ये जी आदि-मध्य-अन्त अशी तीन स्थाने असतात त्या प्रत्येक स्थानात पाच पाच अवस्था असतात; ह्या सूक्ष्म स्वरूपाच्या असतात. म्हणजे मुख्य पाच अवस्थांत प्रत्येकी सूक्ष्म पंधरा अवस्था असतात. ह्यांना दशा हे नाव दिले आहे. याप्रमाणे प्रत्येक संधीत पंधरा दशा असतात. आणि संपूर्ण रूपकात पंचाहत्तर दशा असा हा हिशोब आहे. – 'पञ्चदश्यः' वस्तुतः 'पञ्चदश' असेच रूप अपेक्षित आहे. – 'आद्याः' म्हणजे फक्त प्रारंभावस्थेतील सुरुवातीच्या काही का प्रत्येक अवस्थेच्या सुरुवातीची पहिली याप्रमाणे फक्त पाच हें स्पष्ट नाही. पहिला पर्याय अधिक संभाव्य वाटतो. – 'दशा नाङ्गत्वेन' ही 'दशानामङ्गत्वेन' ची दुरुस्ती आहे. तसेच 'अङ्गिबुद्ध्यनुदयात्' ही 'अङ्गिबुद्ध्युदयात्' ची दुरुस्ती आहे. अशी पाठशुद्धी केली तरच वाक्याचा सुसंगत अर्थ लागतो. अङ्गिन् अथवा अवयविन् असल्याशिवाय अंगांचा अथवा अवयवांचा निर्देश संभवनीय नाही; म्हणून सुरुवातीच्या दशांना अङ्ग ही संज्ञा लागू होत नाही. तेव्हा दशा पंचाहत्तर असल्या तरी अङ्गे चौसष्टच आहेत असा ह्या टीकाकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. – 'उपपाद्यन्ते' म्हणजे उपपन्न आहेत असे दाखविता येते. – 'वक्ष्यमाणेषु तेनैव' मूळ पाठ 'वक्ष्यमाणेनैव' एवढाच असण्याचा संभव आहे. पण आहे त्या पाठातूनहि अर्थनिष्पत्ती होऊ शकते. – 'प्रयोजनशङ्का' यात शङ्का म्हणजे संभव असा अर्थ अभिप्रेत आहे. – 'भेदकरणेऽपि' ही 'बीजकरणेऽपि' ची सुचविलेली दुरुस्ती आहे. बीजकरण हे प्रस्तुत संदर्भात संभाव्य नाही.

यानंतर बडोदे प्रतीत पुढील अधिक श्लोक कंसात दिला आहे –

**संपादनार्थं बीजस्य सम्यक् सिद्धिकराणि च।**
**कार्याण्येतानि कविभिर्विभज्यार्थानी नाटके ॥**

हा श्लोक मूळ असण्याचा संभव नाही. त्यातील आशय पुढे ९७–९८ श्लोकांत अधिक समुचित रीतीने मांडला आहे.

पुनरेषां[1] प्रवक्ष्यामि लक्षणानि यथाक्रमम् ।
काव्यार्थस्य समुत्पत्तिरुपक्षेप इति स्मृतः ।। ६४।।

आता यांची लक्षणे मी क्रमवार सांगतो. काव्याच्या विषयाचा संक्षेपाने निर्देश म्हणजे उपक्षेप असे म्हणतात.

पुनरेषामिति । पुनःशब्दो विशेषद्योतकः । लक्षण एवायं क्रमो न निबन्धन इति यावत् । तेन यदुद्भटप्रभृतयोऽङ्गानां संधौ क्रमे च नियममाहुस्तद्युक्त्यागमविरुद्धमेव । तथा हि 'संप्रधारणमर्थानां युक्तिरित्यभिधीयते' इति यन्मुखसंधौ पञ्चममङ्गं वक्ष्यति तत्सर्वेषु संधिषु तावन्निबन्धनयोग्यम् । न च तथा निवेश्य बध्यमानमदृष्टकृतं विदध्यात् । न च लक्ष्ये न दृश्यते । वेणीसंहारे हि तृतीयेऽङ्के गर्भसंधौ दुर्योधनकर्णयोर्महति संप्रधारणे द्रोणवधे वृत्ते –

तेजस्वी रिपुहतबन्धुदुःखपारं
बाहुभ्यां तरति धृतायुधप्लवाभ्याम् ।
आचार्यः सुतनिधनं निशम्य संख्ये
किं शस्त्रग्रहसमये विशस्त्र आसीत् ।। (३.२७)

इत्यादि यावत् –

दत्त्वाभयं सोऽतिरथो हन्यमानं किरीटिना ।
सिन्धुराजमुपेक्षेत नैवं चेत्कथमन्यथा ।। (३.२८) इति ।

न चात्र प्रीतिव्युत्पत्त्योः क्षतिः काचित् ।

'पुनरेषाम्' इत्यादी. पुनः हा शब्द विशेष दाखविणारा आहे. हा क्रम फक्त लक्षणांच्या संबंधातच आहे, रूपकात योजावयाच्या संबंधात नाही असे तात्पर्य. म्हणून उद्भट प्रभृतींनी अंगांची संधींच्या बाबतीत आणि क्रमाच्या बाबतीत नियतता असते असे जे म्हटले आहे ते युक्तियुक्ततेच्या आणि शास्त्राच्या विरुद्धच आहे. उदाहरणार्थ, 'प्रयोजनांविषयीचा विचार म्हणजे युक्ति असे म्हणतात' असे जे मुखसंधीतील पाचवे अङ्ग म्हणून सांगतील ते सर्वही संधींमध्ये योजावयास उचित असे आहे. आणि त्याची योजना केली

१ नि एतेषां तु पुनर्वक्ष्ये.

असता अदृष्ट असे काही होणार नाही. आणि अशी योजना कोठे दिसून येत नाही असेही नाही. कारण वेणीसंहार नाटकात तिसऱ्या अंकात गर्भसंधीमध्ये द्रोणाचा वध झाल्यानंतर दुर्योधन आणि कर्ण यांच्यामधील दीर्घ कारणमीमांसेत 'तेजस्वी पुरुष शत्रूने स्वजनाचा वध केल्यामुळे होणाऱ्या दुःखरूपी सागराच्या पार आयुधरूपी प्लव घेतलेल्या हातांनी संतरण करून जातो. मग रणांगणावर पुत्राच्या मृत्यूची बातमी ऐकल्यावर शस्त्र हातात घेण्याच्या वेळेस आचार्यांनी शस्त्रत्याग केला हे कसे?' ह्या दुर्योधनाच्या उक्तीपासून तो 'जर असे नसेल तर एरव्ही त्या महान रथीने जयद्रथाला अभय देऊन त्याचा अर्जुनाकडून वध होत असता उपेक्षा कशी केली असती?' ह्या त्याच्याच उक्तीपर्यंतचा अंश. आणि यात आनन्द आणि बोध यांच्यात कोणतीही कमतरता उत्पन्न होत नाही.

'निवेश्य बध्यमानम्' ही 'निबध्यमानम्' शब्दाची फोड केलेली आहे. तेव्हा मुद्रितातील 'निवेश्यं' असा पाठ बरोबर नाही. –'अदृष्टकृतं' अदृष्ट शब्दाचा अर्थ जे शास्त्रात सांगितले नाही ते असा दिसतो. अदृष्ट फल असा अर्थ शक्य आहे, पण तो कमी संभाव्य वाटतो. – 'प्रीतिव्युत्पत्त्योः' प्रीति आणि व्युत्पत्ति ही काव्याची दोन प्रयोजनें प्रसिद्ध आहेत. म्हणून 'प्रतीति-' असा पाठ बरोबर नाही. शिवाय तो शब्दही अप्रस्तुत आहे.

**यत्तु संधिनैयत्येनाभिधानं तत्र संधाववश्यंभावित्वख्यापनार्थम्, युक्तिर्मुखे भवत्येव । संध्यन्तरालानि तु नेत्थमिति पृथक् वर्णयिष्यन्ते । कानिचित्त्वङ्गानि स्वरूपबलादेव नियमभाञ्जि । यथोपक्षेपो मुखसंधावेव प्रथममेव च । न ह्यनुपक्षिप्ते वस्तुनि किंचिदपि शक्यक्रियम् । यत्तूच्यते 'चतुःषष्ट्यङ्गसंयुतम्' इति तेन संभवमात्रमेषामुक्तं न तु नियमः । 'यथासंधि तु कर्तव्यानि' इति वचनं प्रत्युत संध्यौचित्येनैषां निबन्धनमभिदधदस्मदभिहितनीतियोग्यपथोपदेश्येव । योग्यतार्थवृत्तिना हि यथाशब्देनायमव्ययीभावः ।**

अमुक संधीत अमुक अङ्ग असा जो त्यांचा नियत स्वरूपात निर्देश केला आहे तो त्या संधीत ती अवश्य असतात हे दाखविण्यासाठी; उदाहरणार्थ, युक्ति हे अंग मुखसंधीत असतेच. परंतु संध्यन्तरे अशा स्वरूपाची नसतात म्हणून त्यांचे स्वतंत्रपणे वर्णन करणार आहेत. परंतु काही अंगांचे स्वरूपच असे असते की त्यांचे स्थान निश्चित ठरलेलेच असते. उदाहरणार्थ, उपक्षेप मुखसंधीतच आणि तोही प्रथमारंभीच असतो. कारण कोणत्याही गोष्टीचा उपक्षेप झाला नसेल तर तिच्यासंबंधी कोणतीही क्रिया शक्य होत नाही. 'चौसष्ट अंगांनी युक्त' असे जे पुढे म्हटले आहे त्याने या अंगांचा फक्त संभव निर्दिष्ट केला आहे, नियतता दाखविली नाही. उलट 'संधींत योग्य असतील त्याप्रमाणे ही योजावीत' हे वचन संधींत योग्यतेनुसार यांची योजना करावी असे म्हणून आम्ही सांगितलेल्या अर्थयोजनेस अनुकूल

अशा मार्गाचे उपदेश करणारे आहे. कारण योग्यता असा अर्थ असलेल्या 'यथा' शब्दाने हा अव्ययीभाव समास बनला आहे.

'नैयत्य' हे नियत शब्दापासून बनलेले भाववाचक नाम. –'संध्यन्तरालानि' पुढे ९९–१०२ ह्या श्लोकांत साम, भेद इत्यादी एकवीस संध्यन्तरांचा निर्देश आहे. त्यांचा कोणत्याही संधीशी संबंध जोडलेला नाही. रूपकात कोठेही त्यांची योजना करता येईल. – 'प्रथममेव च। न' ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'प्रथममेव वचनं' आणि मुद्रितात 'प्रथमे। एवं च न' असे आहे. अर्थासाठी दुरुस्ती आवश्यक आहे हे उघड आहे. – 'चतुःषष्ट्यङ्गसंयुतम्' हे वचन पुढे ११७ व्या श्लोकात आहे. 'यथासंधि तु कर्तव्यानि' हे वचन पुढे ९७ व्या श्लोकात आहे. तदनुसार येथील 'यथासंधिकृत (:)' ह्या पाठाची दुरुस्ती आवश्यक आहे. – 'योग्यतार्थवृत्तिना' पण अव्ययीभावात 'यथा' चा अनतिक्रमण असाही अर्थ असू शकतो हे लक्षात ठेवले पाहिजे.

**यत्तूक्तं शरीराङ्गनियमदर्शनात्कथमेतदिति, तत्रापि न दृष्टान्ताद्व्यवस्था अपि तु संभवतः । स चास्तीत्युक्तम् । शाखादयश्च वृक्षावयवा मध्येऽपि ब्रध्नेऽपि ऊर्ध्वेऽपि भवन्ति । न च शरीरपादपादिवद् उपक्षेपादिभिरवयविकल्पः संधिरारभ्यते । यच्च प्रतिसंध्यभिधानं तद्बाहुल्येन तथा दर्शनात् । तथा हि उपक्षिप्तेऽर्थे विस्तारिते निश्चितगुणादभिलषिते संभावनीयमुपायादिविषयं संप्रधारणमिति उपक्षेपपरिकरपरिन्यासविलोभनहेतुत्वादन्यान्यभिधाय युक्तिरुक्ता, न तु तत्रैव सद्भावात् । आनन्तर्यनियमश्च मुनेरेवानभिमतो लक्ष्यते । अन्यथा संध्यन्तरालानि सामादीनि मदान्तान्येकविंशतिः लास्याङ्गानि गेयपदादीनि दश यानि वक्ष्यन्ते तेषां कुत्र निवेशः स्यात् । संधिपञ्चकमयं हि रूपकं क्रमनियतम्, अङ्गसंभारभावितश्च संधिरिति । न च क्रमेणानेनैव तानि प्रयोज्यानीति वचनमस्ति । सदपि च न्यायापेतमन्यथा योज्येत । न चोद्देशक्रममनूच्यते निबद्धम् । लक्षणालंकारगुणवीथ्यङ्गसंध्यन्तराणि लास्याङ्गवृत्तितदङ्गानि तु साधर्म्यदृष्टान्तः। तदेतत्प्रत्येकं लक्षणे स्फुटीभविष्यतीत्यास्तां तावत् ।**

शरीराच्या अवयवांच्या बाबतीत नियतता दिसून येते, मग हे अनियत कसे असे जे विचारले आहे त्याला उत्तर असे की दृष्टान्तावरून व्यवस्था ठरत नाही, तर संभव असेल त्याप्रमाणे. आणि तो संभव आहे असे सांगितले आहे. आणि शाखा वगैरे वृक्षाचे अवयव काही मध्ये, काही बुंध्याशी, तर काही वरही असतात. शिवाय, शरीर आणि वृक्ष यांच्याप्रमाणे संधि उपक्षेप आदींच्या मुळे अवयवीसारखा होतो असे नाही. आणि प्रत्येक संधीत म्हणून जो अङ्गांचा निर्देश केला आहे तो ती त्या त्या संधीत पुष्कळ प्रमाणात दिसतात म्हणून. उदाहरणार्थ, अर्थाचा उपक्षेप झाला, विस्तार झाला, निश्चित गुण असल्यामुळे त्याची अभिलाषा झाली, म्हणजे संभाव्य असा उपाय वगैरेविषयीचा विचार होतो म्हणून उपक्षेप, परि-

कर, परिन्यास आणि विलोभन यांना कारणीभूत म्हणून पहिल्या चार अङ्गांचे वर्णन करून युक्तीचा निर्देश केला आहे, पण ते अंग फक्त तेथेच असते म्हणून नाही. आणि क्रमाचा नियम भरतमुनीला संमत नाही असे दिसते. एरव्ही 'साम' पासून 'मद' पर्यंत असलेले एकवीस संध्यन्तराल, गेयपद आदी दहा लास्याङ्गे जी पुढे सांगणार आहेत, त्यांना कोठे स्थान देता येईल ? पाच संधी असलेले रूपक क्रमाने बांधलेले असते, परंतु संधी अङ्गांच्या समूहाने भावित झालेला असतो. आणि ती याच क्रमाने योजावीत असे कोठेही वचन नाही. आणि जरी तसे वचन असते तरी न्यायाला सोडून म्हणून त्याचा निराळा अन्वय लावता आला असता. आणि रचलेले काव्य उद्देशक्रमाला अनुसरून केले जात नाही. लक्षण, अलंकार, गुण, वीथीची अंगे, संध्यन्तर, लास्याची अंगे, वृत्ती, वृत्तींची अंगे, हे समान धर्म दाखविणारे दृष्टान्त आहेत. हे सर्व अङ्गांच्या लक्षणात स्पष्ट होईल, तेव्हा हे असो.

'न दृष्टान्ताद् इ०' मुळात 'न' 'अपि तु' नंतर आहे. तेथून काढून तो 'दृष्टान्ताद्' च्या पूर्वी घातला ओह. त्यामुळेच अभिप्रेत अर्थ संगतवार लावणे शक्य होते. –'शरीरपादपादिवद्' मुद्रितात 'शरीरे' असा स्वतंत्र शब्द आहे. पण ते बरोबर नाही. शरीर आणि पादप ह्या दोहोंहून संधीची भिन्नता येथे दाखवावयाची आहे. अवयव मिळून शरीररूपी अथवा पादपरूपी अवयवी होतो, पण अंगे मिळून संधिरूप अवयवी होतो असे म्हणणे शक्य नाही. – 'अवयविकल्पः' ही हस्तलिखितातील 'अवयविकल्पं' आणि मुद्रितातील 'अवयवविकल्पः' ची आवश्यक असलेली दुरुस्ती आहे. – 'तथा हि' ही मुळातील 'तथापि' ची दुरुस्ती आहे. 'तथापि' येथे अप्रस्तुत आहे. – 'उपक्षिप्तेऽर्थे इ०' यात पाहिल्या चार अंगांनी होणाऱ्या कार्याचा निर्देश आहे. –'अङ्गसंभारभावितश्च' मुद्रित पाठ 'तदङ्गसंहार-' आहे. संहार पेक्षा संभार शब्द अधिक योग्य आहे. 'भावित' म्हणजे त्यांनी ज्याला शोभा येते अशा स्वरूपाचा हा अर्थ अभिप्रेत असावा. – 'सदपि च' मुद्रितात 'च' ऐवजी 'वा' आहे. पण 'च' अधिक समर्पक वाटतो. – 'निबद्धम्' मुद्रितात 'निबन्धम्' आहे आणि संपादकांनी मूळ 'निबन्धः' असण्याची संभाव्यता सूचित केली आहे. पण 'रचलेले' अशा अर्थी काव्याचा वर्णनात्मक 'निबद्धम्' शब्दच योग्य वाटतो. – 'तु साधर्म्यदृष्टान्तः' ही 'त्वसाधर्म्य-' ची दुरुस्ती आहे. अभिनवगुप्ताला येथे असे म्हणावयाचे आहे की लक्षण, गुण, अलंकार वगैरे अनेक गोष्टींचे वर्णन करताना ज्या एका क्रमाने त्या सांगितल्या आहेत त्याच क्रमाने त्यांचा काव्यात उपयोग केला पाहिजे असे कोणी म्हणत नाही; तोच न्याय संध्यङ्गांना लावला पाहिजे. म्हणून येथे 'साधर्म्यदृष्टान्तः' असाच पाठ आवश्यक आहे.

तत्र प्रस्तावना न तावद्रूपकाङ्गं, नटवृत्तव्याप्ततयेतिवृत्ताननुप्रवेशादिति तदनन्तरं पूर्वं काव्यार्थ इतिवृत्तशरीरलक्षणोऽभिधेयः प्रधानरसलक्षणं च प्रयोजनं संक्षेपेणोपक्षिप्येते । यथा वेणीसंहारे भीमः –

लाक्षागृहानलविषान्नसभाप्रवेशैः
प्राणेषु वित्तनिचयेषु च नः प्रहृत्य ।
आकृष्य पाण्डववधूपरिधानकेशान्
स्वस्था भवन्तु कुरुराजसुताः सभृत्याः ॥ (१.८).

त्यात प्रस्तावना हा काही रूपकाचा भाग नाही; कारण, नटांच्या स्वतःच्या वृत्तान्ताने ती व्याप्त असल्यामुळे इतिवृत्ताचा तिच्यात समावेश होत नाही. म्हणून त्या प्रस्तावनेनंतर प्रथम इतिवृत्तरूपी शरीर असलेला, कथन करावयाचा असलेला काव्याचा अर्थ आणि प्रधान रसाचे स्वरूप दोन्ही संक्षिप्त प्रयोजनाच्या रूपात प्रस्तुत केले जातात. उदाहरणार्थ, वेणीसंहारात भीमसेन 'लाक्षागृहाला आग, विषयुक्त अन्न आणि सभेत आमंत्रण यांनी आमच्या प्राणावर आणि संपत्तीवर प्रहार केल्यानंतर आणि पांडवांच्या पत्नीची वस्त्रे आणि केस ओढल्यानंतर भृत्यांसहित कौरव स्वस्थ राहोत काय?'

'अभिधेयः' हे विधेय न समजता 'काव्यार्थः' चे विशेषण समजणे चांगले. त्यामुळे 'काव्यार्थः' आणि 'प्रधानरसलक्षणं' या दोन प्रथमान्त शब्दांचा 'उपक्षिप्येते' शी अन्वय लागतो. उपक्षेप ह्या दोहोंचा अभिप्रेत आहे. म्हणून हे क्रियापद द्विवचनातच हवे, मुद्रितातल्याप्रमाणे एकवचनात नको. – श्लोकातील चौथा चरण सूत्रधाराच्या वचनातील आहे. भीमसेनाच्या उद्गारात तो 'स्वस्था भवन्ति मयि जीवति धार्तराष्ट्राः' असा आहे. येथे वचन उद्धृत करताना अनवधान झालेले असावे. काव्यार्थाबरोबर वीररसाचाही ह्या श्लोकात उपक्षेप आहे.

**[1]यदुत्पन्नार्थबाहुल्यं ज्ञेयः परिकरस्तु सः ।**
**[2]तन्निष्पत्तिः परिन्यासो विज्ञेयः कविभिः सदा ॥ ६५ ॥**

निर्दिष्ट झालेल्या विषयाचा जो विस्तार तो परिकर असे समजावे. त्या विषयाची निष्पत्ति म्हणजे परिन्यास असे कवींनी सदा जाणावे.

**तत ईषद्विस्तार्यते । यथा भीमः –**

**प्रवृद्धं यद्वैरं मम खलु शिशोरेव कुरुभि-**
**र्न तत्रार्यो हेतुर्न भवति किरीटी न च युवाम् ।**
**जरासन्धस्योरःस्थलमिव विरूढं पुनरपि**
**क्रुधा भीमः संधिं विघटयति यूयं घटयत ॥** (१.१०).

त्यानंतर काव्यार्थाचा थोडा विस्तार केला जातो तो परिकर. उदाहरणार्थ, भीमाचे वचन 'मी लहान होतो तेव्हापासून माझे कौरवांशी वैर जे वाढत गेले त्याला कारण आर्य युधिष्ठिर नाही, अर्जुन नाही आणि तुम्ही दोघे नाही. जरासंधाच्या वक्षस्थलाप्रमाणे पुन्हा पुन्हा जुळवून आणलेला संधी हा भीम रागाने मोडणार, तुम्ही पाहिजे तर जोडा.'

१ नि समुत्पन्ना-. २ नि तन्निवृत्तिः, का तन्निष्पत्त्या तु कथनं परिन्यासः प्रकीर्तितः.

**ततोऽपि निश्चयापत्तिरूपतया परितो हृदये सोऽर्थो न्यस्यते । यथा चञ्चद्भुजभ्रमितचण्डगदाभिघातेत्यादि ।**

त्यापेक्षाही अधिक, निश्चयाप्रत येण्याच्या स्वरूपाचा असल्यामुळे तो काव्याचा अर्थ परितः म्हणजे हृदयामध्ये ठेवला जातो म्हणून परिन्यास. उदाहरणार्थ, भीमाचे वचन 'फुरफुरणाऱ्या हाताने फिरविलेल्या भीषण गदेच्या आघाताने' इत्यादी.

संपूर्ण श्लोक पुढीलप्रमाणे आहे –

**चञ्चद्भुजभ्रमितचण्डगदाभिघात-**
**संचूर्णितोरुयुगलस्य सुयोधनस्य ।**
**स्त्यानावनद्धघनशोणितशोणपाणि-**
**रुत्तंसयिष्यति कचांस्तव देवि भीमः ॥ (१.२१).**

**गुणनिर्वर्णनं[१] चैव विलोभनमिति स्मृतम् ।**
**संप्रधारणमर्थानां युक्तिरित्यभिधीयते ॥ ६६ ॥**

गुणांचे वर्णन म्हणजे विलोभन असे म्हणतात. प्रयोजन समजून घेणे म्हणजे युक्ति असे म्हणतात.

**ततस्तदेव वस्तु गुणवदिति श्लाघ्यते । श्लाघैव विलोभनहेतुत्वाद्विलोभनम् । यथा द्रौपदी 'अणुगेह्णन्तु मह एदं वअणं देवदाओ ।' इति । यथा वा विक्रमोर्वश्यां राजा 'अस्याः सर्गविधौ प्रजापतिरभूत्' इत्यादि ।**

नंतर तीच गोष्ट गुणयुक्त म्हणून तिची प्रशंसा केली जाते. प्रशंसाच विलोभनाचे कारण असल्यामुळे विलोभन होय. उदाहरणार्थ, द्रौपदीचे वचन 'माझ्या ह्या वचनाला देवतांचा अनुग्रह असो'. किंवा दुसरे उदाहरण विक्रमोर्वशीयातील राजाचे वचन 'हिला निर्माण करताना चंद्र प्रजापति झाला' इत्यादी.

'अणुगेह्णन्तु' इ०' हल्ली उपलब्ध असलेल्या वेणीसंहाराच्या अनेक प्रतींत हे वचन 'अणुगेह्णन्तु एदं ववसिदं दे भादरो (ह्या उद्यमाला आपले बंधू अनुग्रह करोत)' असे आहे. दुसरा पाठभेदही आहेच. – विक्रमोर्वशीयातील संपूर्ण श्लोक असा –

१ का यत्तु.

अस्याः सर्गविधौ प्रजापतिरभूच्चन्द्रो नु कान्तिप्रदः
शृङ्गारैकरसः स्वयं नु मदनो मासो नु पुष्पाकरः ।
वेदाभ्यासजडः कथं नु विषयव्यावृत्तकौतूहलो
निर्मातुं प्रभवेन्मनोहरमिदं रूपं पुराणो मुनिः ॥ (१.८).

तदेतदुपक्षेपाद्यङ्गचतुष्कं प्रायशो मुखसंधौ भवति । उक्तेनैव क्रमेण न पौर्वापर्येण भवति । आनन्तर्यनियमस्तु नास्ति संध्यन्तराणां सामादीनां मध्येऽनुप्रवेशात् । तदेतदाह मुनिः काव्यार्थस्य समुत्पत्तिरित्यादिना विलोभनमिति स्मृतमित्यन्तेन । तत्र वृत्तान्ते नोपक्षयः सर्वेषां प्रयोजनमित्युक्तम् । परिकरस्य प्रयोजनमिष्टार्थरचनापि ।

उपक्षेप आदी ही चार अंगे प्रायः मुखसंधीत असतात. निर्देशिलेल्या क्रमानेच ती असतात, उलटसुलट क्रमाने नाही. तथापि एकामागून ताबडतोब दुसरे असा नियम नाही, कारण साम आदी संध्यन्तरांचा मध्ये समावेश होतो. हे सर्व भरतमुनी 'काव्यार्थस्य समुत्पत्तिः' पासून 'विलोभनमिति स्मृतम्' येथपावेतोच्या भागात सांगतात. त्यात वृत्तान्ताचा उपक्षय न होणे हे ह्या सर्व अंगांचे प्रयोजन सांगितले आहे. परिकराचे इष्ट असलेल्या अर्थाची रचना हे सुद्धा आणखी प्रयोजन आहे.

'क्रमेण' हा शब्द मुळात नाही. पण नुसतेच 'उक्तेन' हे विशेषण अर्थवाही नाही. – 'आनन्तर्य' म्हणजे दोहोंत मुळीच अंतर किंवा दुसरे काही नसणे. – 'नास्ति' नंतर मुळात 'न' अधिक आहे. पण तो चुकीने पडला आहे. – 'वृत्तान्ते इ०' वर जी सहा प्रयोजने सांगितली आहेत त्यांत 'वृत्तान्तस्यानुपक्षयः' हे एक आहे, आणि 'इष्टस्यार्थस्य रचना' हे दुसरे.

युक्तिर्यथा सहदेवः – 'आर्य, किं महाराजसंदेशोऽयमार्येणाव्युत्पन्न एव गृहीतः' इत्यतःप्रभृति यावद्भीमवचनम् –

युष्मान् ह्रेपयते क्रोधाल्लोके शत्रुकुलक्षयः ।
न लज्जयति दाराणां सभायां केशकर्षणम् ॥ (१.१७) इति ।

अस्याः प्रयोजनं प्रकाश्यप्रकाशनमपि ।

युक्तीचे उदाहरण वेणीसंहारात सहदेवाचे वचन 'आर्य, महाराजांच्या संदेशाला काही विशेष अर्थ नाही असे आपण का समजता?' येथपासून ते भीमाच्या पुढील वचनापर्यंत 'क्रोधाने केलेल्या शत्रूच्या कुळाच्या नाशाची तुम्हाला लोकांत लाज वाटते.

परंतु सभेत पत्नीचे केस ओढले असता तुम्हाला त्याची शरम वाटत नाही.' ह्या युक्तीचे प्रकाशयोग्य गोष्ट प्रकाशित करणे असेही अधिक प्रयोजन आहे.

'किं' हा वेणीसंहारातील पाठ आहे. प्रस्तुत ठिकाणी मुळात 'किंचन' आहे. पण तो पाठ संभवनीय नाही. — 'अव्युत्पन्न एव' मुद्रितात 'एवं' आहे ते बरोबर नाही. हल्लीचा नाटकातील पाठ 'इव' आहे. — येथे निर्दिष्ट झालेल्या अंशात पाच गावे मिळाल्यास तह करण्यास आपण तयार आहोत असा संदेश युधिष्ठिराने कृष्णाबरोबर पाठविला त्याचे रहस्य सहदेव विशद करीत आहे. म्हणजे कारणमीमांसारूप संप्रधारण येथे आहे. — 'प्रकाश्यप्रकाशनम्' सहा प्रयोजनांपैकी एक.

**सुखार्थस्याभिगमनं प्राप्तिरित्यभिसंज्ञिता ।**
**बीजार्थस्योपगमनं समाधानमिति स्मृतम् ॥ ६७ ॥**

सुखकर गोष्टीचा लाभ म्हणजे प्राप्ति असे म्हणतात. बीजाच्या अर्थाची प्राप्ती म्हणजे समाधान असे म्हटले जाते.

**सुखार्थस्याभिगमनं प्राप्तिरिति । सुखयतीति सुखं तादृशस्य वस्तुनः । यथा 'एष खलु भगवान्वासुदेवः पाण्डवपक्षपातामर्षितेन सुयोधनेन संयमितुमारब्धः' इत्यादि यावत् 'कुमारमविलम्बितं द्रष्टुमिच्छामि' इति । अयं ह्यर्थो भीमं सुखयति, संधेर्विघटनात् ।**

**बीजार्थस्योपगमनमिति । यस्मिन् बीजं तदिदानीं प्रधाननायकानुगतत्वेन सम्यगाहितं भवतीति 'यौधिष्ठिरम्' इत्यनेन समाधानं दर्शितम् ।**

'सुखार्थस्याभिगमनं प्राप्तिः' इत्यादी. जी वस्तू सुख देते ती सुख; तशा वस्तूची प्राप्ती. उदाहरणार्थ, वेणीसंहारात 'पांडवांविषयीच्या पक्षपातामुळे रागावलेला सुयोधन भगवान वासुदेवाला बांधू पहात होता' येथपासून 'कुमारास त्वरित भेटावयास बोलाविले आहे' येथपर्यंतचे कंचुकीचे वचन. ही गोष्ट भीमाला सुख देते, कारण तहाची बोलणी फिसकटली आहेत.

'बीजार्थस्योपगमनम्' इत्यादी. ज्या ठीकाणी बीज इतका वेळ होते ते आता प्रधान नायकाच्या ठिकाणीही गेल्यामुळे उत्कृष्ट रीतीने ठेवले जाते म्हणून 'यौधिष्ठिरम' इत्यादी श्लोकात समाधान निदर्शित होते.

१ **घो** मुखार्थस्योप-. २ **का** -स्योपगमनं. ३ **नि** -धीयते, **का** -संज्ञितम्.
४ **नि** तत्समाधानमुच्यते.

'सुखयतीति सुखम्' श्लोकात 'सुख' विशेषण म्हणून वापरले आहे. त्यासाठी ही व्युत्पत्ती.

'यस्मिन् बीजम्' आतापावेतो बीजाचे निधान भीमसेन होता. आता ते प्रधान नायक जो युधिष्ठिर त्याच्याशीही संबद्ध होते. आणि तेच त्याचे उचित स्थान. म्हणून समाधान म्हणजे बीजाचे सम्यक् आधान. – 'यौधिष्ठिरम्' संपूर्ण श्लोक असा –

यत्सत्यव्रतभङ्गभीरुमनसा यत्नेन मन्दीकृतं
यद्विस्मर्तुमपीहितं शमवता शान्तिं कुलस्येच्छता ।
तद् द्यूतारणिसंभृतं नृपसुताकेशाम्बराकर्षणैः
क्रोधज्योतिरिदं महत्कुरुवने यौधिष्ठिरं जृम्भते ॥ (१.२४).

सुखदुःखकृतो योऽर्थस्तद्विधान[1]मिति स्मृतम् ।
[2]कुतूहलोत्तरावेगो [3]विज्ञेया परिभावना ॥ ६८ ॥

सुख व दुःख दोन्ही उत्पन्न करणारा प्रसंग तो विधान होय. कुतूहलाने मिश्रित अशा आवेगाला परिभावना असे जाणावे.

सुखदुःखकृतो योऽर्थस्तद्विधानमिति । व्यामिश्रतया सुखदुःखे अभिधीयेते यत्रेति । यथा भीमः 'तत्पाञ्चालि गच्छामो वयमिदानीं कुरुकुलक्षयाय ।' द्रौपदी – 'णाह, जं असुरसमराहिमुहस्स हरिणो मङ्गलं तं तुम्हाणं होदु ।' इत्यादि, तथा 'मा अणवेक्खिदसरीरा संचरह, अप्पमत्तसंचरणिआइं रिउबलाइं ।' इति । अत्र द्रौपद्याः प्रहर्षो भयं च मिश्रतया विहितमिति विचित्रत्वाद्रसवत्ता भवति । तेनेष्टस्यार्थस्य रचना तथा निगूहितव्यस्य नायिकाचित्तनिस्त्रिंशभावस्य निगूहनं प्रयोजनम् । एवमन्यत्रापि प्रयोजनमुत्प्रेक्ष्यम् । युक्तिवच्चेदमन्यत्रापि संभवत्येव । एवमन्यत्राप्यूह्यम् ।

कुतूहलेति । कौतुकेन जिज्ञासातिशयेन व्यामिश्रो य आवेगः सा परिभावना किमेतदिति । यथा संग्रामं संधिविघटनादाशंसमाना द्रौपदी तूर्यशब्दं श्रुत्वाह – 'णाह किं दाणिं एसो पलअंतजलहरत्थणिदमंसलो खणे खणे समर-दुन्दुही ताडीअदि ।'

'सुखदुःखकृतो योऽर्थस्तद्विधानम्' इत्यादी. सुख आणि दुःख जेथे मिश्रित रूपात योजिले जातात ते. उदाहरणार्थ, भीम – 'तर पांचालि, आम्ही आता कुरुकुलाचा नाश

१ का -मिहोच्यते. २ नि कुतूहलोत्तरावेशो, का कौतूहलोत्तरविशो. ३ का भवेत्तु.

करण्यास जातो' असे म्हणतो तेव्हाचे द्रौपदीचे उद्गार – 'नाथ, असुरांशी युद्ध करण्यास उद्युक्त झालेल्या हरीचे जे मंगल तेच तुमचे होवो' इत्यादी, तसेच 'शरीराविषयी बेफिकीर राहून रणात संचार करू नका. शत्रुसैन्यात सावधानतेने संचार करावा लागतो.' येथे द्रौपदीचा हर्ष आणि भीति ही मिश्रित रूपात दाखविली आहेत म्हणून वैचित्र्यामुळे रसवत्ता उत्पन्न होते. तेव्हा इष्ट अर्थाची रचना आणि अप्रकट ठेवावयाच्या नायिकेच्या चित्तातील निर्घृणतेच्या भावाचे गोपन ही प्रयोजने साध्य होतात. याप्रमाणे इतरही अंगांच्या बाबतीत प्रयोजनांची कल्पना करावी. युक्तीप्रमाणे हे अंग इतरत्रही संभवतेच. याप्रमाणे इतर बाबतीतही कल्पना करावी.

'कुतूहल-' इत्यादी. कौतुकाने म्हणजे अत्यंत जिज्ञासेने मिश्रित जो आवेग तो परिभावना, 'हे काय आहे?' अशा स्वरूपाचा. उदाहरणार्थ, तह मोडल्यामुळे युद्धाची आशंसा करणारी द्रौपदी दुन्दुभीचा आवाज ऐकून उद्गारते, 'नाथ, प्रलयाच्या अंताच्या मेघगर्जनेसारखा गंभीर असा हा रणदुन्दुभी आता क्षणाक्षणाला का वाजवीत आहेत ?'

'नायिकाचित्तनिस्त्रिंशभावस्य' हा मुद्रितातील पाठ आहे. हस्तलिखितात 'निस्त्रिंश' च्या जागी त्रुटी आहे. निस्त्रिंश' शब्दाचा निष्कृप, निर्घृण असा अर्थ आहे हे खरे. पण तो फारसा प्रसिद्ध नाही. निष्कृप किंवा निर्घृण असाच मूळ पाठ असण्याची शक्यता आहे.

'संग्रामं संधिविघटनादाशंसमाना' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'संग्रामं संधिघना-वाशंसमाना' असे आहे. मूळ पाठ 'संग्रामसंधिविघटनावाशंसमाना' असाही असण्याची शक्यता आहे. मुद्रित पाठ 'संग्रामं संघटनया संशयमाना' असा आहे. पण 'संघटनया' याचा अर्थ स्पष्ट नाही. आणि 'संशयमाना' पेक्षा 'आशसमाना' अधिक समर्पक आहे. समरदुन्दुभी असा निर्देश तिच्या वचनातच आहे. तेव्हा संग्रामाचा तिला नुसता संशय आला होता असे समजणे बरोबर नाही.

**बीजार्थस्य प्ररोहो यः स[1] उद्भेद इति स्मृतः ।**
**प्रकृतार्थसमारम्भः करणं नाम तद्भवेत् ॥ ६९ ॥**

बीजरूप विषयाच्या अंकुरित होण्याला उद्भेद असे म्हणतात. प्रस्तुत असलेल्या कार्याचा आरंभ म्हणजे करण होय.

**बीजार्थस्य प्ररोह इति । यथा द्रौपदी – 'णाह पुणो वि तुए अहं समस्सासइदव्वा ।' भीमः –**

**भूयः परिभवक्लान्तिलज्जाबन्धुरिताननम् ।**
**अनिःशेषितकौरव्यं न पश्यासि वृकोदरम् ॥ (१.२६).**

१ का उद्भेदः स तु कीर्तितः.

**न चेदमुद्घाटनं येन प्रतिमुखं भवेत्, अपि तु शत्रुक्षयारम्भबीजस्योद्घाटनेन विनापि प्ररोहमात्रमवस्थानमानुगुण्यात् भूमिसंश्लेष इव बीजस्य ।**

**प्रकृतार्थसमारम्भः करणमिति । यथा सहदेवः – 'गच्छामो वयमिदानीं गुरुजनानुज्ञाता विक्रमानुरूपमाचरितुम्' इत्यादि ।**

'बीजार्थस्य प्ररोहः' इत्यादी. उदाहरणार्थ, द्रौपदी – 'नाथ, पुन्हा तुम्ही माझे समाश्वासन केले पाहिजे.' भीम – 'कौरवांचा पूर्ण निःपात ज्याने केला नाही अशा व अपमानाची क्लान्ति आणि लज्जा यांनी तोंड खाली वळलेले असलेल्या भीमसेनाला तू पुन्हा पहाणार नाहीस.' आणि हे बीजाचे उद्‌घाटन नाही की ज्यामुळे त्याला प्रतिमुख म्हणता येइल, तर शत्रूच्या नाशाच्या उद्योगरूपी बीजाची उद्‌घाटनाशिवायही केवळ अंकुराच्या स्वरूपात अनुकूलतेमुळे स्थिती, बीज भूमीला चिकटून असते तशी.

'प्रकृतार्थसमारम्भः करणम्' इत्यादी. उदाहरणार्थ, सहदेव – 'आता आम्ही गुरुजनाच्या अनुज्ञेने आमच्या पराक्रमाला योग्य अशी कामगिरी बजावण्यास जातो.'

'शत्रुक्षयारम्भबीजस्य' मुद्रितात शत्रुक्षयारम्भं' असा स्वतंत्र शब्द आहे. पण ते बरोबर नाही. शत्रुक्षयारम्भ हेच बीज आहे. यानंतरच्या पाठात थोडी दुरुस्ती सुचविली आहे. हस्तलिखितात '-बीजस्यारोद्‌घाटनेन विनापि प्ररोहमात्रमनुस्थानानुगुण्यात्' असे आहे. दुरुस्तीने अर्थ स्पष्ट होण्यास मदत होते. मुद्रित पाठ 'बीजस्याङ्कुरः कुरुकुलोद्‌घाटनेन विनापि प्ररोहमात्रमनुस्थानानुगुण्यात्' असा आहे. यातील 'कुरुकुलोद्‌घाटनेन' सर्वथा अशक्य आहे. आणि 'अङ्कुरः' हा 'प्ररोह' चा अर्थ त्याच्या अगोदर दिला असल्याची संभाव्यता कमी. – 'भूमिसंश्लेष' मुद्रितातील 'संश्लोष' हा मुद्रणदोष आहे. अंकुराच्या स्वरूपात बीज अद्याप भूमीतच असते, त्याचे पूर्ण उद्‌घाटन झालेले नसते असा अर्थ.

'गुरुजनानुज्ञाताः' मुद्रितात 'कुरुराजानुज्ञाताः' असा असंभाव्य पाठ कोठून आला त्याची कल्पना करता येत नाही.

**संघातभेदनार्थो यः स भेद इति कीर्तितः ।**
**समीहा रतिभोगार्था विलास इति [1]संज्ञितः ॥ ७० ॥**

एकत्रित झालेल्यांचे विघटन करण्याचे उद्दिष्ट असलेला तो भेद असे म्हणतात. रतिभोगाच्या इच्छेला विलास अशी संज्ञा आहे.

१ नि कीर्तितः.

संघातभेदनार्थो यः स भेद इति । पात्रसंघातस्य यन्निजप्रयोजनोपक्षेपेण निष्क्रमणासिद्धये भेदनं विकिरणमिव स भेदः । सर्वत्राङ्केऽन्तर्भावी वस्तूपायात्मा भेदः संध्यन्तरैकविंशतौ वक्ष्यते । अस्योदाहरणम् 'अन्योन्यास्फालभिन्न-' इत्यादि यावत् 'पाण्डुपुत्राः' इति ।

अथ प्रतिमुखोद्दिष्टानामङ्गानामुद्देशक्रमेण लक्षणमाह ।

समीहा रतिभोगार्था विलास इति । रतिलक्षणस्य भावस्य हेतुभूतो यो भोगो विषयः प्रमदा पुरुषो वा तदर्था या समीहा स विलासः । कामफलेषु रूपकेषु प्रतिमुख एव ह्यास्थावत्त्वेन रतिरूपेण भाव्यम् । यथाभिज्ञानशाकुन्तले तापसः – 'कस्येदमुशीरानुलेपनम्' इत्यादि । तथा राजा –

कामं प्रिया न सुलभा मनस्तु तद्भावदर्शनाश्वासि ।
अकृतार्थेऽपि मनसिजे रतिमुभयप्रार्थना कुरुते ॥ (२.१) इत्यादि ।

यस्तु वेणीसंहारे भानुमत्या सह दुर्योधनस्य दर्शितो विलासः स नायकस्य तादृशेऽवसरेऽत्यनुचित इति चिरन्तनैरेवोक्तम् । यथा सहृदयालोककारः –

संधिसंध्यङ्गघटनं रसबन्धव्यपेक्षया ।
न तु केवलशास्त्रार्थस्थितिसंपादनेच्छया ॥ इति ।

एतच्च विवरण एवास्माभिर्वितत्य दर्शितम् । इह च रतिग्रहणं पुमर्थोपयोगि-रसगतस्थायिभावोपलक्षणम् । तेन वीरप्रधानेषु रूपकेषु उत्साहविषया सम्यगीहा चेष्टा विलास इति मन्तव्यम् । युक्तचैतन्य एव हि रसो मुख उपक्षिप्तः, स एव स्वयं प्रतिमुखे स्वोचितारम्भसंभावितः कर्तव्यः । लस श्लेषणेऽपि हि पठ्यते ।

'संघातभेदनार्थो यः स भेदः' इत्यादी. पात्रांच्या समूहाचे त्यांच्या आपापल्या प्रयोजनांचा उपक्षेप झाल्यावर निष्क्रमण साध्य करण्यासाठी जे भेदन विभक्त करण्यासारखे तो भेद. कार्यसिद्धीचा उपाय असे स्वरूप असलेला, सर्वत्र अंकात अन्तर्भाव होण्यासारखा जो भेद त्याचा एकवीस संध्यन्तरांमध्ये निर्देश केला जाईल. ह्या भेदाचे उदाहरण 'एकमेकावर आदळून छिन्नभिन्न झालेल्या' येथपासून 'पाण्डुपुत्र' पर्यंतचे भीमाचे वचन.

आता प्रतिमुखसंधीत निर्दिष्ट केलेल्या अंगांची लक्षणे उद्देशातील क्रमानुसार देतात.

'समीहा रतिभोगार्था विलासः' इत्यादी. रति लक्षण असलेल्या स्थायिभावाचा जो भोग म्हणजे विषय, प्रमदा अथवा पुरुष, त्याच्यासाठी जी इच्छा तो विलास. काम

हे अंतिम फल असलेल्या रूपकांमध्ये प्रतिमुखसंधीतच रतिस्वरूपाची आस्थायुक्तता असावयास पाहिजे. उदाहरणार्थ, अभिज्ञानशाकुन्तलात तापसाची उक्ती – 'कोणासाठी हे वाळ्याचे अनुलेपन आहे?' तसेच राजाचे वचन – 'प्रिया सहज प्राप्त होण्यासारखी नाही हे खरे; तथापि तिच्या भावाचे दर्शन झाल्यामुळे मनाला आश्वासन लाभले आहे. काम कृतार्थ न झाला तरी परस्पराविषयीची उभयतांची अभिलाषा आनंद देते.' परंतु वेणीसंहार नाटकात दुर्योधनाचा भानुमतीबरोबर जो विलास दाखविला आहे तो तसल्या प्रसंगी अत्यंत अनुचित हे प्राचीनांनीच सांगितले आहे. उदाहरणार्थ, ध्वन्यालोककार म्हणतात – 'संधी आणि संध्यङ्गांची योजना रसाच्या प्रस्थापनेच्या उद्देशाने करावी, केवळ शास्त्रात सांगितलेल्या नियमाच्या पालनाच्या बुद्धीने नाही.' आणि हे आम्ही विवरणात विस्तृतपणे दाखवून दिले आहे. आणि प्रस्तुत ठिकाणी रति शब्द पुरुषार्थाला उपयोगी असणाऱ्या रसांचे जे स्थायिभाव त्यांचे उपलक्षण म्हणून वापरला आहे. म्हणून वीररस प्रधान असलेल्या रूपकांत उत्साहाविषयीची योग्य ईहा म्हणजे चेष्टा तो विलास असे समजले पाहिजे. मुखसंधीत योग्य चैतन्य असलेल्या रसाचाच उपक्षेप झाला आहे, तेव्हा प्रतिमुखसंधीत त्याचाच उचित अशा क्रियांनी परिपोष करणे आवश्यक आहे. लस् धातू श्लेषण ह्या अर्थी सुद्धा दिला आहे.

'विकिरणम्' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'स्मृतकरणम्' असा अर्थहीन पाठ आहे. मुद्रित पाठ 'प्रकरणम्' आहे. पण प्रस्तुत संदर्भात कोणत्याही अर्थाने तो योग्य ठरण्यासारखा नाही. विकिरण म्हणजे पांगापांग होणे, एकमेकापासून विभक्त होणे. हा अर्थ येथे अभिप्रेत असणार हे उघड आहे. – 'वस्तूपायात्मा भेदः' साम, दान, भेद आणि दण्ड या चार उपायांपैकी एक जो भेद तो संध्यन्तरांत अन्तर्भूत आहे. तो भेद ह्या भेदाहून निराळा. – 'अन्योन्या- इ०' संपूर्ण श्लोक असा –

अन्योन्यास्फालभिन्नद्विपरुधिरवसामांसमस्तिष्कपङ्के
मग्नानां स्यन्दनानामुपरिकृतपदन्यासविक्रान्तपत्तौ।
स्फीतासृक्पानगोष्ठीरसदशिवशिवातूर्यनृत्यत्कबन्धे
संग्रामैकार्णवाम्भःपयसि विचरितुं पण्डिताः पाण्डुपुत्राः॥ (१.२७).

ह्या श्लोकानंतर सर्व पात्रांचे निष्क्रमण होते, म्हणून हा भेदाचे उदाहरण. अशा प्रकारे प्रत्येक अंकातील शेवटचे वचन भेदाचे उदाहरण म्हणून समजता येईल.

'आस्थावत्त्वेन रतिरूपेण' मुद्रित पाठ 'आस्थाफलत्वेन' आहे. पण तो बरोबर नाही. एकमेकाबद्दल आस्था असणे हे रतीचे स्वरूप आहे. आस्था हे रतीचे फल किंवा रति हे आस्थेचे फल असा प्रकार नाही. – 'कस्येदं' इत्यादि तापसाच्या उद्गारात शकुन्तलेच्या रतीचा निर्देश आहे. – 'सहृदयालोक' यात आनंदवर्धनाच्या ध्वन्यालोकाचा निर्देश आहे. उद्धृत केलेला श्लोक

ध्वन्यालोक, ३.१२ असा आहे. – 'विवरणे' अभिनवगुप्तकृत ध्वन्यालोकाच्या विवरणाचे लोचन असे नाव आहे. – 'पुमर्थोपयोगिरस- इ०' असा एक समास करणे आवश्यक आहे. निरनिराळे रस निरनिराळ्या पुरुषार्थांना कसे उपयोगी आहेत हे अभिनवगुप्ताने सहाव्या अध्यायावरील टीकेत दाखविले आहे. – 'वीरप्रधानेषु रूपकेषु' यानंतर मुद्रितात 'प्रतिमुख एव ह्यास्था रतिरूपेण' हे शब्द अधिक आहेत. ते वरील एका ओळीतून चुकीने पुनरुक्त झाले आहेत यात शंका नाही. प्रस्तुत ठिकाणी ते गैरलागू आहेत. हस्तलिखितात हे शब्द नाहीत. – 'उत्साहविषया सम्यगीहा' ही दुरुस्ती आहे. मुळात 'उत्साह (:) सम्यग्विषया समीहा' असे आहे. उत्साह हा वीररसाचा स्थायिभाव. आणि वर भोग म्हणजे विषय असे म्हटले आहे. तेव्हा वीररसाच्या संबंधात श्लोकातील शब्दांचा 'उत्साहविषया सम्यग् ईहा' असाच अर्थ लावला असणार हे उघड आहे. 'सम्यग्विषया' असे मुळातच असंभाव्य आहे. – 'युक्तचैतन्य इ०' हे विधान वेणीसंहाराविषयी केलेले दिसते. – 'लस' विलास शब्दातील हा धातू. त्याचा श्लेषण अथवा आलिंगन हा अर्थ रतीच्या संबंधातच समर्पक होय.

बडोदे प्रतीत ह्या श्लोकाच्या दोन अर्धांमध्ये पुढील श्लोकार्ध कंसात दिला आहे –

**एतानि तु मुखाङ्गानि वक्ष्ये प्रतिमुखे पुनः ।**

तो मूळ असेलसे वाटत नाही.

**दृष्टनष्टानुसरणं परिसर्प इति स्मृतः ।**
**कृतस्यानुनयस्यादौ विधूतं[1] ह्यपरिग्रहः ॥७१॥**

दृष्टीस पडून नष्ट झालेल्या कार्याचे अनुसरण म्हणजे परिसर्प असे म्हटले आहे. केलेल्या अनुनयाचा प्रथम अस्वीकार म्हणजे विधूत.

**दृष्टनष्टानुसरणं परिसर्प इति । यथा कञ्चुकी – 'आ शस्त्रग्रहणादकुण्ठपरशोः' इत्यादि । दृष्टनष्टप्रायो हि कार्यान्तरव्यासङ्गात् कुरुकुलक्षयो भीष्मवधेन अस्थानपरितोषसूचितेन च दुर्योधनस्यायुक्तचेष्टत्वेनानुसृत इति प्रकृतस्यार्थस्य परिसर्पणात् प्रसरणात् परिसर्पः । यथा अभिज्ञानशाकुन्तले 'भवितव्यमत्र तया । तथाहि – अभ्युन्नता पुरस्ताद्' इति ।**

**कृतस्यानुनयस्येति । आदौ प्रथमतः कृतस्यानुनयस्य सामवचसोऽनङ्गीकरणं विधूतम् । पश्चात्पुनरङ्गीकरणमिति आदिशब्दात् । यथा तत्रैव शकुन्तला – 'अइ किं अंतेउरविरहपय्युस्सुएण राएसिणा उवरुद्धेण ।'**

१ नि -धूतमपरि-.

'दृष्टनष्टानुसरणं परिसर्पः' इत्यादी. उदाहरणार्थ कञ्चुकीचे वचन — 'शस्त्रधारण करण्यास प्रारंभ केल्यापासून ज्याचा परशू अकुंठित राहिला' इत्यादी. कारण यात इतर कार्याच्या व्यासंगामुळे दृष्टनष्टप्राय झालेल्या कुरुकुलक्षयाचे भीष्मवधाने तसेच अस्थानी झालेल्या परितोषाने सूचित झालेल्या दुर्योधनाच्या अयोग्य चेष्टिताच्या प्रवृत्तीने अनुसंधान केले आहे म्हणून प्रस्तुत विषयाच्या परिसर्पणामुळे म्हणजे प्रसरणामुळे परिसर्प. उदाहरणार्थ, अभिज्ञानशाकुन्तलात राजाचे वचन — 'ती या ठिकाणी असावी. कारण, पुढे उन्नत झालेली' इत्यादी.

'कृतस्यानुनयस्य' इत्यादी. आदौ म्हणजे प्रथम, केलेल्या अनुनयाचा म्हणजे सामयुक्त वचनांचा अस्वीकार म्हणजे विधूत. परंतु मागाहून स्वीकार असा अर्थ आदि शब्दाने सूचित होतो. उदाहरणार्थ, त्याच नाटकात शकुन्तलेचे वचन — 'अग, अंतःपुरातील राण्यांपासून झालेल्या विरहाने पर्युत्सुक असलेल्या ह्या राजर्षीला कशाला अडविता?'

'अस्थानपरितोष-' ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'वस्थान-' आणि मुद्रितात 'स्थान-' आहे. कंचुकीच्या वचनात अभिमन्यूच्या वधामुळे दुर्योधनाला झालेला संतोष अयोग्य आहे असे सूचित केले आहे. तेव्हा 'अस्थान' असाच पाठ आवश्यक आहे हे उघड आहे. कंचुकीचे संपूर्ण वचन वर ३७ व्या श्लोकावरील व्याख्येत उद्धृत केले आहे. — 'परिसर्पणात्' परिसर्प शब्दाची व्युत्पत्ती सांगण्यासाठी हा शब्द योजला असून पुढील शब्दात त्याचा अर्थ दिला आहे. — 'अभ्युन्नता इ०' संपूर्ण श्लोक असा —

> **अभ्युन्नता पुरस्तादवगाढा जघनगौरवात्पश्चात्।**
> **द्वारेऽस्य पाण्डुसिकते पदपङ्क्तिर्दृश्यतेऽभिनवा॥**

'आदिशब्दात्' म्हणजे श्लोकात 'आदौ' असे म्हटले आहे म्हणून. संपादकांनी या ठिकाणी (उपरोधः) अशी अधिक शब्दाची दुरुस्ती सुचविली आहे. पण ती सर्वथा अस्वीकार्य आहे. उपरोधाचा येथे काही संबंध नाही.

> **अपायदर्शनं यत्तु[1] तापनं नाम तद्भवेत् ।**
> **क्रीडार्थं विहितं यत्तु[2] हास्यं नर्मेति[3] तत्स्मृतम् ॥ ७२ ॥**

अपायाचे जे दर्शन ते तापन नावाचे अंग होय. थट्टेसाठी म्हणून केलेल्या हास्यकारक प्रसंगाला नर्म असे म्हणतात.

१ नि यत्तत्. २ नि यत्र. ३ का नर्म तु संज्ञितम्.

अपायदर्शनं यत्तु तापनमिति । यथा रत्नावल्यां 'दुल्लहजणाणुराओ' इत्यादि ।

क्रीडार्थं विहितं यत्तु हास्यं नर्मेति । विदूषकः – 'भो मा पण्डिच्चगव्वं उव्वह । अहं एदं सव्वं वक्खाणइस्सं' इत्यादि ।

'अपायदर्शनं यत्तु तापनम्' इत्यादी. उदाहरणार्थ, रत्नावलीत 'दुर्लभ अशा माणसावर प्रेम' इत्यादी.

'क्रीडार्थं विहितं यत्तु हास्यं नर्म' इत्यादी. उदाहरणार्थ विदूषकाचे वचन – 'अहो, पांडित्याचा गर्व वाहू नका. मी ह्या सगळ्याचा अर्थ सांगेन'.

सागरिकेचे निराशेचे उद्गार असलेली संपूर्ण गाथा अशी –

दुल्लहजणाणुराओ लज्जा गुरुई परव्वसो अप्पा ।
पिअसहि विसमं पेम्मं मरणं सरणं णवरमेक्कम् ॥ (२.१).

'विदूषकः इ०' रत्नावली नाटिकेत सुसंगता आणि सागरिका यांच्यातील संवाद सारिकेच्या तोंडून ऐकत असता त्यातील अभिप्राय मला कळला आहे असे राजाने म्हटल्यानंतरचे हे विदूषकाचे वचन आहे.

दोषप्रच्छादनार्थं तु हास्यं नर्मद्युतिः[1] स्मृता ।
उत्तरोत्तरवाक्यं तु भवेत्प्रगयणं[2] पुनः ॥ ७३ ॥

दोष झाकण्यासाठी म्हणून जे हास्य अवलंबिले जाते त्याला नर्मद्युति म्हणतात. उत्तरोत्तर उच्चारलेले जे वाक्य ते प्रगयण होय.

दोषप्रच्छादनार्थं तु हास्यं नर्मद्युतिरिति । दोषो येनोक्तेन प्रच्छादयितुमिष्यते तस्यापि हास्यजननत्वेन नर्म सुतरां द्योतितं भवतीति नर्मद्युतिः । यथा 'चउव्वेई विअ बम्हणो रिआइं पढिदुं पउत्ता ।' इत्यभिहिते राजा – 'नावधारितं मया ।' ततो विदूषकः – 'दुल्लहजणाणुराओ' इत्यादि । अत्र हि मौर्ख्यदोषं छादयितुं यद्विदूषकेणोच्यते तद्राज्ञो हास्यजननमिति नर्मैव द्योतितं भवति । तथा हि राजा – 'महाब्राह्मण, कोऽन्य एवमृचामाभिज्ञः ।' इति ।

१ नि -द्युति स्मृतम्. २ नि प्रशमनं बुधाः, घो प्रगमनं बुधाः.

**उत्तरोत्तरवाक्यं तु भवेत्प्रगयणमिति । विदूषकः – 'किं खु दाणिं गाधेयं ।' राजा – 'कयापि श्लाघ्यनवयावनया प्रियतममनासादयन्त्या जीवितनिरपेक्षयेद-मुक्तम् ।' विदूषकः – 'किं एदेहिं वक्कभणिदेहिं । णं फुडं मं अणासादअंदीए' इत्यादि । प्रगयणमिति रूढिशब्दः । अन्ये तु प्रजाशब्दात् विचिकित्सायनशब्देन शताक्विना व्युत्पत्तिं कल्पयन्ति । प्रागयणमित्यन्ये पठन्ति । प्रागिति पूर्ववचनं ततोऽयनं प्राप्तिर्यस्योत्तरवचनस्येति ।**

'दोषप्रच्छादनार्थं तु हास्यं नर्मद्युतिः' इत्यादी. ज्या उक्तीमुळे दोष झाकण्याचा उद्देश असतो ती सुद्धा हास्य उत्पन्न करणारी असल्यामुळे नर्म चांगले द्योतित होते म्हणून नर्मद्युति. उदाहरणार्थ, विदूषकाचे वचन 'चार वेद जाणणाऱ्या ब्राह्मणाप्रमाणे ह्या सारिकेने ऋचा म्हणण्यास सुरुवात केली आहे.' त्याने असे म्हटल्यावर राजाचे उद्गार 'माझ्या लक्षात आले नाही' आणि त्यावर विदूषकाचे वचन 'दुर्लभ माणसावर प्रेम' इत्यादी. येथे आपल्या मूर्खतेचा दोष झाकण्यासाठी विदूषक जे बोलतो त्याने राजाला हास्य उत्पन्न होते म्हणून नर्मच द्योतित होते. म्हणून राजा म्हणतो 'महा-ब्राह्मणा, तुझ्याशिवाय दुसरा कोण असा ऋचांचा जाणकार आहे?'

'उत्तरोत्तरवाक्यं तु भवेत्प्रगयणम्' इत्यादी. विदूषक – 'काय ही गाथा आहे? राजा – 'प्रशंसनीय नवयौवनांत असलेल्या कोणीतरी युवतीने प्रियतमाची प्राप्ती न झाल्या-कारणाने जीविताची आशा सोडल्यामुळे हे उद्गार काढले आहेत.' विदूषक – 'कशाला हे वाकडे बोलणे? स्पष्टच माझी प्राप्ती न झाल्याकारणाने' इत्यादी. प्रगयण हा रूढ अर्थाने वापरलेला शब्द आहे. परंतु दुसरे प्रजाशब्दापासून विचिकित्सा आणि गत्यर्थक अयन शब्दाने व्युत्पत्ती कल्पितात. दुसरे काही 'प्रागयणम्' असा पाठ स्वीकारतात. प्राक् म्हणजे अगोदरचे वचन, त्यापासून अयन म्हणजे नंतरच्या वचनाची प्राप्ती ज्यात आहे ते प्रागयण.

अभिनवगुप्ताने रत्नावलीतून उद्धृत केलेल्या प्राकृत वचनांत किंचित् भिन्न असे पाठ आढळतात.

'उत्तरोत्तर' ह्याचा अर्थ एका वचनामुळे दुसरे, दुसऱ्यामुळे तिसरे वचन अशा प्रकारचा अर्थ अभिप्रेत दिसतो. – वक्कभणिदेहिं' ही हल्लीच्या पाठाला अनुसरून दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'बहुणीदेहिं' असे भ्रष्ट रूप आहे. – हस्तलिखितातील 'णं पुडं माणम अणासा-देदीए' याची वरप्रमाणे केलेली दुरुस्ती हल्लीच्या पाठावर आधारित आहे. – 'प्रजाशब्दात् इ०' येथे दिलेल्या प्रगयण शब्दाच्या व्युत्पत्तीचा मुळीच बोध होत नाही. पाठ भ्रष्ट आहे. '-यत्न-' च्या ऐवजी '-यन-' एवढीच दुरुस्ती सुचविता आली आहे. कारण 'अयन' शब्दाचा निर्देश

संभाव्य आहे. 'प्रजाशब्दात्' हे संशयास्पद आहे. कारण प्रगयण मधील 'प्रग्' चा 'प्रजा' शी कांही संबंध असेलसे वाटत नाही. आणि 'विचिकित्सा' हा त्या शब्दापासून निष्पन्न झालेला अर्थ असे म्हणावयाचे असेल तरीही प्रजा शब्द अयोग्य ठरेल. प्रग् किंवा प्रक् रूपाची व्युत्पत्ती सांगत येण्यासारखी नाही. मुद्रितात 'विचि क्लिष्ययत्नशब्देन' असे छापले आहे. त्याचा काहीच अर्थ करता येत नाही. पुढील 'शताक्निा' हा शब्दही 'शता क्निा' असा छापला आहे. पण कसेही समजले तरी ह्या अक्षरांतून काही बोध होत नाही. 'गत्यर्थेन' असा पाठ असण्याची शक्यता वाटल्यावरून वर दिलेला अर्थ केला आहे इतकेच.

नाटयशास्त्राच्या काही हस्तलिखितात ह्या अङ्गाचे नाव प्रगमन किंवा प्रशमन असे आढळते. प्रगयण शब्द अपरिचित असल्यामुळे हे शब्द त्याऐवजी वापरले असावेत.

**या तु व्यसनसंप्राप्तिः स[1] निरोधः प्रकीर्तितः ।**
**क्रुद्धस्यानुनयो यस्तु भवेत्तत्पर्युपासनम् ॥ ७४ ॥**

व्यसनाची जी प्राप्ती तिला निरोध म्हणतात. रागावलेल्या मनुष्याचा केलेला अनुनय म्हणजे पर्युपासन होय.

**या तु व्यसनसंप्राप्तिः स निरोध इति । राजा – 'धिङ् मूर्ख, उच्चैर्हसता त्वयेयं त्रासिता ।' व्यसनमत्र खेदमात्रम् । अभीष्टोपरोधान्निरोधः ।**

**क्रुद्धस्यानुनयो यस्त्विति । यथा विदूषकः – 'भो मा कुप्प, एसा खु कदलीघरं एव्व गदा' इत्यादि । राजा अनुनीतः सन्नाह – 'दुर्वारां कुसुमशर-व्यथाम्' इत्यादि ।**

'या तु व्यसनसंप्राप्तिः स निरोधः' इत्यादी. उदाहरणार्थ, राजा – 'हात् मूर्खा. मोठ्याने हसून तू ह्या सारिकेला भिवविलेस.' या ठिकाणी व्यसन म्हणजे फक्त खेद असे समजावयाचे. इष्ट असलेल्या गोष्टीत व्यत्यय येतो म्हणून ह्याला निरोध म्हणतात.

'क्रुद्धस्यानुनयो यस्तु' इत्यादी. उदाहरणार्थ, विदूषक – 'अरे, रागावू नकोस. ही सारिका कदलीघरातच गेली आहे' इत्यादी. शांत होऊन राजा म्हणतो – 'निवारण्यास कठीण अशी मदनाची व्यथा' इत्यादी.

'दुर्वारां इ०' संपूर्ण श्लोक पुढीलप्रमाणे –

१ नि निरोधः स तु.

दुर्वारां कुसुमशरव्यथां वहन्त्या
कामिन्या यदभिहितं पुरः सखीनाम्।
तद्भूयः शिशुशुकसारिकाभिरुक्तं
धन्यानां श्रवणपथातिथित्वमेति ॥ (२.७).

विशेषवचनं यत्तु तत्पुष्पमिति संज्ञितम् ।
प्रत्यक्षरूक्षं[1] यद्वाक्यं वज्रं[2] तदभिधीयते ॥७५॥

वैशिष्ट्ययुक्त जे वचन त्याला पुष्प अशी संज्ञा आहे. साक्षात कठोर जे वचन त्याला वज्र असे म्हणतात.

विशेषवचनं यत्तु पुष्पमिति । 'एसो वि सो चित्तफलओ' इत्यादिविदूषकोक्तेः प्रभृति यावत् 'परिच्युतस्तत्कुचकुम्भमध्यात्' इत्यादि । यथा हि क्रमविकासि पुष्पं भवति एवमत्रापि राज्ञ उत्तरोत्तरानुरागविशेषसूचकं वचो विकासमस्य रागस्य दर्शयति । तथाहि सुसंगता – 'गुरुआणुराआक्खित्तहिअओ असंबद्धं भट्टा मंतेदुं पउत्तो' इत्यादि ।

प्रत्यक्षरूक्षं यद्वाक्यं वज्रमिति । यथा 'कथमिहस्थोऽहं भवत्या ज्ञात' इति राजन्युक्तवति सुसंगता – 'ण केवलं तुमं, चित्तफलएण । ता जाव गदुअ देवीए णिवेदेमि ।'

'विशेषवचनं यत्तु पुष्पम्' इत्यादी. 'हाच तो चित्रफलक' इत्यादी विदूषकाच्या उक्तीपासून राजाच्या 'तिच्या कुचकुम्भामधून खाली पडलेल्या' इत्यादी उक्तीपावेतो. कारण, ज्याप्रमाणे फूल क्रमाक्रमाने विकसत जाते त्याप्रमाणे प्रस्तुत ठिकाणी राजाची उत्तरोत्तर वाढणाऱ्या विशेष प्रेमाची सूचक वचने त्याच्या प्रेमाचा विकास दाखवितात. म्हणून सुसंगता म्हणते – 'गाढ प्रेमाने अंतःकरण व्याक्षिप्त झाल्यामुळे महाराज असंबद्ध बोलावयास लागले आहेत.'

'प्रत्यक्षरूक्षं यद्वाक्यं वज्रम्' इत्यादी. उदाहरणार्थ, 'मी येथे आहे हे तुला कसे कळले?' ह्या राजाच्या वचनानंतर सुसंगता म्हणते – 'केवळ आपणच नाही, तर चित्रफलकासह. तेव्हा आता मी जाऊन राणीसाहेबांना सांगते.'

'परिच्युत इ०' संपूर्ण श्लोक असा –

१ नि -रूपं. २ नि तद्वज्रमिति संज्ञितम्.

परिच्युतस्तत्कुचकुम्भमध्यात्
किं शोषमायासि मृणालहार।
न सूक्ष्मतन्तोरपि तावकस्य
तत्रावकाशो भवतः किमु स्यात्॥ (२.१४).

हस्तलिखितात प्रथम चरणात '-कुचभारमध्यात्' असा पाठ आहे. – 'क्रमविकासि' ही मुळातील 'प्रेमविकासि' ची दुरुस्ती आहे. पुष्पाच्या प्रेमाचा निर्देश असंभाव्य आहे.

उपपत्तिकृतो योऽर्थ उपन्यासश्च[1] स स्मृतः ।
चातुर्वर्ण्योपगमनं[2] वर्णसंहार इष्यते ॥ ७६ ॥

आणि उपपत्ती दाखविणारी जी गोष्ट तिला उपन्यास म्हणतात. चार वर्णांच्या एकत्र येण्याला वर्णसंहार अशी सञ्ज्ञा आहे.

उपपत्तिकृतो योऽर्थ उपन्यास इति । यथा विदूषकः ससाध्वसं – 'अदिमुहरा खु एसा गब्भदासी ।' अत्र मौखर्यात्मिकोपपत्तिरुपन्यस्ता ।

चातुर्वर्ण्योपगमनं वर्णसंहार इति । चातुर्वर्ण्यशब्देन पात्राण्युपलक्ष्यन्ते । तेन यत्र पात्राणि पृथक् स्थितान्यपि ढौक्यन्ते स वर्णसंहारः । उपाध्यायास्त्वाहुः। इह वीरप्रधाने तावन्नायकप्रतिनायकौ तत्सचिवौ च प्रधानत्वेन वर्ण्यन्त इति वर्णाः । कामप्रधानेऽपि नायको नायिका तत्सचिवौ चेति । तथा हि रत्नावल्यां सुसंगताया वचनात् 'अदो मे अअं गरुओ पसादो' इत्यारभ्य राजा – 'क्वासौ ।' सुसंगता – 'हत्थे गेण्हिअ पसादेहि णं' इत्यादि । अत्र चतुर्णामेकीभावे रागप्राप्तिः प्रयोगस्य, इष्टस्य रचना, प्रकाश्यप्रकाशनमित्यपि प्रयोजनानि । यत्तु ब्राह्मणादिवर्णचतुष्टयमेलनमिति तदफलत्वादनादृत्यमेव ।

'उपपत्तिकृतो योऽर्थ उपन्यासः' इत्यादी. उदाहरणार्थ, भीतीने विदूषक म्हणतो 'ही गर्भदासी अत्यंत बडबड करणारी आहे.' येथे बडबड करण्याच्या प्रवृत्तीच्या उपपत्तीचा उपन्यास केला आहे.

'चातुर्वर्ण्योपगमनं वर्णसंहारः' इत्यादी. चातुर्वर्ण्य शब्दाने पात्रांचे उपलक्षण केले आहे. म्हणून जेथे पृथक असलेली पात्रे सुद्धा एकत्र आणली जातात तो वर्णसंहार. परंतु आमचे गुरुजी म्हणतात की वीररसप्रधान नाटकांमध्ये नायक व प्रतिनायक आणि

१ नि -न्यासस्तु. २ नि -र्वर्ण्याभि-.

त्यांचे प्रत्येकी एकेक सल्लागार यांचे मुख्य म्हणून वर्णन केलेले असते, यास्तव त्यांना वर्ण म्हणतात. शृङ्गारप्रधान नाटकांमध्ये सुद्धा नायक, नायिका आणि त्यांचे वयस्य व सखी मिळून चार वर्ण होत. उदाहरणार्थ, रत्नावलीत 'म्हणून हा माझ्यावर मोठा अनुग्रह झाला आहे' इत्यादी सुसंगतेच्या उक्तीपासून राजाचे वचन 'कोठे आहे ती ?' आणि सुसंगतेच्या 'हिचा हात हातात घेऊन हिची समजूत घाला' ह्या वचनापर्यंत. येथे चौघांचे एकत्र येणे — यात प्रयोगाची रागप्राप्ती, इष्ट गोष्टीची रचना, प्रकाशित करावयाच्या गोष्टीचे प्रकाशन ही तीन प्रयोजने साध्य होतात. ब्राह्मणादी चार वर्णांचे एकत्र येणे असा जो अर्थ केला आहे तो व्यर्थ असल्यामुळे उपेक्षेस पात्र आहे.

चातुर्वर्ण्यशब्देन पात्राणि इ०' याचे कारण नाटकातील पात्रे चारही वर्णांची असतात. — 'प्रधानत्वेन वर्ण्यन्ते इति वर्णाः' भट्टतोताने लावलेला वर्ण शब्दाचा हा अर्थ अभिनवगुप्ताला पसंत नाही असे म्हणता येईल. — 'एकीभावे रागप्राप्तिः' ही 'एकीभावः' ची सुचविलेली दुरुस्ती आहे. 'प्रयोजनानि' हे बहुवचनात असल्यामुळे तीन प्रयोजनांचा निर्देश अपेक्षित आहे. एक प्रयोजन 'प्रयोगस्य रागप्राप्तिः' हे आहे. शिवाय, 'प्रयोगस्य एकभावः' हे विशेष अर्थवाही नाही. —'प्रकाश्यप्रकाशनम्' ही 'प्रकाश्ये प्रकाशनम्' ची दुरुस्ती आहे. षष्ठी अपेक्षित आहे, सप्तमी असंभाव्य.

**कपटापाश्रय[1] वाक्यमभूताहरणं[2] विदुः ।**
**तत्त्वार्थवचनं चैव मार्ग इत्यभिधीयते ।।७७।।**

ज्यात कपट आहे अशा वाक्याला अभूताहरण म्हणतात. आणि खरी गोष्ट निर्दिष्ट करणाऱ्या वचनाला मार्ग असे म्हणतात.

**अथ गर्भाङ्गान्युद्देशक्रमेण लक्षयति ।**

**कपटापाश्रयं वाक्यमभूताहरणमिति । यथा वासवदत्तया चित्रफलके दृष्टे विदूषकवचनम् 'अप्पा किल दुक्खेण आलिहीअदि त्ति मम वअणं सुणिअ पिअवअस्सेण विण्णाणं दंसिअं' इत्यादि ।**

**तत्त्वार्थवचनं मार्ग इति । 'भट्टिणि, घुणक्खरं वि संभावीअदि' इति काञ्चनमालयोक्ते वासवदत्तापवार्य परमार्थोचितं वचनमाह – 'अइ उज्जुए, वसन्तओ क्खु एसो' इत्यादि । मार्गवच्च प्रसिद्धत्वात् परमार्थे मार्ग इति व्यपदेशः ।**

आता गर्भसंधीतील अंगांचे उद्देशात असलेल्या क्रमाने लक्षण सांगतात.

१ नि -द्याश्रयं. २ का यत्तदभूता-.

'कपटापाश्रयं वाक्यमभूताहरणम्' इत्यादी. उदाहरणार्थ, वासवदत्तेने चित्रफलक पाहिला तेव्हाचे विदूषकाचे उद्‌गार 'स्वतःचे चित्र काढणे कठीण आहे असे माझे शब्द ऐकून प्रियवयस्याने आपले कौशल्य दाखविले आहे' इत्यादी.

'तत्त्वार्थवचनं मार्गः' इत्यादी. 'बाईसाहेब, घुणाक्षरन्याय सुद्धा संभवतो' असे कांचन-माला म्हणते तेव्हा वासवदत्ता तिला एकीकडे खरी गोष्ट सांगण्यास योग्य असे सांगते 'अग, तू अगदी सरळ स्वभावाची आहेस. म्हटले हा वसन्तक आहे' इत्यादी. मार्गाप्रमाणे खरा अर्थ प्रसिद्ध करणारे असल्यामुळे ह्या अंगाला मार्ग अशी संज्ञा आहे.

'वासवदत्तापवार्यं' ही दुरुस्ती आहे. 'अपवार्यं' च्या ऐवजी हस्तलिखितात 'अनुसारि' आणि मुद्रितात 'समयानुसारि' आहे. दोन्ही मूळ असण्याचा संभव नाही. वासवदत्तेचे हे वचन 'अपवार्यं' च आहे.

**चित्रार्थसमवाये[1] तु वितर्को रूपमिष्यते ।**
**यत्सातिशयवद्वाक्यं तदुदाहरणं स्मृतम् ॥ ७८ ॥**

विविध अर्थ एकत्र आले असता जो तर्क केला जातो त्याला रूप अशी संज्ञा आहे. अतिशयोक्तिपूर्ण जे वाक्य त्याला उदाहरण असे म्हणतात.

**चित्रार्थसमवाये तु वितर्को रूपमिति । यथा राजा – 'प्रसीदेति ब्रूयामिदमसति कोपे न घटते' इत्यादि विचित्रार्थानां समवाये संभावने सर्वविषय एव विरुद्धस्तर्कः इदं नोचितमिदं नोचितमित्येवं प्रतियुक्तिपर्यन्तः । युक्तिस्तु नियतप्रतिपत्तिपर्यन्तेति विशेषः । रूपमिति चानियता आकृतिरुच्यते, तत्राविशेषप्रतिपत्तिः । इहापि तथोपचाराद् व्यपदेशः ।**

**यत्सातिशयवद्वाक्यं तदुदाहरणमिति । लोकप्रसिद्धवस्त्वपेक्षया यत्सातिशयमुच्यते उत्कर्षमाहरतीत्युदाहरणम् । यथा 'मनः प्रकृत्यैव चलम्' इति, तथा 'बाणाः पञ्च मनोभवस्य नियताः' इत्यादि ।**

'चित्रार्थसमवाये तु वितर्को रूपम्' इत्यादी. उदाहरणार्थ, राजा 'राग सोडून दे असे मी म्हटले तर तुला राग आलेला नसल्यामुळे उचित होणार नाही' इत्यादी. वैचित्र्यपूर्ण गोष्टींचा समवाय म्हणजे संभव उत्पन्न झाला असता सर्वही गोष्टींविषयी 'हे उचित नाही, हे उचित नाही' अशाप्रकारचा विरुद्ध तर्क विरुद्ध युक्तीपर्यंतचा तो रूप. युक्तीत निश्चित

१ नि -वायो यस्तद्रूपमिति कीर्तितम्.

निर्णयात शेवट होतो हा फरक. रूप म्हणजे अनियत स्वरूपाची आकृती, त्यात विशेषाची प्रतीती नसते. येथेही त्याचप्रमाणे असल्यामुळे गौण अर्थाने रूप ही संज्ञा.

'यत्सातिशयवद्वाक्यं तदुदाहरणम्' इत्यादी. लोकांत प्रसिद्ध असलेल्या गोष्टीच्या मानाने जे अतिशयोक्तियुक्त वचन ते उत्कर्ष उत्पन्न करते म्हणून उदाहरण. उदाहरणार्थ, 'स्वभावतःच मन चंचल असते' इत्यादी. तसेच 'मदनाचे पाच बाण नियमित आहेत' इत्यादी.

'प्रसीदेति इ०' संपूर्ण श्लोक असा –

**प्रसीदेति ब्रूयामिदमसति कोपे न घटते**
**करिष्याम्येवं नो पुनरपि भवेदभ्युपगमः।**
**न मे दोषोऽस्तीति त्वमिदमपि च ज्ञास्यसि मृषा**
**किमेतस्मिन् वक्तुं क्षममिति न वेद्मि प्रियतमे ॥** (२.१९).

– 'प्रतियुक्ति' म्हणजे केलेल्या तर्काला खोडून काढणारी युक्ती. – 'युक्तिः' हे मुखसंधीतील पाचवे अंग. ते ह्या रूपाहून भिन्न आहे. – 'तत्राविशेषप्रतिपत्तिः' ही 'तत्र विशेष-' ची दुरुस्ती आहे. विशेषप्रतिपत्तीचा अभिप्रेत अर्थाच्या विरुद्ध अर्थ होतो. – 'उपचारात्' ह्या संध्यङ्गातही विशेष प्रतीती होत नाही, हे साम्य.

'उत्कर्षमाहरति' ही उदाहरण शब्दाची व्युत्पत्ती. – 'मनः प्रकृत्यैव इ०' संपूर्ण श्लोक असा –

**मनः प्रकृत्यैव चलं दुर्लक्ष्यं च तथापि मे।**
**कामेनैतत्कथं विद्धं समं सर्वैः शिलीमुखैः ॥** (३.२).

– 'बाणाः पञ्च इ०' संपूर्ण श्लोक असा –

**बाणाः पञ्च मनोभवस्य नियतास्तेषामसंख्यो जनः**
**प्रायोऽस्मद्विध एव लक्ष्य इति यल्लोके प्रसिद्धिं गतम् ।**
**दृष्टं तत्त्वयि विप्रतीपमधुना यस्माद्संख्यैरयं**
**विद्धः कामिजनः शरैरशरणो नीतस्त्वया पञ्चताम् ॥** (३.३).

**भावतत्त्वोपलब्धिस्तु क्रम इत्यभिधीयते ।**
**सामदानादिसंपन्नः संग्रहः परिकीर्तितः ॥ ७९ ॥**

भावनांच्या खऱ्या प्रकटीकरणाला क्रम असे म्हणतात. साम, दान इत्यादी उपायांनी युक्त तो संग्रह असे म्हणतात.

१ नि -दानार्थसंयुक्तः, घो -दानार्थसंयोगः.

**भावतत्त्वोपलब्धिस्तु क्रम इति । भावस्य भाव्यमानस्य वस्तुनो भावनातिशये सत्यूहं प्रति भावनादिबलात् या परमार्थोपलब्धिः सा क्रमः । बुद्धिर्हि तत्र क्रमते न प्रतिहन्यते । यथा 'ह्रिया सर्वस्यासौ हरति विदितास्मीति वदनम्' इत्यादि ।**

**सामदानादिसंपन्नः संग्रह इति । साम्ना संकेतादिवार्ताः श्रुत्वा कटकस्य दानम् । एवमन्यदपि ।**

'भावतत्त्वोपलब्धिस्तु क्रमः' इत्यादी. भावाची म्हणजे जिची कल्पना करावयाची त्या वस्तूची, तर्क करण्याच्या कामी कल्पनाशक्ती प्रखर झाली असता, भावना आदीच्या जोरदारपणामुळे जी खऱ्या गोष्टींची जाणीव तिला क्रम म्हणतात. कारण, त्या ठीकाणी बुद्धी चालते, कुंठित होत नाही. उदाहरणार्थ, 'यांना माहीत झाले आहे असे वाटून ती लज्जेने आपले तोंड सर्वांच्या कडून दुसरीकडे वळविते' इत्यादी.

'सामदानादिसंपन्नः संग्रहः' इत्यादी. सामोपचाराने संकेत आदींची बातमी ऐकल्यानंतर राजाने विदूषकाला केलेले कड्याचे दान. याप्रमाणे इतरही.

'या' हस्तलिखितात 'या' च्या ऐवजी 'स्यात्' आहे. मुद्रितात 'स्यात् या' असे दोन्ही शब्द आहेत. 'स्यात्' असंभाव्य आहे. मूळ 'या' चा तो अपभ्रंश आहे हे उघड आहे. – 'ह्रिया इ०' संपूर्ण श्लोक असा –

**ह्रिया सर्वस्यासौ हरति विदितास्मीति वदनं**
**द्वयोर्दृष्ट्वालापं कलयति कथामात्मविषयाम् ।**
**सखीषु स्मेरासु प्रकटयति वैलक्ष्यमधिकं**
**प्रिया प्रायेणास्ते हृदयनिहितातङ्कविधुरा ॥** (३.४).

**रूपानुरूपगमनमनुमानमिति स्मृतम् ।**
**रतिहर्षोत्सवानां[1] तु प्रार्थना प्रार्थना भवेत् ॥ ८० ॥**

एका वस्तूवरून दुसऱ्या वस्तूचे होणारे ज्ञान ते अनुमान असे म्हटले आहे. रती, हर्ष आणि उत्सव यांच्याविषयीची अभ्यर्थना म्हणजे प्रार्थना होय.

**रूपानुरूपगमनमिति । रूप्यमाणेन प्रत्यक्षाद्युपलभ्यमानेन रूपस्य व्यापकस्याविनाभाविनो गमनं ज्ञानम् अनुमानं निश्चयत्वादूहः उपायः, युक्तेरन्यत्वात् ।**

१ नि -त्सवार्थानां, धो -त्सवाद्यर्थ-.

यथा 'पालीयं चम्पकानाम्' इत्यादि । अत्र 'आघ्रायाघ्राय गन्धं विविधमधिगतैः पादपैरेवमस्मिन्' इति गन्धानीति कुसुमानि तेभ्यः पादपाः तेभ्योऽपि मार्गाभिव्यक्तिरिति राज्ञा विदूषकस्योक्तेः ।

रतिहर्षोत्सवानां तु प्रार्थना प्रार्थनेति । एतत्साध्यफलोचितभावलक्षणम् । तत्र साध्यफले यः प्राधान्येन समुचितो भावस्तद्विषया या प्रकर्षेणार्थना सा प्रार्थनारूपमङ्गम् । यथा संकेतस्थः प्रतिपालयन् राजा –

तीव्रः स्मरसंतापो न तथादौ बाधते यथासन्ने ।
तपति प्रावृषि नितरामभ्यर्णजलागमो दिवसः ॥ (३.१०).

'रूपानुरूपगमनम्' इत्यादी. रूपित केल्या जाणाऱ्या म्हणजे प्रत्यक्ष आदींनी ज्ञात होणाऱ्या अशा वस्तूने दुसऱ्या रूपाचे म्हणजे त्याशिवाय नसणाऱ्या अशा व्याप्तिसंबद्ध वस्तूचे गमन म्हणजे ज्ञान ते अनुमान, निश्चित असल्यामुळे तर्काच्या स्वरूपाचा उपाय, युक्तीहून भिन्न असतो म्हणून. उदाहरणार्थ, 'ही चंपकवृक्षांची रांग' इत्यादी. यात 'याप्रमाणे ह्या उद्यानात विविध प्रकारचा वास घेत घेत ओळखल्या जाणाऱ्या वृक्षांमुळे' वास म्हणजे कुसुम, त्यांच्यापासून वृक्ष आणि त्यांपासून मार्गाची अभिव्यक्ती होते असे राजाने विदूषकाला सांगितले आहे.

'रतिहर्षोत्सवानां तु प्रार्थना प्रार्थना' इत्यादी. हे साध्य करावयाच्या फलाला उचित अशा भावाचे लक्षण आहे. त्यात साध्यफलाविषयी मुख्यत्वेकरून उचित असा जो भाव त्यासंबंधीची प्रकर्षयुक्त अर्थना म्हणजे प्रार्थना नावाचे अंग. उदाहरणार्थ, संकेतस्थानी वाट पहात असलेल्या राजाचे वचन 'तीव्र असा मदनाचा ताप प्रारंभी तितका त्रास देत नाही जितका समागम संनिध आला असता तो देतो. वर्षाऋतून पाऊस जवळ आला असता दिवस अधिकच तापदायक होतो.'

'व्यापकस्य' यात नैयायिकांच्या व्याप्तीतील व्याप्यव्यापकरूप संबंधाचा निर्देश अभिप्रेत आहे. 'अविनाभाव' हे ह्या संबंधाचे लक्षण आहे. – 'निश्चयत्वात्' मुद्रित पाठ 'निश्चयात्मकत्वात्' आहे. मूळ पाठ 'निश्चितत्वात्' असाही असण्याचा संभव आहे. – 'उपायः युक्तेः' ही 'उपायायुक्तेः' ची दुरुस्ती आहे. असा समास असंभाव्य आहे. येथे असा आशय दिसतो की अनुमान म्हणजे ऊह हा उपाय म्हणून योजला जातो, वर सांगितलेल्या युक्ति ह्या अंगाची तशी योजना होत नाही, हा त्या दोहोंतील फरक. – 'पालीयं' संपूर्ण श्लोक याप्रमाणे –

पालीयं चम्पकानां नियतमयमसौ सुन्दरः सिन्दुवारः
सान्द्रा वीथी तथेयं बकुलविटपिनां पाटलापङ्क्तिरेषा।
आघ्रायाघ्राय गन्धं विविधमधिगतैः पादपैरेवमस्मिन्
व्यक्तिं पन्थाः प्रयाति द्विगुणतरतमोनिह्नुतोऽप्येष चिह्नैः॥ (३.८).

'गन्धानीति' ही 'गन्धानि' ची दुरुस्ती आहे. संपादकांनी 'गन्धात् (?)' अशी प्रश्नयुक्त दुरुस्ती सुचविली आहे. त्याचा गन्धावरून कुसुमांचे अनुमान केले आहे असा अर्थ होतो. पण ह्या श्लोकात एकच अनुमान – गन्धावरून पादपांचे – अभिप्रेत आहे असे अभिनवगुप्ताचेही मत दिसते. गन्धावरून कुसुमांचे अनुमान श्लोकात नाही. तेव्हा गन्ध हे कुसुमाचे उपलक्षण मानून 'गन्धानि इति कुसुमानि' असे त्याने म्हटले असल्याचा अधिक संभव आहे. – 'मार्गाभिव्यक्तिः' ही हस्तलिखितातील 'मार्गमनुदिवेष्टम्' या पाठाची सुचविलेली दुरुस्ती आहे. श्लोकातील 'व्यक्तिं पन्थाः प्रयाति' या शब्दांच्या अनुरोधाने ती सुचविली आहे. मुद्रित पाठ 'मार्गमनुमापितम्' असा आहे. पण मार्ग शब्द पुल्लिंगी आहे. शिवाय, मार्गाचे अनुमान केले आहे असे म्हणणे शक्य नाही. पादप आणि मार्ग यात अविनाभाव अथवा व्याप्ति नाही.

'भावस्तद्विषया' मुद्रितातील 'भावस्थद्विषया' हा मुद्रणदोष आहे. – 'प्रकर्षेणार्थना' ही प्रार्थना शब्दाची फोड असल्यामुळे मुद्रितातील 'प्रकर्षेणाभ्यर्थना' अस्वीकार्य आहे. – 'यथादौ' मुद्रितातील 'यदादौ' मुद्रणदोष असावा. – 'नितराम्' 'हि तराम्' असा मुळातील पाठ बरोबर नाही.

**गर्भस्योद्भेदनं यत्साक्षिप्तिरित्यभिधीयते[1] ।**
**संरम्भवचनं[2] चैव तोटकं त्विति संज्ञितम् ॥ ८१ ॥**

गुप्त असलेल्या गोष्टीचा जो परिस्फोट त्याला आक्षिप्ति असे म्हणतात. आवेगयुक्त असे जे वचन त्याला तोटक अशी संज्ञा आहे.

**गर्भस्योद्भेदनमाक्षिप्तिरिति । हृदयान्तःस्थितस्य पुनः प्रतिष्ठापितस्यापि यत्कुतश्चिन्निमित्तादुद्भेदनम् अनपह्नवनीया स्फुटतापत्तिः सा आक्षिप्तिः, अभिप्रायस्य हि तत्राक्षेपो बहिःकर्षणम् । वासवदत्तायामेव सागरिकेति राज्ञा विदूषकेण च गृहीतायां तदुक्तिषु 'सागरिके, शीतांशुर्मुखमुत्पले तव दृशौ' इत्यादिषु ।**

**संरम्भवचनं चैव तोटकमिति । आवेगगर्भं यद्वचनं तत्तोटकम् । स चावेगो हर्षात् क्रोधादन्यतोऽपि वा भावी निर्गतो हृदयतो ततस्तोटकम् । यथा विदूषकः – 'अज्ज वि दाव से देवीए णिच्चरुट्ठाए वासवदत्ताए वअणेहिं कडुइदा कण्णा सुहाविअदु' इत्यादि ।**

'गर्भस्योद्भेनम् आक्षिप्तिः' इत्यादी. हृदयाच्या आत असलेल्या आणि पुन्हा तेथेच प्रतिष्ठापित केलेल्या गोष्टीचे जे कोणत्या तरी निमित्ताने उद्भेदन म्हणजे लपविता न

१ नि यत्स्यात् क्षिप्ति-, घो यत्तु तदाक्षिप्तमिति स्मृतम्. २ नि -वचनप्रायं.

येण्यासारखा गुह्यस्फोट तो आक्षिप्ति. उदाहरणार्थ, वासवदत्तेलाच सागरिका असे राजा आणि विदूषक समजतात तेव्हाचे 'सागरिके, तुझे मुख प्रत्यक्ष चन्द्रच आहे, तुझे नेत्र उत्पल आहेत' इत्यादी राजाचे उद्गार.

'संरम्भवचनं चैव तोटकम्' इत्यादी. आवेगयुक्त जे वचन ते तोटक. आणि तो आवेग हर्षामुळे, क्रोधामुळे अथवा दुसऱ्याही कारणामुळे होणारा हृदयातून बाहेर येतो म्हणून हे तोटक. उदाहरणार्थ, विदूषकाचे वचन 'नेहमी रागावणाऱ्या वासवदत्ता राणीच्या शब्दांनी कटू झालेल्या ह्याच्या कानांना तुझ्या मधुर वचनांनी सुख दे.'

हृदयान्तःस्थितस्य' ही मुळातील '-स्थितं' ची संपादकांनी सुचविलेली दुरुस्ती आवश्यक आहे. – 'पुनः' शब्दाचे प्रयोजन स्पष्ट नाही. त्याऐवजी 'तत्र' शब्द अधिक अर्थवाही झाला असता. – 'यत्' च्या जागी मुद्रित पाठ 'यतः' आहे. पण तो समर्पक नाही. 'यत् उद्भेदनं सा आक्षिप्तिः' असे श्लोकातच आहे. तसेच 'अनपह्नवनीया' नंतर मुद्रितात असलेला 'या' शब्द आवश्यक नाही. – 'शीतांशुर्मुखम्' संपूर्ण श्लोक असा –

**शीतांशुर्मुखमुत्पले तव दृशौ पद्मानुकारौ करौ**
**रम्भागर्भनिभं तवोरुयुगलं बाहू मृणालोपमौ ।**
**इत्याह्लादकराखिलाङ्गि रभसान्निःशङ्कमालिङ्ग्य मा-**
**मङ्गानि त्वमनङ्गतापविधुराण्येह्येहि निर्वापय (३.११).**

'भावी निर्गतो हृदयतो' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'भाविनि यतो हृदयतो हृदयं' असा भ्रष्ट व अंशतः द्विरुक्त पाठ आहे. मुद्रित पाठ 'भिनत्ति यतो हृदयं' असा आहे. हे तोटकाचे वर्णन होईल. पण आवेगाचे हृदयातून बाहेर पडणारा या तऱ्हेचे वर्णन करण्याचा उद्देश अधिक संभाव्य आहे.

**कपटेनातिसंधानं ब्रुवतेऽधिबलं[1] बुधाः ।**
**भयं नृपारिदस्यूत्थमुद्वेगः परिकीर्तितः ॥ ८२ ॥**

कपटाने केलेल्या फसवणुकीला बुद्धिमान लोक अधिबल म्हणतात. राजा, शत्रू, चोर इत्यादींपासून उत्पन्न होणाऱ्या भीतीला उद्वेग म्हणतात.

**कपटेनातिसंधानमधिबलमिति । परस्परं वञ्चनप्रवृत्तयोर्यस्यैवाधिकं सहायबुद्ध्यादीन्यवलम्बयति स एव तमतिसंधातुं वञ्चयितुं समर्थ इति तदिदं कर्माधिबलम् । यथा सागरिकावेषं धारयन्ती वासवदत्ता विदूषकबुद्धिदौर्बल्याद्राजानमतिसंधत्ते । 'किं पद्मस्य रुचं न हन्ति' इत्यादिश्लोकान्तमधिबलम् ।**

१ का ज्ञेयं त्वधिबलं बुधैः.

भयं नृपारिदस्यूत्थमुद्वेग इति । अरिशब्दान्नायिकादि । यथा राजा – 'कथं देवी वासवदत्ता । वयस्य, किमेतत् ।' विदूषकः – 'णं अम्हाणं जीविदसंसओ' इत्यादि ।

'कपटेनातिसंधानमधिबलम्' इत्यादी. एकमेकास फसविण्यास प्रवृत्त झालेल्या दोघां-पैकी ज्याचे वागणे सहायक, बुद्धी आदींचा अवलंब करते तोच त्या दुसऱ्याचे अति-संधान करण्यास म्हणजे फसवणूक करण्यास समर्थ होतो; त्याचे हे वागणे म्हणजे अधिबल उदाहरणार्थ, सागरिकेच्या वेषात असलेली वासवदत्ता विदूषकाच्या बुद्धीच्या दुर्बलतेमुळे राजाला फसविते. 'पद्माची शोभा नष्ट करीत नाही काय?' इत्यादी श्लोकाच्या अंतापर्यंत अधिबल.

'भयं नृपारिदस्यूत्थमुद्वेगः' इत्यादी. अरिशब्दाने नायिका आदींचा बोध होतो. उदाहरणार्थ, राजा 'काय? देवी वासवदत्ता? मित्रा, हे काय?' विदूषक 'आपल्या जीविता-विषयी संशय, दुसरे काय?'

'वञ्चनप्रवृत्तयोः' ही मुळातील 'वचनप्रवृत्तयोः' ची दुरुस्ती आहे. प्रस्तुत संदर्भात 'वञ्चन' च योग्य यात शंका नाही. – 'अधिकं' याचे विशेष्य 'कर्म' हे आहे. – 'किं पद्मस्य इ०' हा संपूर्ण श्लोक वर ३८ व्या श्लोकावरील टीपेत दिला आहे.

'नायिकादि' मुद्रितातील 'नाचिकादि' हा मुद्रणदोष आहे.

शङ्का[1] भयत्रासकृतो विद्रवः समुदाहृतः ।
दोषप्रख्यापनं यत्तु सोऽपवाद इति स्मृतः ॥ ८३ ॥

भय व त्रास उत्पन्न करणाऱ्या वस्तूविषयी शंकेला विद्रव म्हटले आहे. दोषाचे जे प्रख्यापन त्याला अपवाद असे म्हणतात.

शङ्का भयत्रासकृतो विद्रव इति । भयत्रासकारिणो वस्तुनो या शङ्का यदाशङ्कनं स विद्रवः, विद्रवति विलीयते हृदयं येनेति । यथा –

'प्रिया मुञ्चत्यद्य ध्रुवमसहना जीवितमसौ
प्रकृष्टस्य प्रेम्णः स्खलितमविषह्यं हि भवति ॥' (३.१५) इति ।

अन्ये तु शङ्काभयत्रासैः कृतो यः स विद्रव इति । तत्र च विशेष्यपदमन्वेष्यम् । समुदाय एव विशेष्य इति श्रीशङ्कुकः, उदाहरति च कृत्यारावणे षष्ठेऽङ्के गर्भ-संधौ नेपथ्ये – 'हा अय्यउत्त, परित्ताआहि ।' प्रतीहारी श्रुत्वा आत्मगतम् – 'अंहो,

१ नि नृपाग्निभयसंयुक्तः संभवो विद्रवः स्मृतः.

भट्टिणी विअ आक्कंददि ।' प्रकाशम् 'भवदो अन्तेउरे महन्दो कलकलो सुणीअदि ।' राजा – 'ज्ञायतां किमेतदिति ।' अत्र रावणस्याशङ्का प्रतीहार्यास्त्रासभये ।

अथावमर्शसंधावङ्गानां लक्षणमाह ।

दोषप्रख्यापनं यत्तु सोऽपवाद इति । यथा सागरिकोक्तेरनन्तरं राजा 'अयि मिथ्यावादिनी खल्वसि ।

श्वासोत्कम्पिनि कम्पितं स्तनयुगे मौने प्रियं भाषितं
वक्त्रेऽस्याः कुटिलीकृतभ्रुणि रुषा यातं मया पादयोः ।
इत्थं नः सहजाभिजात्यजनिता सेवैव देव्याः पुरः
प्रेमाबद्धविवर्धिताधिकरसा प्रीतिस्तु या सा त्वयि ॥ (३.१८) इति ।

अत्र देवीगुणानां सातिशयकोपनत्वेनापवादनं कृतम् ।

'शङ्का भयत्रासकृतो विद्रवः' इत्यादी. भय आणि त्रास उत्पन्न करणाऱ्या गोष्टीची जी शंका म्हणजे मनात शंका उत्पन्न होणे तो विद्रव; त्याने हृदय द्रव पावते म्हणजे विलय पावते म्हणून. उदाहरणार्थ, 'सहन करण्यास असमर्थ असलेली माझी ती प्रिया आज निश्चित जीव देईल. कारण, प्रकृष्ट प्रेमाचा भंग असह्यच होतो.' परंतु दुसरे टीकाकार शंका, भय आणि त्रास यांनी केलेला तो विद्रव अशी व्याख्या करतात. त्या व्याख्येप्रमाणे विशेष्य काय ते अस्फुट आहे. श्रीशङ्कुकाच्या मते तिन्हींचा समुदाय हेच विशेष्य. त्याने कृत्यारावण नाटकातील सहाव्या अंकामधील गर्भसंधीतून पुढील उदाहरण दिले आहे. नेपथ्यात 'आर्यपुत्र, वाचवा वाचवा!' ऐकून प्रतीहारी स्वतःशी म्हणते 'हा! देवी आक्रोश करते आहे असे वाटते' आणि मग उघड म्हणते 'आपल्या अन्तःपुरात मोठी गडबड चाललेली ऐकावयास येते.' राजा 'पाहून ये काय चालले आहे ते.' या ठिकाणी रावणाची आशंका आणि प्रतीहारीचे भय आणि त्रास ही व्यक्त झाली आहेत.

आता अवमर्शसंधीतील अंगांचे लक्षण सांगतात.

'दोषप्रख्यापनं यत्तु सोऽपवादः' इत्यादी. उदाहरणार्थ, सागरिकेच्या उद्गारानंतर राजाचे वचन – 'अग, तुझे हे बोलणे खरे नाही. तिचा उरोभाग श्वासाने वरखाली होऊ लागला म्हणजे मी कापू लागतो, तिने मौन धारण केले की मी प्रिय असे बोलतो, रागाने तिच्या मुखावरील भुवया वक्र झाल्या की मी तिच्या पाया पडतो, याप्रमाणे उपजत असलेल्या खानदानीमुळे आचरणात येणारी ही देवीच्या बाबतीत माझी केवळ सेवा होय. परंतु प्रेमामुळे दृढ होऊन वृद्धिंगत झालेल्या रसातिशयाने युक्त अशी जी प्रीती ती तुझ्यावरच आहे.' या ठिकाणी देवीच्या गुणांना अतिशय रागिटपणामुळे दोषरूप ठरविले आहे.

'प्रिया इ०' ह्या श्लोकाचा पूर्वार्ध पुढीलप्रमाणे आहे –

**समारूढा प्रीतिः प्रणयबहुमानादनुदिनं**
**व्यलीकं वीक्ष्येदं कृतमकृतपूर्वं खलु मया।**

– 'समुदायः' म्हणजे शङ्का, भय आणि त्रास यांचा समुदाय.

'सागरिकोक्तेः' सागरिकेचे वचन पुढीलप्रमाणे – 'कशाला उगीच खोटे दाक्षिण्य दाखविता? आणि प्राणाहून प्रिय असलेल्या देवीच्या दृष्टीने स्वतःला अपराधी बनवून घेता?'

**रोषग्रथितवाक्यं तु संफेटः परिकीर्तितः ।**
**गुरुव्यतिक्रमो यस्तु स[1] द्रवः परिकीर्तितः ॥ ८४ ॥**

रोषयुक्त वचनाला संफेट असे म्हणतात. गुरुजनांची जी अवज्ञा तिला द्रव असे म्हणतात.

**रोषग्रथितवाक्यं तु संफेट इति । केचित्तु स्फेट अनादर इति धातुं मनसिकृत्य संस्फेट इति पठन्ति । यथा वासवदत्ता सरोषं सहसोपसृत्य – 'अय्यउत्त, जुत्तं णेदं सरिसं णेदं' इत्यादि ।**

**गुरुव्यतिक्रमो यस्तु स द्रव इति । यथा भर्तृसंनिधानेऽपि विदूषकस्य सागरिकायाश्च वासवदत्तया बन्धनम् । यथा वा तापसवत्सराजे षष्ठेऽङ्के वासवदत्ताया यौगन्धरायणवचनातिक्रमेण मरणाध्यवसायः । द्रवणं चलनं मार्गादिति द्रवः ।**

'रोषग्रथितवाक्यं तु संफेटः' इत्यादी. परंतु काही टीकाकार अनादर या अर्थी असलेला स्फेट धातू मनात धरून संस्फेट असा पाठ स्वीकारतात. उदाहरणार्थ, वासवदत्ता रागाने एकदम पुढे होऊन म्हणते – 'आर्यपुत्र, हे योग्य आहे! हे उचित आहे!' इत्यादी.

'गुरुव्यतिक्रमो यस्तु स द्रवः' इत्यादी. उदाहरणार्थ, पति संनिध असताही वासवदत्तेने केलेले विदूषक आणि सागरिका यांचे बंधन. किंवा तापसवत्सराज नाटकातील सहाव्या अंकात यौगन्धरायणाच्या वचनाचा अव्हेर करून वासवदत्तेने केलेला मरणाचा निर्धार. द्रवण म्हणजे उचित मार्गापासून चलित होणे, म्हणून ह्याला द्रव म्हणतात.

१ नि घो विज्ञेयोऽभिद्रवस्तु सः.

'स्फेट अनादरे' हस्तलिखितातील या ठिकाणचे पाठ बरेच भ्रष्ट आहेत. धातूचे 'स्फेट' असे रूप तेथे आढळते, पण त्यापासून निष्पन्न झालेल्या शब्दाचे रूप 'फेल' असे दिले आहे. तसेच त्यापूर्वी 'धातुमन्नसत्कृत्य' हा अक्षरसमुच्चय आहे. मुद्रितात 'संस्फोट अनादर इति धातुं मनस्कृत्य संस्फोट' असे आहे. संस्फोट असे ह्या अंगाचे नाव असंभाव्य नाही.

**विरोधि[1]प्रशमो यश्च[2] सा शक्तिः परिकीर्तिता ।**
**व्यवसायश्च विज्ञेयः प्रतिज्ञाहेतु[3]संभवः ॥ ८५ ॥**

विरोध करणाऱ्याला शांत केले जाते त्याला शक्ति असे म्हणतात. आणि प्रतिज्ञात वस्तूच्या प्राप्तीचा संभव तो व्यवसाय असे जाणावे.

**विरोधिप्रशमः शक्तिरिति । विरोधिनः कुपितस्य प्रशमः प्रसादनं शक्तिः बुद्धिविभवादिशक्तिकार्यत्वात् । यथा –**

**सव्याजैः शपथैः प्रियेण वचसा चित्तानुवृत्त्या भृशं**
**वैलक्ष्येण परेण पादपतनैर्वाक्यैः सखीनां मुहुः ।**
**प्रत्यापत्तिमुपागता न हि तथा देवी रुदत्या यथा**
**प्रक्षाल्यैव तयैव बाष्पसलिलैः कोपोऽपनीतः स्वयम् ॥ (४.१) इत्यादि ।**

**व्यवसायश्च विज्ञेयः प्रतिज्ञाहेतुसंभव इति । प्रतिज्ञातस्याङ्गीकृतस्यार्थस्य हेतवो ये तेषां संभवः प्राप्तिर्व्यवसायः । यथा ऐन्द्रजालिकप्रवेशादितो यावत् 'एक्को उण खेलओ अवस्सं पेक्खिदव्वो' इत्यादि । यौगन्धरायणेन यत्कर्तुमङ्गीकृतं तस्यैव हेतोः प्राप्तिः ।**

'विरोधिप्रशमः शक्तिः' इत्यादी. विरोध करणाऱ्याचा म्हणजे रागावलेल्याचा प्रशम म्हणजे प्रसादन करणे ती शक्ति; कारण, बुद्धी, विभव आदी शक्तीचे हे कार्य असते. उदाहरणार्थ, 'मी घेतलेल्या खोट्या शपथांमुळे, माझ्या गोड बोलण्याने, तिच्या मनासारखे नेहमी वागण्याने, खूप खिन्नता दाखविण्याने, पाया पडण्याने, किंवा तिच्या सखींच्या सततच्या अनुनयवाक्यांनी देवी वासवदत्तेचा राग तितका नाहीसा झाला नाही जितका तो तिनेच स्वतः रडून आसवांच्या पाण्याने जणू काही धुवून घालविला आहे' इत्यादी.

'व्यवसायश्च विज्ञेयः प्रतिज्ञाहेतुसंभवः' इत्यादी. ज्याची प्रतिज्ञा केली आहे म्हणजे जे अंगीकृत केले आहे त्या कार्याचे जे हेतू त्यांचा संभव म्हणजे प्राप्ती तो व्यवसाय.

१ नि विरोधप्र-, घो विरोधोप- २ नि यस्तु. ३ का -दोषसंभवः.

उदाहरणार्थ, ऐन्द्रजालिकाच्या प्रवेशापासून ते 'माझा एक खेळ अवश्य पाहिला पाहिजे' इत्यादीपर्यंत. यौगन्धरायणाने जे कार्य अंगीकृत केले होते त्याच्याच हेतूची ही प्राप्ती आहे.

'प्राप्तिर्व्यवसायः' ही मुळातील 'प्राप्तिव्यवसायः' ची दुरुस्ती आहे. 'प्राप्तिः' हा 'संभवः' चा अर्थ आहे. आणि व्यवसायाची व्याख्या केलेली असल्यामुळे 'व्यवसायः' असा स्वतंत्र शब्द श्लोकानुसार वापरलेला असणार. – 'हेतोः' ही 'हेतुः' ची दुरुस्ती आहे. संपादकांनी 'हेतुः' च्या पुढे कंसात (तस्य) शब्द सुचविला आहे.

**प्रसङ्गश्चैव विज्ञेयो गुरूणां परिकीर्तनम् ।**
**वाक्यमाधर्षसंयुक्तं द्युतिस्तज्ज्ञैरुदाहृता ॥ ८६ ॥**

गुरुजनांचा गौरवयुक्त निर्देश तो प्रसङ्ग असे समजावे. निर्भर्त्सना करणाऱ्या वाक्याला तज्ज्ञ लोक द्युति असे म्हणतात.

**प्रसङ्गश्चापि विज्ञेयो गुरूणां परिकीर्तनमिति । यथा वासवदत्ता – 'उज्जइणीए आअदो त्ति अत्थि मे तस्सिं इन्दआलिए पक्खवादो' इत्यादि । अत्र हि बन्धुकुलादागमोऽस्य बहुमानकारणम् ।**

**वाक्यमाधर्षसंयुक्तं द्युतिरिति । आधर्षो न्यक्कारः तेन संयुक्तम् । यथा विदूषकः – 'आ दासीए उत्त इन्दआलिअ' इत्यादि ।**

'प्रसङ्गश्चापि विज्ञेयो गुरूणां परिकीर्तनम्' इत्यादी. उदाहरणार्थ, वासवदत्ता 'उज्जयिनींहून आला आहे म्हणून त्या इन्द्रजालिकाविषयी मला आपुलकी वाटते.' या ठिकाणी नातेवाइकांकडून आगमन हे त्याच्याबद्दल वाटणाऱ्या बहुमानाचे कारण आहे.

'वाक्यमाधर्षसंयुक्तं द्युतिः' इत्यादी. आधर्ष म्हणजे धिक्कार, त्याने युक्त. उदाहरणार्थ, विदूषक 'आः रांडलेका ऐन्द्रजालिका' इत्यादी.

अभिनवगुप्ताचा पाठ 'प्रसङ्गश्चापि' होता असे दिसते. – पुढे श्लोक ९२ मध्ये द्युति हेच नाव असलेल्या निर्वहणसंधीतील एका अंगाचे वर्णन आहे. दोहोंचे स्वरूप सर्वस्वी भिन्न आहे. अशी शक्यता आहे की या ठिकाणी धृति किंवा द्रुति असे मूळ नाव होते.

१ नि -माधर्षणकृतं. २ घो द्रुति-.

**मनश्चेष्टाविनिष्पन्नः श्रमः खेद उदाहृतः ।**
**ईप्सितार्थप्रतीघातः प्रतिषेधः[1] प्रकीर्तितः ॥ ८७ ॥**

मन आणि शरीर यांच्या क्रियांमुळे उत्पन्न झालेल्या श्रमाला खेद म्हणतात. इच्छि-लेल्या कार्यात आलेल्या विघ्नाला प्रतिषेध म्हणतात.

**मनश्चेष्टाविनिष्पन्नः श्रमः खद इति । मानसः कायीयश्चेत्युभयोऽपीति यावत् । आद्यो यथा सिंहलेश्वरस्य कुशलप्रश्ने वसुभूतिः निःश्वस्य 'देव न जाने किं कथयामि' इत्यत आरभ्य रत्नावल्याः समुद्रपतनाकर्णनोदितवासवदत्ता-विलपपर्यन्तम् । शारीरस्तु खेदः पुरूरवाः 'अहो श्रान्तोऽस्मि, यावदस्या गिरिनद्यास्तीरे' इत्यादि ।**

**यद्यपि श्रमोद्वेगवितर्कलज्जाप्रभृतयो व्यभिचारिवर्गे पूर्वमुक्तास्तथापि एते सत्यवसरेऽवश्यप्रयोज्याः प्रागुक्तप्रयोजनार्थसिद्धये इति पृथक्प्रयोजनत्वात् संध्यङ्गत्वेनोक्ता मन्तव्याः ।**

**ईप्सितार्थप्रतीघातः प्रतिषेध इति । यथा रत्नावलीवृत्तान्तवर्णने ईप्सितार्थे बाभ्रव्येण प्रस्तुते तस्य प्रतिघातोऽन्तःपुरदाहेन ।**

'मनश्चेष्टाविनिष्पन्नः श्रमः खेदः' इत्यादी. मानसिक आणि शारीरिक दोन्हीही प्रकारचा असा अर्थ. पहिल्याचे उदाहरण सिंहलच्या राजाचे कुशल विचारले असता वसुभूति निश्वास टाकून 'महाराज, समजत नाही काय सांगावे ते' असे म्हणतो तेथपासून रत्नावली समुद्रात पडली हे ऐकल्यामुळे वासवदत्तेने केलेल्या विलापापर्यंत. शारीरिक खेद विक्रमोर्वशीय नाटकात पुरूरव्याचे वचन 'हा ! मी दमलो आहे. आता थोडा वेळ ह्या पर्वतावरील नदीच्या तीरावर' इत्यादी.

श्रम, उद्वेग, वितर्क, लज्जा वगैरे जरी मागे व्यभिचारिभावांमध्ये निर्दिष्ट केले असले तरी प्रसंग प्राप्त झाल्यास पूर्वी सांगितलेल्या प्रयोजनांच्या सिद्धीसाठी ह्यांची अवश्य योजना करावयाची असते म्हणून उद्देश निराळा असल्यामुळे संधींची अंगे म्हणून सांगतली आहेत असे समजावे.

'ईप्सितार्थप्रतीघातः प्रतिषेधः' इत्यादी. उदाहरणार्थ, रत्नावलीच्या वृत्तान्ताचे वर्णन हे इच्छिलेले कार्य बाभ्रव्याने सुरू केले असता अन्तःपुरातील अग्नीने त्यात आलेले विघ्न.

१ नि घो निषेधः स तु.

'जाने' मुद्रितातील 'जाते' हा मुद्रणदोष आहे. – 'पुरूरवाः' ही मुळातील 'पुरूरवसा' ची सुचविलेली दुरुस्ती आहे. तृतीया विशेष समर्पक नाही. आणि पात्रांची वचने उद्धृत करताना त्यांचा निर्देश प्रथमेत करण्याचा अभिनवगुप्ताचा प्रघात आहे.

'व्यभिचारिवर्गे पूर्वम्' म्हणजे नाट्यशास्त्रातील सातव्या अध्यायात.

'ईप्सितार्थे' ही मुळातील 'ईप्सितार्थप्रतीघातः (-प्रतीघाते – मुद्रित)' ची दुरुस्ती आहे. प्रतीघात शब्दाची चुकीने द्विरुक्ती झाली आहे हे उघड आहे.

**[१]कार्यात्ययोपगमनं विरोधनमिति स्मृतम् ।**
**बीजकार्योपगमनमादानमिति संज्ञितम् ॥ ८८ ॥**

कार्यामध्ये विनाशाची प्राप्ती म्हणजे विरोधन असे म्हटले आहे. बीजाच्या कार्याचे जे समीप येणे त्याला आदान अशी संज्ञा आहे.

**कार्यात्ययोपगमनं निरोधनमिति । यथा राजा – 'कथमन्तःपुरेऽग्निः । हा हा धिक्कष्टं दग्धा देवी वासवदत्ता' इत्यादि यावत्सागरिकोत्सादनपर्यन्तम् । अत्र हि कार्ये वासवदत्तायाः सागरिकां प्रति विस्रम्भस्यात्ययो विनाशः उपगतः प्राप्तः ।**

**बीजकार्योपगमनमादानमिति । बीजफलसमीपताभवनमित्यर्थः । यथा सागरिका राजानं दृष्ट्वा स्वगतम् 'अय्यउत्त' इत्यादि । अत्र हि बन्धुकुलादागमो यावद्राज्ञ उक्तिः –**

**व्यक्तं लग्नोऽपि भवतीं न धक्ष्यति हुताशनः ।**
**यतः सन्तापमेवायं स्पर्शस्ते हरति प्रिये ॥ (४.१८) इत्यन्तम् ।**

'कार्यात्ययोपगमनं निरोधनम्' इत्यादी. उदाहरणार्थ, राजा 'काय? अन्तःपुराला आग लागली आहे? हाय! हर हर! देवी वासवदत्ता अग्नीच्या भक्ष्यस्थानी पडली' येथपासून ते सागरिकेच्या प्रवेशापर्यंत. कारण, या ठिकाणी कार्यामध्ये वासवदत्तेच्या सागरिकेविषयीच्या विश्वासाला अत्यय म्हणजे विनाश उपगत म्हणजे प्राप्त झाला आहे.

'बीजकार्योपगमनमादानम्' इत्यादी. म्हणजे बीजाच्या फलाची प्राप्ती समीप येणे असा अर्थ. उदाहरणार्थ, सागरिका राजाला पाहून स्वतःशी म्हणते 'आर्यपुत्र' इत्यादी.

१ नि विरोधनं तु संरम्भादुत्तरोत्तरभाषणम्.

या ठिकाणी 'नातेवाइकाकडून आगमन' येथपासून राजाची उक्ती 'अग्नीने तुला स्पर्श केला असताही तो तुला जाळणार नाही हे स्पष्ट आहे. कारण, प्रिये, हा तुझा स्पर्शच ताप दूर करतो' येथपर्यंत आदान आहे.

'निरोधनम्' असा अभिनवगुप्ताचा पाठ होता, 'विरोधनम्' नव्हता असे दिसते. – 'सागरिकोत्सादनपर्यन्तम्' यातील 'उत्सादन' शब्द अपभ्रष्ट आहे. त्याचा अर्थ 'विनाश' मुळीच लागू पडण्यासारखा नाही. 'सागरिकादर्शन-' असा मूळ पाठ असण्याची शक्यता आहे. अग्नीने वेष्टित अशा सागरिकेच्या प्रवेशापर्यंतचा भाग येथे अभिप्रेत आहे यात शंका नाही. – 'वासवदत्तायाः' ही मुळातील 'वासवदत्ता' ची दुरुस्ती आहे. षष्ठीचे रूप विस्रम्भशी अन्वयासाठी आवश्यक आहे. – 'सागरिकां प्रति विस्रम्भस्य' मुद्रित पाठ 'सागरिकाप्रेमविस्रम्भस्य' बरोबर नाही हे उघड आहे. सागरिकेचे प्रेम अथवा तिच्यावरील प्रेम येथे अप्रस्तुत आहे. तिच्याविषयी वासवदत्तेला जो विश्वास वाटायला लागला होता त्यात व्यत्यय आला आहे असा येथील आशय आहे. – 'विनाशः' मुद्रितातील 'विनाशम्' हा पाठ बरोबर नाही. 'अत्ययः' चा अर्थ सांगण्यासाठी हा शब्द वापरला आहे.

'अज्जउत्त' सागरिकेचे येथील वचन 'यांना पाहून मला पुन्हा जीविताची अभिलाषा वाटू लागली आहे' अशा अर्थाचे आहे. – 'बन्धुकुलादागमो' म्हणजे सामान्यतः वासवदत्तेच्या प्रवेशापासून. कारण हे तिचे उद्गार आहेत.

**[1]अपमानकृतं वाक्यं कार्यार्थं [2]छादनं भवेत् ।**
**प्ररोचना च विज्ञेया [3]संहारार्थप्रदर्शिनी ॥ ८९ ॥**

कार्याच्या निमित्ताने अपमान करणारे वाक्य ते छादन होय. आणि संहारातील कार्याचे दर्शन घडविणारी ती प्ररोचना असे जाणावे.

**अवमानकृतं वाक्यं छादनमिति । वाक्यमिति तदर्थो लक्ष्यते । करोतिर्बहुमाने वर्तते । तेन दुष्टोऽप्यर्थोऽवमानेन बहुमतीकृतः । तदवमानकलङ्कापवारणाच्छादनमिति । यथा सागरिका – 'दिट्ठिआ पज्जलिदो भअवं हुदासणो करइस्सदि मे सअलदुक्खावसाणम् ।' इति ।**

**प्ररोचना च विज्ञेया संहारार्थप्रदर्शिनी इति । संह्रियमाणस्य निर्वाह्यमाणस्यार्थस्य दर्शिका प्रकर्षेण रोचत इति प्ररोचना । यथा –**

१ **नि** अवमानात्कृतं. २ **घो** सादनं. ३ **नि** संभारार्थप्रकाशिनी.

क्वासौ ज्वलन् हुतवहस्तदवस्थमेत-
दन्तःपुरं कथमवन्तिनृपात्मजेयम् ।
बाभ्रव्य एष वसुभूतिरयं वयस्यः
स्वप्नो मतिभ्रमः' इति ।

'अवमानकृतं वाक्यं छादनम्' इत्यादी. वाक्य म्हणजे त्याचा अर्थ निर्दिष्ट होतो. करोति धातूचा बहुमान असा अर्थ आहे. म्हणून मुळात वाईट असलेली गोष्ट सुद्धा अवमान झालेला असल्यामुळे बहुमानास्पद बनते. त्या अवमानाच्या कलंकाच्या निवारणामुळे छादन हे नाव. उदाहरणार्थ, सागरिका 'बरे झाले. आता हा प्रज्वलित झालेला अग्निदेव माझ्या सर्व दुःखांचा अंत करील.'

'प्ररोचना च विज्ञेया संहारार्थप्रदर्शिनी' इत्यादी. संहार केल्या जाणाऱ्या म्हणजे अंतापर्यंत नेल्या जात असलेल्या गोष्टीचे दर्शन घडविणारी, प्रकर्षाने आवडते म्हणून प्ररोचना. उदाहरणार्थ, 'कोठे आहे तो प्रज्वलित झालेला अग्नि? हे अंतःपुर पूर्वीच्याच स्थितीत कसे आहे? ही अवन्तीच्या राजाची कन्या वासवदत्ता, हा बाभ्रव्य, हा वसुभूति हा वयस्य. हे स्वप्न आहे, का बुद्धिभ्रम आहे?'

'अवमानकृतं' हस्तलिखितात 'अवमान' युक्त पाठ आहे. आणि अभिनवगुप्ताचा तोच पाठ असण्याचा संभव आहे. अपमानापेक्षा अवमान शब्द अधिक समर्पक वाटतो. उदाहरणातील सागरिकेचा अपमान नसून अवमान झाला आहे. – 'करोतिर्बहुमाने' कृधातूचा हा अप्रसिद्ध अर्थ आहे. – 'दुष्टोऽप्यर्थः' आगीसारखी मुळात वाईट असलेली गोष्ट.

'स्वप्नो मतिभ्रमः इ०' चतुर्थ चरणाचा हल्ली उपलब्ध असलेला पाठ 'स्वप्ने मतिर्भ्रमति किं न्विदमिन्द्रजालम्' (४.१९) असा आहे. अभिनवगुप्ताचा पाठ 'स्वप्नो मतिभ्रम इदं नु किमिन्द्र जालम्' असा असावा. तो अधिक योग्य वाटतो.

**युक्तिरित्यन्ये इदमङ्गं व्यवहरन्ति । अत्रोद्देशक्रमत्यागेन यत्केषांचिदङ्गानां लक्षणं तत्क्रमानियमसूचनार्थम् । अनेन पाठविपर्यासेन यत्कैश्चिदुद्देशस्यान्यथापठनं तद्ग्रन्थकाराशयापरिज्ञानकृतम् । केचिदत्रान्यतममङ्गं नाधीयते, द्वादशाङ्गमेवैतं संधिमाहुः । अन्ये तु त्रयोदशाङ्गत्वेऽप्यस्य निर्वहणसंधावपि प्रशस्तेरितिवृत्तानन्तर्भूतत्वेन गणनमन्याय्यमिति त्रयोदशाङ्गत्वात् चतुःषष्टिसंख्यां समर्थयन्ते ।**

दुसरे टीकाकार ह्या अंगाला युक्ति असे नाव देतात. या ठिकाणी उद्देशातील क्रमाचा त्याग करून जे काही अंगांचे लक्षण दिले आहे ते क्रमाबद्दल कांही नियम नाही

हे सुचविण्यासाठी. यावरून हे उघड आहे की पाठात फेरबदल करून उद्देशविषयक श्लोक काहींनी निराळ्या रूपात स्वीकारले आहेत ते ग्रंथकाराचा आशय न समजल्यामुळे. काही टीकाकार कोणते तरी एक अंग वगळतात आणि ह्या अवमर्श संधीत बाराच अंगे आहेत असे प्रतिपादन करतात. परंतु दुसरे काही यात तेरा अंगे आहेत तरी निर्वहण संधीत सुद्धा शेवटच्या प्रशस्ति अंगाचा इतिवृत्तामध्ये अन्तर्भाव होत नसल्याकारणाने त्याची गणना करणे न्यायाला सोडून असल्यामुळे तेराच अंगे आहेत असे म्हणून चौसष्ट ह्या संख्येचे समर्थन करतात.

'इदमङ्गं' म्हणजे प्ररोचना ह्या अंगाला काही जण युक्ति असे नाव देतात. – 'उद्देशक्रमत्यागेन' प्रत्यक्षात असा क्रमाचा त्याग फक्त एके ठिकाणीच झालेला दिसून येतो. निर्वहणसंधीतील प्रसाद अंग उद्देशात आनन्द व समय यांच्या पूर्वी असता त्याचे लक्षण समयाच्या लक्षणानंतर दिले आहे. – 'सूचनार्थम्' ही मुळातील 'सूचनार्थः' ची दुरुस्ती आहे. – 'प्रशस्तेरितिवृत्तानन्तर्भूतत्वेन' ही दुरुस्ती आहे. मुळात 'प्रसक्तेरितिवृत्तान्तर्भूतत्वेन' आहे. 'प्रसक्ति' येथे अर्थहीन आहे. आणि संदर्भदृष्ट्या 'अनन्तर्भूत' आवश्यक आहे. चौसष्ट संख्येची ही उपपत्ती पटण्यासारखी आहे. अभिनवगुप्ताने प्रारंभी अवमर्शसंधीत बारा अंगे असतात असे म्हटले असले तरी प्रत्यक्षात त्याने तेरा अंगांच्या व्याख्या दिल्या आहेत. प्रस्तुत ठिकाणी अवमर्शात बारा अंगे असतात हे मत इतरांचे म्हणून उद्धृत केले आहे. तेव्हा चौसष्ट ह्या संख्येची अभिनवगुप्ताची स्वतःची काय उपपत्ती आहे ते स्पष्ट होत नाही.

ह्या श्लोकानंतर बडोदे प्रतीत पुढील अधिक मजकूर साध्या कंसात आढळतो –

**प्रत्यक्षवचनं यत्तु स व्याहार इति स्मृतः ॥**
**सविच्छेदं वचो यत्र सा युक्तिरिति संज्ञिता ।**
**ज्ञेया विचलना तज्ज्ञैरवमानार्थसंयुता ॥**
**एतान्यवमृशेऽङ्गानि संहारे तु निबोधत ।**

यात निर्दिष्ट असलेली तीन अंगे जमेस धरली तर अमवर्शसंधीत एकूण सोळा अंगे होतील. ते असंभाव्य आहे हे उघड आहे. यातील पहिल्या दोन अंगांचा निर्देश 'व्यवहारश्च युक्तिश्च विमर्शाङ्गान्यमूनि च' ह्या उद्देशातील ६१ व्या श्लोकात स्वीकारलेल्या बडोदे प्रतीतील पाठातही आहे. तो पाठही उघडच अस्वीकार्य आहे.

**[1]मुखबीजोपगमनं संधिरित्यभिधीयते ।**
**कार्यस्यान्वेषणं युक्त्या [2]निरोध इति कीर्तितः ॥ ९० ॥**

मुखसंधीतील बीजाची प्राप्ती म्हणजे संधि असे म्हणतात. युक्तीने कार्याचा शोध त्याला निरोध असे म्हणतात.

१ का सुख-. २ का विरोध, घो विबोध.

**अथ निर्वहणसंधावुद्देशक्रमेणाङ्गानि लक्षयितुं प्रक्रमते ।**

**मुखबीजोपगमनं संधिरिति । यथा वसुभूतिः – 'बाभ्रव्य, सुसदृशीयं राजपुत्र्या' इत्यादि । मुखे यदुक्तं तदिह निकटीभूतं संधानं संधिः ।**

**कार्यस्यान्वेषणं युक्त्या निरोध इति । यथा वसुभूतिः – 'कुत इयं कन्यका' इत्यादि ।**

आता निर्वहणसंधीतील अंगांची लक्षणे क्रमाने देण्यास प्रारंभ करतात.

'मुखबीजोपगमनं संधिः' इत्यादी. उदाहरणार्थ, वसुभूतीचे वचन - 'बाभ्रव्य, ही आपल्या राजकन्येसारखीच आहे' इत्यादी. मुखसंधीत जे निर्दिष्ट झालेले असते, ते या ठिकाणी जवळ आलेले असते; संधान होते म्हणून संधी हे नाव.

'कार्यस्यान्वेषणं युक्त्या निरोधः' इत्यादी. उदाहरणार्थ, वसुभूतीचे वचन - 'ही मुलगी कोठून आली आहे?' इत्यादी.

'संधान' म्हणजे एकत्र जोडले जाण्याची क्रिया.

**उपक्षेपस्तु कार्याणां ग्रथनं परिकीर्तितम् ।**
**अनुभूतार्थकथनं[1] निर्णयः समुदाहृतः ॥ ९१ ॥**

कार्यांच्या उपन्यासाला ग्रथन असे म्हणतात. अनुभवलेल्या गोष्टीच्या कथनाला निर्णय म्हणतात.

**उपक्षेपस्तु कार्याणां ग्रथनमिति ।**

**अनुभूतार्थकथनं निर्णय इति । प्रमाणसिद्धस्य वस्तुनः कथनमित्यर्थः ।**

उपक्षेपस्तु कार्याणां ग्रथनम्' इत्यादी.

'अनुभूतार्थकथनं निर्णयः' इत्यादी. प्रमाणांनी सिध्द झालेल्या वस्तूचे कथन असा अर्थ.

ह्या दोन्ही अंगांची उदाहरणे हस्तलिखितातून गहाळ झालेली दिसतात. अभिनवगुप्ताने ती दिलीच नसतील असा संभव नाही. उदाहरणांची उणीव संपादकांनी पाठ सुचवून भरून काढली आहे. ग्रथनाचे उदाहरण म्हणून त्यांनी पुढील भाग सुचविला आहे. यौगन्धरायणः 'देव, क्षम्यतां यन्मयाऽनिवेद्य कृतम्' इत्यादि। आणि त्यावर 'अत्र रत्नावलीलाभरूपकार्यस्योपक्षेपाद् ग्रथ-

१ का अनुभूतस्य कथनं.

नम्।' अशी टीप जोडली आहे. पण हे उदाहरण विशेष समर्पक वाटत नाही. दुसरी गोष्ट अशी की आतापावेतो आणि पुढेही उद्धृत केलेली रत्नावलीतील उदाहरणे नाटकात ज्या क्रमाने आढळतात त्याच क्रमाने ती दिलेली दिसून येतात. पण ह्या सुचविलेल्या उदाहरणाचा स्वीकार केल्यास ह्या क्रमाचा भंग होतो. क्रमवार असलेले उदाहरण पुढीलप्रमाणे सुचविता येण्यासारखे आहे. यथा, वासवदत्ता 'अमच्च, एसा क्खु साअरदो पाविदेत्ति भणिअ अमच्चजोअन्धराअणेण मम हत्थे णिक्खित्ता' इत्यादि। येथपासून कार्याच्या उपक्षेपात्मक ग्रथनाला प्रारंभ होतो असे म्हणता येईल.

निर्णयाचे उदाहरण कंसात दिलेले नसले तरी ते संपादकांनी सुचविलेले आहे यात शंका नाही. ते उदाहरण असे – वसुभूतिः 'अपि रत्नावली, ननु त्वमीदृशीमवस्थां प्राप्तासि।' सागरिका (सप्रत्यभिज्ञम्) 'तुमं पि किं अमच्चवसुभूदी।' वसु० 'स एवाहं मन्दभाग्यः' इति-प्रभृति यावद् विदूषकवाक्यं 'सविहवो होदु' इति। हे उदाहरण संभवनीय नाही याचे कारण यात अभिनवगुप्ताने म्हटल्याप्रमाणे प्रमाणांनी सिद्ध वस्तूचे कथन आहे असे म्हणता येण्यासारखे नाही. तसे कथन असलेले उदाहरण पुढीलप्रमाणे सुचविता येईल – वसुभूतिः 'बाभ्रव्य, यथा सुसदृशी वसन्तकस्य कण्ठे रत्नमाला, अस्या अपि सागरात्प्राप्तिः तथा व्यक्तं सिंहलेश्वरदुहिता रत्नावलीयम्।' निर्णयाचे हे अधिक समर्पक उदाहरण मानता येईल.

**परिवादकृतं यत्स्यात्तदाहुः परिभाषणम्।**
**लब्धस्यार्थस्य शमनं[1] द्युतिमाचक्षते[2] पुनः ॥ ९२ ॥**

निन्दायुक्त जे वचन त्याला परिभाषण म्हणतात. आणि प्राप्त झालेल्या गोष्टीचे जे स्थिरीकरण त्याला द्युति असे म्हणतात.

**परिवादकृतं यत् तत् परिभाषणमिति । यथा सागरिका 'किदापराधा खु अहं देवीए । ता ण सक्कुणोमि मुहं दंसेदुं।' वासवदत्ता अपवार्य 'अज्जउत्त, लज्जामि खु अहं इमिणा णिसंसत्तेण । ता अवणेहि से बंधणं।' एतदुभयोरप्यन्योन्यापराधोद्घट्टनं वचनम् । यौगन्धरायणोऽपि प्रविश्यैवमेवापराधं स्वमुद्घट्टयति यथा –**

**देव्या मद्वचनाद्यदाभ्युपगतः पत्युर्वियोगस्तदा**
**सा चाप्यन्यकलत्रसंघटनया दुःखं मया स्थापिता । इत्यादि ।**

**लब्धस्यार्थस्य शमनं द्युतिरिति । सामर्थ्यात् प्रशमनीयस्य क्रोधादेरर्थस्य प्राप्तस्यापि यत्प्रशमनं सा द्युतिः । 'देव, श्रूयताम् । इयं सिंहलेश्वरदुहिता सिद्धैरा-**

१ घो गमनं. २ नि धृति-; का द्युतिरित्यभिधीयते (घो कृति-).

दिष्टा' इत्यादि यावद्देव्या उक्तिः 'अय्य, फुडं एव्व किं ण भणासि पडिवादेहि से रअणावलिं त्ति ।'

'परिवादकृतं यत् तत् परिभाषणम्' इत्यादी. उदाहरणार्थ, सागरिका 'खरेच मी देवीचा अपराध केला आहे. म्हणून मी तिला तोंड दाखवू शकत नाही.' वासवदत्ता (राजास एकीकडे) 'आर्यपुत्र, ह्या माझ्या निर्घृणतेची मला खरोखर लाज वाटते. म्हणून तुम्हीच तिचे बंधन सोडा.' दोघींचे परस्परांच्या बाबतीत स्वतःचा अपराध उघड करणारे असे हे वचन आहे. यौगन्धरायण सुद्धा प्रवेश करून याचप्रमाणे आपला अपराध उघड करतो – 'जेव्हा देवीने माझ्या सांगण्यावरून पतीपासून होणाऱ्या वियोगाचा अंगीकार केला तेव्हा त्याच्यासाठी दुसऱ्या पत्नीची योजना करून मी तिला दुःखदायक अवस्थेत ठेवले' इत्यादी.

'लब्धस्यार्थस्य शमनं द्युतिः' इत्यादी. शब्दसामर्थ्यामुळे शमन ज्याचे करावयाचे असते त्या क्रोध आदी गोष्टीचे ती प्राप्त झाली असताही जे प्रशमन ती द्युति. उदाहरणार्थ, यौगन्धरायण 'महाराज, ऐकावे. सिंहलेश्वराच्या ह्या कन्येबद्दल सिद्धांनी भविष्य केले होते' येथपासून ते देवीच्या 'आर्य, स्पष्टच का सांगत नाही की रत्नावली ह्यांना अर्पण कर ह्या उक्तीपर्यंत.

'परिवादकृतं इ०' हस्तलिखितातून ही अवतरणिका सुद्धा गहाळ झाली आहे. – 'अपराधं स्वम्' हस्तलिखितात 'स्वम्'च्या जागी 'स्वयम्' आहे. पण 'स्वम्' अधिक योग्य आहे. मुद्रितात हा शब्दच नाही. – श्लोकाचा उत्तरार्ध पुढीलप्रमाणे आहे –

तस्याः प्रीतिमयं करिष्यति जगत्स्वामित्वलाभः प्रभोः ।
सत्यं दर्शयितुं तथापि वदनं शक्नोमि नो लज्जया ॥ (४.२०).

'सामर्थ्यात्' म्हणजे 'शमन' शब्द वापरला आहे म्हणून अर्थ 'प्रशमनीय' असाच समजणे उचित आहे.

समागमस्तथार्थानामानन्दः[1] परिकीर्तितः ।
दुःखस्यापगमो[2] यस्तु समयः[3] स निगद्यते ॥ ९२ ॥

इच्छित कार्यांचा लाभ म्हणजे आनन्द असे म्हणतात. दुःख नाहीसे होते त्याला समय असे म्हणतात.

१ नि. -स्तु योऽर्थाना-. २ नि -गमश्चैव समयोऽथ. ३ का स शमः संनिगद्यते.

**समागमस्तथार्थानामानन्द इति । अर्थितस्य तथेति प्रकारशतैः प्रार्थितस्य सम्यगपुनर्वियोगवद्यदागमनं तदानन्दहेतुत्वादानन्दः । यथा राजा – 'को देव्याः प्रसादं न बहु मन्यते' इत्यादि ।**

**दुःखस्यापगमो यस्तु समय इति । अपगमनमपगमः । यथा 'अय्यउत्त, दूरे खु एदाए णादिउलं । ता तहा अणुचिट्ठ जहा बन्धुजणं ण सुमरेदि ।'**

'समागमस्तथार्थानामानन्दः' इत्यादी. इच्छित असलेल्या, तथा म्हणजे शेकडो प्रकारांनी, अभिलषित असलेल्या वस्तूचे जे सम्यक् म्हणजे पुन्हा वियोग होणार नाही अशा तऱ्हेचे आगमन ते आनन्दाचे कारण असल्यामुळे आनन्द नावाचे अंग. उदाहरणार्थ, राजा 'देवीच्या प्रसादाबद्दल कोणाला बहुमान वाटणार नाही ?' इत्यादी.

'दुःखस्यापगमो यस्तु समयः' इत्यादी. अपगम म्हणजे दूर होणे. उदाहरणार्थ, वासवदत्ता 'आर्यपुत्र, हिचे नातेवाईक फार दूर आहेत. तेव्हा असे वागा की तिला आपल्या बन्धुजनाची आठवण होणार नाही' इत्यादी.

'प्रकारशतैः' हा श्लोकातील 'तथा' शब्दाचा अर्थ. आणि 'सम्यग् आगमन' ही 'समागम' शब्दाची फोड असून 'सम्यक्' चा अर्थ 'अपुनर्वियोगवत्' असा दिला आहे.

**शुश्रूषाद्युपसंपन्नः प्रसादः[1] प्रीतिरुच्यते ।**
**अद्भुतस्य तु[2] संप्राप्तिरु[3]पगूहनमिष्यते ॥ ९४ ॥**

शुश्रूषा आदींनी युक्त अशा प्रीतीला प्रसाद म्हणतात. आणि अद्भुताची प्राप्ती म्हणजे उपगूहन असे म्हणतात.

**शुश्रूषाद्युपसंपन्नः प्रसाद इति । यथा वासवदत्ता – 'एत्तिअं वि दाव मम बहिणिआए अणुरूवं होदु' इति स्वैराभरणैरलंकरोति । इति । केचिद् द्युतेरनन्तरमिदमङ्गं पठन्ति ।**

**अद्भुतस्य तु संप्राप्तिरुपगूहनमिति । यथा विदूषकः – 'ही ही भो कहं कहं संपुण्णमणोरहा संवुत्त म्ह' इत्युत्थाय नृत्यति ।**

'शुश्रषाद्युपसंपन्नः प्रसादः' इत्यादी. उदाहरणार्थ, वासवदत्ता 'हे इतके माझ्या बहिणीला अनुरूप असे होऊ दे' असे म्हणून स्वतःचे अलंकार तिला घालते. काही टीकाकार हे अंग 'द्युति' नंतर घालतात.

१ का प्रसाद इत्ति भण्यते. २ नि च. ३ नि -र्भवेत्तदुपगूहनम्.

'अद्भुतस्य तु संप्राप्तिरुपगूहनम्' इत्यादी. उदाहरणार्थ, विदूषक 'अहा! आता आमचे मनोरथ पूर्ण झाले आहेत' असे म्हणून उभा राहून नाचू लागतो.

'केचित् इ०' वर उद्देशश्लोकात द्युतिनंतरच प्रसादाचा निर्देश आहे. त्या श्लोकातील अभिनवगुप्ताचा स्वतःचा भिन्न पाठ कसा होता हे समजण्यास मार्ग नाही.

**सामदानादिसंपन्नं भाषणं समुदाहृतम्[1] ।**
**पूर्ववाक्यं तु विज्ञेयं यथोक्तार्थप्रदर्शनम्[2] ॥ ९५ ॥**

साम, दान आदींनी संपन्न वाक्याला भाषण असे म्हणतात. जसे म्हटले होते तसे कार्याचे दर्शन म्हणजे पूर्ववाक्य असे जाणावे.

**सामदानादिसंपन्नं भाषणमिति । यद्यपि गर्भेऽपि संग्रहाख्यमिदमुक्तं तथाप्यत्र स्थानेऽवश्यं प्रयोक्तव्यतां ख्यापयितुं पुनरुपादानं शब्दान्तरेण च । यथा वसुभूतिः – 'देवि, स्थाने देवीशब्दमुद्वहसि' इति साम । दानं तु यथा भगवती जीमूतवाहनाय वरं ददाति – 'त्वां विद्याधरचक्रवर्तिनमहं प्रीत्या करोमि क्षणात' इति । अन्ये मन्यन्ते आदिशब्देन भेददण्डादेरुपायान्तरस्य संग्राह्यत्वम् । तस्य त्विह स्थाने स्पष्टेन पथानौचित्यम् । गर्भसंध्युक्तसामाद्युपायानुवदनमात्रमत्र यत्क्रियते इत्थमिदं प्राप्तमित्येवंप्रायं तदिदं भाषणाख्यमङ्गमिति ।**

**पूर्ववाक्यं यथोक्तार्थप्रकाशनमिति । यथा बाभ्रव्यः – 'इदानीं सफलपरिश्रमोऽस्मि संपन्नः' इति ।**

'सामदानादिसंपन्नं भाषणम्' इत्यादी. जरी गर्भसंधीमध्ये संग्रह नावाने ह्याचाच निर्देश केला आहे तरीही ह्या ठिकाणी त्याचा अवश्य प्रयोग करावयाचा असतो हे सांगण्यासाठी पुन्हा एकदा आणि निराळ्या शब्दांत त्याचा निर्देश केला आहे. उदाहरणार्थ, वसुभूति 'देवि, तुला देवी असे म्हणतात ते सार्थच आहे.' हे सामाचे उदाहरण. दानाचे उदाहरण नागानन्द नाटकात गौरी जीमूतवाहनाला वर देते 'प्रसन्न होऊन मी तुला या क्षणी विद्याधरांचा चक्रवर्ती करते.' दुसरे टीकाकार 'आदि' शब्दाने भेद, दण्ड आदी अन्य उपायांचा सुद्धा समावेश होतो असे मानतात. परंतु ह्या ठिकाणी ते उघडपणेच अनुचित आहेत. गर्भसंधीमध्ये सांगितलेल्या साम आदी उपायांचा जो येथे केवळ अनुवाद केला आहे – हे अशा प्रकारे प्राप्त झाले आहे अशाच स्वरूपाचा मुख्यतः – ते हे भाषण नावाचे अंग.

१ **का** तूच्यते बुधैः. २ **नि** यथार्थोक्तार्थदर्शनम्, **का** यथोक्तार्थप्रदर्शकम्.

'पूर्ववाक्यं यथोक्तार्थप्रकाशनम्' इत्यादी. उदाहरणार्थ, बाभ्रव्य 'आता माझ्या परिश्रमाचे सार्थक झाले.'

'गर्भेऽपि' ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'गर्भोप-' असे याचे भ्रष्ट रूप आहे. मुद्रितातील 'तदार्थेऽपि' ला काहीच अर्थ नाही. वर ७९ व्या श्लोकात गर्भसंधीतील संग्रहाची व्याख्या अशाच प्रकारे केली आहे. – 'शब्दान्तरेण' वस्तुतः दोन्ही ठिकाणी शब्द तेच आहेत. – 'त्वां विद्याधर- इ०' संपूर्ण श्लोक असा –

**हंसांसाहतहैमपङ्कजरजःसंपर्कपङ्कोक्षितै-**
**रुत्पन्नैर्मम मानसादुपनतैस्तोयैर्महापावनैः ।**
**स्वेच्छानिर्मितरत्नकुम्भनिहितैरेषाभिषिच्य स्वयं**
**त्वां विद्याधरचक्रवर्तिनमहं प्रीत्या करोमि क्षणात् ॥ (नागानन्द, ५.३९).**

– 'त्वेह' ही हस्तलिखितातील 'वेग' ची दुरुस्ती आहे. संपादकांनी सुचविलेली 'चेह' अशी दुरुस्ती समर्पक नाही. ह्या वाक्यात 'अन्ये'च्या मताचे खंडन आहे. म्हणूनच मुद्रितातील 'अनौचित्यात्' हा पाठही बरोबर नाही. – 'इत्थमिदं प्राप्तमित्येवंप्रायम्' हे अनुवदनाच्या वर्णनपर आहे. पण याचा अर्थ स्पष्ट नाही.

**वरप्रदान[1]संप्राप्तिः काव्यसंहार इष्यते ।**
**नृपदेश[2]प्रशान्तिश्च प्रशस्तिरभिधीयते ॥ ९६ ॥**

वराचे प्रदान व त्याची प्राप्ती म्हणजे काव्यसंहार होय. राजा व देश यांना शान्ति प्राप्त व्हावी अशा प्रार्थनेला प्रशस्ति म्हणतात.

**वरप्रदानसंप्राप्तिः काव्यसंहार इति । यथा यौगन्धरायणः – 'देव, तदुच्यतां किं ते भूयः प्रियमुपहरामि' इत्यादि यावद् 'यातो विक्रमबाहुरात्मसमताम्' इत्यादि ।**

**नृपदेशप्रशान्तिश्च प्रशस्तिरिति ।**

**उर्वीमुद्दामसस्यां जनयतु विसृजन् वासवो वृष्टिमिष्टा-**
**मिष्टैस्त्रैविष्टपानां विदधतु विधिवत्प्रीणनं विप्रमुख्याः ।**
**आकल्पान्तं च कुर्यात् क्रमसमुपचितं संगमं सज्जनानां**
**निर्विश्लेषावकाशं पिशुनजनवचोवर्जनाद्वज्रलेपः ॥ (४.२२) इति ।**

१ का -प्रदानं. २ नि -देवप्रशस्तिश्च, का -देवप्रशान्तिश्च.

'वरप्रदानसंप्राप्तिः काव्यसंहारः' इत्यादी. उदाहरणार्थ, 'महाराज, आणखी कोणती आपल्याला प्रिय असलेली गोष्ट मी करावी ?' या यौगन्धरायणाच्या उक्तीपासून ते 'विक्रम-बाहु आमच्यासारखा झाला आहे' या राजाच्या उक्तीपर्यंत.

'नृपदेशप्रशान्तिश्च प्रशस्तिः' इत्यादी. उदाहरणार्थ, 'इष्ट अशी वृष्टी पाडून इन्द्र पृथ्वीला उदंड धान्याने समृद्ध करो. श्रेष्ठ ब्राह्मण विधीप्रमाणे केलेल्या यागांनी देवांना संतुष्ट करोत. आणि क्रमाने वृद्धिंगत झालेली सज्जनांची मैत्री दुष्ट लोकांच्या शब्दांचा परिहार केल्यामुळे ताटातुटीला अवकाश नसलेली अशी वज्रलेप कल्पान्तापर्यंत टिकून ठेवो.

'यातो इ०' संपूर्ण श्लोक पुढीलप्रमाणे –

**यातो विक्रमबाहुरात्मसमतां प्राप्तेयमुर्वीतले**
**सारं सागरिका ससागरमहीप्राप्त्येकहेतुः प्रिया ।**
**देवी प्रीतिमुपागता च भगिनीलाभाज्जिताः कोसलाः**
**किं नास्ति त्वयि सत्यमात्यवृषभे यस्मै करोमि स्पृहाम् ॥** (४.२१).

'च कुर्यात्' ही मुळातील 'क्रियायाः' च्या जागी सुचविलेली दुरुस्ती आहे. 'क्रियायाः' चा वाक्यात अन्वय लागण्यासारखा नाही. आणि उत्तरार्धात क्रियापदाची अपेक्षा आहे. उत्तरार्धाचा प्रचलित पाठ असा –

**आकल्पान्तं च भूयात्समुपचितसुखः संगमः सज्जनानां**
**निःशेषं यान्तु शान्तिं पिशुनजनगिरो दुर्जया वज्रलेपाः ॥**

अभिनवगुप्तांचा पाठ बराच निराळा आहे. त्यात वज्रलेपः हे कर्तृपद ठरते. तो पाठ विशेष सयुक्तिक वाटत नाही.

संपादक श्री कवी यांनी प्रारंभापासून सर्व संध्यङ्गांना क्रमांक दिले आहेत. शेवटी काव्य-संहाराला क्रमप्राप्त ६४ अंक दिल्यानंतर प्रशस्तिला सुद्धा ६४ हाच क्रमांक दिला आहे व अशा रीतीने ६४ ही संख्या प्रस्थापित केली आहे.

**[1]यथासंधि तु कर्तव्यान्येतान्यङ्गानि नाटके ।**
**कविभिः [2]काव्यकुशलै रस[3]भावमपेक्ष्य तु ॥ ९७ ॥**

काव्य रचण्यात कुशल असलेल्या कवींनी रस आणि भाव यांच्या अनुरोधाने नाटकात ह्या अंगांची योजना ज्या त्या संधीत करावी.

१ का इत्येतानि यथासंधि कार्याण्यङ्गानि रूपके. २ का कार्य-. ३ नि भावानवेक्ष्य.

यथासंधि त्विति । यो यस्मिन् संधौ योग्य इत्यर्थः । योग्यतां च कविरेव जानाति । न च मुक्तककविः किन्तु प्रबन्धयोजनासमर्थः । तदाह कविभिरित्यादि । ननु कवेः कीदृशं तत्प्रबन्धनिर्माणकौशलमित्याह रसभावमपेक्ष्येति । तदपेक्षा च कौशलमित्यर्थः । रस एव हि प्रीत्या व्युत्पत्तिप्रदं नाट्यात्मकं शास्त्रमित्युक्तम् । ततश्च यथा यद्यस्योपयोगि तदरोचकं रुचितदधिशर्करापयःप्रभृतिरसान्तरमध्ययोजितं तद्द्वारेणान्तःप्रविष्टं सत् पुष्टिं व्याधिनिवृत्तिं च विधत्ते तथैव पुमर्थोपायो हृदयमनुप्रवेष्टुमसमर्थः सुन्दरतरोचितरससंक्रमणया प्राप्तान्तःप्रवेशः विनेयजनस्य संपाद्ये वस्तुनि कल्पपादपकल्पनायै कल्पते । रससंक्रान्तिश्च विभावादिरूपतयैव नान्यथेत्युक्तं षष्ठे । एतान्यङ्गानि लिखितानि विवक्षितरसविभावादिसंपूरणभाञ्जि भवन्ति तद्यौगपद्येन । ते तु रसावहितमनसो यत्नान्तरनिरपेक्षतयैवाहमहमिकया समुचितभावेन बन्धशय्यामनुवर्तन्ते । इतिवृत्ताविच्छेदोऽपि हि रसस्यैव पोषकः । अन्यथा विच्छेदे स्थाय्योदेरेव त्रुटितत्वात् क्व रसवार्ता । तेन रसस्यैवायं विभावादिपरिकरो यदङ्गचक्रमिति । तथाहि लाक्षागृहानलेत्युपक्षेपो वीररौद्रयोर्विभावांशपूरकः । प्रवृद्धं यद्वैरमिति क्रोधस्य वीरे व्यभिचारिणो रौद्रे स्थायिनः स्वरूपप्रत्युज्जीवकः परिकरः । चञ्चद्भुज इति च परिन्यासो अनुभावांशं पुष्णाति । अणुगेह्णन्तु एदं वअणं देवदाओ इति विलोभनं मनोनिर्वृत्यौत्सुक्यहर्षमतिस्मृतिप्रभृतिव्यभिचारिभावसंधानधुर्यम् । एवमन्यदपि योज्यम् ।

'यथासंधि तु' इत्यादी. जे ज्या संधीत योग्य असेल त्याप्रमाणे असा अर्थ. आणि कवीच योग्य काय ते जाणतो. फुटकळ श्लोक रचणारा कवी नाही, तर प्रबन्धाची रचना करण्यास समर्थ असलेला. हे 'कविभिः' इत्यादी शब्दांत सांगतात. कवीचे प्रबन्ध निर्माण करण्याचे कौशल्य कशा प्रकारचे या प्रश्नाचे उत्तर 'रसभावमपेक्ष्य' ह्या शब्दांत देतात. रस आणि भाव यांची अपेक्षा म्हणजेच कौशल्य असा अर्थ. कारण, रस म्हणजेच आवड उत्पन्न करून बोध देणारे नाटयस्वरूपाचे शास्त्र असे मागे सांगितले आहे. आणि म्हणून ज्याप्रमाणे जे ज्याला उपयोगी परंतु त्याला न आवडणारे औषध रुचकर अशा दही, साखर, दूध वगैरे इतर रसांच्या मध्ये योजना करून तद्द्वारा आत गेले असता पुष्टी आणि व्याधीचा नाश उत्पन्न करते त्याप्रमाणेच पुरुषार्थाचा उपाय हृदयाच्या आत शिरण्यास असमर्थ असता अधिक सुदंर अशा योग्य रसात संक्रमण करण्याने आत प्रवेश प्राप्त करून बोधास योग्य अशा मनुष्यांना संपादन करावयाच्या वस्तूच्या संबंधात कल्पवृक्षाप्रमाणे उपयुक्त होतो. आणि रसामध्ये संक्रान्ती विभाव आदींच्या रूपाच्या द्वाराच होते, इतर प्रकारे नाही हे सहाव्या अध्यायात सांगितले आहे. ही अंगे लिहिली असता विवक्षित असलेल्या

रसाच्या विभाव आदींची परिपूर्ति करणारी होतात ती त्यांच्या समवेतच. परंतु ते कवीचे मन रसावर केंद्रित झाले म्हणजे इतर कोणत्याही प्रयत्नाशिवाय अहमहमिकेने योग्य त्या रीतीने ती अंगे काव्यबंधाच्या चौकटीत अवतीर्ण होतात. कारण, कथानकाचा विच्छेद न होणे ही सुद्धा रसाचाच परिपोष करणारी गोष्ट आहे. नाही तर विच्छेद झाल्यास स्थायिभाव आदी खंडित झाल्यामुळे रसाची कोठून गोष्ट ? म्हणून हा जो अंगांचा समूह आहे तो रसाच्याच विभावादींचा परिवार आहे. उदाहरणार्थ, वेणीसंहारात 'लाक्षागृहानल' इत्यादी वचनातील उपक्षेप अंग वीर आणि रौद्र ह्या रसांच्या विभावांच्या अंशाचे पूरक आहे. 'प्रवृद्धं यद्वैरम्' इत्यादीतील परिकर अंग वीररसात व्यभिचारिभाव असलेल्या व रौद्ररसात स्थायिभाव असलेल्या क्रोधाच्या स्वरूपाचे प्रत्युज्जीवन करते. आणि 'चञ्चद्भुज' इत्यादीतील परिन्यास अनुभावांच्या अंशाचा परिपोष करतो. 'अणुगेह्णन्तु एदं वअणं देवदाओ' यातील विलोभन अंग मनात सुख झाल्याकारणाने औत्सुक्य, हर्ष, मति, स्मृति इत्यादी व्यभिचारिभावांना एकत्रित करण्यास अत्यंत समर्थ आहे. याचप्रमाणे इतर अंगांचीही योजना करावी.

'यो···योग्यः' अङ्गाचा निर्देश असल्यामुळे 'यत् योग्यम्' अशी नपुंसकलिंगी रूपे अपेक्षित आहेत. – 'यथा यद्यस्योपयोगि तदरोचकं' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. मुळात 'यथा' च्या अगोदर आणखी एक 'यद्' आहे. ते अनावश्यक आहे. तसेच मुळात 'अनुपयोगि' आहे. ते अभिप्रेत अर्थाच्या उलट अर्थाचे आहे. आणि हस्तलिखितात 'तदरोचिततो' आणि मुद्रितात 'तदरोचकिनो' असे पाठ आहेत. 'तदरोचकं' हे अध्याहृत 'औषधम्' चे विशेषण म्हणून संभाव्य आहे. यातील 'तत्' म्हणजे ज्याला औषध द्यावयाचे तो मनुष्य. – 'सुन्दरतरोचित-' मुद्रित पाठ 'सुन्दरतदुचित-' आहे. – 'षष्ठे' रसाध्यायात 'विभावानुभावव्यभिचारिसंयोगाद्रसनिष्पत्तिः' हे प्रसिद्ध सूत्र आहे. – '-विभावादिसंपूरण-' मुद्रित पाठ '-भावादिसंपूर्ण-' असा आहे. परंतु पुढे केलेल्या विवरणावरून हे स्पष्ट आहे की अंगे ही विभाव, अनुभाव आणि व्यभिचारिभाव यांची पूर्ति करणारी आहेत. – 'तद्यौगपद्येन' ही सुद्धा सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात तद्यौ··· द्यानि' असा त्रुटित पाठ आहे. मुद्रितात केवळ 'यानि' आहे. तो समर्पक नाही. यातील 'तत्' म्हणजे 'विभावादि'. – 'ते तु' मुद्रितात 'ते' नाही. 'ते' ने विभाव आदी भावांचा बोध होतो. – 'रसावहितमनसः' मुद्रित पाठ 'एकरसा–' आहे. पण नाटकात अनेक रस असू शकतात. हा शब्द 'कवेः' चे विशेषण मानणे योग्य वाटते. प्रथमा बहुवचनात त्याचा 'ते' शी अन्वय लावणे शक्य आहे. पण विभाव आदींच्या संबंधात 'मनस्' शब्द वापरला असण्याची शक्यता कमी. – 'स्थाय्यादेरेव' मुद्रितात 'एव' नाही. – 'स्वरूपप्रत्युज्जीवकः' मुद्रितात 'स्वरूपं' असा स्वतंत्र शब्द आहे. पण ते बरोबर नाही. – 'मनोनिर्वृत्या' ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'मनोनिवृत्त्या' आणि मुद्रितात 'अतो निवृत्त्या' आहे. निवृत्तीचा निर्देश असंभाव्य आहे. – '-व्यभिचारिभावसंधानधुर्यम्' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. मुळात '-व्यभिचारि। स चायं संधानधुर्यम्' (र्यः – मुद्रित) असा पाठ आहे. तो अर्थहीन आहे. 'स चायं' ने कोणाचा बोध होतो हे मुळीच सांगता येण्यासारखे नाही.

**संमिश्राणि[1] कदाचित्तु द्वित्रियोगेन वा पुनः ।**
**ज्ञात्वा कार्यमवस्थां च कार्याण्यङ्गानि[2] संधिषु ॥ ९८ ॥**

परंतु, कार्य व अवस्था लक्षात घेऊन ही अंगे संधींमध्ये कधी कधी मिश्ररूपाने अथवा दोनदा, तीनदा अशीही योजावीत.

ननु संधिपरतन्त्रैरङ्गैर्भवितव्यम्, तद्रसपारतन्त्र्यमेषां कुतस्त्यम् । उच्यते । संधयो हि अवस्थापरतन्त्राः । प्रारम्भाभिधानदशाविशेषोपयोगि कथाखण्डलकं मुखसंधिरित्युक्तम्, एवमन्यत्र । अवस्था अप्यन्यकृतिविशेषमनूच्यते । नन्वतः किम् । इदमतो भवतीत्याह रसभावापेक्षया तु कार्यं स्थितं तदपेक्षया च अवस्थानं ज्ञात्वेति । कार्यमपि रसप्रवाहजननपर्यन्तत्वेन कृतार्थं संपद्यत इति यावत् । संमिश्राणीति संध्यन्तरोक्तं संध्यन्तरेऽपीत्यर्थः । यथा युक्तिर्मुखेऽप्युक्ता गर्भेऽप्युपनिबद्धा वितर्कव्यभिचार्यंशपोषकभावेन वेणीसंहारे यथोदाहृतं प्राक् 'तेजस्वी रिपुहतबन्धुदुःखभारम्' इत्यादि । द्वित्रीति द्वित्वत्रित्वयोगेनेत्यर्थः । तेनैकमपि संध्यङ्गं तत्रैव संधौ द्विस्त्रिर्वा कर्तव्यम् । यथा रत्नावल्यां प्रतिमुखे विलासः सागरिकायां राज्ञि वासकृदुपनिबद्धः प्रधानं शृङ्गाररसमुद्दीपयति । वेणीसंहारे संफेटविद्रवौ पुनः प्रदर्शितौ वीररौद्रोद्दीपनौ भवतः । अतिशयेन तु पौनःपुन्ये वैरस्यं स्यादिति द्वित्रिग्रहणम् । तथा द्वयोर्योगः द्वाभ्यामङ्गाभ्यां संपाद्यम्, तदेकेनैव चेद्घटते तत्किमपरेण । एवं त्रियोगः । द्वियोगो यथा प्रतिमानिरुद्धे भीमसूनोर्वसुनागस्य कृतौ उपक्षेपानन्तरमेव परिकरकार्ये तेनैव कृते परिन्यासदर्शनम् । त्रियोगो यथा भेज्जलविरचिते राधाविप्रलम्भरासकाङ्के उपक्षेपेणैव हि विअविस्सा इत्यादि परिकरपरिन्यासकार्ये गुरुभूते पालिते एकोद्देशेन विलोभननिरूपणम् । एवं चतुरङ्गो यावत्संधिर्भवतीति ।

अंगे संधींवर अवलंबून असावयास पाहिजेत, मग त्यांचे हे रसांवर अवलंबून असणे कोठून आले? सांगतो. कारण, संधी हे अवस्थांवर अवलंबून असतात. प्रारंभ नावाच्या विशिष्ट दशेला उपयोगी असा कथेचा खंड म्हणजे मुखसंधि असे म्हटले आहे. तसेच इतरत्रही. अवस्था सुद्धा दुसऱ्या विशिष्ट क्रियांच्या अनुरोधाने निश्चित होते. पण ह्यामुळे काय होते? ह्यामुळे पुढील गोष्ट होते हे 'रस आणि भाव यांच्या अनुरोधाने निश्चित झालेले कार्य आणि त्याच्या अनुरोधाने ठरलेली अवस्था ह्या गोष्टी विचारात घेऊन' या शब्दांत सांगतात. कार्याचा सुद्धा रसप्रवाह उत्पन्न करण्यात शेवट होण्याने ते कृतकृत्य

१ नि सर्वाङ्गाणि. २ नि योज्यान्यङ्गानि.

होते असा भावार्थ. संमिश्र म्हणजे एका संधीत निर्दिष्ट केले असता दुसऱ्या संधीत सुद्धा असा अर्थ. उदाहरणार्थ, युक्ति मुखसंधीत सांगितली असली तरी गर्भसंधीत सुद्धा वितर्क ह्या व्यभिचारिभावाच्या अंशाचा परिपोष करणारी म्हणून वेणीसंहारात योजिली आहे, त्याचे उदाहरण 'तेजस्वी पुरुष शत्रूने ठार मारलेल्या नातलगामुळे होणारा दुःखभार' इत्यादी पूर्वी दिले आहे. द्वि आणि त्रि म्हणजे द्वित्व आणि त्रित्व यांच्या योगाने. म्हणून एकच संध्यङ्ग त्याच संधीमध्ये दोनदा किंवा तीनदा योजावे. उदाहरणार्थ, रत्नावलीमध्ये प्रतिमुखसंधीत विलास हे अंग सागरिकेच्या संबंधात किंवा राजाच्या संबंधात अनेकवार योजिले असून ते मुख्य जो शृङ्गाररस त्याचे उद्दीपन करते. वेणीसंहारात संफेट आणि विद्रव ही दोन अंगे पुन्हा योजिली असून ती वीर आणि रौद्र रसांचे उद्दीपन करतात. तथापि पुन्हा पुन्हा पुष्कळदा योजिली तर विरसता उत्पन्न होईल म्हणून दोनदा तीनदा असे म्हटले आहे. त्याचप्रमाणे दोघांचा योग म्हणजे दोन अंगांनी साध्य करावयाचे कार्य, ते जर एकाच अंगाने घडून येत असेल तर दुसऱ्याची काय आवश्यकता ? याचप्रमाणे तिघांचा योग. अशा प्रकारच्या द्वियोगाचे उदाहरण भीमसूनु वसुनागाच्या प्रतिमानिरुद्ध ह्या कृतीत उपक्षेपाच्या नंतरच त्यानेच परिकराचे कार्य सिद्ध केले असल्यामुळे परिन्यासाचे होणारे दर्शन. त्रियोगाचे उदाहरण भेज्जलाने रचिलेल्या राधाविप्रलम्भ रासकाच्या अंकात 'विअविस्सा' इत्यादी उपक्षेपानेच परिकर आणि परिन्यास ह्यांची मोठी झालेली कार्ये पाळली गेली आहेत म्हणून एकाच निर्देशानंतर विलोभनाची योजना केली आहे. याप्रमाणे संधि चार अंगे असलेला सुद्धा होऊ शकतो.

'अन्यकृतिविशेषम्' काही कृती अथवा क्रिया प्रारम्भावस्थेच्या द्योतक असतात, तर काही नंतरच्या भिन्न अवस्थांच्या द्योतक. म्हणून कोणती अवस्था आहे हे क्रियांच्या स्वरूपावरून ठरते. – 'तदपेक्षया च' ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'तचापेक्षया' आणि मुद्रितात 'तस्यापेक्षया' आहे. श्लोकाला अनुसरून 'च' आवश्यक आहे. यापुढील शब्द 'अवस्थानं' असा आहे. श्लोकातील 'अवस्थां' ची ही व्याख्या आहे असे समजता येते. तथापि टीकेतही 'अवस्थां' असाच मूळ पाठ असण्याचा संभव आहे. – 'कृतार्थे' हस्तलिखितात 'कृतार्थः' आणि मुद्रितात 'कृतार्थता' आहे. दोन्हीही मूळ पाठ असण्याचा संभव कमी. – 'उदाहृतं प्राक्' वर ६४ व्या श्लोकावरील टीकेत हे उदाहरण दिले आहे. – 'तथा द्रयोर्योगः' येथे 'द्वित्रियोगेन' चा दुसरा अर्थ दिला आहे. पहिला अर्थ एकाच अंगाची दोन किंवा तीन वेळा पुनरावृत्ती असा होता. हा दुसरा अर्थ दोन किंवा तीन अंगे मिळून एकच झालेल्या अशा अंगाची योजना असा आहे. – 'भीमसूनोः इ०' हस्तलिखितात या ठिकाणी बराच गोंधळ झालेला आहे. काही अंशाची पुनरुक्ती झाली असून अनेक पाठ भ्रष्ट आहेत. – 'कृतौ' ही 'कृते' ची दुरुस्ती. 'कृते' ठेवावयाचे असेल तर 'भीमसूनुना वसुनागेन' अशी दुरुस्ती करावी लागेल. – 'उपक्षेपानन्तरमेव' मुद्रितात 'एव' च्या जागी 'एवं' असा पाठ असून त्यापुढील शब्द 'न परिकरः, आद्येनैव कृते' अशा स्वरूपात आहेत. पण मध्येच 'न परिकरः' असे शब्द असण्याचा संभव नाही. येथील म्हणण्याचा आशय असा की

उपक्षेपवाक्यातच परिकर हे दुसरे अंग सुद्धा अंतर्भूत आहे, म्हणून हा द्वियोग. उपक्षेपानंतर एकदम तिसऱ्या परिन्यास अंगाची योजना केली आहे. – 'विअविस्सा' किंवा मुद्रितातील 'लिअलीस्सा' ह्या प्राकृत वचनाचा अर्थ करता येण्यासारखा नाही. रासकाचे नाव मुद्रितात राधाविप्रलम्भ आहे तेच बरोबर आहे. हस्तलिखितात राधाप्रलम्ब असे रूप आहे. – '-कार्ये' हे नपुंसकलिंगी प्रथमेचे द्विवचन समजावे. 'गुरुभूते' हे त्याचे विशेषण आणि 'पालिते' हे विधेय. 'गुरुभूते' हा शब्द वापरण्याचे प्रयोजन स्पष्ट नाही. – 'एकोद्देशेन' म्हणजे उपक्षेप ह्या एकाच अंगाच्या योजनेने. – 'चतुरङ्गो यावत्' तीनतीन अंगांच्या जागी एकच अंग योजावयाचे असे ठरविल्यास बारांच्या जागी चारच पुरे होतील. म्हणजे एका संधीत फक्त चार अंगे असू शकतात. चार ही सर्वात कमी अशी संभाव्य संख्या. 'यात्' हा मुद्रणदोष आहे.

**एतेषामेव चाङ्गानां संबद्धान्यर्थयुक्तितः ।**
**संध्यन्तराणि संधीनां विशेषास्त्वेकविंशतिः ॥ ९९ ॥**
**साम भेदस्तथा दण्डः प्रदानं वध एव च ।**
**प्रत्युत्पन्नमतित्वं च गोत्रस्खलितमेव च ॥ १०० ॥**
**साहसं च भयं चैव ह्रीर्माया क्रोध एव च ।**
**ओजः संवरणं भ्रान्तिस्तथा हेत्ववधारणम् ।**
**दूतो लेखस्तथा स्वप्नश्चित्रं मद इति स्मृतम् ॥ १०१ ॥**

आणि ह्याच अंगांशी अर्थाला अनुरूप रीतीने संबद्ध अशी संधींची संध्यंतरे होत; त्यांचे एकवीस प्रकार होत. साम, भेद, दंड, दान, वध, प्रत्युत्पन्नमतित्व, गोत्रस्खलन, साहस, भय, लज्जा, माया, क्रोध, ओज, संवरण, भ्रान्ति, हेतूचे ज्ञान, दूत, लेख, स्वप्न, चित्र, आणि मद ही संध्यंतरे मानली आहेत.

**अथ संध्यन्तराणि दर्शयितुमाह एतेषामेव चाङ्गानामित्यादि । तत्र केचिदाहुः । अन्तरं छिद्रम्, संधिरिति तदङ्गमात्रम्, तात्स्थ्याच्च तत्स्थानीयम् । तेन संध्यङ्गच्छिद्रवर्तित्वात्संध्यन्तराणि, अत एव च अङ्गानां संबद्धानि । ननु किं श्लेषमात्रेण । नेत्याह किंत्वर्थस्य प्रयोजनस्य योगेन, अत एव संध्यङ्गानां विशेषकाः । तदर्थविशेषसंबद्धं हि तदङ्गं भवति । अन्ये मन्यन्ते । य एवोपक्षेपाद्याः सामान्येनोक्तास्तेषामेवैते विशेषा अवान्तरभेदाः । उपक्षेपो हि सामादिविशेषभिन्नः । तथाहि 'लाक्षागृहानल' इति क्रोधात्मकोपक्षेपः, रामाभ्युदये भयात्मोपक्षेपः, प्रतिमानिरुद्धे स्वप्नरूपः, उदात्तराघवे हेत्ववधारणात्मा । एवमन्यदनुसरणीयम् । एते च विभावानुभावव्यभिचारिरूपा एव । न तु तदतिरिक्तं जगति किंचिदस्ति प्रयोगोज्ज्वलकम् । तत्रोपयोगाय तूपलक्षणत्वेनैकविंशतिरित्युक्तं कवेर्मार्गं प्रदर्शयितुम् ।**

आता संध्यन्तरांचा निर्देश करण्यासाठी 'एतेषामेव चाङ्गानाम्' इत्यादी सांगतात. त्यासंबंधात काहींचे म्हणणे असे – अन्तर म्हणजे छिद्र; संधि म्हणजे त्यातील केवळ अंग, त्यात असल्याकारणाने त्याच्या जागी असलेले. तेव्हा संध्यङ्गांच्या छिद्रात असतात म्हणून यांना संध्यन्तरे म्हणतात. आणि म्हणूनच ती संध्यङ्गांशी संबद्ध असतात. केवळ श्लिष्ट होऊन संबद्ध का? याचे उत्तर नाही, ती अर्थाच्या म्हणजे प्रयोजनाच्या संबन्धाने संबद्ध असतात. म्हणूनच ती संध्यङ्गांची वैशिष्ट्ये दर्शविणारी असतात. कारण, ते अंग त्या विशिष्ट प्रयोजनाशी संबद्ध होते. दुसऱ्या टीकाकारांचे मत असे की उपक्षेप आदी जे सामान्य स्वरूपात सांगितले आहेत त्यांचेच हे विशेष म्हणजे अवांतर भेद आहेत. कारण, सामादी विशेषांमुळे उपक्षेप भिन्न भिन्न प्रकारचा होतो. उदाहरणार्थ, 'लाक्षागृहा-नल' इत्यादी वेणीसंहारातील उपक्षेप क्रोधात्मक आहे; रामाभ्युदय नाटकात उपक्षेप भयात्मक आहे; प्रतिमानिरुद्धात तो स्वप्नरूप आहे; उदात्तराघवात तो हेतू जाणण्याच्या स्वरूपाचा आहे. याच प्रकारे इतर अंगांच्या बाबतीतही समजावे. आणि ही संध्यन्तरे विभाव, अनुभाव आणि व्यभिचारिभाव यांच्याच स्वरूपाची आहेत. कारण, त्यांच्या व्यतिरिक्त अशी जगात कोणतीही गोष्ट प्रयोग उज्ज्वल करणारी नाही. परंतु त्या ठिकाणी उपयोग व्हावा म्हणून कवीला मार्गदर्शन करण्यासाठी उपलक्षणाने एकवीस असे म्हटले आहे.

'तत्स्थानीयम्' ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'तात्स्थाव्यं' असा भ्रष्ट पाठ आहे. मुद्रित पाठ 'तत्स्थान्यं' आहे. पण 'स्थान्य' असे रूप प्रचलित नाही. संधि शब्दाचा संध्यङ्ग असा अर्थ का केला आहे त्याचे कारण असे सांगितले आहे की संधीत ते असते (तत्स्थ) म्हणून त्याच्या जागी (तत्स्थानीय) ते समजता येते. – 'श्लेषमात्रेण' हा हस्तलिखितातील पाठ आहे. मुद्रितात 'शेष-' आहे. ते विशेष समर्पक नाही. श्लिष् 'चिकटणे, जोडले जाणे' यापासून श्लेष शब्द निष्पन्न झाला आहे. – 'सामान्येनोक्ताः' ही दुरुस्ती आहे हस्तलिखितात 'सामान्या न उक्ताः' असे आहे. व मुद्रितात 'सामान्या उक्ताः' असे. सामान्य हे उपक्षेपादींचे वर्णनपर विशेषण म्हणून समर्पक नाही. – 'एते विशेषाः' ही 'एतद्विशेषाः' ची दुरुस्ती आवश्यक आहे हे उघड आहे. – 'एते च' म्हणजे हे सामक्रोधादी विशेष. विशेषाला अनु-लक्षून पुल्लिंगी सर्वनाम. – 'प्रयोगोज्ज्वलकम् । तत्रोप–' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितातील त्रुटित पाठ 'प्रयोगोज्वल··· प–' असा आहे. मुद्रित पाठ 'प्रयोगे । प्रयोगोज्ज्वलत्वोप-' असा आहे. तो मूळ असण्याची संभाव्यता फार कमी आहे.

**तत्र सामादयो वीरे उज्ज्वलत्वहेतवः, वधो रौद्रे, प्रत्युत्पन्नमतित्वं मति-लक्षणं व्यभिचारिरूपं सर्वत्र, गोत्रस्खलनमीर्ष्याविप्रलम्भे, साहसं वीरादौ, चापलं हास्यादौ । एवमन्यत्र । ओज इति तेजः सामान्याभिनये लक्षयिष्यते 'अधि-क्षेपावमानादेः' इत्यादि । संवरणमवहित्थम् । चित्रं विस्मयः शिल्पविशेषश्च ।**

**एते सर्वेषु नाटकादिरूपकेषु सुलभाः स्वयं च सुज्ञाना इति तदुदाहरणपरिवर्तनेन ग्रन्थो न विस्तारितः ।**

त्यांपैकी साम आदी संध्यंतरे वीररसात उज्ज्वलतेस कारणीभूत होतात, वध रौद्ररसात, बुद्धीचे लक्षण हजरजबाबीपणा व्यभिचारिभावरूप सर्व रसांत, गोत्रस्खलन ईर्ष्येने झालेल्या विप्रलम्भ शृंगारात, साहस वीर आदी रसांत, चपलता हास्य आदीमध्ये. याचप्रमाणे इतरत्र. ओज म्हणजे तेज, त्याचे लक्षण सामान्याभिनयामध्ये 'अधिक्षेप, अवमान इत्यादींच्या' या श्लोकात केले जाईल. संवरण म्हणजे गोपन. चित्र म्हणजे विस्मय आणि विशिष्ट प्रकारची कला. हे नाटक आदी सर्व रूपकप्रकारांत योजावयास सुलभ आणि समजण्यासही सोपे म्हणून त्यांची उदाहरणे प्रस्तुत करून ग्रंथ वाढविला नाही.

'मतिलक्षणं' मति हा एक व्यभिचारिभाव आहे. — 'वीरादौ' हे मुळात नाही. संपादकांनी 'शृङ्गारवीरादौ' सुचविले आहे. शृंगारात साहस निराळ्या प्रकारचे असंभवनीय नाही. — 'तेजः' सामान्याभिनय नावाच्या २२ व्या अध्यायात 'तेजस्' चे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे —

**अधिक्षेपावमानादेः प्रयुक्तस्य परेण यत् ।**
**प्राणात्ययेऽप्यसहनं तत्तेजः समुदाहृतम् ॥** २२.४१.

—'अवहित्थ' म्हणजे मनातील भावाचे गोपन. हा एक व्यभिचारिभाव आहे.

वर नाट्यशास्त्रातील श्लोकांना क्रमांक देतांना एक श्लोक सहा चरणांचा ठरविला आहे. संध्यन्तरांचा निर्देश करणारे पाचच श्लोकार्ध आहेत. त्या पूर्वीचा अथवा त्यानंतरचा श्लोकार्ध यांच्याशी संलग्न करता येण्यासारखा नाही. म्हणून हा मार्ग अवलंबावा लागला आहे.

यानंतर बडोदे प्रतीत पुढील सात श्लोक कंसात दिले आहेत —

**विष्कम्भश्चूलिका चैव तथा चैव प्रवेशकः ।**
**अङ्कावतारोऽङ्कमुखमर्थोपक्षेपपञ्चकम् ॥**

**मध्यमपुरुषनियोज्यो नाटकमुखसंधिमात्रसंचारः ।**
**विष्कम्भकस्तु कार्यः पुरोहितामात्यकञ्चुकिभिः ॥**

**शुद्धः संकीर्णो वा द्विविधो विष्कम्भकस्तु विज्ञेयः ।**
**मध्यमपात्रैः शुद्धः संकीर्णो नीचमध्यकृतः ॥**

**अन्तर्यवनिकासंस्थैः सूतादिभिरनेकधा ।**
**अर्थोपक्षेपणं यत्तु क्रियते सा हि चूलिका ॥**

**अङ्कान्तरानुसारी संक्षेपार्थमधिकृत्य बिन्दूनाम् ।**
**प्रकरणनाटकविषये प्रवेशको नाम विज्ञेयः ॥**

अङ्कान्त एव चाङ्को निपतति यस्मिन् प्रयोगमासाद्य ।
बीजार्थयुक्तियुक्तो ज्ञेयो ह्यङ्कावतारोऽसौ ॥

विश्लिष्टमुखमङ्कस्य स्त्रिया वा पुरुषेण वा ।
यदुपक्षिप्यते पूर्वं तदङ्कमुखमुच्यते ॥

श्री कवि यांनी टीपेत म्हटल्याप्रमाणे हे श्लोक प्रक्षिप्त आहेत यात मुळीच शंका नाही. यांतील तिसरा व पाचवा हे श्लोक वर अठराव्या अध्यायात आलेले आहेत. त्यांत निर्देशिलेले विष्कम्भक व प्रवेशक हे दोनच प्रकार भरताला अवगत आहेत. पाच अर्थोपक्षेपकांची कल्पना नाट्यशास्त्रात नाही. ती उत्तरकालीन, प्रायः कोहलकृत आहे.

[१]अन्यान्यपि लास्यविधावङ्गानि तु [२]नाटकोपयोगीनि ।
अस्माद्विनिःसृतानि तु भाण इवैकप्रयोज्यानि ॥ १०२ ॥
गेयपदं स्थितपाठ्यमासीनं पुष्पगण्डिका ।
प्रच्छेदकं त्रिमूढं च सैन्धवं च द्विमूढकम् ॥ १०३ ॥
उत्तमोत्तमकं चैव[३]मुक्तप्रत्युक्तमेव च ।
[४]लास्ये दशविधं ह्येतदङ्गनिर्देशलक्षणम् ॥ १०४ ॥

लास्याच्या प्रयोगातील दुसरीही अंगे नाटकात उपयोगी पडतात. ह्या नाटकाच्या कथानकातून निष्पन्न झालेली ही अंगे भाणाप्रमाणे एका पात्राच्या द्वारा योजावीत. गेयपद, स्थितपाठ्य, आसीन, पुष्पगण्डिका, प्रच्छेदक, त्रिमूढ, सैन्धव, द्विमूढक, उत्तमोत्तमक आणि उक्तप्रत्युक्त याप्रमाणे लास्यात दहा प्रकारच्या अंगांचा निर्देश व लक्षण केलेले आहेत.

एवमितिवृत्तनिरूपणनान्तरीयकत्वेन संधयः संध्यङ्गानि संध्यन्तराणि चात्मभूतरसोपयोगीन्यपि प्राधान्येनेतिवृत्तात्मकं शरीरांशमभिनिविशमानानि, तत एव वृत्तिचतुष्कसाधारणानि निदर्शितानि । अधुना तु यस्याः प्रसादेन शास्त्रेतिहासादिभ्योऽभ्युद्धरकन्धरीभूतं सर्वजनाहरणीयतास्पदं नाट्यं, यामुद्दिश्य प्रथमेऽध्याये 'कैशिकीमपि योजय, यच्च तस्याः क्षमं द्रव्यम्' इत्यादि बहुतरमुक्तम्, तदाविर्भावकानि, अत एवात्मभूतरसभावभागाभिनिवेशशालीन्येव लास्याङ्गान्यपि कविप्रयोक्तृभिरभिनेतव्यकाव्यविषये सर्वथैव योज्यानीति दर्श-

१ **का घो** १०२–११५ इत्येतावानंशः विंशाध्यायस्यान्ते पठ्यते. २ **घो** नाटके प्रयुक्तानि. ३ **घो** विचित्रपदमेव च ।. ४ **घो** उक्तप्रत्युक्तं भावं च लास्याङ्गानि विदुर्बुधाः.

यितुमाह अन्यान्यपि लास्यविधावङ्गानीत्यादि । नाटकमित्यभिनेयमात्रम् इतःपरमाध्यायान्तमुक्तेभ्योऽङ्गेभ्योऽभिन्नानि लास्यविधौ यान्यङ्गानि वक्ष्यन्ते तानि नाटकोपयोगीन्यपि भवन्ति । नन्वेवमङ्गानामभेदादङ्गिनो लास्यस्य नाटके को भेद इत्याशङ्कां शमयति अस्मादिति । अस्मान्नाटकादनुकाराभिनेयलक्षणाद्विनिःसृतानि बहिर्भूतानि एकपात्रहार्याणि भाण इवेति । इवशब्देन नाटकमाह । भाणे नाट्यरूपता समस्ति, न तु लास्ये कथंचिदपि, तस्य नाट्यरूपवैलक्षण्यात् । तच्चोपपादितं वितत्य तुर्येऽध्याये ।

याप्रमाणे इतिवृत्ताच्या निरूपणाशी निकट संबंध असलेले संधी, संध्यङ्गे आणि संध्यन्तरे आत्म्याच्या स्थानी असलेल्या रसाला प्राधान्येकरून उपयोगी असले तरी इतिवृत्तात्मक शरीराचा अंश म्हणून योजिले जाणारे आणि म्हणूनच चार वृत्तींना समान असलेले वर्णिले आहेत. परंतु आता जिच्या प्रसादामुळे नाट्य शास्त्र, इतिहास इत्यादीहून श्रेष्ठ प्रकारचे होऊन सर्व लोकांचे मन आकर्षित करण्याचे साधन बनते आणि जिच्याविषयी पहिल्या अध्यायात 'कैशिकी वृत्तीची सुद्धा योजना कर, आणि तिच्यासाठी जी योग्य सामुग्री असेल' इत्यादी पुष्कळ विवेचन केले आहे, त्या कैशिकी वृत्तीचा आविर्भाव करणारी आणि म्हणूनच आत्मभूत रस आणि भाव यांच्या भागातच योजावयाची असलेली लास्याची अंगे सुद्धा कवींनी आणि प्रयोग करणारांनी ज्याचा अभिनय करावयाचा अशा काव्याच्या संबंधात सर्व प्रकारे योजावीत हे दाखविण्यासाठी 'अन्यान्यपि लास्यविधावङ्गानि' इत्यादी लिहितात. नाटक म्हणजे केवळ अभिनय करण्यास योग्य ते. येथपासून ते अध्यायाच्या शेवटपर्यंत सांगितलेल्या अंगांहून भिन्न नसलेली लास्याच्या विधीत जी अंगे सांगितली जाणार आहेत ती नाटकात सुद्धा उपयोगी होतात. याप्रमाणे अंगांमध्ये भिन्नता नसेल तर अंगी लास्य आणि नाटक यांच्यात काय भेद ह्या शंकेचे शमन 'अस्मात्' इत्यादी शब्दांत करतात. अनुकरणात्मक अभिनयास योग्य असे लक्षण असलेल्या ह्या नाटकातून विनिःसृत म्हणजे त्यात अन्तर्भूत नसलेली, भाणाप्रमाणे एक पात्राने योजावयाची अशी ही अंगे आहेत. इव शब्दाने नाटकाचा निर्देश केला आहे. भाणात नाट्याचे रूप संपूर्णपणे असते, पण ते लास्यात कोणत्याही प्रकारे नसते, कारण ते नाट्याहून भिन्न स्वरूपाचे आहे. आणि ते आम्ही चौथ्या अध्यायात विस्ताराने प्रतिपादित केले आहे.

'वृत्तिचतुष्क' म्हणजे भारती, सात्त्वती, आरभटी आणि कैशिकी ह्या चार वृत्ती. – '-जनाहरणीयतास्पदं नाट्यं' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात '-जनाहरणीयास्पदत्वं तत्राद्यं' असा पाठ आहे. मुद्रित पाठ '-जनाहरणीयतास्पदत्वं तु नाट्यं' आहे. 'तु' अनावश्यक आहे; तसेच भाववाचक रूप संभाव्य नाही. – 'कैशिकीमपि इ०' पहिल्या अध्यायात पुढीलप्रमाणे विधान आहे –

**अथाह मां सुरगुरुः कैशिकीमपि योजय ॥**
**यच्च तस्याः क्षमं द्रव्यं तद् ब्रूहि द्विजसत्तम। (१.४२-४३).**

– 'उक्तेभ्योऽङ्गेभ्योऽभिन्नानि' यातील 'अभिन्नानि' शब्द मुळात नाही, पण तो आवश्यक आहे. येथे सांगितलेली अंगे आणि पुढे ३१ व्या अध्यायात सांगितलेली लास्याची अंगे दोन्ही एकच आहेत, ती भिन्न नाहीत असे म्हटले आहे. आणि 'अभिन्नानि' शब्दाने पूर्ती केल्यावाचून 'अङ्गेभ्यः' मधील पंचमीची उपपत्ती लागणार नाही. – 'नाटके को भेदः' 'नाटकात्' असे पंचमीचे रूप अपेक्षित होते. पण सप्तमीचे रूप चालण्यासारखे आहे. 'अस्मादिति' हस्तलिखितात नसलेले हे शब्द संपादकांनी सुचविले आहेत व ते आवश्यक आहेत. – 'भाण इवेति' ही मुळातील 'भाण इति' ची दुरुस्ती आहे. ती श्लोकाला धरून आहे. लास्यांगे भाणासारखी (भाण इव) एका पात्राने करावयाची असतात असे येथे म्हणावयाचे आहे. – 'इवशब्देन नाटकमाह' हे कसे काय ते स्पष्ट नाही. भाणाप्रमाणे असे म्हटले आहे. पण भाण व लास्यांगे यात फरक असा की भाणात नाट्याची सर्व अंगे असतात, तशी ती लास्यांगांत नसतात. असा संभव आहे की मूळ पाठ 'इवशब्देन नाटकाद्भेदमाह' असा होता. – 'तुर्येऽध्याये' चौथ्या अध्यायातील श्लोक २६१–२६८ वरील टीकेत नृत्ताच्या उपयोगाच्या अनुषंगाने नृत्त व नाट्य यांतील भेदाची विस्तृत चर्चा अभिनवगुप्ताने केली आहे.

**नन कानि लास्याङ्गानि नाट्ये वक्ष्यन्त इत्याह गेयपदमित्यादि दशविधं ह्येतदङ्गनिर्देशलक्षणमित्यन्तम्। एतस्याकनिर्केदशस्योद्देशस्य दशविधं यद्विशेषलक्षणं तत्तालाध्याये लास्यनिरूपणावसरे वक्ष्यते। तथा चोपसंहरिष्यति एतेषां लास्यविधौ विज्ञेयं लक्षणमित्यादि। तत्र हि संपूर्णमकानां रूपम्। इह तर्हि कथमुपयोग इति नाट्योपयोगितां समर्थयितुम् आसनेषूपविष्टैर्यदित्यादिग्रन्थः। तेनेदं तात्पर्यम्। यानि लास्याङ्गानि वक्ष्यन्ते तेभ्यः कश्चिद्वैचित्र्यांशो लोकापरिदृष्टोऽपि रञ्जनावैचित्र्याय कविप्रयोक्तृभिर्नाट्ये निबन्धनीयः।**

लास्याची कोणती अंगे नाट्यात सांगणार आहेत त्यांचा निर्देश 'गेयपदम्' पासून 'दशविधं ह्येतदङ्गनिर्देशलक्षणम्' येथपावेतो. ह्या अंगांच्या निर्देशाचे म्हणजे अंगांच्या उद्देशाचे जे दहा प्रकारचे विशेष लक्षण ते तालाध्यायामध्ये लास्याचे निरूपण करण्याच्या प्रसंगाने करण्यात येईल. आणि त्याला अनुसरून 'एतेषां लास्यविधौ विज्ञेयं लक्षणम्' असा येथे उपसंहार करतील. कारण तेथे ह्या अंगांचे संपूर्ण स्वरूप वर्णन केले आहे. मग येथे त्यांचा कसा उपयोग होईल हे सांगण्यासाठी म्हणजे नाट्यात त्यांच्या उपयोगाचे समर्थन करण्यासाठी 'आसनेषूपविष्टैर्यद्' इत्यादी ग्रंथ लिहिला आहे. म्हणून तात्पर्य असे. जी लास्याची अंगे सांगितली जाणार आहेत त्यांच्यातील जो वैचित्र्यपूर्ण अंश तो लोकांमध्ये दिसून येत नसला तरी रंजकतेत वैचित्र्य उत्पन्न करण्यासाठी कवींनी आणि प्रयोग करणारांनी नाट्यामध्ये ग्रथित करावा.

'अङ्गोद्देशस्य' ही १०४ ह्या श्लोकातील 'अङ्गनिर्देश' शब्दाची व्याख्या आहे. –'तत्ताला-ध्याये' यातील 'तत्' मुळात नाही. पण अर्थासाठी तो शब्द आवश्यक आहे. तालाध्याय हे ३१ व्या अध्यायाचे नाव आहे. त्या अध्यायात लास्याचे निरूपण ३३१–३६७ या श्लोकांत केले असून तेथे ह्या दहा अंगांचे अधिक विस्तृत वर्णन केले आहे. – 'एतेषां लास्यविधौ इ०' हे पुढील ११५ व्या श्लोकातील वचन आहे. –'समर्थयितुम्' मुद्रित पाठ 'गमयितुम्' आहे. – 'आसनेषु इ०' हा पुढील १०५ व्या श्लोकाचा निर्देश आहे. –'लोकापरिदृष्टोऽपि' हा मुद्रित पाठ आहे. पुढील विवेचनावरून असे स्पष्ट दिसते की लास्यांगाचा जो अलौकिक अंश त्याचीच नाट्यात योजना करावयाची आहे.

**अन्ये तु व्याचक्षते तथाविधलास्याङ्गयोजनैवात्र क्रियते । तथाहि गेयपदे निदर्शनं दर्शयन्ति 'ततः प्रविशति वीणां वादयन्ती मलयवती चेटी च । मलयवती – "उत्फुल्लकमलकेसर" इत्यादि गायति ।' तच्चेदमसत् । अत्र हि अन्यव्यापारवद् देवतापरितोषः किंचिद्गेयं जप्यसहस्रतुल्यं तन्मिश्रं जप्यं कोटिसहस्रमित्यादि-पुराणवाक्यप्रामाण्यबलात् कर्तव्यत्वेनाभिमतो मलयवत्याः । सा च गायतीति न लास्यार्थोऽत्र कश्चित्, न लास्याङ्गता । यत्रापि 'ततः प्रविशतो गायन्त्यौ चेट्यौ "कुसुमाउहपिअदूअअ" इत्यादि' तत्रापि परिभ्रमणादिवदेव लौकिकवृत्तम् । वसन्तोत्सवप्रमोदाभ्युदयावसरकृतं प्रयोजनं चेद्यावत् क्रियते तत्र यद्यप्यनुकार्यत्वं तथापि नाट्याङ्गत्वे पृथगुपदेश्यतापत्तिः । यथा ह्यश्वमेधयागाद्यनुकारः कर्तव्यस्तदोपयुज्यते यज्ञाङ्गज्ञानमिति यज्ञाङ्गान्युपदेश्यानि भवेयुः । न हि तादृग्वस्तुमात्रमप्यस्ति यन्नाट्ये नोपयुज्यते च । तस्माल्लास्ये यान्यङ्गानि तत उपजीव्योऽलौकिक एवांशो रञ्जनोपयोगी लास्याङ्गत्वेन मुनेरिह विवक्षितः । अन्यथा आसनेषूपविष्टैर्यद् इत्यादि किमिहोक्तवा । एतेषां लक्षणं व्याख्यास्ये एतदिह च नोक्तमित्येतद्विशृङ्खलं स्यात् ततश्च परिधानकमित्यादि ।**

परंतु दुसरे टीकाकार अशी व्याख्या करतात की तसल्या पूर्ण स्वरूपाच्या लास्यांगांचीच योजना येथे केली जाते. त्याप्रमाणे गेयपदाचे उदाहरण पुढीलप्रमाणे दाखवितात. नागानन्द नाटकात 'नंतर वीणावादन करीत असलेली मलयवती आणि चेटी प्रवेश करतात. मलयवती "फुललेल्या कमळांचे केसर" इत्यादी गाते.' पण हे बरोबर नाही. कारण ह्या ठिकाणी इतर उद्योगांसारखाच असलेला देवतापरितोष 'थोडेसे गान हजार जपांच्या बरोबरचे, गानमिश्रित जप हजार कोटी होतो' इत्यादी पुराणांतील वाक्ये प्रमाण मानल्या-कारणाने कर्तव्य म्हणून मलयवतीला श्रेयस्कर वाटला. आणि ती गाते यात लास्याचे कोण-तेही प्रयोजन नाही, आणि हे लास्यांग नाही. रत्नावली नाटिकेतील 'नंतर गात गात दोन चेटी प्रवेश करतात "कुसुमायुधाच्या प्रियदूता" इत्यादी' ह्या उदाहरणात सुद्धा परिभ्रमण इत्यादी सारखेच असलेले लौकिक वागणे आहे. वसन्तोत्सवाच्या आनंदमय अभ्युदयाच्या

प्रसंगी होणारी सर्व कृत्ये जर करावयाची असतील तर जरी त्यात अनुकरण असते तरी नाट्याचे अंग झाले तर त्याचे स्वतंत्रपणे वर्णन करण्याचा प्रसंग ओढवेल. उदाहरणार्थ, अश्वमेध यज्ञाचे अनुकरण करावयाचे असेल तेव्हा यज्ञाच्या अंगांच्या ज्ञानाचा उपयोग केला जातो म्हणून यज्ञाच्या अंगांचे वर्णन करणे आवश्यक होईल. कारण अशी कोणतीही वस्तू नाही की जिचा नाट्यात उपयोग केला जात नाही. म्हणून लास्यात जी अंगे आहेत त्यांमधील स्वायत्त असा अलौकिक अंशच लास्यांग म्हणून भरतमुनीला या ठिकाणी अभिप्रेत आहे. नाही तर 'आसनेषूपविष्टैर्यद्' इत्यादी सांगण्याचे प्रयोजन काय? आणि 'यांचे लक्षण मी आता सांगतो' अशा प्रकारची येथे प्रतिज्ञा केली नाही म्हणून 'ततश्च परिधानकम्' इत्यादी असंबद्ध होईल.

'दर्शयन्ति' ही मुळातील 'दर्शयति'ची दुरुस्ती आहे. कर्तृपद 'अन्ये' हेच संभाव्य आहे.– 'उत्फुल्ल-' संपूर्ण गाणे असे आहे –

**उत्फुल्लकमलकेसरपरागगौरद्युते मम हि गौरि ।**
**अभिवाञ्छितं प्रसिध्यतु भगवति युष्मत्प्रसादेन ॥** (१.१३).

– 'देवतापरितोष:' यासाठी विधेय 'कर्तव्यत्वेन अभिमत:' हे आहे. – 'कोटिसहस्रम्' हे कोटिसहस्रजप्यतुल्य या अर्थी वापरलेले दिसते. मुद्रित पाठ 'कोटिफलसाधनम्' असा आहे. तो मूळ असेलसे वाटत नाही. – '-प्रामाण्य-' शब्द मुद्रितात नाही. – 'गायतीति' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. मुळात 'प्रयोज्येति' असा पाठ आहे. पण त्यापासून काही अर्थबोध होत नाही. – 'कुसुमाउह- इ०' रत्नावलीतील पहिल्या अंकात वसन्त ऋतूच्या स्तुतिपर १३-१५ ह्या तीन गाथा आहेत. – 'वसन्तोत्सव- इ०' ह्या वाक्यात 'प्रयोजने'च्या जागी 'प्रयोजनं', 'अनुकार्यस्य'च्या जागी 'अनुकार्यत्वं' आणि 'अनुपदेश्यतापत्ति:'च्या जागी 'उपदेश्यतापत्ति:' अशी दुरुस्ती सुचवून अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे. रत्नावलीतील चेटींचे गायन हे जर परिपूर्ण लास्यांगाचे उदाहरण मानले तर त्या लास्यांगाच्या सर्व विधीचा नाटिकेत निर्देश आवश्यक होता असे समजावे लागेल. उदाहरणार्थ, नाटकात अश्वमेध यज्ञाचे दर्शन घडवावयाचे असेल तर त्या यज्ञाच्या विधीचा निर्देश करणे आवश्यक ठरते. नाट्याचे अंग झाल्यामुळे असे करणे आवश्यक होते. रत्नावलीत वसन्तोत्सवाचे संपूर्णपणे वर्णन करणे हा नाटककाराचा उद्देश नाही. याप्रमाणे ते नाट्याचे अंग ठरत नाही म्हणून त्याला लास्यांग म्हणता येणार नाही अशा तऱ्हेचा युक्तिवाद येथे केला असावा असे वाटते. – 'न हि तादृक् इ०' याचा अर्थ असा दिसतो की नाटकात सर्व गोष्टींचे दर्शन होते, पण ती प्रत्येक गोष्ट नाट्यांग होत नाही. – 'उपजीव्यो' मुळात 'उपजीव्ये' आहे. पण त्या रूपाचा कोठे अन्वय लावता येण्यासारखा आहे असे दिसत नाही. उपजीव्य म्हणजे प्रस्तुत संदर्भात दुसऱ्या गोष्टींतून उद्धृत करून घेतलेला असा अर्थ आहे. तालाध्यायात लास्यांगांचे जे विस्तृत वर्णन आहे त्यातील फक्त काही अंशच नाटकात योजावयाचा असतो, त्यातील ताल, चारी वगैरे प्रकार वर्ज्य आहेत. अलौकिक म्हणजे लोकात प्रचलित नसलेला. 'आसनेषु इ०' हा पुढील गेयपदाचे वर्णन करणारा श्लोक.

त्यात आसनावर बसणे, वाद्ये वाजविणे, गाणे ह्या अलौकिक गोष्टींचा निर्देश आहे. – 'उक्त्वा' मुद्रितात 'उक्त्या' असा पाठ आहे. – 'ततश्च परिधानकम्' तालाध्यायात गेयपद ह्या लास्यांगाच्या वर्णनात पुढील श्लोक आहे –

त्र्यश्रेण द्विकलेन स्यात् ततश्च परिधानकम् ।
प्रयोक्तव्यं प्रयोगज्ञैः परिवर्तनमेव च ॥ (३१.३३६).

त्यात त्र्यश्र हे तालाचे नाव असून परिधानक आणि परिवर्तन ही पूर्वरङ्गातील नृत्ताच्या भागांची नावे आहेत. येथे अभिनवगुप्ताला असे म्हणावयाचे आहेसे दिसते की नाट्यात संपूर्ण लास्यांगांची योजना करावी असे जर भरतमुनीचे मत असते तर त्याने या ठिकाणीच 'मी आता लास्यांगांचे लक्षण सांगतो' असे म्हटले असते. तसे त्याने म्हटलेले नाही. तसे त्याने म्हटले असते तर तालाध्यायातील वर्णन प्रस्तुत लक्षणांशी असंबद्ध ठरले असते.

वरील १०२ व १०३ ह्या दोन श्लोकांच्या मध्ये बडोदे प्रतीत पुढील अधिक श्लोक कंसात दिला आहे –

भाणाकृतिवल्लास्यं विज्ञेयं त्वेकपात्रहार्यं वा ।
प्रकरणवदूह्य कार्यासंस्तवयुक्तं विविधभावम् ॥

हा मूळ नाही हे उघड आहे. पूर्वार्धात १०२ ची कल्पना पुनरुक्त झाली आहे.

[1]आसनेषूपविष्टैर्यत्तन्त्रीभाण्डोपबृंहितम् ।
गायनैर्गीयते शुष्कं तद्गेयपदमुच्यते ॥ १०५ ॥

आसनांवर स्थानापन्न झालेल्या गायकांनी वीणादी वाद्यांची साथ असलेले जे केवल गान गायिले जाते त्याला गेयपद म्हणतात.

ततो यावानंशो नाट्योपयोगी तं दर्शयितुमाह आसनेषूपविष्टैर्यदिति । यच्छब्दो निपातो यस्मिन्नित्यर्थे । तेन यत्र काव्ये प्रयोगे वा शुष्कमित्यनुकरणीयतया शून्यं गायनैरिति न तु पात्रैः आसनोपविष्टैरिति स्वस्थैः न तु नेपथ्ये गीयत इत्यादिवत् कविप्रयोगायातमावेशविशेषं जृम्भयद्भिर्गीतम्, यत्तन्त्रीभाण्डान्वितमिति सर्वातोद्ययुतं न तु भाव्यासीनपाठ्यवत् तद्विहीनं तत्सर्वं गेयस्य पदं स्थानमिति कृत्वा गेयपदम् । तेन ध्रुवागानपञ्चकमन्तरालापस्वररहितं यत्र प्रयोगयोग्यं भवति स काव्यप्रयोगो गेयपदमित्युक्तं भवति । यत्र हि योगो तत्राभिनिविष्टं रञ्जकं भवतीति तावानंशो लास्याङ्गादिहोपजीवितः । यत्तु गायनैः

१ घो आसनें चोपविष्टायां.

**पात्रैः शुष्कमित्यर्थात् छेकाश्रितं गेयं निर्गीतमपि वा एतत् त्र्यश्रं चतुरश्रं वेत्येवंभूतं गीयमानं गेयानि पदानि यत्र गेयपदमिति व्याचक्षते तत्सर्वमेवापास्तम् ।**

त्यापैकी जितका अंश नाटयाला उपयोगी आहे तो दाखविण्यासाठी 'आसनेषूपविष्टैर्यद्' इत्यादी सांगतात. 'यत्' शब्द 'यस्मिन' ह्या अर्थी अव्यय आहे. म्हणून ज्या काव्यात अथवा प्रयोगात शुष्क म्हणजे अनुकरणाचा भाग मुळीच नसलेले असे, गायनांनी म्हणजे पात्रांनी नाही, आसनावर बसलेल्यांनी म्हणजे स्वस्थ असलेल्यांनी, नेपथ्यगृहात गातात यासारखे कवीच्या प्रयोगामुळे आलेला विशिष्ट आवेश प्रकट करणाऱ्यांनी नाही, असे जे गायिले जाते आणि जे वीणावाद्याने युक्त म्हणजे सर्व वाद्यांनी युक्त असते, पुढे वर्णन करावयाचे असलेल्या आसनपाठ्याप्रमाणे वाद्यविहीन नसते, ते सर्व गाण्याचे पद म्हणजे स्थान म्हणून गेयपद. म्हणजे अन्तरालाप आणि स्वर यांनी विरहित असे पाच प्रकारचे ध्रुवागान ज्या ठिकाणी प्रयोगास योग्य होते तेव्हा त्या काव्यप्रयोगाला गेयपद असे म्हणतात. कारण जेथे योग होतो तेथे योजना केली असता रंजक होते म्हणून तेवढा अंश लास्यांगातून येथे घेतला आहे. गायनांनी म्हणजे गाणाऱ्या पात्रांनी शुष्क म्हणजे विदग्ध स्वरूपाचे गान किंवा निर्गीत असेही गान त्र्यश्र किंवा चतुरश्र तालात गायिले जाते म्हणून ज्यात गेय, गाण्यास योग्य, अशी पदे आहेत ते गेयपद अशी काहीजण व्याख्या करतात त्या सर्वांचे निराकरण केलेच आहे.

'अनुकरणीयतया शून्यम्' ही 'शुष्कम्' ची व्याख्या आहे. नाटकातील प्रत्येक गोष्ट अनुकरणात्मक म्हणजे अभिनयाच्या स्वरूपाची असते. गेयपदातील गाण्यात अनुकरण नसते अथवा ते अभिनयहीन असते. याचाच अर्थ ते नाटकातील कथावस्तूशी साक्षात संबद्ध नसते. – 'गायनैः' पूर्वरङ्गाच्या वर्णनात गायक, वादक यांची रंगभूमीवरील उपस्थिती व त्यांनी करावयाच्या विविध क्रिया यांचा निर्देश आहे. गायन म्हणजे पूर्वरङ्गातील हे गायक. किंबहुना तालाध्यायात वर्णिलेल्या लास्यांगांचा उपयोग पूर्वरंगातच मुख्यतः होतो. – 'कविप्रयोगा-' नेपथ्यातून येणारे गान कोण करण्याचा संभव असतो त्याचे यात दिग्दर्शन आहे. कवीने योजिल्याप्रमाणे एखादी तीव्र भावना व्यक्त करण्यासाठी पात्र नेपथ्यातून गाते. पण ते गायनही अभिप्रेत नाही. गेयपद रंगभूमीवर बसलेल्या व पात्र नसलेल्या गायकांनी म्हणावयाचे असते. – 'ध्रुवागानपञ्चकम्' पात्राचा प्रवेश, पात्राचे निष्क्रमण, रसाचा आक्षेप, सामाजिकांचे प्रसादन आणि पात्रांचे परिक्रमणादि अन्तर या पाच प्रसंगांत प्रावेशिकी, नैष्क्रामिकी, आक्षेपिकी, प्रासादिकी आणि आन्तरा अशा पाच प्रकारच्या ध्रुवा प्रयोगात योजिल्या जातात. नाट्यशास्त्राच्या बत्तिसाव्या ध्रुवाध्यायात ध्रुवांची असंख्य उदाहरणे दिली आहेत. ती सर्व प्राकृत भाषेत आहेत. अभिनवगुप्ताच्या म्हणण्याप्रमाणे हे विविध प्रकारचे ध्रुवागान म्हणजेच गेयपद. ध्रुवागानात अन्तरालापाचे स्वर नसतात. – 'यत्र हि योगो इ०' ह्या वाक्यात बरीचशी दुरुस्ती सुचविली आहे. हस्तलिखितातील पाठ फारच भ्रष्ट आहे. मुद्रित पाठ 'यत्र हि प्रयोगे तत्तत्राभिनिविष्टं सामाजिकरञ्जकं भवतीति यावानंशोऽसौ इ०'

असा आहे. सुचविलेल्या पाठानुसार पुढीलप्रमाणे अर्थ करता येण्यासारखा आहे – नाटकात ज्या ठिकाणी गेयपद ह्या लास्यांगातील जितक्या अंशाची योजना (योगः) उचित होईल तेथे ते वापरले असता रंजक होते म्हणून तेवढा अंश नाटकात गेयपद म्हणून ओळखले जाते. – 'छेकाश्रितं गेयं' छेक म्हणजे विदग्ध, सुसंस्कृत मनुष्य. छेकाश्रित गान म्हणजे विदग्ध स्वरूपाचे गान असा अर्थ असण्याचा संभव आहे. विदग्ध पुरुषांविषयी गान अशा तऱ्हेचा अर्थ विशेष आकर्षक वाटत नाही. – 'निर्गीतम्' पूर्वरङ्गाच्या आश्रावणा नावाच्या अंगात जे गीत गाइले जाते त्याला निर्गीत अशी संज्ञा असल्याचे पाचव्या अध्यायात म्हटले आहे (५.३०–४१). त्याला बहिर्गीत असेही म्हटले आहे. – 'त्र्यश्रं चतुरश्रं' ही दोन तालांची नावे आहेत. – 'सर्वमेव' मुद्रित पाठ 'पूर्वमेव' आहे. – 'अपास्तम्' नाट्यातील गेयपदात ताल, चारी वगैरे नसतात हे वर आग्रहानें प्रतिपादिले आहे.

*या श्लोकानंतर बडोदे प्रतीत पुढील अधिक श्लोक कंसात दिला आहे –

**या नृत्यत्यासना नारी गेयं प्रियगुणान्वितम् ।**
**साङ्गोपाङ्गविधानेन तद्गेयपदमुच्यते ॥**

ह्या लास्यांगांच्या संबंधात टीकाकारांत मतभेद होते, इतकेच नव्हे तर त्यांच्या निरनिराळ्या व्याख्या प्रचलित होत्या यात शंका नाही.

**प्राकृतं यद्वियुक्ता[1] तु पठेदोत्तरसं स्थिता[2] ।**
**मदनानलतप्ताङ्गी स्थितपाठ्यं तदुच्यते ॥ १०६ ॥**

कामाग्नीने शरीराचा दाह होत असता विरहिणी स्त्री रसपूर्ण व प्राकृतात असलेले वचन उभी राहिली असता उच्चारते त्याला स्थितपाठ्य म्हणतात.

अथ स्थितप्रापि यल्लास्याङ्गं भविष्यति तदुपजीवितुमाह प्राकृतं यद्वियुक्ता त्विति । लास्येऽपि तावद् देवतानरपतिरञ्जनप्रधाने पाठ्यमस्ति । तच्चित्तग्रहणं हि तत्र गेयेनैव मध्ये वैचित्र्याय पाठ्येनापि क्रियते । तत्र स्थितेन पठ्यत आसीनेनेवेति पाठ्यगतं यदलौकिकं रञ्जनाङ्गं चित्रत्वं तस्मादङ्गादुपजीव्यते । तथा हि यद्वियुक्ता आतप्तापि सती प्राकृतभाषालक्षणयुक्तं तथात्तरसामिति रसोपयोगिस्थायिस्वरग्रहणपूर्वकं पठेत् । एतदलौकिकं सल्लास्याङ्गादुपजीव्यमानं स्थितपाठ्यम् । एतच्चावेशोपलक्षणम् । तेन क्रोधाविष्टोऽपि संस्कृतेन पठतीत्याद्यपि मन्तव्यम् । अन्ये तु बहुचारीयुतेन चच्चत्पुटेनोत्तरेण च स्थितपाठ्यमिति लक्षणं कुर्वन्ति, उदाहरन्ति रत्नावल्यां द्वितीयेऽङ्के राजा – 'उद्यामोत्कलिकाम्'

१ नि या वियुक्ता. २ नि -दासनसंस्थिता.

**इत्यादि इति तत्पूर्वमेव निरस्तम्। न च पाठ्येऽवसरोऽत्र तालस्त्र्यश्रः चतुरश्रो वा यथा तु लास्याङ्गत्वे। तत्सर्वं तालाध्याय एव वक्ष्यामः।**

आता स्थितपाठ्याला जवळ असणारे जे लास्यांग आहे त्यातून अनुरूप अंश घेण्यासाठी 'प्राकृतं यद्वियुक्ता तु' इत्यादी सांगतात. देवता अथवा नृपती यांचे रंजन करणाऱ्या लास्यामध्ये सुद्धा पाठ्य असते. त्यावेळेस त्यांचे चित आकर्षित केले जाते गाण्यानेच, पण मधून मधून वैचित्र्यासाठी पाठ्याने सुद्धा. त्यात बसलेल्या मनुष्याप्रमाणे उभा राहिलेला पठन करतो म्हणून त्या पाठ्यात असलेले जे अलौकिक रंजनात्मक वैचित्र्य त्या अंगापासून हे नाटकात उपयोगी होणारे अंग घेतले जाते. त्याप्रमाणे, विरहिणी स्त्री कामविह्वल झाली असताही प्राकृत भाषेच्या लक्षणांनी युक्त असे, तसेच आत्तरस म्हणजे रसाला अनुरूप अशा स्थिर स्वरांचा उपयोग करून पठन करते. हे अलौकिक असलेलें असे लास्यांगातून घेतलेले स्थितपाठ्य. आणि हे आवेशाचे उपलक्षण आहे. त्यामुळे क्रोधाविष्ट मनुष्य संस्कृतात सुद्धा पठन करतो असे समजावे. परंतु दुसरे टीकाकार पुष्कळ चारी असलेले, चच्चत्पुट व उत्तर यांनीं युक्त असे स्थितपाठ्याचे लक्षण करतात आणि रत्नावलीच्या दुसऱ्या अंकातील 'उद्दामोत्कलिकाम्' इत्यादी श्लोकाचे उदाहरण देतात. त्या मताचे पूर्वीच निराकरण केले आहे. आणि पाठ्यामध्ये त्र्यश्र किंवा चतुरश्र इत्यादी तालांना अवकाश नसतो जसा तो लास्याङ्गात असतो. ते सर्व आम्ही तालाध्यायातच सांगणार आहोत.

'स्थितप्रापि' म्हणजे नाटकात उपयोगी जे स्थितपाठय त्याच्या जवळ येणारे म्हणजे त्याच्यासारखे असणारे. – '-रञ्जनप्रधाने' मुद्रित पाठ '-रञ्जनप्रधानं' आहे. पण लास्यरूप नृत्त हे रञ्जनप्रधान आहे असे म्हणणे अधिक योग्य. – 'गेयेनैव' मुद्रितपाठ 'तेनैव' आहे. पण 'तत्र'ने 'लास्ये' समजणे आवश्यक असल्यामुळे 'तेन'ने लास्याचा निर्देश अभिप्रेत समजता येणार नाही. म्हणून 'गेयेन' असा पाठ अधिक समर्पक. – 'स्थितेन पठयत आसीनेनेवेति' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'स्थिते च पाठयतासीनोवेति' असा भ्रष्ट पाठ आहे. मुद्रित पाठ 'स्थिते च पठत्यासीनेवेति' असा आहे. यात 'स्थिते'च्या जागी 'स्थिता' अधिक समर्पक झाले असते. – '-स्थायिस्वरग्रहण-' मुद्रितात 'स्वर'च्या जागी 'रस' आहे. पण पाठयात विविध रसांच्या अनुरोधाने स्वरांची योजना भिन्न भिन्न प्रकारे करावयाची असते हे सतराव्या अध्यायात १२८–१३१ या गद्यपद्यात्मक अंशात सांगितले आहे त्याचाच येथे अनुवाद केला आहे असे दिसते. – 'एतदलौकिकं' मुद्रित पाठ 'एतल्लौकिकं' आहे. पण तो बरोबर नाही. लास्यांगांतून घेतलेले अंश अलौकिक असतात असे सर्वत्र म्हटले आहे. मुद्रितात यानंतर 'सत्'च्या ऐवजी 'यत्' आहे. ते सुद्धा बरोबर नाही. – 'आवेशोपलक्षणम्' मदनानलताप हा एक आवेश आहे, त्याचा निर्देश उदाहरणादाखल केला आहे. – 'तेन क्रोधाविष्टोऽपि इ०' याचा अर्थ असा की नाटकात जेथे जेथे एखादे पात्र कोणत्याही तीव्र भावनेचा आविष्कार करण्यासाठी उभ्याने पाठयाचा अवलंब करते तेथे तेथे स्थितपाठय असते. – 'चारी' पदविन्यास

करण्याच्या विविध प्रकारांना चारी असे नाव आहे. 'चच्चत्पुट' हे चतुरश्र तालाचे दुसरे नाव आहे. 'उत्तर' हा गीताचा एक प्रकार आहे (३१.२००-१). – 'न च पाठ्ये इ०' पाठ्यात तालाला अवसर नाही हे उघडच आहे.

ह्या श्लोकानंतर बडोदे प्रतीत पुढील श्लोक कंसात दिला आहे –

बहुचारीसमायुक्तं पञ्चपाणिकलानुगम् ।
चच्चत्पुटेन वा युक्तं स्थितपाठ्यं विधीयते ॥

**आसीनमास्यते यत्र सर्वा[1]तोद्यविवर्जितम् ।**
**[2]अप्रसारितगात्रं च [3]चिन्ताशोकसमन्वितम् ॥ १०७ ॥**

जेव्हा विरहिणी स्त्री गात्रांचा संकोच करून चिन्ता व शोक यांनी युक्त आणि कोणत्याही वाद्याची साथ नसलेले असे गायन बसून गाते तेव्हा त्याला आसीन म्हणतात.

**अथासीनपाठ्यादुपजीवनीयमंशमाह आसीनमास्यते यत्रेति । अत्यन्तशोकावेशेऽभिनयादिशून्यत्वेन यत्रास्यते उपरञ्जकचतुर्विधातोद्यवर्जितोऽतिसुकुमारकाकलीप्रायप्रमदागीतमात्रावशेषो यः, चित्रगानादपि च तत्र साध्यमानार्थस्य तस्याश्रूयमाणा या स्थितिः, तदासीनपाठ्यादुपजीवितेनासनांशेन योगतश्च सर्वत्र करुणादौ रञ्जनांशोपयोगि । तदाह चिन्ताशोकसमन्वितामिति । ... निःशब्द इति । तदनु अप्रसारितगात्रमित्यभिनयशून्यमित्यर्थः । सुप्रसारितगात्रमित्यपरे पठन्ति तत्रापि...**

आता 'आसीनमास्यते यत्र' यात आसीनपाठ्यातून घ्यावयाचा अंश सांगतात. शोकाचा आवेग अनिवार झाला असता अभिनयरहित होऊन प्रमदा जेथे बसते, उपरंजन करणाऱ्या चार प्रकारच्या वाद्यांनी विरहित, अगदी सुकुमार असे प्रायः काकली स्वरूपाचे स्त्रीचे गायनच अवशिष्ट असलेला जो अंश, त्यात वैचित्र्ययुक्त गायन असले तरी साध्य करावयाचे प्रयोजन कानावर पडत नाही अशी जी स्थिती असते तो, आसीनपाठ्यातून घेतलेल्या आसन ह्या अंशामुळे आणि योगामुळे करुण आदी रसांमध्ये सर्वत्र रंजनाला उपयोगी पडतो. म्हणून म्हणतात 'चिन्ताशोकसमन्वितम्' इत्यादी .... शब्दविरहित असा. त्याला अनुसरून 'अप्रसारितगात्रम्' म्हणजे अभिनयाशिवाय असा अर्थ. दुसरे 'सुप्रसारितगात्रम्' असा पाठ स्वीकारतात. त्या पाठात सुद्धा....

१ **नि** चिन्ताशोकसमन्वितम. २ **घो** अप्रसाधित-. ३ **नि** जिह्मदृष्टिनिरीक्षितम्.

या आणि पुढील श्लोकांवरील टीका पुष्कळ ठिकाणी त्रुटित झालेली आढळते. तसेच उपलब्ध भागातील बरेच पाठ सुद्धा भ्रष्ट आहेत. त्रुटींच्या ठिकाणी संपादकांनी परिपूर्ति सुचविली आहे. भ्रष्ट पाठ शुद्ध करण्याचाही त्यांनी प्रयत्न केलेला दिसतो. – 'यत्रास्यते' ही हस्तलिखितातील 'यत्र सोऽस्ते' ची सुचविलेली दुरुस्ती आहे. ती श्लोकातील पाठाला अनुसरून आहे. मुद्रित पाठ 'यत्र आस्ते सोंऽशः' असा आहे. पण 'सः' हे सर्वनाम प्रस्तुत ठिकाणी योग्य नसून पुढे 'यः' नंतर अधिक अनुरूप होईल. आणि तेथेच 'अंशः' शब्द पठन करणे किंवा अध्याहृत धरणे उचित होईल. – 'उपरञ्जकचतु-' ही 'उपरञ्जकश्चतु-' ची सुचविलेली दुरुस्ती आहे. मुद्रित पाठ 'उपरञ्जकगुणश्चतु-' असा आहे. उपरञ्जक हे अंशाचे विशेषण समजण्यापेक्षा आतोद्याचे विशेषण समजणे अधिक चांगले असे वाटते. घेतलेल्या अंशाला 'रञ्जनोपयोगि' असे पुढे म्हटले आहे. – 'काकली' हे कोमल स्वरात व मधुर आवाजात म्हटल्या जाणाऱ्या गाण्याचे नाव आहे. पण विशिष्ट स्वरूपातील निषाद स्वरालाही काकली अशी संज्ञा आहे (२८.३४ गद्य). – 'यः' नंतर 'अंशः' अध्याहृत धरावा लागतो. हस्तलिखितात 'जः' असे भ्रष्ट रूप आहे. – 'चित्रगानादपि इ०' हस्तलिखितात 'चित्रत्रिगानादपि च तत्र हि साध्यमात्रार्थस्य तस्याश्रूयमाणा च स्थिति' असा पाठ आहे. त्यात वरीलप्रमाणे दुरुस्ती सुचविली आहे. 'साध्यमान अर्थ' म्हणजे कथानकाचे जे प्रयोजन साध्य करावयाचे असते ते. गायन वैचित्र्ययुक्त असले तरी त्यातील शब्द प्रेक्षकांच्या कानावर पडत नसल्यामुळे त्या गाण्याचे कथानकातील प्रयोजन त्यांना प्रतीत होत नाही, अशा तऱ्हेचा अर्थ अभिप्रेत असण्याची शक्यता आहे. मुद्रितात येथील पाठ पुढीलप्रमाणे आहे – 'चित्तग्राही (स लौकिकः) लौकिकादपि च तत्र हि साम्यमात्रार्थस्य तस्याश्रयमाणा च स्थितिः'. हा पाठ मूळ असेलसे वाटत नाही. – 'तदासीनपाठ्याद्' मुद्रितात 'तद्' नंतर 'आसीनन्नामाङ्गं' हे शब्द अधिक आहेत. – 'योगतश्च' योग शब्द प्रयोग या अर्थी वापरलेला दिसतो. – '-समन्वितम्' यानंतर हस्तलिखितात 'असंश' अशी अक्षरे असून त्यापुढे त्रुटी व 'शब्द इति' ही अक्षरे आहेत. मुद्रितात पुढीलप्रमाणे सूचित पाठ आहे – 'अधःशय(नध्यानाधोमुखाद्यनुभावयुतम् । सर्वेति ध्यानविलापादिचिन्ताशोकानुभावेषु ततादेरप्रयोज्यतया तद्राहित्यमुक्तम्,) निःशब्दमिति भावः ।' हे सर्व मुळात असेल हे मान्य करणे कठीण आहे. – 'तत्रापि' या शब्दानंतर पुन्हा त्रुटी आहे. संपादकांनी पुढीलप्रमाणे पूर्ती सुचविली आहे– '(सोष्ठवाङ्गप्रदर्शनपृथग्यत्नराहित्येन) स्रस्तगात्रतयाभिनयशून्यतैव'. यातील आशय अभिप्रेत असण्याचा संभव आहे. – '-राहित्येन' नंतर कंस पूर्ण झाल्याचे चिन्ह मुद्रणदोषामुळे पडले आहे. हा कंस पुढील श्लोकावरील टीकेच्या प्रारंभी 'गान इति' या शब्दानंतर पूर्ण होतो.

**वृ[1]त्तानि विविधानि स्युर्गेयं गाने च संश्रितम् ।**
**चेष्टाभिश्चाश्रयः पुंसां यत्र सा पुष्पगण्डिका ।। १०८ ।।**

जेव्हा म्हटले जाणारे पद संगीताच्या आश्रयाने असते, त्यात विविध वृत्ते असतात आणि पुरुषांना उचित अशा चेष्टितांचा आधार घेतला जातो तेव्हा पुष्पगण्डिका होते.

१ नि यत्र स्त्री नरवेषेण ललितं संस्कृतं पठेत् ।
सखीनां तु विनोदाय सा ज्ञेया पुष्पगन्धिका ।।

**ततेन मध्ये सुषिरेण मध्येऽवनद्धेन मिश्रेण कृतो विचित्रभावः पात्राणां सुकुमारप्रयोगे...यद्वैचित्र्यम् । मालासादृश्यात्पुष्पगण्डिका गाननृत्तगीतगतिवैचित्र्ययोगात् ।... स च चेष्टाश्रयशब्दाभ्यां पर्यायेण योज्यः ।**

गाण्यात मध्ये ततवाद्याने मध्ये सुषिरवाद्याने मध्ये अवनद्धवाद्याने मिश्रित झाल्यामुळे आलेले वैचित्र्य, पात्रांच्या सुकुमारप्रयोगामध्ये.... जे वैचित्र्य ते. गान, नृत्य, गीत आणि गति यांच्या योगामुळे मालेशी सादृश्य उत्पन्न होते म्हणून पुष्पगण्डिका हे नाव.... आणि त्या शब्दाचा चेष्टा आणि आश्रय ह्या दोन शब्दांशी पर्यायाने अन्वय लावावयाचा.

ह्या श्लोकावरील टीकेचा पुष्कळच अंश गहाळ झाला आहे. प्रारंभीची अवतरणिका आणि श्लोकांतील काही शब्दांच्या व्याख्या लुप्त झाल्या आहेत. संपादकांनी पुढीलप्रमाणे प्रारंभी पाठ सुचविला आहे – 'पुष्पगण्डिकाख्यलास्याङ्गादुपजीव्यांशमाह वृत्तानीति । गान इति'. श्लोकात प्रारंभी असलेल्या 'वृत्तानि' ह्या शब्दाची अभिनवगुप्ताने व्याख्या केली असण्याचा संभव आहे. आणि नंतरच्या एका वाक्यावरून असे म्हणता येण्यासारखे आहे की गान, गीत, नृत्त आणि गति या चार गोष्टी म्हणजे 'विविधानि वृत्तानि' अशी व्याख्या त्याने केली असावी. तथापि तालाध्यायात पुष्पगण्डिकेत खञ्जन व नर्कुट हे वृत्तप्रकार असतात असे म्हटले आहे (३१.३४७). येथील 'वृत्तानि' मध्ये त्याचा निर्देश असण्याची शक्यता आहे. पुढे गेय म्हणजे गायन गानाच्या म्हणजे वाद्यसंगीताच्या आश्रयाने असते ह्यावरील व्याख्येचा काही भाग उपलब्ध आहे. लुप्त भागात 'मध्ये घनेन' हे शब्द असण्याची शक्यता आहे. – 'मिश्रेण कृतो' ही 'मिश्रेणाकृते' ची दुरुस्ती आहे. मुद्रित पाठ 'मिश्रणाकृतो' आहे. – 'सुकुमारप्रयोगे' मुद्रितात पुढीलप्रमाणे पाठ आहे – 'सुकुमारप्रयोगोऽभिनयेऽपि रञ्जक एव यद्यप्यलौकिकं यद्वैचित्र्यम् ।' यात संपादकांनी सुचविलेला अंश असावा असे वाटते. '-प्रयोगे' ऐवजी '-प्रयोगो' हा मुद्रणदोष असण्याची शक्यता आहे. – 'वैचित्र्ययोगात्' नंतर संपादकांनी पुढील पूर्ती केली आहे – (स्त्रीलिङ्गविवक्षया च स्त्रीपात्राणां पुष्पगण्डिकोक्ता । पुंसामिति)'. हे फारसे संभाव्य वाटत नाही. – 'स च... योज्यः' हस्तलिखितात 'योज्या' आहे आणि मुद्रितात 'सा च...योज्या' आहे. पण हे विधान 'पुष्पगण्डिका' शब्दाबद्दल केले असण्याची शक्यता नसून पुंसाम् ह्या शब्दाबद्दल केले असणार. त्या शब्दाचा एकदा 'चेष्टाभिः' शब्दाशी अन्वय करून पुन्हा 'आश्रयः' शब्दाशी अन्वय लावावयाचा असे येथे म्हटले आहे. म्हणून 'सः (शब्दः) योज्यः' अशी पुल्लिंगी रूपेच संभाव्य.

बडोदे प्रतीत यानंतर पुढील दोन अधिक श्लोक कंसात दिले आहेत. –

**यत्र स्त्री नरवेषेण ललितं संस्कृतं पठेत् ।**
**सखीनां तु विनोदाय सा ज्ञेया पुष्पगण्डिका ॥**
**नृत्तं तु विविधं यत्र गीतं चातोद्यसंयुतम् ।**
**स्त्रियः पुंवच्च चेष्टन्ते सा ज्ञेया पुष्पगण्डिका ॥**

यांपैकी पहिली व्याख्या बरीच निराळ्या स्वरूपाची आहे.

**प्रच्छेदकः स विज्ञेयो यत्र चन्द्रातपाहताः ।**
**स्त्रियः प्रियेषु सज्जन्ते ह्यपि विप्रियकारिषु ॥ १०९ ॥**

जेव्हा प्रतिकूल आचरण करणाऱ्याही प्रियकरांना चन्द्रातपाने विह्वल झालेल्या स्त्रिया आलिंगन देतात तेव्हा तो प्रच्छेदक असे समजावे.

**अथ प्रच्छेदकाङ्गकृतं वैचित्र्यं योजयितुमाह प्रच्छेदक इति । 'ज्योत्स्नायां मदिरायां वा सलिले दर्पणेऽथ वा । छायां कान्तस्य संदृश्य प्रहृष्याथ विभूषितम् ॥' इत्यादि प्रच्छेदकस्य लक्षण... पान ईषत्प्रतिबिम्बिततदाकृतिदर्शने सति कान्तायाः प्रहर्ष इति त्रिधा प्रच्छेदं प्रतिबिम्बमिति पर्य... 'गोरीचलणग्गलग्गपडिबिंबं' इत्यादि । तत्र त्रिविधे ज्योत्स्नैवोपयोगिनी... पानलीलापि स्वाधीनभर्तृकोचित-संभोगविशेषोपलम्भेन । एतदुक्तं भवति । लोकवृत्ते तावन्न सर्वदा संपूर्णचन्द्रोदयो भवति । प्रयोगे तु संभावनागर्भतया रसोपयोगी कालविशेषो गृहीतव्यः । तथा च रत्नावल्यां भूयसा चन्द्रोदयो वर्णितः 'संप्रत्येष सरोरुहद्युतिमुषः' इति, 'उदय-तटान्तरितम्' इति, वक्त्रेन्दौ तव सत्ययं यदपरः शीतांशुरभ्युद्गतः' इति । एवं रसोपयोग्यलौकिककालविशेषग्रहणं प्रच्छेदकादुपजीवितम् । यदाहुरुपाध्यायपादाः—**

**यद्यत्रास्ति न तत्रास्य कविर्वर्णनमर्हति ।**
**यत्रासंभवि तत्रास्य तद्वर्ण्यं सौमनस्यदम् ॥**
**देशोऽद्रिदन्तुरो द्यौर्वा तडित्कुण्डलमण्डिता ।**
**नदी कृष्णाऽथवा न स्यात्किं कदाचन कुत्रचित् ॥ इत्यादि ।**

आता प्रच्छेदक ह्या लास्यांगाने उत्पन्न झालेल्या वैचित्र्याची योजना करण्यासाठी 'प्रच्छेदकः' इत्यादी म्हणतात. 'चन्द्रप्रकाशात मदिरेमध्ये, पाण्यामध्ये किंवा आरशामध्ये प्रियकराचे प्रतिबिंब पाहून आनंदित होऊन विभूषित केलेल्या' इत्यादी वचनातील प्रच्छेदकाच्या लक्षणात .... पेयामध्ये किंचित प्रतिबिंबित झालेल्या प्रियकराच्या आकृतीचे दर्शन झाले असता कान्तेला आनंद होतो म्हणून तीन प्रकारे प्रच्छेद म्हणजे प्रतिबिंब.... 'पार्वतीच्या चरणांच्या नखांत ज्याचे प्रतिबिंब पडले आहे' इत्यादी. या तीनही प्रकारांत चन्द्रप्रकाशच उपयोगी असतो ... पानलीला सुद्धा स्वाधीनपतिकेला उचित अशा विशिष्ट संभोगाच्या प्राप्तीमुळे. याचा अर्थ असा. लोकरहाटीत पूर्ण चन्द्राचा उदय सदासर्वदा होत नाही. परंतु प्रयोगामध्ये संभाव्यता असल्यामुळे रसाला उपयोगी असा विशिष्ट काल समजावा लागतो. उदाहरणार्थ, रत्नावलीत पुष्कळदा चन्द्रोदयाचे वर्णन केले आहे : 'आता हा नृपसमूह कमळांहूनही अति सुंदर अशा' इत्यादी, 'उदयपर्वताच्या तटाने

झाकलेल्या' इत्यादी, 'तुझा मुखचन्द्र असताही हा दुसरा चन्द्र उगवला आहे' इत्यादी. याप्रमाणे रसाला उपयोगी अशा अलौकिक कालविशेषाची योजना प्रच्छेदकातून घेतली आहे. आमच्या गुरुजींनी यासंबंधात म्हटले आहे – 'जी गोष्ट ज्या ठिकाणी असते त्या ठिकाणी तिचे कवीने वर्णन करणे श्रेयस्कर नसते. जेथे ती संभवनीय नसते तेथे तिचे त्याने केलेले वर्णन आह्लाददायक होते. पर्वतांनी दंतुर झालेला देश, विद्युद्रूपी कुंडलाने मंडित आकाश, अथवा कृष्णवर्ण नदी – या गोष्टी कधीही कोठेही असणार नाहीत काय ?'

'ज्योत्स्नायां इ०' हा ३१ व्या तालाध्यायातील प्रच्छेदकाच्या वर्णनपर श्लोकांपैकी एक (३४९वा) आहे. – 'प्रच्छेदकस्य' मुद्रित पाठ 'त्रिधाप्रच्छेदकस्य' आहे. परंतु या ठिकाणी 'त्रिधा' आवश्यक नाही. – 'प्रतिबिम्बित-' ही मुळातील 'प्रतिविमलित-'ची सुचविलेली दुरुस्ती आहे. त्याचप्रमाणे पुढे 'प्रतिविमल' च्या जागी 'प्रतिबिम्ब' शब्द सुचविला आहे. प्रच्छेद शब्दाचा अर्थ सांगण्यासाठी पर्याय म्हणून प्रतिबिम्ब शब्द योजला आहे असे दिसते. मुद्रित पाठ 'प्रतिफलित-' आणि 'प्रति विमल (फलन?)' असे आहेत. ते अर्थबोधास सुगम नाहीत. – 'गोरीचलण-' शिवस्तुतिपर ही गाथा गुणाढ्याच्या बृहत्कथेत पैशाची प्राकृतात प्रारंभी मंगलश्लोक म्हणून होती. तिचे महाराष्ट्री प्राकृतातील रूप पुढीलप्रमाणे आढळते –

**पणमह पणअप्पकुविअगोरीचलणग्गलग्गपडिबिंबं ।**
**तंसु णहदप्पणेसु अ एआअस तणुअरं रुद्दं ॥**

'पानलीलापि' ही मुळातील 'धानलीलानि'ची सुचविलेली दुरुस्ती आहे. 'संप्रत्येष इ०' हा श्लोक वर ३३ व्या श्लोकावरील टीपेत उद्धृत केला आहे. – 'उदयतटा- इ०' हा संपूर्ण श्लोक पुढीलप्रमाण आहे –

**उदयतटान्तरितमियं प्राची सूचयति दिङ् निशानाथम् ।**
**परिपाण्डुना मुखेन प्रियमिव हृदयस्थितं रमणी ॥**

– वक्त्रेन्दौ तव इ०' हा श्लोक वर ३८ व्या श्लोकावरील टीपेत उद्धृत केला आहे. – 'यद्यत्रास्ति इ०' भट्ट तोताच्या या दोन श्लोकांत काही दुरुस्ती सुचविली आहे. दुसऱ्या ओळीत 'यत्नासंभवि' च्या जागी 'यत्रासंभवि' आणि चौथ्या ओळीत हस्तलिखितातील 'कृष्णा' च्या जागी 'नदी कृष्णा' असे पाठ सुचविले आहेत. मुद्रितात चौथ्या ओळीत 'ईदृक् स्यादथवा न स्यात्' असा पाठ आहे. 'कविः अस्य वर्णनं न अर्हति' ही शब्दरचना विशेष समाधानकारक नाही. पहिल्या श्लोकात भट्ट तोताच्या म्हणण्याचा आशय असा दिसतो – जी गोष्ट वास्तवात जशी असेल तशीच ती चितारणे यात कवीचे असे काही कौशल्य प्रतीत होत नाही. सामान्यतः संभाव्य नसणाऱ्या गोष्टी रसिकांना संभाव्य वाटावयास लावणे यात त्याचे खरे कौशल्य आहे. दुसऱ्या श्लोकात याची तीन उदाहरणे दिली आहेत. दन्तुर म्हणजे दात असलेला. देशाच्या संबंधात हे विशेषण असंभाव्य आहे. पण लक्षणेच्या साहाय्याने कवीने ते संभाव्य केले आहे. तसेच आकाशाला कुण्डलेल हे वाच्यार्था

असंभाव्य वचन कवीने संभाव्य बनविले आहे. काळ्या रंगाची नदी प्रत्यक्षात तशी काळी नसते. पण कवी ती आहे असे वाटावयास लावतो. श्लोकाच्या शेवटी जो प्रश्न विचारला आहे त्याचा आशय असा दिसतो की या गोष्टी प्रत्यक्षात कोठेही नसल्या तरी कविकल्पनेत त्यांचे अस्तित्व असते. प्रस्तुत संदर्भात भट्टतोताचे हे मत उद्धृत करण्याचे प्रयोजन असे की कोणत्याही दिवशी पूर्ण चन्द्राचा उदय प्रत्यक्षात संभवनीय नसला तरी कविकल्पनेने तो संभाव्य वाटावयास लावला आहे.

**अनिष्ठुरश्लक्ष्णपदं[1] समवृत्तैरलंकृतम् ।**
**नाट्यं पुरुषभावाढ्यं त्रिमूढकमिति स्मृतम्[2] ॥ ११० ॥**

सौम्य व मृदु शब्द असलेले, सम वृत्तांनी अलंकृत झालेले व पुरुषांच्या विविध भावांनी संपन्न असे जे नाट्य त्याला त्रिमूढक असे म्हणतात.

**अथ त्रिमूढकादुपयोगिनं भागं निरूपयितुमाह अनिष्ठुरश्लक्ष्णपदमित्यादि । त्रिमूढके तावल्लास्याङ्गे नायकस्य व्यलीकवशादेकस्या ईर्ष्यातोऽभिनवायाः प्रथमप्रणयबद्धलज्जादिनेति मोहस्त्रयाणाम् । तत्र नायकस्यावश्यमनिष्ठुराण्येवोदयनविषयाणीव वचांसि भवन्ति । तत इह वचसि रसोपयोगी गुणालंकारांशः स्वीकर्तव्यः । न हि लोके तद्वते माधुर्यौजःप्रभृतिगुणगणोऽस्ति । सर्वो ह्येवमाविष्टो यत्किंचिद्वदति तत्काव्यमेव स्यात्, छायामात्रेण त्वंशतः । सर्वो हि पूर्णत्वादनुपयोग्येव । तस्मादलौकिकमेवैतद्वैचित्र्यं रसोपयोगि । सर्वं तद्गुणग्रामकृतम् । समवृत्तैरित्यनेन वृत्तकृतवैचित्र्यं, पुरुषभावाढ्यमित्यनेन पात्रकृतमपि हेलाहावादि, एवं विशेषकृतं वैचित्र्यं तत्र नाट्येऽस्त्यथ च सौन्दर्यमस्तीति दर्शयन् गुणानामेवान्वयव्यतिरेकाभ्यां तत्र प्रभावं दर्शयति ।**

आता त्रिमूढकातून घ्यावयाच्या उपयोगी भागाचे निरूपण करण्यासाठी 'अनिष्ठुरश्लक्ष्णपदम्' इत्यादी सांगतात. त्रिमूढक ह्या लास्यांगामध्ये नायकाच्या अपराधीपणामुळे, एका नायिकेच्या ईर्ष्येमुळे, दुसऱ्या नूतन नायिकेच्या प्रथम प्रणयामुळे उत्पन्न होणाऱ्या लज्जा वगैरेमुळे, याप्रमाणे तिघांना मोह होतो. त्यांपैकी नायकाच्या उक्ती अवश्य उदयनाच्या उक्तींप्रमाणे सौम्यच असतात. त्यातून या ठिकाणच्या वचनात रसाला उपयोगी असा गुण व अलंकार यांचा अंश स्वीकृत करावयाचा आहे. कारण, त्याशिवाय ह्या लोकात माधुर्य, ओज प्रभृती गुणांचा समूह असत नाही. याप्रमाणे भावनेने भारलेला प्रत्येक जण जे काही बोलतो ते काव्यच असू शकते, परंतु अंशतः केवळ छायास्वरूपात. पूर्ण असल्यामुळे सर्वच्या सर्व उपयोगी होत नाही. म्हणून अलौकिक असेच हे वैचित्र्य

१ **नि** -स्वल्प-. २ **नि** -मुदाहृतम्.

रसाला उपयोगी होते. ते सर्व गुणसमूहामुळे होते. 'सम वृत्तांनी' याने निर्दिष्ट वृत्तांच्या उपयोगाने आलेले वैचित्र्य, 'पुरुषांच्या भावांनी संपन्न' याने निर्दिष्ट पात्रांच्या हेला, हाव आदींचे वैचित्र्य – याप्रमाणे वैशिष्ट्ययुक्त वैचित्र्य त्या नाट्यात असते आणि त्यामुळे सौन्दर्य उत्पन्न होते हे दाखवून अस्तिपक्षी आणि नास्तिपक्षी दोन्ही प्रकारच्या विधानांनी गुणांचाच तेथे प्रभाव असतो हे दाखवितात.

'व्यलीक' म्हणजे खोटा अथवा अपराधी असे दोन्ही अर्थ संभवतात. – 'ईर्ष्यातो' ईर्ष्येचा निर्देश तालाध्यायातील त्रिमूढकाच्या ३१.३५८ श्लोकावरील व्याख्येत केला आहे. तोच शब्द येथेही अभिप्रेत असणार. मुळात 'द्रेष्यतो' आहे. – 'उदयनविषयाणि' म्हणजे कवीने उदयनाच्या तोंडी घातली आहेत तशी वचने. हस्तलिखितात यानंतर 'इव' शब्द नाही. पण तो आवश्यक आहे असे दिसते. लास्याङ्ग त्रिमूढकात उदयनाच्या वचनांसारखी सौम्य वचने असतात, तेथून नाट्यात तशीच म्हणजे गुणालंकारांनी युक्त वचने रसोपयोगी म्हणून घेतली आहेत असे येथे म्हणावयाचे आहे, आणि याचे तात्पर्य म्हणून त्या लास्याङ्गातून गुण आणि अलंकार घेतले आहेत असे म्हटले आहे. – 'तद्दते' ही मुळातील 'यद्दते' ची सुचविलेली दुरुस्ती आहे. 'यत्' चा पुढे अन्वय लावता येण्यासारखा नाही. 'तत्' ने गुणालंकारांशः'चा निर्देश अभिप्रेत आहे असे समजता येईल. – 'एवमाविष्टः' म्हणजे व्यलीकभाव, ईर्ष्या, लज्जा आदी भावांनी आविष्ट झालेला असा अर्थ अभिप्रेत दिसतो. – 'छायामात्रेण त्वंशतः' याचा अर्थ स्पष्ट नाही. भावावेशाने मनुष्य बोलतो ते काव्यमय असू शकते, पण ते सर्वच बोलणे काव्यमय नसते, तर गुणालंकारांनी युक्त असा अंशच तसा असतो असा अर्थ असण्याची शक्यता आहे. 'छाया' शब्दाचे प्रयोजन नीट लक्षात येत नाही. – 'सर्वो हि पूर्णत्वात्' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'सर्वोऽ-पूर्णत्वात्' आणि मुद्रितात 'स एवापूर्णत्वात्' असे पाठ आहेत. वस्तुतः ह्या वाक्याचा अर्थही स्पष्ट नाही. मागील वाक्याच्या अनुरोधाने सर्व म्हणजे भावाविष्ट मनुष्य जे बोलतो ते सर्व अशा तऱ्हेचा अर्थ शक्य आहे. अपूर्ण असे त्याचे विशेषण समर्पक होणार नाही. पुढील वाक्याच्या अनुरोधाने सर्व म्हणजे त्रिमूढक लास्याङ्गाचा सर्व भाग असाही अर्थ असण्याची शक्यता आहे. – 'समवृत्तैः' ज्यांच्या चारही चरणांत तीच अक्षरसंख्या असते अशी वृत्ते. – 'हेलाहावादि' ही मुळातील 'हेलाभावादि' ची दुरुस्ती आहे. बाविसाव्या अध्यायात श्लोक १० मध्ये 'हाव' चे वर्णन असून ११ व्या श्लोकात 'हेला' चे वर्णन आहे –

**तत्राक्षिभ्रूविकाराढ्यः शृङ्गाराकारसूचकः।**
**सग्रीवारेचको ज्ञेयो हावः स्थितसमुत्थितः॥**
**यो वै हावः स एवैषा शृङ्गाररससंभवा।**
**समाख्याता बुधैर्हेला ललिताभिनयात्मिका ॥ (२२.१०–११).**

हाव आणि हेला यांच्या व्याख्या अभिनवगुप्ताने पुढे ११३ व्या श्लोकावरील टीकेत अंशतः उद्धृत केल्या आहेत. – 'तत्र नाट्ये' मुळात 'यत्र' आहे. पण त्याचा पुढे अन्वय लागत नाही. 'अन्वयव्यतिरेकाभ्याम्' 'अनिष्ठुर' यात व्यतिरेक आहे आणि 'श्लक्ष्णपद' यात अन्वय आहे.

पात्रं[1] विभ्रष्टसंकेतं सुव्यक्तकरणान्वितम् ।
प्राकृतैर्वचनैर्युक्तं विदुः सन्धवकं बुधाः ॥ १११ ॥

संकेतांपासून च्युत झालेले, सुस्पष्ट अशा क्रियांनी अन्वित असलेले आणि प्राकृत वचनांनी युक्त असलेले जे पात्र त्याला सुद्धा प्राज्ञ लोक सैन्धवक म्हणतात.

अथ सैन्धवकादुपजीव्यमंशं स्वीकर्तुमाह पात्रं विभ्रष्टसंकेतमिति । 'सैन्धवीमाश्रितं भाषां ज्ञेयं सैन्धवकं बुधैः । रूपवाद्यादिसंयुक्तम्' इति लास्याङ्गं लक्ष्यते । तत्र यदा नान्यप्राकृतादिभाषोपकरणत्वेन सैन्धवीप्राया आश्रीयते तद्रसोपयोगिरञ्जनादिः तदा अलौकिकोऽयमर्थो रञ्जनोपयोगी लास्याङ्गात्स्वीकृतो भवति । तथाहि शृङ्गाररसे सातिशयोपयोगिनी प्राकृतभाषेति सट्टकः कर्पूरमञ्जर्याख्यो राजशेखरेण तन्मय एव निबद्धः, भेज्जलेन राधाविप्रलम्भाख्यो रासकाङ्कः सैन्धवभाषाबाहुल्येन, चन्द्रकेण स्वानि रूपकाणि वीररौद्राधिकोपयोगिसंस्कृतभाषयैव । अत एव च तत्तद्रसोपयोगतारतम्यादेकैतमस्यातोऽन्यस्यात्र प्राधान्य कल्प्यते । तदेतदाह पात्रमित्यादिना । जातावेकवचनम् । तेन यत्र पात्राणि प्राकृतैर्वचनैर्युक्तानि । अत एव विभ्रष्टः संकेतविशेषो रसोचितः काक्वध्याये कथितपूर्वः स एष भ्रष्टात्मा भ्रंशं नीतः यत्र, सुष्ठु व्यक्तिर्यतो रसस्य तेनैव करणेन वीणावाद्यादिक्रिययान्वितं पात्रं सैन्धवकमिति । विषयतद्वतोरभेदोपचारात् । तेन दशरूपकस्य यद्भाषाकृतं वैचित्र्यं कोहलादिभिरुक्तं तदिह मुनिना सैन्धवाङ्गनिरूपणे स्वीकृतमेव । करुणान्वितमिति त्वपपाठः । एवं पाठ्यविहीनं सैन्धवकमिति यथा रत्नावल्यां विदूषको नृत्यतीति प्रियातिथिप्रभृति मुनिमतोपेक्षयैव लक्षणमुदाहरणं च कृतं न चोक्तं युक्त्या किंचिदित्यसदेव ।

आता सैन्धवक ह्या लास्यांगातून घ्यावयाच्या अंशाचा स्वीकार करण्यासाठी 'पात्रं विभ्रष्टसंकेतम्' इत्यादी सांगतात. ह्या लास्यांगाचे लक्षण पुढीलप्रमाणे करणार आहेत — 'सैन्धवी भाषेचा उपयोग करणारे, रूप, वाद्य आदींनी युक्त ते सैन्धवक असे प्राज्ञ लोकांनी जाणावे'. त्यात जेव्हा अन्य प्राकृत आदी भाषेचे उपकरण नसलेली अशा स्वरूपात, त्यातील रसाला उपयोगी आणि रंजन आदी करणारी म्हणून सैन्धवी भाषेचा उपयोग केला जातो तेव्हा हा अलौकिक असा रंजनाला उपयोगी प्रकार लास्यांगातून स्वीकृत केला जातो. उदाहरणार्थ, शृङ्गाररसामध्ये प्राकृत भाषा अतिशय उपयोगी

१ नि पात्रविस्मृत-.

म्हणून राजशेखराने कर्पूरमञ्जरी नावाचे सट्टक त्याच भाषेत लिहिले आहे, भेज्जलाने राधाविप्रलम्भ नावाचे एक अंकी रासक सैन्धव भाषेचा पुष्कळ प्रमाणात उपयोग करून लिहिले आहे आणि चन्द्रकाने आपली रूपके वीर आणि रौद्र रसांना अधिक उपयोगी असलेल्या संस्कृत भाषेतच लिहिली आहेत. आणि म्हणूनच त्या त्या रसात होणाऱ्या उपयोगाच्या कमीअधिक प्रमाणानुसार ह्या भाषांपैकी एकीचे प्राधान्य कल्पिले जाते. तेच 'पात्रम्' इत्यादी श्लोकात सांगतात. पात्रम् शब्दातील एकवचन जातिनिदर्शक आहे. म्हणून ज्यात पात्रें प्राकृत भाषेत बोलतात ते असा अर्थ. म्हणूनच काक्वध्यायात पूर्वी सांगितलेले रसाला अनुरूप असे जे विशिष्ट संकेत ते विभ्रष्ट झाले आहेत असे, ज्यापासून रसाची उत्तम प्रकारे अभिव्यक्ती होते असे आणि त्याच करणाने म्हणजे वीणावादनादी क्रियेने युक्त असे पात्र ते सैन्धवक. विषय आणि विषयी यांच्यात अभेद असल्याच्या उपचारामुळे पात्राला सैन्धवक म्हटले आहे. म्हणून कोहल प्रभृतींनी भाषेच्या अनुरोधाने दहा रूपकांच्या प्रकारांचा जो निर्देश केला आहे त्याचा भरतमुनीने येथे सैन्धवक अंगाच्या निरूपणात स्वीकार केलाच आहे. 'करुणान्वितम्' हा पाठ तर चुकीचाच आहे. त्याचप्रमाणे 'पाठ्यविरहित ते सैन्धवक', उदाहरणार्थ रत्नावलीत 'विदूषक नाचतो' प्रिय गोष्टीने आनंद वगैरे अशी जी भरतमुनीच्या मताची उपेक्षा करूनच लक्षण व उदाहरणे उद्धृत केली आहेत आणि त्याबद्दल कोणताही युक्तिवाद केला नाही म्हणून तेही बरोबर नाहीच.

'सैन्धवीमाश्रित इ०' ह्या श्लोकाचा चतुर्थ चरण 'युग्मतालकृतं तथा ॥' (३१.३५९) असा आहे. त्या श्लोकातील 'रूप' म्हणजे वादनाचा एक प्रकार असा अर्थ असावा. २९.११३ वरील टीकेत अभिनवगुप्ताने तो अर्थ दिला आहे. सैन्धवी म्हणजे सिन्धु नदीच्या तीरावर राहाणाऱ्या लोकांत प्रचलित असलेली प्राकृत भाषा. पंजाब ते सिंध यातील कोणता विशिष्ट प्रदेश अभिप्रेत आहे ते निश्चित नाही. सतराव्या अध्यायात अनेक प्राकृत भाषांचा निर्देश आहे, त्यात सैन्धवीचे नाव नाही. – 'नान्यप्राकृता-' या समासाचा तात्पर्यार्थ 'स्वतंत्रपणे' असा आहे. – 'तद्रसोपयोगिरञ्जनादिः' असा हस्तलिखितात पाठ आहे. 'सैन्धवीप्राया भाषा'चे ते विशेषण आहे असे समजता येण्यासारखे आहे. 'तद्' ने सैन्धवी भाषेचा उपयोग असलेल्या रूपकाचा निर्देश अभिप्रेत आहे असे मानता येईल. मुद्रितातील पाठात 'रञ्जनाधिक्यात्' असा स्वतंत्र शब्द आहे. यानंतरचा 'तदा' शब्द मुद्रितात नाही. पण तो आवश्यक वाटतो. – 'तत्तद्रसोपयोग- इ०' याचा अर्थ असा की रूपकाची भाषा त्यातील रसाच्या अनुरोधाने संस्कृत, प्राकृत यापैकी कोणतीही असू शकेल. हा निष्कर्ष सैन्धवक लास्याङ्गाच्या व्याख्येतून काढला आहे. – 'काक्वध्याये' म्हणजे काकुविषयक सतराव्या अध्यायात. तेथे ११४–१३१ ह्या भागात रसाच्या अनुरोधाने पाठ्यातील स्वरयोजनेसंबंधी काही संकेत निर्दिष्ट केले आहेत. – 'भ्रष्टात्मा' या शब्दापुढील हस्तलिखितातील पाठ अत्यंत भ्रष्ट आहे. वर स्वीकारलेला पाठ मुद्रितानुसारी आहे, फक्त मुद्रितात 'नीतः' नंतर 'संकेतो' शब्द अधिक आहे. – 'सुष्ठु व्यक्तिर्यतो रसस्य' असे दिसते की अभिनवगुप्ताचा द्वितीय चरणातील पाठ 'सुव्यक्तं करणान्वितम्' असा होता. 'यतः' म्हणजे 'यस्मात् पात्रात्'. – 'विषयतद्वतोः' सैन्धवक हा विषय आणि पात्र हा विषयिन्. यांच्यात अभेद

कल्पिल्यामुळे पात्राला सैन्धवक म्हटले आहे. – 'प्रियातिथिप्रभृतिः' असा हस्तलिखितातील पाठ आहे. त्यात 'अतिथि' शब्द सर्पमक नाही. प्रिय म्हणजे मनासारखी गोष्ट घडल्यामुळे होणाऱ्या आनंदाचे प्रदर्शन असा अर्थ येथे अभिप्रेत असावा. मुद्रितात 'प्रियाप्रतिनिधिप्रभ्रंशः' असा पाठ आहे. त्याने अर्थ कोणत्याही तऱ्हेने सुगम होत नाही. – 'उदाहरणम्' मुद्रित पाठ उदाहृतम्' आहे. पुढे 'कृतम्' असल्यामुळे हा पाठ मूळ असण्याची शक्यता कमी.

वरील टीकेच्या शेवटी निर्दिष्ट केलेल्या मतान्तराला धरून असलेली सैन्धवकाची व्याख्या' देणारा श्लोक बडोदे प्रतीत प्रस्तुत श्लोकानंतर कंसात दिलेला आढळतो –

**रूपवाद्यादिसंयुक्तं पाठ्येन च विवर्जितम् ।**
**नाट्यं हि तत्तु विज्ञेयं सैन्धवं नाट्यकोविदैः॥**

**मुखप्रतिमुखोपेतं[1] चतुरश्रपदक्रमम् ।**
**श्लिष्टभावरसोपेतं वैचित्र्यार्थं द्विमूढके ॥ ११२ ॥**

मुख आणि प्रतिमुख यांनी युक्त, चारही दिशांना पदन्यास असलेले आणि सुश्लिष्ट भाव व रस यांनी समृद्ध असे नाट्य द्विमूढकामध्ये वैचित्र्य उत्पन्न करण्यासाठी योजतात.

द्विमूढकाद्वैचित्र्यांशं स्वीकरोति मुखप्रतिमुखमित्यादिना । यत्र काव्ये लास्यगीताश्रये द्वयोर्नायकस्य नायिकायाश्च नायिकयोरेव वा त्रिमूढक इव मोहो व्यावर्ण्यते तत्र तालनिरूपणायामेकस्तालश्चतुर्भिः पादैर्युक्तः सन्नावर्तत इति वक्ष्यते –

मुखप्रतिमुखोपेतं तथा चाचपुटाश्रयम् ।
यथाक्षरैः संनिपातैस्तथा द्वादशभिर्युतम् ॥ इति ।

तस्मादङ्गाङ्गपरिक्रमे यदेव तालानुसरणं चतुर्षु च मुखेषु गतिपरिसमापनं लोके गत्यादावपरिदृष्टमपि नटसामाजिकवर्गसंविधत्वापादनेन साम्यांशस्यानन्दस्वभावतया रसांशेतराङ्गत्वादतिशयेन रसोपयोगीति तत्स्वीकृतम् । मुखं यदग्रे सामाजिकाः प्रतिमुखं ततोऽन्या दिशो, लास्याङ्गं नेतुं मुखप्रतिमुखे गीतकाङ्गत्वेन चतुरश्रं कृत्वा क्रान्तदिक्चतुष्टयैः पदैः क्रमणं यत्रेति । किमेवं सति भवतीत्याह वैचित्र्यार्थम्, वैचित्र्यमत्र प्रयोजनमिति । तेनापि किमिति चेत्तत आह श्लिष्ट-

१ नि शुभार्थगीताभिनयं चतुरस्रपदक्रमम् ।
स्पष्टभावरसोपेतं व्याजचेष्टं द्विमूढकम् ॥

भावेन सर्वसाम्यलक्षणेन चित्तवृत्तिसंघट्टनेन रसानामुपेतमुपगतं स्फुटत्वं येनेति । गीतकाङ्गाभ्यां मुखप्रतिमुखाभ्यामङ्गसौष्ठवेन रसभावैर्नायिकाद्वयरचनया च युतमिति श्रीशङ्कुकाद्याः । तच्च प्रागेव परीक्षितम् । मुखप्रतिमुखौ संधी इत्येतदपि न समीचीनम् अनुपयोगादस्यार्थस्य, इत्युपाध्यायमतमेवानवद्यमावेदितपूर्वं ग्राह्यम् ।

'मुखप्रतिमुखम्' इत्यादी शब्दांत द्विमूढक ह्या लास्याङ्गातून वैचित्र्यपूर्ण अंशाचा स्वीकार करतात. जेथे लास्यातील गीताला आश्रयभूत असलेल्या काव्यामध्ये दोघांच्या म्हणजे नायक व नायिका यांच्या किंवा दोन नायिकांच्याच मोहाचे त्रिमूढकातल्याप्रमाणे वर्णन केले जाते तेथे तालाचे निरूपण करताना एक ताल चार पदक्रमणाने युक्त असून त्याची आवृत्ती होते असे सांगणार आहेत – 'मुख आणि प्रतिमुख यांनी युक्त, तसेच चाचपुट तालाच्या आश्रयाने असलेले, तसेच अक्षरांच्या अनुरोधाने बारा संनिपातांनी युक्त (ते द्विमूढक)'. म्हणून प्रत्येक अंगाच्या परिक्रमणामध्ये जे तालाचे अनुसरण आणि चार दिशांना होणारी गतीची परिसमाप्ती ह्या गोष्टीच लौकिक गती वगैरेमध्ये दिसून येत नसल्या तरी नट आणि प्रेक्षकवर्ग यांच्यात सांनिध्य उत्पन्न करून – साम्याचा अंश स्वभावतः आनन्ददायक असल्याकारणाने – रस खेरीज करून इतर अंशाच्या अंगभूत होतात म्हणून रसाला अत्यंत उपयोगी होतात, यास्तव त्या स्वीकृत केल्या आहेत. मुख म्हणजे समोर प्रेक्षक असतात ती दिशा आणि प्रतिमुख म्हणजे तिच्याहून अन्य दिशा; लास्याङ्ग सिद्ध करण्यासाठी मुख आणि प्रतिमुख दिशांत गीताचे अंग म्हणून चार वेळा चार दिशांना केलेला पदांचा विन्यास ज्यात आहे ते द्विमूढक. असे केले असता काय होते याचे उत्तर 'वैचित्र्यार्थम्' या शब्दात देतात. वैचित्र्य हे याचे प्रयोजन असा अर्थ. त्यामुळे तरी काय होते ते सांगतात – श्लिष्ट भावाने म्हणजे सर्वसाम्य स्वरूपाच्या चित्तवृत्तीच्या संघटनामुळे रसांना जेणेकरून स्फुटता येते ते. श्रीशङ्कुकप्रभृतींचे असे मत आहे की हे नाट्यांग मुख आणि प्रतिमुख ह्या गीताच्या अंगांनी, अंगसौष्ठवाने, रस आणि भाव यांनी आणि दोन नायिकांच्या योजनेने युक्त असते. त्या मताचा समाचार पूर्वीच घेतला आहे. मुख आणि प्रतिमुख हे दोन संधी हा अर्थ सुद्धा योग्य नाही, कारण तो निरुपयोगी आहे. म्हणून वर मांडलेले आमच्या गुरुजींचे मतच निर्दोष असे समजावे.

'लास्यगीताश्रये' ही मुळातील 'लास्यमित्याश्रये' ची सुचविलेली दुरुस्ती आहे. 'मिति' म्हणजे मान असा मधला शब्द आहे हे संभाव्य असले तरी तो अर्थबोधास निरुपयोगी आहे.

लास्यनृत्ताला गीताची साथ असतेच. – 'नायिकयोरेव वा' हस्तलिखितात 'वा' चे 'पा' असे भ्रष्ट रूप आहे. मुद्रितात 'एव' नाही. – 'त्रिमूढक' ही हस्तलिखितातील 'तिमूढक' ची दुरुस्ती आहे. मुद्रितात 'प्रतिमूढक' असा पाठ आहे. त्याला अर्थ नाही. त्रिमूढकात तिघांना मोह होतो तर द्विमूढकात दोघांनाच. – 'तालनिरूपणायाम्' म्हणजे ३१ व्या तालाध्यायात. – 'वक्ष्यते' येथे उद्धृत केलेले वचन ३१.३६०-३६१ मध्ये आढळते. त्या ठिकाणी मुख आणि प्रतिमुख ही नृत्ताच्या दोन अंशांची नावे असा अर्थ अभिप्रेत आहे. नृत्ताच्या एकूण चार भागांचा निर्देश ३१.८८ मध्ये आहे. चाचपुट हे त्र्यश्र तालाचे दुसरे नाव. संनिपात म्हणजे दोन्ही हातांची मृदङ्गावर वगैरे एकाच वेळी थाप (हस्तयोस्तु समः पातः संनिपात इति स्मृतः – ३१.३७). यथाक्षर म्हणजे नृत्ताच्या वेळी गात असलेल्या गीतातील अक्षरांना अनुसरून केले जाणारे संनिपात. ते द्विमूढक लास्याङ्गात बारा असतात. – 'अङ्गाङ्गपरिक्रमे' हे नाट्यात होणाऱ्या परिक्रमाला अनुलक्षून म्हटले आहे. नाटकांत परिक्रमणाने एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाण्याचा अभिनय होतो हे प्रसिद्ध आहे. 'अङ्ग' शब्दाच्या द्विरुक्तीचे प्रयोजन स्पष्ट नाही. कदाचित 'नाट्याङ्ग' असा मूळ पाठ असावा. – 'सविधत्वापादनेन' ही हस्तलिखितातील 'सविधव्यापादनेन' ची दुरुस्ती आहे. मुद्रितात 'सविधाध्यासनेन' असा पाठ स्वीकारला आहे तो संभाव्य वाटत नाही. परिक्रमणाने नट व प्रेक्षक यांत सांनिध्य उत्पन्न होते असे येथे म्हटले आहे. – 'साम्यांशस्य' नाट्यातील परिक्रमणात असलेली गती प्रत्यक्ष लोकांत दिसून येत नसली तरी तिचे लौकिक गतीशी काहीसे साम्य असल्याचा प्रेक्षकांना प्रत्यय येतो आणि हा प्रत्यय आनंदप्रद असतो असे येथे म्हणावयाचे आहे. – 'रसांशेतराङ्गत्वात्' गतीतील साम्याच्या प्रतीतीने होणारा आनंद हा रसोत्पत्तीस साक्षात कारणीभूत होणारा नसून त्याहून भिन्न असे नाट्याचे एक अंग आहे. तथापि, रसाच्या एकूण परिपोषाला तो साहाय्यकच होतो. – 'प्रतिमुखं ततोऽन्या' ही हस्तलिखितातील 'प्रतिमुख्यन्तरोऽन्या' ची दुरुस्ती आहे. मुद्रित पाठ 'प्रतिमुखयस्ततोऽन्या' असा आहे. पण 'प्रतिमुखी' असा शब्द अभिप्रेत असण्याचा संभव नाही. – 'लास्याङ्गं नेतुम्' याचा अर्थ स्पष्ट नाही. वस्तुतः 'लास्याङ्गात करतात त्याप्रमाणे' चार दिशांना पदन्यास करून अशा तऱ्हेचा अर्थ येथे अपेक्षित आहे. 'गीतकाङ्गत्वेन' हे वर्णन लास्याङ्गाच्या बाबतीतच समर्पक आहे, नाट्यातील परिक्रमणाच्या बाबतीत नाही. त्यामुळे असा संभव वाटतो की ह्या शब्दानंतर मुळात 'इव' शब्द असावा. मुद्रितात त्यानंतर 'हि' शब्द आहे. पण त्याचे काही प्रयोजन दिसत नाही. – 'त्रिचतुरश्रं कृत्वा' असा हस्तलिखितातील पाठ आहे. तो मूळ आहे असे मानले तर त्यात त्र्यश्र किंवा चाचपुट तालाचा निर्देश आहे असा संभव मानता येईल. तथापि मूळ श्लोकात 'चतुरश्र' एवढाच शब्द असल्यामुळे 'त्रि-' मूळ नाही असे वाटते. मुद्रितात 'त्रि' च्या ऐवजीच 'हि' हा पाठ स्वीकारलेला दिसतो. – 'श्लिष्टभाव' याचा अर्थ चित्तवृत्तीचे संघट्टन, दृढीकरण असा केला आहे आणि ह्या चित्तवृत्तीचे स्वरूप साम्याची प्रतीती होणे हे आहे असे म्हटले आहे. – 'उपेतम्' हा शब्द मुद्रितात चुकीने गळलेला दिसतो. – 'गीतकाङ्गाभ्याम् इ०' श्रीशङ्कुकाच्या मते मुख आणि प्रतिमुख ही गीताची अङ्गे होत. उल्लोप्यक आणि उत्तर नावाच्या दोन गीतप्रकारांत मुख आणि प्रतिमुख ही अंगे असल्याचे नाट्यशास्त्रात (३१.२२४) म्हटले आहे. – 'अङ्गसौष्ठवेन' ही व्याख्या श्लोकातील 'चतुरश्रपदक्रमम्' ला अनुलक्षून श्रीशङ्कुकाने केली आहे. – 'प्रागेव' म्हणजे नाट्यात संपूर्ण लास्याङ्ग घेतले जात नाही, तर त्यातील फक्त रसोपयोगी असा अलौकिक अंश असे प्रतिपादन करताना.

उत्तमोत्तमकं विद्यादनेकरससंश्रयम् ।
विचित्रैः श्लोकबन्धैश्च हेलाहावैर्[1]विभूषितम्[2] ॥ ११३ ॥

अनेक रसांना आधारभूत, निरनिराळ्या श्लोकांत रचलेले आणि हेला व हाव यांनी सुशोभित अंग ते उत्तमोत्तमक असे समजावे.

अथोत्तमोत्तमकमङ्गं नाट्ये उपयोजयितुमाह उत्तमोत्तमकं विद्यादनेकरससंश्रयमित्यादि । 'उत्तमोत्तमके त्वादौ नर्कुटं संप्रयोजयेत्' इत्यादिना 'हेलाहावविभूषितम्' इत्यन्तेन लास्याङ्गं लक्षयिष्यते । तत्र च चित्तवृत्तिपरिपोषो हेलाहावादिचेष्टालंकारमुखेन यः स्थितः सोऽत्रालौकिकः सन्नुपजीव्यते । न हि भगवदवतारस्य रामस्य कुलकलत्रमुपेक्ष्यं पराभवखलीकारश्च न सोढव्यः क्षत्रियेण च लोककण्टकाभ्युद्धरणं कर्तव्यमिति यच्छास्त्रार्थपरिपालनमुक्त्वा रावणहृतसीतासमानयनादारभ्य तदुचितं निमित्तं परमार्थं, न तु यथा प्रति तत्र मुहुर्व्याधूता... स्त्रादृशमित्यादि वर्ण्यते तथास्य तृतीयत्रेतावतीर्णस्य संभाव्यते । रामायणेऽपि मुनिना तथा वर्णितमिति चेत् किमतः । वेदेऽपि हि तथा वर्ण्यताम्, न वयमतोऽपि बिभीमः । स हि भागः काव्यं यत्र यत्र रसनिष्यन्दो वर्ण्य इत्युक्तमसकृत् । ततश्चान्यतररञ्जनोपक्रमाविनेयहृदयसंवादिवैचित्र्यांशोऽसौ नाट्ये लास्याङ्गप्रसादोपनत एव । उत्तमानि तावल्लास्याङ्गानि तेभ्योऽपीदमुत्तमम् । सर्वं हि रसपर्यायीति दर्शितं प्राक् । ततः संज्ञायां कन् । अनेकस्यासाधारणस्य रसस्य संश्रयोऽस्मिन्निति स्थायिनोऽनेकरूपत्वमुक्तम् । श्लोके च बध्यन्त इति श्लोकबन्धा विधास्तैर्विविधैः परमार्थतोऽभूतैः क्वचित्कदाचित् संभवमात्रतया वर्णितैः युक्तम् । यथा 'आः दुरात्मन् रक्षः, क्व नु खलु मे प्रियतमामादाय गच्छसि । (विभाव्य) नवजलधरः संनद्धोऽयम्' इत्यादि पुरूरवस उक्तिश्चानुरागेणैव व्याख्यातेति किं पुनरुक्त्या । हेलाहावैर्विशेषेण दीप्ततोपगमनरूपेण भूषितमिति सात्त्विकाद्यभिनयवर्गस्य दीप्ततोपलक्षिता ।

तत्राक्षिभ्रूविकाराढ्यः शृङ्गाराकारसंयुतः ।
सग्रीवारेचको ज्ञेयो हावः स्थितसमुत्थितः ॥
य एव हावः सा हेला ललिताभिनयात्मिका ।

इति हेलाहावयोर्लक्षणम् ।

१ घो हेलाभाव-. ५ ब -विचित्रितम्.

आता उत्तमोत्तमक ह्या लास्यांगाची नाट्यात योजना करण्यासाठी 'उत्तमोत्तमकं विद्यादनेकरससंश्रयम्' इत्यादी सांगतात. 'उत्तमोत्तमकामध्ये प्रथम नर्कुटाची योजना करावी' येथपासून ते 'हेला आणि हाव यांनी विभूषित' येथपर्यंत ह्या लास्यांगाचे लक्षण सांगितले जाणार आहे. त्यात हेला, हाव इत्यादी चेष्टितरूप अलंकारांच्या द्वारा जो चित्तवृत्तीचा परिपोष स्थिर होतो तो ह्या ठिकाणी अलौकिक अशा रूपात स्वीकृत केला जातो. भगवन्ताचा अवतार असलेल्या रामचन्द्राला कुलकलत्राची उपेक्षा करणे योग्य नव्हते, आणि पराभवाचा अपमान सहन करता येण्यासारखा नव्हता, तसेच क्षत्रियाने दुष्टांचे निर्दलन केले पाहिजे ह्या शास्त्राच्या आज्ञेचे परिपालन करावयाचे आहे असे म्हणून रावणाने अपहरण केलेल्या सीतेला परत आणणे ह्या त्याच्या कृत्याचे तेच खरोखरीचे निमित्त, परंतु.... इत्यादी वर्णन करतात त्याप्रमाणे तृतीय त्रेतायुगात अवतीर्ण ह्या रामाच्या बाबतीत संभवत नाही. वाल्मीकिमुनीने रामायणात सुद्धा तसे वर्णन केले आहे असे म्हटले तर आम्ही विचारतो की म्हणून काय झाले ? वेदांत सुद्धा तसे वर्णन केलेले असू द्या, त्याला सुद्धा आम्ही भीत नाही. तोच भाग काव्य की जेथे जेथे रसाची अभिव्यक्ती वर्णनाचा विषय होते असे आम्ही अनेकदा सांगितले आहे. आणि म्हणून एक प्रकारच्या रंजनाच्या द्वारा उपदेशास योग्य अशा प्रेक्षकांच्या हृदयाशी संवादिता साधणारा असा जो वैचित्र्यरूप अंश तो नाट्यात लास्यांगाच्या कृपेनेच आलेला असतो. लास्यांगे ही उत्तम असतात. त्यांपेक्षाही हे अङ्ग अधिक उत्तम, म्हणून उत्तमोत्तम. कारण नाट्यात सर्व काही रसाभोवती फिरणारे असते हे आम्ही पूर्वी दाखवून दिले आहे. त्या शब्दाला संज्ञार्थी क प्रत्यय लागला आहे. अनेक म्हणजे असाधारण अशा रसाचा ज्यात संश्रय असतो ते, यात स्थायिभावाची अनेकरूपता निर्दिष्ट केली आहे. आणि श्लोकामध्ये बंदिस्त केले जातात ते श्लोकबन्ध म्हणजे प्रकार, त्या विविध, वास्तवात अस्तित्वात नसलेल्या परंतु क्वचित कदाचित केवळ संभाव्य म्हणून वर्णिलेल्या, प्रकारांनी युक्त असे उत्तमोत्तमक. उदाहरणार्थ, विक्रमोर्वशीयात चौथ्या अंकातील पुरूरव्याची उक्ती 'हा ! दुष्ट राक्षसा ! माझ्या प्रियेला घेऊन तू कोठे चाललास ? ( नीट पाहून ) हा कटिबद्ध झालेला नूतन मेघ आहे' इत्यादीची उपपत्ती अनुरागानेच लागते. तेव्हा हे सर्व पुन्हा कशाला सांगावे? हेला आणि हाव यांनी विशेषेकरून म्हणजे दीप्त स्वरूपात अभिव्यक्त होऊन भूषित असे – याने सात्त्विकप्रभृती अभिनयप्रकारांची दीप्तता निर्दिष्ट होते. हेला आणि हाव यांचे लक्षण असे केले आहे – 'त्यांत नेत्र आणि भ्रुकुटी यांच्या विकारांनी पूर्ण असलेला, शृंगाराच्या आकाराने युक्त असा, मानेच्या हालचालीसह असलेला आणि असलेल्या ठिकाणीच उत्पन्न होणारा तो हाव असे समजावे. जो हाव तीच हेला ललित अभिनयाच्या स्वरूपाची'.

'उत्तमोत्तमके इ०' ह्या लास्याङ्गाचे हे वर्णन तालाध्यायात ३१.३६२–३६४ ह्या श्लोकात आढळते. त्या ठिकाणी बडोदे प्रतीत 'हेलावृत्तिविभूषितम्' असा पाठ आहे. – 'नर्कुटम्' गीतांमध्ये

योजावयाच्या वृत्तांच्या प्रकारांपैकी नर्कुट हा एक असून त्याचे पुन्हा आठ भेद असल्याचे म्हटले असून त्या सर्व भेदांची उदाहरणे ३२.२७३–२९२ यांत दिली आहेत. – '-चेष्टालंकार-' हेला आणि हाव (यांच्या व्याख्या परिच्छेदाच्या शेवटी उद्धृत केल्या आहेत) यांचे निदर्शक जे चेष्टित होते ते चित्तवृत्तिरूप भावांचे अलंकार बनते. हेला, हाव, इत्यादी सर्व विकार भाव आणि रस यांच्या आश्रयाने असणारे अलंकार होत असे २२ व्या अध्यायात ४–५ ह्या श्लोकांत म्हटले आहे. – 'अलौकिकः' मुद्रित पाठ 'लौकिकः' आहे. पण तो बरोबर नाही. लास्याङ्गातून नाट्यात घेतला जाणारा अंश सर्वत्र अलौकिक असल्याचे म्हटले आहे. – 'न हि भगवद्वतारस्य इ०' या ठिकाणी अभिनवगुप्ताला असे म्हणावयाचे आहेसे दिसते की रामचरितावरील काव्यात वीररसाचा परिपोष साधण्यासाठी सीतेच्या अपहरणाची उपेक्षा न करणे, दुष्टांचे दमन करण्याचे क्षत्रियाचे कर्तव्य पार पाडणे इत्यादी उत्साहनिदर्शक गोष्टींचे चित्रण आवश्यक आहे, एखाद्या सामान्य नायकाप्रमाणे रामाच्या संबंधात विप्रलम्भ शृङ्गाराचे वर्णन उचित होणार नाही. अशा तऱ्हेचा निष्कर्ष संभाव्य आहे इतकेच, काही पाठ अशुद्ध अथवा त्रुटित असल्यामुळे खात्री वाटत नाही. मुळातील 'अनुपेक्ष्यम्' च्या जागी 'उपेक्ष्यम्' अशी दुरुस्ती सुचविली आहे. तसेच '-पालनं मुक्त्वा' च्या जागी '-पालनमुक्त्वा' असा पाठ सुचविला आहे. – '-समानयनादारभ्य... दुचितं निमित्तं, परमार्थं' असे हस्तलिखितात आढळते. मुद्रितात '-समानयनाद्युचितं निमित्तं, परमार्थतो' असा पाठ आहे. याच्या नंतरच्या शब्दांपासून काहीच अर्थबोध होत नाही. वर दिलेला पाठ हस्तलिखिताप्रमाणे आहे. मुद्रित पाठ 'न तु यथा प्रतिरूपं "मुहुर्व्याधूतास्तादृश" मित्यादि' असा आहे. या ठिकाणी रामविषयक एखाद्या नाटकातील एका श्लोकाचा निर्देश केलेला असावा असे वाटते. आणि तो श्लोक रामाच्या विरहावस्थेचे वर्णन करणारा असण्याची शक्यता आहे. रामाचे सीतेवरील प्रेम हेच तिला परत आणण्यास कारणीभूत झाले असाही त्या श्लोकाचा अर्थ असणे संभवनीय आहे. – 'तृतीयत्रेता-' यातील 'तृतीय' शब्दाची उपपत्ती नीट लागत नाही. कलियुगापासून उलट मोजले तरच त्रेतायुगाला 'तिसरे' म्हणता येईल. – 'तथा' म्हणजे राम विरहावस्थेत असलेला व सीतेवरील प्रेमामुळे तिच्या सोडवणुकीस सिद्ध झालेला असा अर्थ अभिप्रेत असावा. – 'यत्र यत्र रसनिष्यन्दो' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'तच्च तच्च तास्वनिष्यं' असा भ्रष्ट पाठ आहे. मुद्रित पाठ 'यश्च यश्च रसाभिनिष्यन्दी' असा आहे. तोही चालण्यासारखा आहे. रस असेल तरच ते काव्य हे बरोबर आहे. पण रामविषयक काव्यात विप्रलम्भ शृङ्गार का नसावा ते स्पष्ट नाही. म्हणूनच ह्या उदाहरणाचा वर सुचविलेला आशय बरोबर आहे अशी खात्री वाटत नाही. – 'अन्यतररञ्जनोपक्रम-' म्हणजे प्रेक्षकांचे रंजन करणाऱ्या गोष्टींपैकी एक. यात रसाचा निर्देश अभिप्रेत आहे. – 'संज्ञायां कन्' हे पाणिनीचे ५.३.८७ येथील सूत्र आहे. – 'रसपर्यायि' पर्यायिन् शब्दात परि+इ धातूचा शब्दशः अर्थ अभिप्रेत आहे. रस मध्यवर्ती आणि इतर त्याच्या भोवताली अशी कल्पना आहे. 'असाधारणस्य' श्लोकातील 'अनेक' शब्दाची 'असाधारण' अशी व्याख्या केली आहे. – 'स्थायिनोऽनेकरूपत्वम्' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'स्थायि... प्तपम्' असा त्रुटित पाठ आहे. मुद्रितात 'स्थायिनां बहुत्वनूतनत्वाद् घटनाविचित्रत्वम्' असा विस्तृत पाठ आहे. तो पाठ मूळ असेलसे वाटत नाही. 'रसस्य' एकवचनात आहे, तेव्हा 'स्थायिनां' असे बहुवचनी रूप असण्याचा संभव कमी. – 'परमार्थतोऽभूतैः' यातील अवग्रह हस्तलिखितात नाही. मुद्रित पाठ 'परमार्थताभूतैः' असा आहे. यानंतर जे शब्द आहेत त्यावरून असे दिसते की 'अभूतैः' असे रूप आवश्यक आहे. –

'संभवमात्रतया' ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'संभवमात्रा तथा' आणि मुद्रितात 'संभवमात्रं तथा' असे पाठ आहेत. ते दोन्हीही अर्थबोधास उपयुक्त नाहीत. – 'नवजलधरः इ०' संपूर्ण श्लोक असा –

**नवजलधरः संनद्धोऽयं न दृप्तनिशाचरः**
**सुरधनुरिदं दूराकृष्टं न नाम शरासनम्।**
**अयमपि पटुर्धारासारो न बाणपरंपरा**
**कनकनिकषस्निग्धा विद्युत् प्रिया न ममोर्वशी॥** (विक्रमो०,४.१).

–'अनुरागेणैव' येथील म्हणणे असे की पुरूरव्याला झालेला हा आभास त्याच्या उत्कट प्रेमामुळे होतो. परमार्थतः तेथे राक्षस नसतो (अभूत), परंतु या ठिकाणी कवीने त्याचा संभव कल्पिला आहे. ते पुरूरव्याच्या अनुरागामुळे संभाव्य वाटते. अनुरागाचे हे स्वरूप म्हणजे रति हा जो स्थायिभाव त्याच्या विविध रूपांपैकी एका रूपाचे उदाहरण म्हणून निर्दिष्ट केले आहे. – मूळ श्लोकातील अभिनवगुप्ताचा पाठ 'हेलाहावविभूषितम्' होता हे स्पष्ट आहे. – 'सात्त्विकाद्यभिनयवर्गस्य' ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'सात्त्विकाद्यनुभावे वर्गस्य' आणि मुद्रितात 'सात्त्विकाद्यनुभाववर्गस्य' असे पाठ आहेत. अभिनयाच्या चार प्रकारांपैकी सात्त्विक अभिनय एक आहे. अनुभावांचे विशेषण म्हणून सात्त्विक प्रसिद्ध नाही. – 'तत्राक्षि- इ०' हा बाविसाव्या अध्यायातील १० वा श्लोक आहे. त्या ठिकाणी 'शृङ्गाराकारसूचकः' असा पाठ आहे. तो अधिक समर्पक वाटतो. – 'य एव इ०' बाविसाव्या अध्यायातील हा संपूर्ण श्लोक पुढीलप्रमाणे आहे –

**यो वै हावः स एवैषा शृङ्गाररससंभवा।**
**समाख्याता बुधैर्हेला ललिताभिनयात्मिका॥** (२२.११).

**कोपप्रसादजनितं साधिक्षेपपदाश्रयम्।**
**उक्तप्रत्युक्तमेवं[1] स्याच्चित्रगीतार्थयोजितम्॥ ११४॥**

कोप व प्रसाद यांनी उत्पन्न झालेले, दोषपर वचनांनी युक्त आणि हृद्य अशा गीताच्या अर्थाची योजना असलेले ते उक्तप्रत्युक्त होय.

**अथान्त्यमङ्गं नाट्योपयोगि कर्तुमाह कोपप्रसादजनितमित्यादि । प्रथमार्धेन भाविलक्षणमेकदेशद्वारेणानूद्यते, द्वितीयेन तत आकृष्य वैचित्र्यभागो नाट्योपयोगी कथ्यते । तदयमर्थः । कोपप्रसादजनितं साधिक्षेपपदाश्रयं चेत्यादिरूपं यदुक्तं प्रत्युक्तं च लास्यगाने वक्ष्यते नाट्ये एवमिति समनन्तरमेव वक्ष्यमाणेन पथा स्यात् । तमाह चित्रेति । चित्रं यद्गीतं ध्रुवागानकाव्यं तस्य**

१ नि -मेव स्यात् किंतु गीता-.

योऽर्थस्तेन संयोजनं यस्मिन्नाट्यांशे । उक्तप्रत्युक्ते हि लास्याङ्गा... 'बाले नाथ विमुञ्च मानिनि रुषम्' इत्यादौ भिन्नानां वाक्यखण्डलकानां समन्वयो रसावेशमहिम्नैव । न तु श्रुतिलिङ्गादिप्रमाणषट्कमत्रावकाशं लभते । 'क्वाकार्यं शशलक्ष्मणः क्व च कुलम्' इत्यादावियमेव वार्ता । एवं 'णलिणीदलणीसहमुत्तदेहिआ । अइदुल्लहपडिबद्धाणुराइआ॥' इत्यादेर्द्विपदिकागीतार्थस्याभिनेयकाव्यार्थस्य च 'हिअअ समस्सस' इत्यादेः, रसावेशकृत एवाभिनयार्थसमावेशो लोकापरिदृष्टोऽपि रञ्जनाय सातिशयमुपयोगीति रसावेशवैवश्यप्रसादादित्युक्तप्रत्युक्ताल्लास्याङ्गादुपजीवितः । यद्यपि 'स्थाने ध्रुवास्वभिनयो यः क्रियते' इति नाट्यनिरूपणायां वक्ष्यते तथापि कविना तादृक्काव्यं कार्यं प्रयोक्त्रा च तादृग्गीतं कर्तव्यमिति शिक्षणाय, कुतश्चेदमङ्गमुपजीवितमिति शङ्काशमनाय, रूपकाङ्गत्वेनेहास्याभिधानम्; सामान्याभिनये त्वभिनेयत्वेनास्य निरूपणं भविष्यति 'षडात्मकस्तु शारीरः' इत्यत्र । कोपप्रसादजनितत्वमित्यनेन चित्तवृत्त्यावेशस्थानमस्याङ्गस्य निवेशविषय इत्युक्तम् । उक्तप्रत्युक्तनिर्वचनमहिम्ना चाकाशभाषितात्मकमप्यलौकिकरूपं स्वीकुर्वता तत्सहचरस्वगतजनान्तिकापवारिताद्यप्युपलक्षितम् । न च सर्वथा तन्नाट्ये, लोके क्वचित्संभवात् । नाट्येऽपि गीयमानस्यान्यान्यश्रोतुः काकतालीयवशात् स्वचित्तवृत्त्यार्थसंवादो भवति, यथा हर्षचरिते भगवत्याः सरस्वत्याः 'तरलयसि दृशं समुत्सुकाम्' इत्यपरवक्त्रं शृण्वन्त्याः । तत्सर्वं हि लोके यथा स्यात्तर्हि प्रत्यक्षकल्पं कथमिव तत्र प्रतीतिरिति नास्यरूपतैव भ्रंशेत ।

आता शेवटचे अंग नाट्याला उपयोगी करण्यासाठी 'कोपप्रसादजनितम्' इत्यादी सांगतात. श्लोकातील पूर्वार्धात पुढे करावयाच्या लास्यांगाच्या लक्षणाचा एक भाग उद्धृत केला आहे आणि उत्तरार्धात त्यातून घेतलेला नाट्याला उपयोगी असा वैचित्र्यपूर्ण भाग निर्दिष्ट केला आहे. तेव्हा एकूण अर्थ असा. कोप आणि प्रसाद यांनी उत्पन्न झालेले आणि दोषपर शब्दांनी युक्त इत्यादी स्वरूपाचे जे वचन आणि प्रतिवचन लास्यगानामध्ये निर्दिष्ट केले जाणार आहे ते नाट्यात ह्या प्रकारे म्हणजे आत्ताच सांगणार असलेल्या पद्धतीने असू शकते. ती पद्धत 'चित्र-' इत्यादी शब्दांत सांगतात. चित्र असे जे गीत म्हणजे ध्रुवागानातील काव्य त्याचा जो अर्थ त्याच्याशी समन्वय ज्या नाट्यांशात होतो ते उक्तप्रत्युक्त. कारण उक्तप्रत्युक्तामध्ये लास्यांगातून ... ' "बाले," "नाथ," "हे मानिनि, राग सोडून दे" इत्यादी निरनिराळ्या वाक्यखंडांमध्ये जो समन्वय होतो तो रसावेशाच्या महिम्यामुळेच. श्रुति, लिङ्ग आदी मीमांसेतील सहा प्रमाणांना येथे काहीच अवकाश प्राप्त होत नाही. 'अकार्य कोठे आणि सोमवंशातील कुल कोठे?' इत्यादीमध्ये हीच गोष्ट आहे. याप्रमाणे 'नलिनीदलाप्रमाणे नाजूक व शिथिलगात्र असलेली, अतिदुर्लभ प्रियकरावर जिचे प्रेम जडले आहे अशी' ह्या द्विपदीगीताच्या अर्थाचा आणि 'हृदया, आश्वस्त हो' इत्यादी अभिनयास योग्य अशा

काव्याच्या अर्थाचा रसावेशामुळेच होणारा अभिनयाच्या अर्थाशी समन्वय लोकांत दिसत नसला तरी रंजनाला अतिशय उपयोगी म्हणून रसावेशाच्या विवशतारूप प्रसादामुळे उक्त-प्रत्युक्त ह्या लास्यांगामधून घेतला आहे. जरी नाट्यायिताचे निरूपण करताना 'उचित प्रसंगी ध्रुवागानांमध्ये जो अभिनय केला जातो' इत्यादी सांगणार आहेत तथापि कवीने त्या तऱ्हेचे काव्य रचावे आणि प्रयोग करणाराने त्या तऱ्हेचे गीत करावे हे शिक्षण देण्यासाठी आणि हे अंग कोठून आले या शंकेचे समाधान करण्यासाठी रूपकाचे अंग म्हणून ह्याचा येथे निर्देश केला आहे, परंतु सामान्याभिनय अध्यायात 'षडात्मकस्तु शारीरः' या ठिकाणी अभिनेय म्हणून ह्याचे निरूपण होणार आहे. 'कोप आणि प्रसाद यांनी उत्पन्न' या शब्दांनी चित्तवृत्तीच्या आवेशाचे स्थान तो ह्या अंगाच्या योजनेचा प्रसंग असा अभिप्रेत अर्थ निर्दिष्ट होतो. आणि उक्तप्रत्युक्त या शब्दाच्या अर्थाच्या प्रभावामुळे आकाशभाषिताच्या स्वरूपाचे अलौकिक रूप सुद्धा स्वीकृत केल्याने त्याच्या बरोबर असलेले स्वगत, जनान्तिक, अपवारित इत्यादी सुद्धा उपलक्षित होतात. आणि ते सर्वस्वी नाटयातच असते असे नाही, लोकातही ते क्वचित संभवते. नाट्यामध्ये सुद्धा गीत ऐकणाऱ्या काही श्रोत्यांच्या चित्तवृत्तीचे गाइले जाणाऱ्या अर्थाशी संवादित्व उत्पन्न होते, जसे ते हर्षचरितात 'औत्सुक्य-पूर्ण अशी दृष्टी तू का चंचल करतेस?' इत्यादी अपरवक्त्र ऐकत असलेल्या सरस्वती देवीच्या चित्तवृत्तीचे होते. ते सर्व जर लोकात जसे असते तसेच असेल तर ते प्रत्यक्षासारखे होईल. मग त्या ठिकाणी रसप्रतीती कशी होणार असा प्रश्न उपस्थित होऊन नाटयाचे स्वरूपच नष्ट होईल.

'भाविलक्षणम्' हे लक्षण ३१.३६५–३६७ येथे दिले आहे. परतु तेथील पाठ 'कोपप्रसादबहुलं सविक्षेपैरुपक्रमैः' असा आहे. त्या ठिकाणी अभिनवगुप्तापुढे भिन्न पाठ असण्याची शक्यता आहे. 'च लास्यगाने' ही मुळातील 'तथास्यगाने' ची दुरुस्ती आहे. या मूळ पाठाचा काही अर्थ हो-ण्यासारखा नाही. 'च' आवश्यक आहे. आणि लास्यगान म्हणजे नृत्ताची साथ करणारे गीत हा अर्थ प्रस्तुत संदर्भात समर्पक आहे. 'पथा' ही मुळातील 'पथिना' ची सुचविलेली दुरुस्ती आहे. हे रूप शिष्टसंमत नाही. – 'लास्याङ्ग-' याच्यापुढील टीकेतील काही शब्द गहाळ झाले आहेत. मुद्रितात '(वैचित्र्यं) लास्याङ्गात्स्वीकृतम्' अशी पूर्ती आढळते. पण वैचित्र्याच्या स्वरूपाचा निर्देश केल्याशिवाय अशा तऱ्हेचे विधान केले असण्याचा संभव कमी. उक्तप्रयुक्त लास्याङ्गात कशा तऱ्हेचे गीत असते त्याचे उदाहरण पुढील वाक्यात दिले आहे. त्याचा निर्देश प्रस्तुत वाक्यात केला असण्याचा अधिक संभव आहे. – 'बाले नाथ इ०' अमरुशतकातील हा संपूर्ण श्लोक पुढीलप्रमाणे आहे –

**बाले नाथ विमुञ्च मानिनि रुषं रोषान्मया किं कृतं**
**खेदोऽस्मासु न मेऽपराध्यति भवान् सर्वेऽपराधा मयि।**
**तत्किं रोदिषि गद्गदेन वचसा कस्याग्रतो रुद्यते**
**नन्वेतन्मम का तवास्मि दयिता नास्मीत्यतो रुद्यते॥**

यात उक्त आणि प्रत्युक्त स्पष्ट अहेत. त्या सर्वांत एकसूत्रता शृङ्गाररसाच्या अधिष्ठानामुळे उत्पन्न होते. – 'न तु श्रुतिलिङ्ग इ०' वाक्यांचे अर्थ करण्यासाठी मीमांसकांनी सहा प्रमाणे ठरविली आहेत. अभिनवगुप्तांचे म्हणणे असे दिसते की वरील श्लोकातील वाक्यांच्या परस्पर संबंधाचा बोध त्यातील रसाची प्रतीती झाल्यावरच होतो, मीमांसकांच्या प्रमाणांचा त्या कामी काही उपयोग नाही. पण हे अशा तऱ्हेचे विधान करण्याचे प्रयोजन लक्षात येत नाही. – 'अत्रावकाशं' ही 'अन्यत्रावकाशं' ची दुरुस्ती आहे. मुद्रितात 'तदन्यत्रावकाशं' असा पाठ आहे. – 'क्वाकार्यं इ०' कालिदासाच्या नावावर खपणारा, पण त्याच्या कोणत्याही ग्रंथात न आढळणारा हा श्लोक असा –

**क्वाकार्यं शशलक्ष्मणः क्व च कुलं भूयोऽपि दृश्येत सा**
**दोषाणां प्रशमाय मे श्रुतमहो कोपेऽपि कान्तं मुखम्।**
**किं वक्ष्यन्त्यपकल्मषाः कृतधियः स्वप्नेऽपि सा दुर्लभा**
**चेतः स्वास्थ्यमुपेहि कः खलु युवा धन्योऽधरं पास्यति॥**

यात प्रथमदर्शनी प्रेमात पडलेल्या सोमवंशातील एका राजाच्या मनात उत्पन्न झालेल्या परस्परविरोधी विचारांचे चित्रण आहे. परस्परविरोधी उद्गार म्हणजे उक्त-प्रत्युक्त असे अभिप्रेत दिसते. या उक्त-प्रत्युक्तांचा परस्परसंबंध शृङ्गाररसाच्या अभिनिवेशामुळेच प्रतीत होतो. – 'अभिनेयकाव्यार्थस्य' मुद्रित पाठ 'अभिनये काव्यार्थस्य' असा आहे. पण तो बरोबर नाही. – 'हिअअ समस्सस' हे अभिज्ञानशाकुन्तलातील सातव्या अंकात शकुन्तलेनें हा दुष्यन्तच ही खात्री पटल्यावर काढलेले उद्गार आहेत. द्विपदी हे गीत आहे, तर शकुन्तलेचे उद्गार साधे काव्य आहे. पण दोघांच्याही संबंधात अभिनय केला जातो. गीत आणि काव्य यांच्या अर्थाशी जो अभिनयाचा संबंध प्रस्थापित होतो तो रसावेशामुळे. म्हणून त्यांत उक्ती व प्रत्युक्ती नसल्या तरी रसाभिव्यञ्जक अभिनय हा उक्तप्रत्युक्त लास्याङ्गातील अंश विद्यमान असतो. म्हणजे असा अभिनय हाच लास्याङ्गातून नाट्यात उपयोगी पडणारा अंश घेतला आहे. – 'उपयोगोति' मुळात 'इति' नाही. – 'यद्यपि इ०' येथे शंका अशी उपस्थित केली आहे की अभिनय हेच जर उक्तप्रत्युक्ताचे वैशिष्ट्य असेल तर त्याचा लास्याङ्ग म्हणून निर्देश करण्याची काय आवश्यकता आहे? कारण पुढे २२ व्या अध्यायात ह्या अभिनयाचे विस्तृत वर्णन केलेच आहे. 'स्थाने इ०' ही आर्या अशी –

**स्थाने ध्रुवास्वभिनयो यः क्रियते हर्षशोकरोषाद्यैः।**
**भावरससंप्रयुक्तैर्ज्ञेयं नाट्यायितं तदपि॥ २२.४९.**

– 'तादृक्काव्यं कार्यं' ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'तादृक्काव्यार्थं' आणि मुद्रितात 'तादृक्कार्यं' असे पाठ आहेत. ते अपूर्ण आहेत. – 'रूपकाङ्ग-' येथे निर्देशिलेली लास्याङ्गे रूपकाची अंगे होत. – 'अस्य' म्हणजे अभिनयस्वरूप प्रस्तुत अंगाचे. – 'षडात्मकस्तु इ०' संपूर्ण श्लोक येणेप्रमाणे –

**षडात्मकस्तु शारीरो वाक्यं सूचाङ्कुरस्तथा।**
**शाखा नाट्यायितं चैव निवृत्त्यङ्कुर एव च॥ २२.४३.**

हे शारीर अभिनयाचे सहा प्रकार आहेत. – 'उक्तप्रत्युक्तनिर्वचनमहिम्ना' मुद्रितात 'निर्वचन' शब्द नाही. पण तो आवश्यक वाटतो. 'उक्त-' च्या पूर्वी मुळात 'यतः' शब्द अधिक आहे. त्याचा अन्वय लागण्यासारखा नाही. – 'तत्सहचर-' मुद्रितात 'तत्सहचरं' असा स्वतंत्र शब्द केला आहे. – 'तन्नाट्ये' ही मुळातील 'तन्नाशो' ची सुचविलेली दुरुस्ती आहे. 'तन्नाशः' चा काहीच अर्थ लागत नाही. 'तत्' म्हणजे आकाशभाषित, स्वगत वगैरे. हे प्रकार क्वचित लोकातही संभावतात असा अर्थ असावा. – 'नाट्येऽपि' नंतर मुळात 'इति' शब्द अधिक आहे. त्याचे काही प्रयोजन दिसत नाही. – 'गीयमानस्यान्यान्यश्रोतुः' हस्तलिखितात 'अन्योन्यश्रोतुः' असे आहे. मुद्रित पाठ 'गीयमानः स्यात् अनेन श्रोतुः' असा आहे. त्यातील शब्दांचा अन्वय कसा लावावयाचा हे समजण्यासारखे नाही. – 'तरलयसि इ०' अपरवक्त्रछंदातील हा श्लोक पुढीलप्रमाणे आहे –

**तरलयसि दृशं किमुत्सुकामकलुषमानसवासलालिते ।**
**अवतर कलहंसि वापिकां पुनरपि यास्यसि पङ्कजालयम् ॥**

हंसीला उद्देशून म्हटलेला हा श्लोक ऐकताना शापामुळे पृथ्वीवर जाणे आवश्यक असलेल्या सरस्वतीला त्यातील अर्थ स्वतःला उद्देशून असल्याचेहि प्रत्ययास येते. तसाच अनुभव नाट्यातही काही प्रेक्षकांना येतो. – 'तत्सर्वं हि इ०' ह्या वाक्याचा अर्थ असा दिसतो की लोकव्यवहारात कोणी काही ऐकले तर त्याला प्रत्यक्ष स्वरूपाचे ज्ञान होते. नाट्यातील अनुभव तसाच आहे असे मानले तर हा अनुभव प्रत्यक्षस्वरूपाचाच ठरेल. पण मग तेथे रसास्वाद होत नाही असे मानावे लागेल. कारण रसास्वाद हा प्रत्यक्षादी सर्व अनुभवप्रकारांहून भिन्न आहे हे सहाव्या रसाध्यायावरील टीकेत विस्तृतपणे दाखवून दिले आहे. आणि रसास्वाद नाही तर तेथे नाट्यच नाही असा निष्कर्ष निघेल.

**अन्ये तु चित्रपदं भाविकं चेत्यङ्गद्वयमाहुः पठन्ति च –**
**यत्र प्रियाकृतिं दृष्ट्वा विनोदयति मानसम् ।**
**मदनानलतप्ताङ्गी तच्चित्रपदमुच्यते ॥**
**दृष्ट्वा स्वप्ने प्रियं यत्र मदनानलतापिता ।**
**करोति विविधान् भावांस्तद्धि भाविकमुच्यते ॥ इति ।**

**तच्चेदमसत्, 'लास्ये दशविधम्' इत्यत्रत्येन ग्रन्थेन 'दशाङ्गं लास्यम्' इति च तालाध्याये पठिष्यमाणेन विरोधात् । न चास्योपयोगः कश्चित् । तथा ह्यलौकिककैशिक्युपयोगि रसांशे सर्वथोपकारि यद्वैचित्र्यं तल्लास्याङ्गद्वारेणाह । स्वकार्यं तच्च दशभिरेव संगृहीतम् । तथाहि प्रधाने चित्तवृत्त्यंशे वैचित्र्यं विभावाद्यंशे वा उपरञ्जकभागे वा । तत्र चित्तवृत्त्यंशे वैचित्र्यमुत्तमोत्तमकात् । विभावांशगतं तु वैचित्र्यं सैन्धवकात्, काक्वाद्यंशे स्थितपाठ्यात्, लक्षणगुणाद्यंशे त्रिमूढकात्, वृत्तांशे**

पुष्पगण्डिकात् आहार्ये उपरञ्जकगीतातोद्ययोजने च, सात्त्विके आसीनपाठ्यात्, उपरञ्जकेऽपि शब्दाद् ध्रुवागानभागे सर्वातोद्ययोगे च गेयपदात्, गीतार्थस्य पात्रैः काव्यार्थाभिनये उक्तप्रत्युक्तात्, वाचिकस्य स्वरतालानुसरणे द्विमूढकात्, तत एवाङ्गिकवैचित्र्यमपि । व्यभिचार्यंशे तु वैचित्र्यमुत्तमोत्तमकादेव । तदतोऽतिरिक्तो नास्त्येवांश इति दशैवाङ्गानि । वाग्भागस्तनुत्वेनोपरञ्जकभागः । स्वरसात्मनि हि तद्वैचित्र्ये भूयसा मुनिना निरूपणं कृतम् । अत एव चालौकिको वैचित्र्यांशः प्रत्युत रसे सातिशयोपयोग इति शब्दतो मुनेरनुकारः । रसात्मा नाट्यमिति चाभिप्रेतमिति लक्ष्यते । अलौकिकवैचित्र्यसारो हि रसः । तथा चोक्तं भट्टतोतेन –

लक्षणालंकृतिगुणा दोषाः शब्दप्रवृत्तयः ।
वृत्तिसंध्यङ्गसंरम्भः संभारो यः कवेः किल ॥
अन्योन्यस्यानुकूल्येन संभूयैव समुत्थितैः ।
झटित्येव रसा यत्र व्यज्यन्ते ह्लादिभिर्गुणैः ॥
वृत्तैः सरलबन्धैर्यत्स्निग्धैश्चूर्णपदैरपि ।
अक्लिष्टहृद्यघटनभाषया सुप्रसिद्धया ॥
यच्चेदृक्काव्यमात्रं तद्रसभावानुभावकम् ।
सामान्याभिनये प्रोक्तं वाच्याभिनयसंज्ञया ॥
एवंप्रकारं यत्किंचिद्वस्तुजातं कथंचन ।
अनूनाधिकसामग्रीपरिणामोन्मिषद्रसम् ॥
रसपोषाय तज्जाते नाट्यस्वयंवरे ।
प्रतिभायाः प्रगल्भायाः सर्वमोडुप एष सः ॥ इति ।

संभावनाप्राणनाया हि यल्लोके संभाव्यते परमार्थं तत् । वस्तुतो लोकोत्तरत्वेनैव संभारेण युक्ता कविवाणी हठादेव रसमयी भवति असाधारणताप्राणत्वादिति तत्र तात्पर्यम् ।

परंतु दुसरे टीकाकार चित्रपद आणि भाविक अशी आणखी लास्याङ्गे मानतात आणि पुढील अर्थाचे श्लोक पठन करतात – 'जेव्हा कामाग्नीने दाह होत असलेली युवती प्रियकराच्या चित्राकडे पाहून आपले मन रिझविते तेव्हा ते चित्रपद असे म्हणतात. जेव्हा मदनाग्नीने विव्हल झालेली युवती स्वप्नात प्रियकराला पाहून विविध भाव अभिव्यक्त करते तेव्हा त्याला भाविक म्हणतात.' पण हे बरोबर नाही. कारण 'दहा प्रकारचे लास्य'

असे ह्या ठिकाणी म्हटले आहे त्याच्याशी आणि तालाध्यायात 'दहा अंगे असलेले लास्य' असे म्हणणार आहेत त्याच्याशी ते विरुद्ध आहे. शिवाय ह्याचा काही उपयोगही नाही. कारण असे की अलौकिक अशा कैशिकी वृत्तीला उपयोगी होणारे आणि रसांशाला सर्व प्रकारे उपकारक असे जे वैचित्र्य त्याचा लास्यांगांच्या द्वारा निर्देश केला आहे. आणि ते त्यांचे कार्य दहांनीच स्वीकृत झाले आहे. म्हणजे असे की वैचित्र्य मुख्य जो चित्तवृत्तिरूप भाव त्यात असू शकते किंवा विभावादी अंशामध्ये किंवा रंजन करणाऱ्या भागामध्ये. त्यांपैकी चित्तवृत्त्यात्मक अंशात वैचित्र्य उत्तमोत्तमकापासूनच येते. पण विभावादी अंशात असलेले वैचित्र्य सैन्धवकापासून, काकु आदी अंशातील स्थित-पाठ्यापासून, लक्षण, गुण, आदी अंशातील वैचित्र्य त्रिमूढकापासून, वृत्तरूप अंशातील पुष्पगण्डिकापासून आणि आहार्य अभिनयापैकी रंजन करणाऱ्या गीत व वाद्य यांच्या योजनेतील वैचित्र्य सुद्धा पुष्पगण्डिकापासून, सात्त्विक अभिनयातील वैचित्र्य आसीनपाठ्या-पासून, उपरंजक भागापैकी शाब्दिक अंशातील ध्रुवागानात तसेच सर्व वाद्यांच्या योजनेत वैचित्र्य गेयपदापासून, गीताच्या अर्थाच्या आणि पात्रांनी केलेल्या काव्याच्या अर्थाच्या अभिनयातील वैचित्र्य उक्तप्रत्युक्तापासून, वाचिक अभिनयाच्या स्वर आणि ताल यांनी केलेल्या साथीतील वैचित्र्य द्विमूढकापासून आणि त्यापासूनच आङ्गिक अभिनयातील वैचित्र्य सुद्धा येते. परंतु व्यभिचारिभावरूप अंशातील वैचित्र्य उत्तमोत्तमकापासून येते. म्हणून ह्याहून अतिरिक्त असा अंश नाहीच, तेव्हा दहाच लास्यांगे होत. वाचिक भाग अल्प प्रमाणातच उपरंजक असतो. त्यातील रसात्मक वैचित्र्याविषयी भरतमुनीने खूपच विवेचन केले आहे. आणि म्हणूनच अलौकिक असा वैचित्र्याचा अंश रसाला उलट अतिशय उपयोगी यास्तव मुनीने शब्दांतून त्याचे अनुकरण होत असल्याचे म्हटले आहे. आणि नाट्याचा आत्मा रस हे अभिप्रेत आहे असे दिसून येते. कारण अलौकिक वैचित्र्य हे रसाचे सार होय. भट्टतोताने तसे म्हटले आहे– 'लक्षण, अलंकार, गुण, दोष, शब्दप्रवृत्ती, वृत्ती व संध्यंगे यांचे वैपुल्य ही जी कवीची सामुग्री असते, ज्यात आल्हाददायक गुण परस्परांना अनुकूल असे एकत्रच उत्पन्न झाल्याकारणाने रस तात्काल अभिव्यक्त होतात, जे सरळ रचना असलेल्या वृत्तांनी, कोमल गद्याने आणि प्रसिद्ध आणि अक्लिष्ट व हृद्य घडण असलेल्या भाषेने युक्त असते, अशा प्रकारचे जे काही काव्य असते ते रस आणि भाव यांची प्रतीती देते, त्याचाच सामान्याभिनय अध्यायात वाच्याभिनय नावाने निर्देश केला आहे. अशा प्रकारची जी काही कोणतीही वस्तू असेल, जिच्यात सामुग्री कमी किंवा अधिक नसल्यामुळे परिणामतः रसाचा उन्मेष होतो, ती रसपरिपोषास कारणीभूत होते. प्रगल्भ अशा कविप्रतिभेचा तो आविष्कार होय.' संभावना प्राणभूत मानून लोकात जे कल्पिले जाते ते लौकिक होय. खरे पाहू जाता अलौकिक अशाच सामुग्रीने युक्त अशी कवीची वाणी अवश्यच रसमय होते, कारण असाधारणत्व तिचा प्राण असतो, असे त्या श्लोकांचे तात्पर्य.

'यत्र प्रियाकृतिं इ०' हे दोन्ही श्लोक बडोदे प्रतीत स्वीकारले आहेत. टीपेत ते प्रक्षिप्त असल्याचे म्हटले आहे, तथापि नेहमीच्या प्रथेप्रमाणे ते कंसात छापले नाहीत. – 'लास्ये दशविधं' हा वरील १०४ वा श्लोक. – 'दशाङ्गं लास्यम्' तालाध्यायात हेच शब्द नाहीत. पण ३१.३३०–३६७ मध्ये लास्याङ्गांचे वर्णन आहे, त्यात दहांचाच निर्देश आहे. – 'उपरञ्जकभागे' ही मुळातील 'उपरञ्जकभावे' ची दुरुस्ती आहे. अंश ह्या अर्थाचा 'भाग' शब्दच अपेक्षित आहे. – 'तत्र चित्तवृत्त्यंशे वैचित्र्यमुत्तमोत्तमकात्' ही सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'तत्रानुत्तमोत्तमकात्' असा त्रुटित पाठ आहे. मुद्रितात '(चित्तवृत्त्यंशे प्रच्छेदकाद्)' असा सूचित पाठ आहे. पण प्रच्छेदकापासून चित्रवृत्तिविषयक वैचित्र्य उत्पन्न होते असे मानणे बरोबर वाटत नाही. वर प्रच्छेदकाच्या संबंधात 'अलौकिककालविशेषग्रहणम्' एवढेच त्यातील वैचित्र्य निर्दिष्ट केले आहे. याउलट उत्तमोत्तमकाच्या संबंधात 'चित्तवृत्तिपरिपोष' हाच त्यातील अलौकिक अंश मानला आहे. प्रच्छेदकाचा निर्देश उपलब्ध पाठात नाही हे खरे आहे. पण ऋतु म्हणजे काल याची विभावात (उद्दीपनविभावात) गणना केली असल्यामुळे 'प्रच्छेदकात्' हा शब्द 'विभावांशगतं तु वैचित्र्यं' नंतर पठन करणेच योग्य होईल. – 'सैन्धवकात् इ०' सैन्धवकाचे वैशिष्ट्य भाषाभिन्नता. त्याची विभावात गणना होऊ शकेल. त्यात काकुविषयीचे संकेत भ्रष्ट होतात असे स्पष्टपणे म्हटले असल्यामुळे 'काक्वांशे' चा अन्वय 'स्थिपाठ्यात्' शी लावला आहे. लक्षण, गुण यांतील वैचित्र्य त्रिमूढकातून घेतले आहे हे तर वर म्हटलेलेच आहे. – 'वृत्तांशे' मुळात 'अनुवृत्तांशे' आहे. त्याला काही अर्थ नाही. पुष्पगण्डिकेच्या व्याख्येतच वृत्तांचा निर्देश आहे. – 'उपरञ्जकेऽपि' असा हस्तलिखितात पाठ आहे. मुद्रितात 'उपरञ्जकभावेऽपि' आहे. त्यात '-भागेऽपि' अशी दुरुस्ती आवश्यक आहे. – 'पात्रैः' ही 'पात्रे' ची सुचविलेली दुरुस्ती आहे. तृतीयेने अन्वय अधिक सुलभ होतो. – 'काव्यार्थाभिनये' ही सुद्धा सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'करणार्थाभिनये' आणि मुद्रितात 'करुणार्थाभिनये' असे पाठ आहेत. उक्तप्रत्युक्तात गीतार्थाचा आणि काव्यार्थाचा अभिनय होतो असे वर स्पष्टच म्हटले आहे. शिवाय 'करण' म्हणजे हस्ताभिनय असे मानले तरी त्यानंतरच्या 'अर्थ' शब्दाची उपपत्ती लागत नाही. आणि फक्त 'करुण' रसाचाच अभिनय उक्तप्रत्युक्तात अभिप्रेत नाही. – '-तालानुसरणे' ही '-तालानुसरणा' ची आवश्यक असलेली दुरुस्ती आहे. – 'उत्तमोत्तमकादेव' मुद्रितात 'एवं' असा पाठ स्वीकारला असून तो पुढील वाक्याच्या प्रारंभी घातला आहे आणि 'अतः' शब्द गाळला आहे. पण हस्तलिखितातील पाठच अधिक समर्पक आहे. – 'वाग्भागः इ०' ज्या रूपकाचा प्रयोग करावयाचा त्यातील जो कवीनें लिहिलेला भाग म्हणजे काव्य त्याचा येथे वाग्भाग म्हणून निर्देश केला आहे. त्याचा लास्याङ्गांत साक्षात समावेश होत नाही म्हणून त्यासंबंधी हे निराळे विवेचन केले आहे. त्यात वैचित्र्य असतेच. पण त्या वैचित्र्यात केवळ उपरंजनात्मक भाग अगदी अल्प असतो, रसात्मक भाग अधिक म्हणून नाट्यशास्त्रात छंद, भाषा, अलंकार, लक्षण इत्यादी काव्यांगांचे विस्तृत वर्णन केले आहे. – 'भूयसा' म्हणजे १४,१५,१६ व १७ या अध्यायांत. – 'शब्दतो मुनेरनुकारः' याचा अर्थ स्पष्ट नाही. काव्यातील शब्दांच्या द्वारा रसाचा अनुकार म्हणजे आविष्कार होतो असे मुनीचे मत आहे अशा तऱ्हेचा अर्थ अभिप्रेत असण्याचा संभव आहे. – 'चाभिप्रेतम्' ही 'नाभिप्रेतम्' ची दुरुस्ती आहे. ती उघडच आवश्यक आहे. – 'भट्टतोतेन' हे सहा श्लोक भट्ट तोताच्या काव्यकौतुक नावाच्या ग्रंथातून घेतले आहेत. हा ग्रंथ सध्या उपलब्ध नाही. यांपैकी पहिल्या तीन श्लोकांत काव्याच्या स्वरूपाचे वर्णन

असून नंतरच्या श्लोकांत त्याच्या परिणामाचा निर्देश आहे. – 'दोषाः' दोष टाळावेत या उद्देशाने त्यांचा निर्देश केला आहे. लक्षण, अलंकार वगैरे गोष्टींचे निरूपण १६ व १७ या अध्यायांत केले आहे, वृत्तींचे २० व्या अध्यायात आणि संध्यङ्गांचे प्रस्तुत १९ व्या. –'अक्लिष्ट-' ही 'अश्लिष्ट' ची दुरुस्ती आहे. श्लेषयुक्त नसलेली भाषा किंवा सुसंबद्ध घडण नसलेली भाषा असा अर्थ अभिप्रेत असण्याचा संभव नाही. – 'तद्' ही 'सद्' ची दुरुस्ती आहे. त्यामुळे 'यत्' चा अन्वय लावणे सुगम होते. – 'सामान्याभिनये' बाविसाव्या अध्यायात श्लोक ५१–५९ यांत वाचिक अभिनयाच्या म्हणजे भाषणात दिसून येणाऱ्या आलाप, प्रलाप आदि बारा प्रकारांचे वर्णन आहे. – 'कथंचन' ही हस्तलिखितातील 'अर्थाचन' ची सुचविलेली दुरुस्ती आहे. मुद्रितात '(कथार्पितम्)' अशी दुरुस्ती सुचविली आहे. – शेवटचा श्लोक त्रुटित व अशुद्ध स्वरूपात उपलब्ध झाला आहे. संपादकांनी त्याची पुढीलप्रमाणे दुरुस्ती सुचविली आहे –

रसपोषाय तज्जातं लोकान्नाट्यजगत्स्वयम् ।
प्रतिभायाः प्रगल्भायाः सर्वस्वं कविवेधसः ॥

प्रथम चरणात 'रसपोषाय' नंतर 'नूनं' शब्द असण्याची शक्यता आहे. तसेच शेवटी 'एष सः' च्या ऐवजी 'एव सः' असा मूळ पाठ असण्याचा संभव आहे. स्वयंवराची कल्पना अभिप्रेत असावी, पण ती कशी मांडली असेल ते स्पष्ट नाही. – 'परमार्थं तत्' ही संपादकांनी 'परम् अथ' च्या जागी सुचविलेली दुरुस्ती आहे. ह्या वाक्याचा अर्थ असा दिसतो की लौकिक गोष्टी संभाव्य अशाच असल्यामुळे परमार्थ म्हणजे वास्तव स्वरूपाच्या असतात. याउलट काव्यातील गोष्टी असाधारण असल्यामुळे लोकोत्तर ठरतात आणि रस निष्पन्न करतात. – 'हठादेव' या शब्द-प्रयोगाची समर्पकता स्पष्ट नाही. कदाचित 'स्वयमेव' किंवा 'स्वत एव' अधिक उचित ठरले असते. – 'असाधारणता-' ही 'साधारणता-' ची सुचविलेली दुरुस्ती आहे. रसमय होणाऱ्या कविवाणीला साधारणपणा प्राणभूत मानला असण्याची शक्यता फार कमी. – 'तत्र' म्हणजे भट्ट तोताच्या श्लोकांत.

**[1]एतेषां लास्यविधौ [2]विज्ञेयं लक्षणं प्रयोगज्ञैः ।**
**तदिहैव तु यन्नोक्तं प्रसङ्गविनिवृत्तिहेतोस्तु ॥ ११५ ॥**

प्रयोग करणारांनी ह्यांची लक्षणे लास्यप्रयोगाविषयीच्या नियमांवरून जाणून घ्यावीत. ते मी येथेच सांगितले नाही, याचे कारण विस्तार वाढू नये म्हणून.

**ननु लास्याङ्गेभ्यो यं भागमुपजीवति स तावदिहोक्तः, तेषां तु स्वरूपं वक्त-व्यमित्याशङ्क्याह एतेषां लास्यविधाविति ।**

१ नि एतद्वै. २ नि लक्षणमुक्तं मया तु विस्तरतः

लास्यांगांमधून जो भाग घेतला जातो त्याचा येथे निर्देश केला आहे, परंतु त्या लास्यांगांचे स्वरूप सांगणे आवश्यक आहे अशी शंका घेऊन तिचे निवारण 'एतेषां लास्यविधौ' या श्लोकात करतात.

'यं भागम्' ही मुळातील 'यो भागान्' ची दुरुस्ती आहे. 'यान् भागान्' अशीही दुरुस्ती चालली असती, परंतु पुढे 'सः' असे एकवचनी रूप आहे. 'उपजीवति' चा कर्ता 'नाट्यम्' हा आहे. लास्याङ्गांचे विस्तृत वर्णन ३१ व्या तालाध्यायात केले आहे.

[१]पञ्चसंधि चतुर्वृत्ति चतुःषष्ट्यङ्गसंयुतम् ।
षट्त्रिंशल्लक्षणोपेतं गुणालंकारभूषितम् ॥ ११६ ॥
महारसं महाभोगमुदात्तवचनान्वितम् ।
महापुरुषसंचारं साध्वाचारजनप्रियम् ॥ ११७ ॥
सुश्लिष्टसंधिसंयोगं सुप्रयोगं सुखाश्रयम् ।
मृदुशब्दाभिधानं च कविः कुर्यात्तु नाटकम् ॥ ११८ ॥

कवीने पाच संधींनी युक्त, चार वृत्ती असलेले, चौसष्ट अंगांनी युक्त, छत्तीस लक्षणांनी संपन्न, गुण व अलंकार यांनी सुशोभित, उत्कृष्ट रस असलेले, उत्तम रंजन करणारे, उदात्त वचनांनी युक्त, महान पुरुषांची चेष्टिते असलेले, सज्जनांना प्रिय होणारे, संधींची सुन्दर जोडणी असलेले, उत्कृष्ट प्रयोगास योग्य, सुखाचा आश्रय असलेले आणि कोमल शब्दांचा उपयोग केलेले असे नाटक रचावे.

एतद्दशरूपकलक्षणं कवीनां सुखग्रहणाय राशीकर्तुमाह पञ्चसंधीत्यादि । नाटकमित्यभिनेयमात्रम् । तत्र पञ्चसंधीत्यादि संभवमात्रे मन्तव्यम् । महान्तो रसाः पुरुषार्थोपयोगिनो यत्र । महान् भोगो रञ्जनप्रधानो रसो यत्र । आभोग इत्यन्ये । उदात्तवचनान्वितमिति गुणान् श्लेषप्रसादादीन् स्वीकुरुते । सुश्लिष्टसंधिसंयोगमिति संध्यन्तराणि । सुप्रयोगमिति लास्याङ्गानि । सुखाश्रयमिति छन्दोवृत्तवैचित्र्यम् । मृदुशब्दैरभिधानं वर्णनाविवक्षितस्यार्थस्य यत्रेति माधुर्यप्रसादार्थव्यक्तिगुणानां प्रकर्षणं सूचयति । एवं नाटकं कुर्यात् । यश्च नाटकं कुर्यात्स एव कविः ।

१ नि वृत्तिवृत्त्यङ्गसंपन्नपदार्थप्रकृतिक्षमम् । पञ्चावस्थाभिनिष्पन्नैः पञ्चभिः संधिभिर्युतम् ॥
सन्ध्यन्तरैकविंशत्या चतुःषष्ट्यङ्गसंयुतम् ।

कवींना सुलभतेने ग्रहण करता यावे म्हणून ह्या दहा रूपकप्रकारांचे लक्षण एकत्रित करण्यासाठी 'पञ्चसंधि' इत्यादी श्लोक सांगतात. नाटक म्हणजे अभिनयास योग्य असे सर्व काही. त्यात पाच सन्धी वगैरे जे संभवनीय असेल तेच समजावे. मोठे म्हणजे पुरुषार्थाला उपकारक असे रस ज्यात आहे ते. महान भोग म्हणजे प्रधानतया रंजन करणारा रस ज्यात आहे असे. दुसरे टीकाकार 'आभोग' हा शब्द आहे असे मानतात. उदात्त वचनांनी युक्त या वर्णनाने श्लेष, प्रसाद आदी गुणांचा स्वीकार होतो. सुश्लिष्ट असा संधींचा संयोग असलेले म्हणजे संध्यन्तरांनी युक्त. सुप्रयोग म्हणजे लास्यांगे असलेले. सुखाश्रय म्हणजे छंद आणि वृत्त यांच्या वैचित्र्याने युक्त. मृदु शब्दांनी अभिधान म्हणजे विवक्षित अर्थाचे वर्णन ज्यात आहे ते — याने माधुर्य, प्रसाद, अर्थव्यक्ति ह्या गुणांचा प्रकर्षाने उपयोग सूचित करतात. याप्रमाणे नाटक रचावे. आणि जो असे नाटक रचील तोच कवी.

'आभोग इत्यन्ये' श्लोकातील 'महाभोग' शब्दात दुसरा अवयव 'आभोग' आहे असे या लोकांचे मत. आभोग म्हणजे विस्तार.

**अवस्था या तु[1] लोकस्य सुखदुःखसमुद्भवा ।**
**नानापुरुषसंचारा नाटकेऽसौ[2] विधीयते ॥ ११९ ॥**

सुख व दुःख उत्पन्न करणारी अनेक मनुष्यांची चेष्टिते असलेली जी लोकांची अवस्था ती नाटकात प्रकट केली जाते.

**किं तेनेत्याह अवस्था या त्विति । नानापुरुषेषु संचारः एको भावानुप्रवेशो रसात्मना यस्याः सा तादृशी यतो नाटके विधीयते संपाद्यते रसरूपतां नीयत इत्यर्थः । उक्तं चैतद्वितत्य ।**

त्या नाटकाने काय होते ते 'अवस्था या तु' इत्यादी श्लोकात सांगतात. अनेक प्रकारच्या मनुष्यांमध्ये संचार म्हणजे रसाच्या स्वरूपात एकच भावावेश जिच्यात होतो ती अवस्था, तशी अवस्था नाटकात केली जाते म्हणजे साध्य केली जाते, रसावस्थेप्रत नेली जाते म्हणून असा याचा अर्थ. आणि हे आम्ही विस्तृतपणे सांगितले आहे.

'उक्तं चैतत्' सहाव्या रसाध्यायात.

**न तज्ज्ञानं न तच्छिल्पं न सा विद्या न सा कला ।**
**न तत्कर्म न[3] वा योगो नाट्येऽस्मिन्यन्न दृश्यते ॥ १२० ॥**

१ नि हि. २ नि संभवेदिह. ३ नि न योगोऽसौ नाटके यन्न.

**योऽयं[1] स्वभावो लोकस्य नानावस्थान्तरात्मकः ।**
**सोऽङ्गाद्यभिनयैर्युक्तो[2] नाट्यमित्यभिधीयते ॥ १२१ ॥**

असे ज्ञान नाही, असे शिल्प नाही, अशी विद्या नाही, अशी कला नाही, असे कृत्य नाही किंवा असा योग नाही की ज्याचे ह्या नाटकात दर्शन होत नाही. विविध अवस्थांतून दिसून येणारा जो हा लोकांचा स्वभाव तो आंगिक आदी अभिनयप्रकारांनी प्रकट झाला म्हणजे त्याला नाट्य असे म्हणतात.

**ननु सर्वा चात्र किमवस्थास्तीत्याशङ्क्य प्रथमाध्यायोक्तमेव श्लोकद्वयं पठति न तज्ज्ञानमिति योऽयं स्वभावो लोकस्येति । एतच्च तत्रैव व्याख्यातमिति किं पुनरुक्तेन ।**

यात सर्वच अवस्था असतात काय अशी शंका घेऊन तिच्या उत्तरासाठी पहिल्या अध्यायातीलच 'न तज्ज्ञानम्' इत्यादी आणि 'योऽयं स्वभावो लोकस्य' इत्यादी दोन श्लोक उद्धृत करतात. त्यांची व्याख्या तेथेच केली आहे, तेव्हा येथे पुनरुक्ती कशाला ?

'सर्वा' ही हस्तलिखितातील 'सर्वे' ची दुरुस्ती आहे. मुद्रित पाठ 'सर्वे चात्र किमवस्थाना इत्याशङ्क्य' असा आहे. तो मूळ असण्याची संभाव्यता फार कमी. 'सर्वे' ने त्यात कोणाचा निर्देश अभिप्रेत आहे ते मुळीच स्पष्ट नाही. – हे दोन श्लोक अनुक्रमे १.११६ व १.११९ येथे सापडतील.

**देवतानामृषीणां च राज्ञां चोत्कृष्टमेधसाम्[3] ।**
**पूर्ववृत्तानुचरितं नाटकं नाम तद्भवेत् ॥ १२२ ॥**
**यस्मात्स्वभावं[4] संत्यज्य साङ्गोपाङ्गगतिक्रमैः ।**
**प्रयुज्यते[5] ज्ञायते च तस्माद्वै नाटकं स्मृतम् ॥ १२३ ॥**

देवदेवता, ऋषी, राजे व प्रखर बुद्धीचे लोक यांच्या पूर्वकालीन वृत्तान्ताला अनुसरून होणारी जी क्रिया तिला नाटक असे नाव आहे. ज्या अर्थी स्वाभाविक प्रक्रियेचा त्याग करून अङ्ग, उपाङ्ग यानी युक्त अशा गतींचा उपयोग प्रयोगात केला जातो व त्याचा प्रेक्षकांना बोध होतो म्हणून त्याला नाटक म्हणतात.

१ **का** यो यः. २ **का** साङ्गाभिनयसंयुक्तो. ३ **नि** लोकस्य चैव हि. ४ **नि** स्वभावः संहृत्य. ५ **नि** अभिनीयते गम्यते च.

पूर्ववृत्तानुचरितं कथं नाटकशब्दस्यार्थ इत्याह यस्मात्स्वभावं संत्यज्येति । नट नताविति नमनं प्रह्वीभावलक्षणम् । ये त्वन्ये नट नृताविति पठन्ति तन्मतेऽपीह नमनम् । नटशब्दो जनिदाच्युसूत्रेण व्युत्पादितो गृहीतव्य इति दर्शयति । साङ्गोपाङ्गा ये पदक्रमा गतिवैचित्र्याणि । एतच्च समस्तनाट्याङ्गोपलक्षणम् । प्रयुज्यत इति नटैः, ज्ञायते चेति सामाजिकैः, तेनोभयोरपि नमनमुक्तमिति संभावनाकृतमौचित्यम् ।

पूर्वकालीन वृत्तान्ताला अनुसरून केलेले चेष्टित असा नाटक शब्दाचा अर्थ कसा होतो ते 'यस्मात्स्वभावं संत्यज्य' इत्यादी श्लोकात सांगतात. नट नतौ ह्या धातूपासून नम्र होणे ह्या स्वरूपाचा नमन हा अर्थ निष्पन्न होतो. परंतु जे दुसरे नट नृतौ असा धातू स्वीकारतात त्यांच्या मते सुद्धा ह्या ठिकाणी नमन अर्थ अभिप्रेत आहे. नट शब्द 'जनिदाच्यु' इत्यादी उणादिसूत्राप्रमाणे व्युत्पादित झालेला समजावा हे दाखवितात. अंगे आणि उपांगे यांनी युक्त जे पदक्रम म्हणजे गतीतील वैचित्र्य. आणि हे नाट्याच्या सर्व अंगांचे उपलक्षण आहे. प्रयोग केला जातो तो नटांनी आणि प्रतीती होते ती सामाजिकांना, याप्रमाणे दोघांचेही नमन म्हटले आहे ते संभाव्यतेला अनुसरून असलेले औचित्य होय.

'नट नृतौ' मुद्रितातील 'वृत्तौ' मुद्रणदोष असावा. वर १८.१२ ह्या आर्येवरील टीकेत अभिनवगुप्ताने नट् धातू 'नति' आणि 'नृति' या दोन अर्थी प्रसिद्ध असल्याचे म्हटले आहे (नट नतौ नृतौ इत्युभयथा हि स्मरन्ति). – 'जनिदाच्यु' हे उणादिसूत्र ४.११५ आहे. ह्या सूत्रानुसार नम् धातूला टक् प्रत्यय लागून 'नट' शब्द सिद्ध होतो. याचा अर्थ असा दिसतो की नट शब्दात मूळ धातू 'नट्' असल्याचे जरी म्हटले आहे तरी उणादिसूत्राप्रमाणे त्यात 'नम्' आहे हे सुद्धा अभिनवगुप्ताला मान्य आहे. – 'समस्तनाटयाङ्गो-' ही 'समस्तं नाटयाङ्गो-'ची आवश्यक असलेली दुरुस्ती आहे. – 'संभावनाकृतमौचित्यम्' याचा अर्थ असा दिसतो की नटांनी व प्रेक्षकांनी संभाव्यतेला धरून केलेल्या औचित्यपूर्ण हालचाली म्हणजे त्यांच्यातील नम्रतेचा आविष्कार.

सर्वभावैः सर्वरसैः सर्वकर्मप्रवृत्तिभिः ।
नानावस्थान्तरोपेतं नाटकं संविधीयते ।। १२४ ।।

लोकस्वभावं संप्रेक्ष्य नराणां च बलाबलम् ।
संभोगं चैव युक्तिं च ततः कार्यं[1] तु नाटकम् ।। १२५ ।।

१ नि कुर्यात्तु.

सर्व भावांनी, सर्व रसांनी आणि सर्व प्रकारच्या कर्मप्रवृत्तींनी युक्त, विविध अवस्थांचे दर्शन घडविणारे असे नाटक रचावे. लोकांचा स्वभाव, मनुष्यांचे बल किंवा दुर्बलता, उपभोग आणि युक्ती या गोष्टी लक्षात घेऊन मग नाटकाची रचना करावी.

१२४ आणि १२५ या दोन श्लोकांच्या मध्ये बडोदे प्रतीत पुढील अधिक श्लोक कंसात दिला आहे –

**अनेकशिल्पजातानि नैककर्मक्रियाणि च ।**
**तान्यशेषाणि रूपाणि कर्तव्यानि प्रयोक्तृभिः ॥**

**भविष्यति युगे प्रायो भविष्यन्त्यबुधा नराः ।**
**ये चापि हि भविष्यन्ति ते[1] यत्नश्रुतबुद्धयः ॥ १२६ ॥**
**[2]कर्म शिल्पानि शास्त्राणि विचक्षणबलानि च ।**
**[3]सर्वाण्येतानि नश्यन्ति यदा लोकः प्रणश्यति ॥ १२७ ॥**

पुढे येणाऱ्या युगामध्ये मनुष्य बहुतेक बुद्धिहीन होतील. आणि जे होतील त्यांची सुद्धा बुद्धी प्रयत्नाने कमावलेली अशी असेल. जेव्हा लोकांचा ऱ्हास होतो तेव्हा कर्म, शिल्प, शास्त्र, विचक्षण लोकांचे बल ही सर्व नाश पावतात.

**मृदुशब्देति यदुक्तं तस्य प्रयोजनमाह भविष्यतीति । त्रेतायुगापेक्षया, द्वापरे कलौ वेत्यर्थः ।**

'मृदु शब्द असलेले' असे जे म्हटले आहे त्याचे प्रयोजन 'भविष्यति' इत्यादी श्लोकात सांगतात. त्रेतायुगाच्या दृष्टीने भविष्यकाली, म्हणजे द्वापर किंवा कलि युगात असा अर्थ.
'यदुक्तम्' वर ११८ व्या श्लोकात 'मृदुशब्दाभिधानम्' असे म्हटले आहे.

**तदेवं लोकभाषाणां[4] प्रसमीक्ष्य बलाबलम् ।**
**मृदुशब्दं सुखार्थं च कविः कुर्यात्तु नाटकम् ॥ १२८ ॥**
**चेक्रीडिताद्यैः शब्दैस्तु काव्यबन्धा भवन्ति ये ।**
**वेश्या इव न ते[5] भान्ति कमण्डलुधरैर्द्विजैः ॥ १२९ ॥**

तर याप्रमाणे लोकांच्या भाषांचे बलाबल विचारात घेऊन कवीने कोमल शब्दांनी युक्त व सुखकर आशय असलेले नाटक रचावे. ज्या काव्यांमध्ये चेक्रीडित वगैरे शब्द

१ नि तेऽप्यल्प-. २ नि बुद्धयः कर्म शिल्पानि वैचक्षण्यं कलासु च. ३ घो सर्वाणि पुंसां. ४ नि -भावानां. ५ नि शोभन्ते.

असतात ती कमंडलू धारण करणारे ब्राह्मण समवेत असणाऱ्या वेश्यांप्रमाणे शोभायमान होत नाहीत.

**सुखार्थमित्यर्थव्यक्तिः स्वीकृता ।**

सुखकर अर्थ असलेले – याने अर्थव्यक्ति हा गुण अभिप्रेत होतो.

'चेक्रीडित' हे 'क्रीड्' धातूपासून बनलेले यङ्लुगन्ताचे धातुसाधित विशेषण आहे. हा शब्द मृदु नाही. त्याची कमण्डलुधारी ब्राह्मणाशी तुलना केली आहे.

**[1]दशरूपविधानं च मया प्रोक्तं द्विजोत्तमाः ।**
**अतःपरं प्रवक्ष्यामि वृत्तीनामिह लक्षणम् ॥ १३० ॥**

**इति भारतीये नाट्यशास्त्रे [2]संधिनिरूपणं [3]नामाध्याय एकोनविंशः ।**

हे श्रेष्ठ द्विजांनो, मी दहा रूपकांची रचना समजावून सांगितली आहे. आता यानंतर मी वृत्तींचे लक्षण सांगणार आहे.

येथे भरतमुनिकृत नाट्यशास्त्रातील संधिनिरूपण नावाचा
एकोणविसावा अध्याय समाप्त होतो.

**एतदुपसंहरन्नन्यदासूत्रयन्नध्यायमध्यायान्तरेण संगमयति दशरूपविधानं चेति । शिवम् ।**

'दशरूपविधानं च' ह्या श्लोकात ह्याचा उपसंहार करून आणि दुसऱ्या विषयाचा उपन्यास करून ह्या अध्यायाची पुढील अध्यायाशी संगती लावतात. शिव असो.

**द्विजवरतोतनिरूपितसंध्यध्यायार्थतत्त्वघटनेयम् ।**
**अभिनवगुप्तेन कृता शिवचरणाम्भोजमधुपेन ॥**

**इति महामाहेश्वरश्रीमदभिनवगुप्तविरचितायां नाट्यवेदविवृतावभिनवभारत्यामेकोनविंशः संध्यध्यायः समाप्तः ।**

द्विजश्रेष्ठ तोताने निरूपण केलेल्या संध्यध्यायाच्या अर्थाच्या तत्त्वांची ही मांडणी शिवाच्या चरणकमलातील मधुकर अभिनवगुप्ताने केली.

येथे परम महेश्वरभक्त श्रीमान अभिनवगुप्ताने रचलेल्या नाट्यवेदाच्या
अभिनवभारती विवृतीतील एकोणविसावा संध्यध्यात समाप्त होतो.

१ **नि** इतिवृत्तं ससंध्यङ्गं. २ **नि** संध्यङ्गविकल्पो. ३ **का** नामैकविंशोऽध्यायः.

